सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : पुष्प ४७ वें

# मानवजातीची कथा

डॉ. हेन्री थॉमस यांच्या "The Story of The Human Race"
या पुस्तकाचा अनुवाद



अनुवादक : साने गुरुजी




एप्रिल १९४९ ] [ मूल्य ८ रुपये

# प्रास्ताविक दोन शब्द



या पुस्तकांत इतिहासांतील महत्त्वाच्या घडामोडी मांडल्या आहेत. त्या त्या घडामोडींतील महत्त्वाच्या व्यक्तींभोंवतीं त्या त्या घडामोडी रंगविल्या आहेत. या जगांत स्थूल दृष्टीनें दोन प्रकारचे नेते आढळतात : संस्कृति व सुधारणा यांना पुढें नेणारे आणि त्यांना मागें खेंचणारे. शांतीचे पुरस्कर्ते पहिल्या वर्गात येतात. युद्धें पेटविणारे दुसऱ्या वर्गात येतात. जे मोठमोठे धर्म-स्थापक होऊन गेले, त्यांनीं 'शांतीनेंच खरी प्रगति होते' या तत्त्वावरील आपली श्रद्धा आपल्या जीवनांत उत्कटपणें दाखविलेली आहे. इतिहासाचें नीट निरीक्षण केल्यास आपणांस कबूल करावे लागेल, कीं धर्मसंस्थापकांची ही श्रद्धा यथार्थ आहे. ही श्रद्धा म्हणजे केवळ धर्मग्रंथांतील आशावाद नव्हे; ही श्रद्धा स्वतःसिद्ध असें इतिहासांतील एक सत्य आहे. 'शांतीचे दूतच पृथ्वीचे वारसदार होतील' हा दृष्टिकोन "मानवजातीची कथा" हें पुस्तक लिहितांना डोळ्यांसमोर आहे.

ऐतिहासिक व्यक्तीसंबंधीं लिहितांना मीं स्पायनोझाचा उपदेश डोळ्यां-समोर ठेवला आहे : 'केवळ टीका करणें, केवळ धिक्कारणें ही दृष्टि नसावी, समजावून घेण्याची दृष्टि असावी; वाईट मानल्या गेलेल्या व्यक्तींतीलहि चांगुलपणा दाखविण्याचा यत्न मीं केला आहे. व्यक्तींशीं माझा दावा नाहीं, माझें भांडण नाहीं; पण त्यांच्या कांहीं विचारांशीं मात्र माझें भांडण नक्कीच आहे.

हें पुस्तक पूर्वग्रहदूषित दृष्टीनें लिहिण्यांत आले आहे, असा आक्षेप घेतला जाण्याचा संभव आहे. हा आरोप मी मान्य करतों. केवळ वस्तुनिष्ठ दृष्टीने इतिहास लिहिणे अशक्य आहे. मानवी मन हें कांहीं केवळ त्रयस्थ-पणानें, तटस्थपणानें नोंद करणारे यंत्र नव्हे. आपण ऐतिहासिक घटनांकडे वर वर पाहत नाहीं, तर त्यांतील अर्थ पाहतों, त्यांचें मूल्यमापन करतों.

त्यांतील तर-तम-भाव पाहतों. प्रत्येक इतिहासकार पूर्वग्रहदूषित दृष्टीनेंच लिहितो. आपआपल्या श्रद्धेप्रमाणें व दृष्टीनुसारच प्रत्येक इतिहासकार या जगांतल्या संसाराचें विवेचन करीत असतो. आपल्या तत्त्वज्ञानाच्या रंगीत चष्म्यांतूनच तो मानवी दुःखांकडे व मानवी प्रयत्नांकडे पाहतो ; त्या विशिष्ट दृष्टीनेंच तो या संसार-नाटकाचें परीक्षण करतो. अर्थात् इतर इतिहासकारांप्रमाणें मीहि पूर्वग्रहदूषित आहें हें कबूल करण्यांत मला मुळींच संकोच वाटत नाहीं. आकाशस्थ ग्रहावरून अकस्मात् येऊन पाहणाऱ्या एकाद्या तिऱ्हाइताची शास्त्रीय व अनासक्त दृष्टि माझ्या ठायीं नाहीं व अशा केवळ निःपक्षपाती दृष्टीनें इतिहासाकडे पाहण्याचा यत्न मीं केलेलाच नाहीं. जाणूनबुजून मी एका विशिष्ट बाजूने उभा आहें. प्रस्तुत 'मानवजातीची कथा' हा ग्रंथ लिहितांना न्यायाला अनुकूल व अन्यायाला प्रतिकूल अशी प्रखर पक्षपाती दृष्टि मीं निश्चितपणें व बुद्धिपुरःसरच घेतली आहे.

माझा हा ग्रंथ म्हणजे इतिहासाचें नवें मूल्यमापन करण्याचा प्रयत्न होय. खऱ्या व खोटया लोकनायकांतील फरक स्पष्टपणें दाखविण्यासाठीं हा ग्रंथ आहे. युद्धांचा धांगडधिंगा व रणधुमाळीची घाण या जगांतून दूर करण्यासाठीं हा ग्रंथ आहे. मानवजातीची कथा अधिक सुसंस्कृत व अधिक समतोल दृष्टीनें पुनः सांगण्याचा, अधिक विचारशील दृष्टीनें नव्यानें मांडण्याचा प्रयत्न म्हणजे हा ग्रंथ होय.

— ग्रंथकर्ता

# अनुक्रमणिका



## भाग पहिला : मानवजातीचें बाल्य



## भाग दुसरा : तरवारीचें व फांसाचें थैमान !

## भाग तिसरा : मध्ययुगांतील रानटीपणा



## भाग चौथा : मानवजातीची जागृति



## भाग पांचवा : खऱ्या संस्कृतीचा प्रारंभ

---

प्रकरण १ लें

# आरंभींच्या इतिहासाचें संक्षिप्त अवलोकन

— १ —

माकडांतून उत्क्रांत होत होत प्राणी जन्माला यायला जवळजवळ चार कोटी वर्षें लागलीं. त्याला ताठ उभें राहतां यायला व दगडधोंड्यांनीं आपलें भक्ष्य मारून खातां यायला आणखी तीन लक्ष वर्षें लागलीं. पुढें आणखी पन्नास हजार वर्षें गेलीं आणि त्याला तांब्याचा शोध लागला. मारण्याचीं, संहाराचीं अधिक प्रभावी हत्यारें तो बनवू लागला. त्यानंतर दोन हजार वर्षांनीं त्याला लोखंड सांपडलें. हिंसेचीं साधनें अधिकच प्रखर अशीं तयार झालीं. मारण्याच्या पद्धतींत अधिक कौशल्य आलें. लोखंडाच्या शोधानंतर पाच हजार वर्षांनीं डायनामिटचा शोध लागला. त्यानंतर कित्येक शतकांनीं त्यानें पाणबुड्या बांधल्या व विमानें बांधलीं, आणि दुसऱ्या प्राण्यांचा संहार करण्याची त्याची संशोधक बुद्धि पूर्णतेस पोंचली. मानवाच्या मत्थड मेंदूला ' हिंसा म्हणजे मूर्खपणा आहे ' ही गोष्ट कळायला आणखी पन्नास हजार वर्षें लागतील. संहार करण्यापेक्षां हितकर व उपयोगी अशा दुसऱ्या उद्योगात वेळ दवडणें अधिक चागलें ही गोष्ट तेव्हां त्याच्या लक्षांत येईल.

मनुष्य अगदीं मत्थड प्राणी आहे. फारच हळूहळू त्याची प्रगति होत आली आहे. आणि जी कांहीं थोडीफार प्रगति झाली तीहि सारखी अखंड होत आली असेंहि नाहीं. कधीं प्रगति तर कधीं अधोगति, असें सारखें चाललें आहे. उंचावरून कितीदां तरी हा प्राणी खालीं घसरला आहे; वर चढून पुन्हा कितीदा तो खालीं पडला आहे. आजच्या बहुजनसमाजापेक्षां २४०० वर्षांपूर्वीचे ग्रीक अधिक सुधारलेले होते, अधिक सुसंस्कृत व प्रगत होते. १९०० वर्षांपूर्वींच्या रोम शहरांत कचरा व घाण वाहून नेण्याची आजच्यापेक्षा अधिक उत्कृष्ट पद्धति होती. याच्या उलट तीनशें वर्षांपूर्वींच्या बर्लिन

शहरामधील पीटरच्या चर्चसमोर कचऱ्याच्या व घाणीच्या राशी पडलेल्या असत व नाकाला रुमाल लावावा लागे. इ. स. १६५० पर्यंत पॅरिस शहरांतील लोक रस्त्यावर मलमूत्राचीं भांडीं खुशाल फेंकीत. १८४९ मध्यें इमर्सन हा बोस्टन शहरांत रहात होता. तेथील नागरिकांनीं जरा नीट वागावें म्हणून तो किती खटपट करायचा. १९२९ मध्यें या बोस्टन शहरांतच सरकारी निरीक्षकांना " स्ट्रेंज इन्टरल्यूड " या बोलपटाला बंदी करावी लागली.

मानवी प्रगतीचा प्रवाह फार आस्ते आस्ते चालला आहे. एवढेंच नव्हे, तर मनुष्याच्या आडमुठेपणामुळें व मूर्खपणामुळें हा प्रवाह पुन्हा पुन्हा मागें सारण्यांतहि आला आहे. इतिहासाचें सम्यक् आकलन होण्यासाठीं या दोन गोष्टी सदैव ध्यानांत ठेविल्या पाहिजेत. तिसरीहि एक महत्त्वाची गोष्ट आपणास सांगतों. आणि ती म्हणजे मनुष्य हा फार आळशी प्राणी आहे. तो आपण होऊन कधींहि प्रगति करणार नाहीं. प्रगतीचा त्याला तिटकारा आहे. ही नसती उठाठेव कशाला ? कां ही डोकेफोड ? असें त्याला वाटतें. कधीं मोठें संकट, फार मोठी आपत्तीच आली तर तो पाऊल पुढें टाकूं पाहतो. शत्रूचा हल्ला आला, नैसर्गिक उत्पात झाले तरच तो हातपाय हालवतो, डोकें चालवतो. प्रगति करायची कीं आजि नष्ट होऊन जायचें, असाच प्रश्न जेव्हां समोर उभा राहतो तेव्हांच हा मनुष्य प्राणी जरा निराळें वळण घेतो, थोडी प्रगति करतो.

ह्या नैसर्गिक आपत्ती म्हणजे प्रगतीची प्रेरणा. अशीच एक पहिली प्रेरणा त्या मोठ्या हिमयुगांत आली.

— २ —

इतिहासपूर्व काळीं युरोपची व आशियाची हवा आजच्यापेक्षां बरीच उष्ण होती ; अधिक उबदार होती. आपले केसाळ पूर्वज रानावनांतून भटकत ; कंदमुळावर, पानाफळांवर रहात ; मिळालेंच कधीं तर कच्चें मांस खात. त्यांचें हाडपेर बळकट होतें, परंतु पाय जरा वांकलेले होते. त्यांना तितकें नीट ताठ उभें रहातां येत नसे. जरा बुटबैंगण असे ते होते. आजच्या स्त्री-पुरुषांपेक्षां ते आकारानें बरेच लहान होते. विस्तवाचा शोध अद्याप त्यांना लागला नव्हता. त्यांच्या अंगावर वस्त्र नव्हतें. त्यांची भाषाहि नीटशी नव्हती. निरनिराळे

आवाज व आरोळ्या यांनी मनांतील भाव ते एकमेकांस दाखवीत. भूक लागली म्हणजे ते कधीं कधीं एकटे किंवा कधीं दोघेतिघे असे भक्ष्याच्या शोधार्थ निघत. भूक शांत झाली म्हणजे एकाद्या वृक्षाच्या किंवा दगडाच्या छायेंत पाय पोटांत घेऊन ते बसत. पुन्हा भूक लागली किंवा शत्रूच आला, एकादा अधिक बलवान् प्राणी आला तरच ते मग उठत.

अशा रीतीनें दहा लक्ष पिढ्या गेल्या ; आणि एके दिवशीं आपल्या या आलस्यमय जीवनांतून ते खडबडून जागे झाले. डोंगरांतून, पहाडांतून अपरिचित प्राणी धांवत आले ; भीतीनें आरोळ्या मारीत, किंचाळ्या फोडीत ते आले. ज्या दिशेनें ते आले त्या दिशेकडे ते भीतीनें पहात होते. काय दिसत होतें तिकडे ? दूर भुरेंभुरें असें कांहींतरी दिसत होतें. एकाद्या प्रचंड अक्राळ-विक्राळ जिवंत प्राण्याप्रमाणें ती वस्तु हळूहळू पुढें येत होती. हवा अति गार-गार वाटूं लागली. सर्वांना अस्वस्थ वाटूं लागलें. आकाश काळेंकाळें झालें. आणि आकाशांतून पृथ्वीवर बारीकबारीक तुकड्यांची प्रचंड वृष्टि होऊं लागली, आणि आकाशांतील त्या हिमशलाका उघड्या शरीरांवर पडूं लागल्यावर काय दुर्दशा झाली असेल तिची कल्पना करा ! सारें शरीर जसें बधिर झालें. दांत-खिळ्या बसल्या. एक प्रकारचें तीव्र व अननुभूत असें दुःख होऊं लागलें. ती पहिल्या हिमपाताची वेळ होती.

त्या येणाऱ्या हिमवृष्टीपासून ते लोक पळाले. परंतु कितीतरी जणास भरभर पळतां येईना. पुष्कळ जण थंडीनें गारठून मेले. जे दूर गेले व वांचले, त्यांनीं खोल गुहांमध्यें आश्रय घेतला. ऊब मिळावी म्हणून व संरक्षण व्हावें म्हणून सारे एकमेकांस खेटून, जसे कांहीं चिकटून बसले. आपल्या त्या वानरसदृश पूर्वजांना सामाजिक जाणिवेची ती पहिली प्रभा त्या वेळेस मिळाली. सामाजिक—सामुदायिक जाणिवेची ती पहिली अंधुक उषा होती. मानवतेच्या उंबरठ्यावर प्रथमच ते चढत होते—पहिलें पाऊल टाकीत होते.

जरूर पडली, आणि अन्नासाठीं म्हणून ज्या प्राण्यांना ते मारीत त्यांची कांतडीं सोलून काढून त्यांनीं तीं स्वतःच्या अंगाभोंवतीं गुंडाळलीं. थंडीपासून बचाव करणें जरूर होतें. आणि पुढें विस्तवाचा शोध त्यांनीं लाविला. दोन काष्ठें एकावर एक घांसून ठिणगी पडते हें त्यांनीं पाहिलें. थंडीपासून रक्षण करून घेण्यासाठीं हें चांगलेंच साधन मिळालें. तसेंच स्वतःचें रक्षण व्हावें म्हणून

गुहांत शिरून बसलेल्या इतर क्रूर पशूंपासूनहि या विस्तवाच्या शोधामुळें स्वतःचा बचाव त्यांना करतां येऊं लागला. हा विस्तवाचा शोध हिमपातानंतर कितीतरी हजार वर्षांनीं त्यांना लागला. जवळजवळ पन्नास हजार वर्षांपूर्वी हा विस्तवाचा शोध लागला असावा. १८ व्या शतकांतील विजेचा शोध जितका महत्त्वाचा, तितकाच महत्त्वाचा हा प्राचीन अग्निशोध होता.

विस्तवाचा शोध लागला. कांतडीं पांघरूं लागले. त्याचबरोबर प्रकट वाणीहि जन्मली. बोलायला लागण्यापूर्वी ते आधीं गाऊं लागले असावेत. ज्या वेळेस त्यांना अस्वस्थ व असुखी वाटत असे त्या वेळेस ते सारे एकदम दुःखानें किंचाळत; जेव्हां एकादी सुंदरशी शिकार त्यांना मिळे, किंवा स्वच्छ सूर्यप्रकाश पडे, तेव्हां ते आनंदानें आवाज करीत. हळूहळू या सर्वांतून अतुटक असें 'क' वर्गातील गान निर्माण झालें. त्यांच्यांतील जे अधिक प्रतिभावान् व प्रगतिशील होते ते आपल्या मनांतील नवीनच उगवलेले विचार अधिक स्पष्टतेनें प्रकट करूं लागले. आपल्या आवाजांत भर घालून, त्याला कांहीं जोडून, ते विचार प्रकट करूं पहात. अशा रीतीनें मानवी भाषेंतील पहिलीं अक्षरें जन्मास आलीं.

वाणीमुळें ज्याप्रमाणें मनुष्यप्राणी इतर प्राण्यांपासून पृथक् झाला, त्याचप्रमाणें हत्यारांच्या व नानाविध यंत्रांच्या शोधामुळेंहि हा गुहेंतील मानवप्राणी मानवेतर प्राण्यांपासून निराळा झाला. आणि पहिलें यंत्र म्हणजे आपला हात. आपल्या या हातानें फेंकतां येतें हा अगदीं आरंभींचा अति महत्त्वाचा शोध. हातानें जवळच नव्हे, तर लांब अंतरावरसुद्धां दगड मारतां येतो हा शोध ज्या आदि काळांतील एडिसननें लाविला त्याचें मानवजातीवर फार ऋण आहे. तो अज्ञात असा एडिसन अत्यन्त बुद्धिमान् असला पाहिजे. संस्कृति व सुधारणा त्याची अत्यंत ऋणी आहे. मारण्याची जी सुंदर कला तींत त्या वेळेपासून मनुष्य इतर प्राण्यांच्या सदैव पुढें राहिला !

वस्तु कशी फेंकावी हें कळतांच फेंकण्याच्या निरनिराळ्या वस्तूंचा—अधिक प्रभावी हत्यारांचा—शोध होऊं लागला. दगडधोंडे व काठ्यालाठ्या त्याला अपुऱ्या वाटूं लागल्या. आपलें भक्ष्य अधिक सहजतेनें मारतां यावें म्हणून घांसून घांसून अणकुचीदार काठी तो करूं लागला. दगडांनासुद्धां धार लावून त्यांचे सुळके तो करी. मृतपशूंचें कांतडें सोलून काढण्यासाठीं, तसेंच मांसखंड

करण्यासाठीं या पाषाणी हत्यारांचा उपयोग मनुष्य करूं लागला. स्वतःसाठीं व कुटुंबातील इतरांच्यासाठीं तो अशा प्रकारें मांस तोडी.

आणि अशाच रीतीनें हळूहळू प्रगति होत आजचीं वाफेचीं यंत्रें जन्मलीं. विद्युद्यंत्रें जन्मलीं. हे शोध लागणें ही गोष्ट आश्चर्याची नसून हे शोध लागायला इतकीं हजारों वर्षें लागलीं हें आश्चर्य होय. वास्तविक चारपांचशें वर्षांतच हे शोध लागले पाहिजे होते. परंतु यासंबंधीं पुढें बोलूं. सध्यां मानवजातीच्या त्या आरंभींच्या प्रगतीसंबंधींच बोलूं. हीं जीं पहिलीं ओबडधोबड हत्यारें मानवानें निर्मिलीं, त्यांच्या साहाय्यानें दोन गोष्टी त्याला करतां येऊं लागल्या. स्वतःचें संरक्षण करणें व दुसऱ्यास मारणें. परंतु आपल्या ह्या अगतिक व एकाकी प्रयत्नांनीं तो या दोन्ही बाबतींत फारशी प्रगति करूं शकला नाहीं. आपणाहून अधिक सामर्थ्यसंपन्न अशी एकादी वस्तु त्याला पाहिजे होती; त्या सामर्थ्यसंपन्न शक्तीचें साहाय्य त्याला हवें होतें. आणि अत्यंत महत्त्वाचा असा एक शोध लावण्यांत त्याला यश आलें. मानवानें ईश्वराला निर्मिलें. देवाचा किंवा अनेक देवांचा शोध लागला.

देवाचा शोध कसा लागला याविषयीं नाना उपपत्ती आहेत. परंतु सर्वांत अधिक शक्य अशी पुढील उपपत्ति वाटते. मानवप्राणी स्वतःच्या छाया पाण्यांत बघत. स्वप्नांत आपल्या मित्रांच्या आकृती ते बघत. आपणां सर्वांस जणूं दोन शरीरें आहेत असें त्यांना वाटलें. एक हें दैनंदिन इंद्रियगम्य शरीर, ज्याला आपण हातांनीं स्पर्श करतों; आणि विशिष्टच प्रसंगीं कधींकधीं दिसणारें व बहुधा नेहमीं अदृश्य असणारें असे तें दुसरें छायामय शरीर. मनुष्य मरतो तेव्हां त्याचें तें स्थूल शरीर पुरलें जातें; परंतु त्याचें तें दुसरें छायामय शरीर नष्ट होत नाहीं. तें स्वप्नांत आपणांस दिसतें, भेटतें. तें छायामय शरीर कोठेंतरी जिवंत असलेंच पाहिजे.

समजा, एकाद्या जातीजमातीचा प्रमुख मनुष्य मेला. तो जिवंत होता तेव्हां त्याला सारे भीत; परंतु आतां मेल्यावर तो अधिकच भीतिप्रद झाला. कारण त्याचें तें छायाशरीर आतां अदृश्य असणार. छायाशरीरधारी तो नायक कधीं येईल व हल्ला करील तें कळणारहि नाहीं. आपण कदाचित् त्याला असंतुष्ट केलें तर काय होईल, काय न होईल, असें या दुबळ्या व दुर्दैवी मानवाला वाटे.

त्याची कृपा असावी म्हणून पूजा, प्रार्थना, देणग्या यांची लांच त्याला सुरू झाली. या प्रबळ व भयंकर दूताला संतुष्ट ठेविलें पाहिजे. हा प्रेतात्माच प्रचंड वादळाचे वेळीं कडाडतो, गरजतो ; ज्वालामुखींच्या रूपानें त्याचाच क्रोधाग्नि प्रकट होतो ; ज्यांच्यावर त्याची अवकृपा होते, त्यांच्यावर रोगांची, मृत्यूची कृपा होते ; नवीन जन्मणाऱ्या मुलांमध्यें प्राण तोच घालतो. ( त्या आदिमानवाला लैंगिक संबंधापासून नवीन जीव जन्माला येतो याची अर्थातच अजिबात कल्पना नव्हती. ) हा जो शक्तिमय, छायामय प्रेतात्मा त्याच्या ताब्यांत आणखी एक अपूर्व अशी गोष्ट होती. हवेत तरंगणारी अशी ही गूढ रहस्यमय वस्तु होती. तिचें नांव दैव. हें दैव कधीं हात देई तर कधीं दूर लोटी. तुम्ही व तुमचे मित्र एके दिवशीं युद्धाला गेलांत. तुमचा मित्र मारला गेला आणि तुम्ही वांचलेत. कां ? तुम्ही कांहींतरी महत्त्वाची अशी एक गोष्ट केली असावी, कीं जी तुमच्या मित्रानें केली नाहीं. परंतु हें तुम्ही कसें सांगणार, तुम्हाला काय माहीत ? कांहीं शहाणे लोक पुढें आले. त्यांनीं या गोष्टीचा शोधबोध करण्याचें ठरविलें. ते दैवज्ञ झाले. ते धर्मोपाध्याय झाले, मंत्रज्ञ झाले. ते छायात्मे, तो तुमचा देव, त्याची कृपा व्हावी व त्याची अवकृपा टळावी म्हणून काय करावें, काय करूं नये तें ते सांगू लागले. असें केल्यानें तुमच्या सुदैवाचा भाग तुम्हांस मिळेल असें ते सांगत. या धर्मोपाध्यायांची आज्ञा सदैव मानलीच पाहिजे. आज्ञाभंग कराल तर मरणाची किंमत द्यावी लागेल !

त्या प्राचीन जगांत अशा कांहींतरी प्रकारानें धर्म अस्तित्वांत आला. पहिले देव म्हणजे मृत नायकांचे प्रेतात्मे असत. अशा रीतीनें आरंभीं मानवानें ईश्वर निर्मिला. त्यानें स्वतःच्यासारखाच हा ईश्वर निर्मिला. आणि असा हा ईश्वर निर्मून त्याच्यासमोर तो लोटांगण घालूं लागला. आपल्या या देवासमोर जो कोणी गुढगे टेंकणार नाहीं त्याला तो ठार करी.

ईश्वराचा शोध लागल्यानें कांहीं दुष्ट गोष्टी सुरू झाल्या. परंतु या शोधाबरोबर कांहीं भलेंहि जन्मलें. मनुष्यांतील कलात्मकतेचा जन्म याच वेळेस झाला. धर्माच्या पाठोपाठ कला आली. सुदैवाचा संपूर्ण वांटा मिळावा म्हणून, विशेषतः शिकार चांगली सांपडावी म्हणून, जे प्राणी मारण्याची इच्छा त्या आदिमानवाला असे, त्या प्राण्यांचीं चित्रें तो गुहांच्या तोंडावर काढूं लागला.

भाल्यानें त्या चित्रमय आकृतींना जर दुरून नेम मारतां आला तर शिकारींत यश येईल असे तो समजे. ज्या प्राण्यांच्या त्या आकृती असत, त्या प्राण्यांना मारायला देव आपणांस समर्थ करतील असें तो मानी. आकृति जितकी हुबेहूब असेल, तितका त्या प्राण्याच्या शिकारीचा संभव अधिक. म्हणून आपल्या कलेंत निर्दोषता यावी यासाठीं तो तासन् तास दवडी. सुधारणेच्या व संस्कृतीच्या त्या आरंभकाळीं गुहांच्या तोंडांवर रंगवलेलीं तीं चित्रें आजच्या वास्तववादी यथार्थ चित्रांहून फार कमी दर्जाचीं आहेत असें नाहीं.

मंत्रतंत्रांवर, जादूटोण्यांवर हा जो विश्वास होता, त्यांतून ती पहिली सौंदर्याची जाणीव जन्माला आली. परंतु पुढें लौकरच म्हणजे आणखी दहा हजार वर्षांनीं कलेसाठीं म्हणून कला तो उपासूं लागला. हिमयुगाच्या आरंभीं स्वसंरक्षणार्थ हत्यारें व साधनें त्याला शोधावीं लागलीं हें आपण पाहिलेंच. पुढें जेव्हां त्याचीं संकटें कमी झालीं तेव्हां त्याला फुरसत मिळाली. आपलीं हत्यारें तो भुषवूं लागला. त्यांच्यांत सौंदर्य व सुभगता आणूं लागला. त्याच्या त्या दगडी कुऱ्हाडीला हातांत धरण्यासाठीं दांडा तर हवाच, परंतु तो दांडा सुंदरहि असला पाहिजे. त्या दांड्याचा आकार त्यानें हातासारखा केला; इतकेंच नव्हे, तर त्यानें त्याला घांसून घांसून गुळगुळीत केलें. त्याच्यावर सुंदर आकृति त्यानें काढल्या. मनुष्य केवळ भाकरीनें जगत नाहीं ही गोष्ट आपल्या पूर्वजांनीं मानवी जीवनाच्या अगदीं आरंभींच जणूं ओळखली. आजचा सौंदर्योपासक मानव हा कांहीं नवीन प्रकार नव्हे. मी सुंदर आहें म्हणून मीं जगावें. सौंदर्यासाठीं म्हणून सौंदर्य, ही भावना पंचवीस हजार वर्षांची तरी जुनी आहे.

आपले पूर्वज दुसरी एक कला लौकरच शिकले व ती वाढवते झाले. ही कला म्हणजे युद्धाची कला. त्या वेळेस अन्न फार कमी असे. अन्नप्राप्तीचीं साधनें अपुरीं होतीं. अशा वेळेस एका जमावाला दुसऱ्या जमावाशीं, एका व्यक्तीला दुसऱ्या व्यक्तीशीं अन्नासाठीं लढावें लागे. आपलें जीवन मोठ्या मुष्किलीनें त्यांना टिकवावें लागे. तशा प्रकारच्या संहाराची वास्तविक आतां जरूर नाहीं. परंतु संहाराची लालसा मानवी हृदयांत पूर्वीइतकीच आजहि तीव्र आहे. प्रत्येक सुधारलेल्या देशांत युद्ध ही अत्यंत लोकप्रिय कलांपैकीं एक कला अद्याप मानिली जात आहे.

प्राचीन इतिहासाच्या या संक्षिप्त वर्णनावरून आपणांस दिसून येईलच कीं, जे गुण वा दुर्गुण आजच्या अर्वाचीन माणसांत आहेत तेच बहुतेक सारे पंचवीस हजार वर्षांपूर्वीच्या आपल्या वानरसदृश पूर्वजांमध्येंहि होते. गुणाच्याविषयीं म्हणायचें झाले, तर त्या बाबतींत आपण कांहीं अधिक प्रगति केली आहे असें नाहीं. आणि दुर्गुणहि आपण दूर केले आहेत असें म्हणतां येणार नाहीं. मनुष्य हा होतां होईतों आपली मूर्खता टाकूं इच्छीत नसतो.

— ३ —

सुसंस्कृत व सुधारलेल्या जीवनाकडे मानवप्राणी कसा चांचपडत जात होता त्याचें अत्यंत त्रोटक दर्शन आपण घेतलें. हिमप्रपातामुळें मनुष्य एकमेकांच्या कसा जवळ येऊं लागला तें आपण पाहिलें. हिमप्रपाताचे चार काळ होऊन गेले. सामाजिक जीवनाची पहिली जाणीव त्या संकटसमयीं झाली. विस्तवाचा शोध लागला. कपडे करूं लागले. हत्यारें बनवूं लागले. भाषा निर्माण झाली. देवदेवता उत्पन्न झाल्या. चित्रकला, प्रार्थना व संहार या कलांत त्यांनीं बरीच प्रगति केली. त्या अति प्राचीन काळाविषयींची आपणांस उपलब्ध झालेली माहिती अद्याप फारच अपुरी आहे. सापडलेलीं कांहीं हाडें, कांहीं कवट्यांचे अवशेष, जमिनींतून खणून काढलेलीं कांहीं हत्यारें, गुहांच्या व घराच्या भिंतींवरून रंगविलेलीं कांहीं चित्रें; बस्, हीच आपली सामग्री. या आधारावर त्या प्राचीन काळांतील इतिहास उभारावयाचा. परंतु या तुटपुंज्या साधनांनीहि इतिहासाच्या अभ्यासकांनीं आपल्या त्या इतिहासकाळपूर्व पूर्वजाच्या जीवनाचें नीटनेटकें चित्र तयार केलें. माहिती नीट जुळवून त्या जीवनाची चांगली कल्पना येईल असें केलें. बारीकसारीक तपशिलाचे बाबतींत मतभेद असूं शकतील. परंतु त्या चित्रातील मुख्य मुख्य गोष्टींसंबंधीं साधारणतः सर्वांचें एकमत आहे.

वानरापेक्षां थोड्या उच्च भूमिकेवर तो पहिला मानव उभा होता. त्या हिमप्रपातामुळें त्याची सुधारणा झाली. सुमारें बारा हजार वर्षांपूर्वी त्या हिमवृष्टीनंतर ज्या भूमिकेवर मानव उभा होता, ती भूमिका आजच्या सर्वसाधारण मनुष्याच्या भूमिकेपेक्षां फारशी खालची नाहीं. ख्रिस्तशकापूर्वी सुमारें दहा हजार वर्षें जे आपले पूर्वज होते, ते जरी फार सुधारलेले नसले, तरी

बऱ्याचशा गोष्टी त्यांना अवगत झाल्या होत्या. पाककला, कुंभारकाम, टोपल्या विणणें, वस्त्रें विणणें, इत्यादि बाबतींत त्यांनीं बरीच प्रगति केली होती. कुत्रीं, गायी-गुरें, शेळ्या-मेंढ्या, डुकरें इत्यादि प्राण्याना माणसाळविण्यास ते शिकले होते. मुंगीच्या मेंदूइतपत त्यांची प्रगति झाली होती. मुंगी ज्या गोष्टी करूं शकते त्या ते करूं लागले होते. बुद्धीची तितपत वाढ झाली होती. मुंग्यासुद्धां आपला नातलग जो मानवप्राणी त्याच्याप्रमाणें खालच्या जीवजंतूंना माणसाळवितात. त्यांना आपलें घरकाम करायला लावतात. मुंग्यांचींसुद्धां गायीगुरें असतात. कांहीं विशिष्ट जंतू मुंग्या पाळतात. दुधासारखा द्रव ते जंतू देतात. त्या जंतूंच्या पाठीवर थोपटून मुंग्या हा रस काढतात. या आपल्या गायींसाठीं मुंग्या गवताचे व बारीक रेशमी धाग्याचे गोठे बांधतात. या गोठ्यांत त्या गायींना मुंग्या दवडतात. बारा हजार वर्षांपूर्वींचा मानवहि हें सारें करूं लागला होता व ओबडधोबड गोठ्यांत गायीगुरें ठेवूं लागला होता.

त्या इतिहासपूर्व काळांत ज्या गोठ्यांतून गायीगुरें रहात त्यांतच माणसेंहि रहात. जेथें गुरें तेथेंच गुरांचे धनी. हे गोठे किंवा या झोंपड्या सरोवराच्या मध्यभागीं कांहींतरी उंच उभारून त्यावर बांधण्यांत येत. किनाऱ्याशीं लांकडी पुलाच्या योगानें या झोंपड्या जोडलेल्या असत. हे पूल रात्रींच्या वेळेस काढून ठेवीत. कोणी शत्रु येऊं नये म्हणून. या झोंपड्यांतील जागा शेणानें लिंपलेली असे. शेण आधीं पायांखालीं खूप तुडवीत. घरांतील एका बाजूला गायीगुरें असत. एका बाजूला माणसें, स्त्रिया, पुरुष, मुलें, गायीगुरें—सर्वांमिळून जणू झालेलें कुटुंब. जरा गोंगाट असे. शांति नसे. परंतु बरें होतें. लोक जमिनीवरच खालीं बसत; तेथेंच खात; तेथेंच झोंपत. खुर्च्या, खाटा, मेजें, इत्यादि प्रकार करावयास मनुष्य अद्याप शिकला नव्हता. ताटें, चमचे, सुऱ्या, चाकू इत्यादि प्रकार अजून नव्हते. खिस्तशकाच्या पंधराव्या शतकापर्यंत जेवणाच्या कांट्यांचा शोध लागला नव्हता. कांट्याचा शोध लावण्याइतपत हुशार मेंदू इसवी सनाच्या पंधराव्या शतकापर्यंत तयार झाला नव्हता.

बारा हजार वर्षांपूर्वींचे युरोपांतील हे आपले सरोवरनिवासी पूर्वज असे होते. दहाबारा पिढ्यापूर्वींच्या युरोपांतील शेतकऱ्यांची जी स्थिति होती, तीच त्या बारा हजार वर्षांपूर्वीं युरोपांत वसाहत करणाऱ्या त्या सरोवरवासीयांची

होती. केनट्की पर्वतांत रहाणाऱ्या आजच्या डोंगरी लोकांचा जितपत मानसिक विकास आहे त्याहून त्या बारा हजार वर्षांपूर्वीच्या युरोपांतील सरोवरवासीयांचा मनोविकास कमी नव्हता. जीवनाच्या शाळेंतील मानवप्राणी हा अत्यंत गचाळ व मंदबुद्धि असा प्राणी आहे.

— ४ —

सरोवरवासीयांच्या काळांतच मानवजातीचे चार मुख्य वंश झाले होते : गोरे, पिवळे, आफ्रिकी व आस्ट्रालिया. आफ्रिकी व आस्ट्रालिया हे काळे होते. हे चारी वंश त्याच मूळ पूर्वजांपासून जन्मले. आज आपल्या कातडीचा रंग जरी निराळा असला, तरी आपले पूर्वज एकच होते. एकाच पूर्वजांपासून आपण झालों. परंतु त्या हिमयुगांत आपले पूर्वज सर्वत्र पांगले. तें हिमयुग जवळजवळ एक लक्ष वर्षे होतें. निरनिराळया ठिकाणीं पांगल्यामुळें शरीराची वाढ निरनिराळी झाली. त्या त्या ठिकाणचें हवापाणी, त्या त्या ठिकाणचें अन्न, तेथील एकंदर निसर्गपरिस्थिति, या सर्वांचा शरीरावर परिणाम होऊन निरनिराळे असे हे नमुने तयार झाले. या सर्वांना भिन्नभिन्न वंशाचे असें वास्तविक म्हणतां येणार नाहीं. एकाच वंशवृक्षाच्या या चार आस शाखा आहेत. तसेंच कांहीं जातींना इतर जातींपेक्षां उच्च मानणें हीहि चूक आहे. संस्कृतीची उच्चता ही कातडीच्या रंगावर किंवा चेहरेपट्टीवर अवलंबून नसते. दुसऱ्याच गोष्टींवर सांस्कृतिक श्रेष्ठता अवलंबून असते. संस्कृति-सुधारणेच्या प्रगतींत कांहीं जातीजमाती मागें पडल्या याचें कारण ज्या वेळेस तें हिमयुग होतें, त्या वेळेस जी पांगापांग झाली त्या वेळेस या कांहीं जातीजमाती पृथ्वीच्या अत्यंत दूर अशा टोकांना गेल्या. त्यांचा इतरांशीं संबंध राहिला नाहीं. ते तसेच तिकडे एकटे पडून राहिले. जगाशीं संबंध न राहिल्यामुळें त्या प्रारंभिक बाल्यावस्थेंतून ते बाहेर पडूं शकले नाहींत.

जेथें निरनिराळे लोक एकत्र येतात, एकमेकांशीं दळणवळण ठेवतात, एकमेकांत मिसळतात, जेथें विचारांची व अनुभवाची देवाण-घेवाण होत असते, तेथें सुधारणेची शक्यता असते. पृथ्वीच्या कांहीं भागांत प्रगति कां झाली, आणि कांहीं ठिकाणचे मानवप्राणी अप्रगत कां राहिले याची ही अशी मीमांसा आहे. आस्ट्रालियाच्या आग्नेय दिशेस तासमानिया आहे. भाकरीचा लहानसा तुकडा भाकरीजवळच पडलेला असावा तसा हा तासमानियाचा

ल्हानसा तुकडा पडलेला आहे. १६४२ मध्यें डच लोकांना या बेटावर मूळचे रहिवाशी आढळले. पन्नास हजार वर्षांपूर्वी त्यांचे पूर्वज तेथें प्रथम आले. ते पूर्वज जसे रहात असत तसेच हे रहिवाशी इ. स. १६४२ मध्येंहि रहात होते. दक्षिण अमेरिकेचें अत्यंत दक्षिणेकडचें टोंक जें टायराडेल फ्यूगो, तेथें जे लोक आहेत त्यांना अद्याप अंगावर कपडे घालण्याइतपतहि बुद्धि नाहीं. तासमानियांतील लोकांचा शेवटचा वंशज इ. स. १८८७ मध्यें मेला. हे तासमानियी व टायराडेल फ्यूगी लोक संस्कृतीच्या संग्रामांतील हरलेले लोक आहेत. या परागंदा झालेल्या पलटणी जणुं आहेत. कित्येक हजार वर्षांपूर्वी पृथ्वीच्या एका बाजूस हे बिचारे पडले. आणि पाषाणकाळांतील तो साधा निष्पाप रानवटपणा तसाच त्यांच्यांत राहिला.

परंतु याच्या उलट नील नदीच्या खोऱ्यांत मानवजातीचे निरनिराळे प्रवाह एकत्र आले. अन्न व निवाऱ्याची जागा शोधणाऱ्या मानवांना या टापूंतून वरचेवर जावे लागे. येथें भेटीगांठी होत. सरमिसळ होई. दुसरा एक टापू म्हणजे पश्चिम आशियांतील युफ्रातीस आणि तैग्रीस या नद्यांचा. तैग्रीस व युफ्रातीस यांचा दुआब फुलला. नील नदीचें खोरें फुललें. या दोन स्थानीं संस्कृतीनें पहिलें मोठें पाऊल टाकलें. बर्फांतून, पर्वतातून, वाळवंटांतून, समुद्र-किनाऱ्यापासून हजारों लोक येथें आले. त्या त्या मानवप्रवाहानें स्वतःच्या विशिष्ट कल्पना बरोबर आणल्या. स्वतःचीं दैवतें, स्वतःच्या चालीरीती, स्वतःचे विचार घेऊनच तो तो मानवी प्रवाह येई. त्या सर्व प्राथमिक संस्कृतींच्या संघर्षांतून—संमिश्रणांतून नवीन विचार जन्मले; कल्पनाशक्ति बहरली; रानटीपणाच्या बाल्यावस्थेंतून संस्कृति-सुधारणेच्या रम्य पाठशाळेंत मानव-जात जायला तयार झाली. हें पाऊल टाकायला मानव उभा राहिला.

इजिप्तमधील सुधारणेची आरंभींची स्थिति आपण थोडक्यांत पाहूं या.

— ५ —

ज्या प्रदेशाला पुढें नील नदीचें खोरें असें नांव मिळालें, त्या प्रदेशांत कित्येक हजार वर्षांपूर्वी केवळ सर्वत्र चुनखडीचे दगड होते. शेवटच्या हिम-युगांतील बर्फ जेव्हा वितळलें, तेव्हां या प्रदेशावर सर्वत्र पाणीच पाणी झालें. तीस मैल रुंदीची एक खाडीच जन्मली. हळूहळू पाणी ओसरलें. या खोऱ्यांत एक सुपीक टापू तयार झाला. भटक्या लोकांना येथें पृथ्वीवरचा स्वर्गच जणूं

मिळाला. येथें रानबाजरी व इतर खाद्य पदार्थ भरपूर होते. हवा सुंदर होती. पाणी विपुल होतें. हिमयुगांत निराधाराप्रमाणें सर्वत्र भटकणाऱ्या मानवास अतःपर भटकण्याची जरूर राहिली नाहीं. अन्न शोधीत भ्रमन्ती करण्याची कटकट उरली नाहीं. या नील नदीच्या खोऱ्यात या लोकांनीं वसाहत केली. आणि त्याची लोकसंख्या भराभरा वाढली. नील नदीचा प्रवाह हा जणूं जोडणारा धागा. या प्रवाहानें त्या सर्व मानवांना एकत्र जोडलें. त्यांचा एक समाज बनला. ते परस्पराशीं प्रेमानें वागूं लागले. सुमारें सहा हजार वर्षांपूर्वी ही गोष्ट घडली.

नील नदीच्या खोऱ्यांतील हें जीवन एकंदरींत सुखकर होतें. परंतु मधून-मधून आपत्ती येत. कांहीं काळ गेला म्हणजे नील नदीला आपला पूर यावयाचा. अद्याप कालगणना शोधली गेली नव्हती. नदी नेहमींच प्रेमळ मैत्री दाखवील असें दिसेना. पृथ्वींतून नेहमींच धनधान्य वर येईना. अशीं संकटें येत. आणि या वेळेस त्यांच्यांत एक प्रतिभावान् पुरुष जन्मला. अलौकिक बुद्धि त्याची असली पाहिजे. अन्न आपोआप उगवतें असें नव्हे; तर जमिनींत बीं पेरून आपणांस तें वाढवतां येणें शक्य आहे असा शोध त्या माणसानें लावला. कसा लावला देव जाणें. अकस्मात् तो शोध दैवयोगानें लागला असावा. त्याबरोबर दुसराहि एक विचार त्यांच्या डोक्यांत डोकावला कीं, सारें अन्न एकदम खातां आलें नाहीं, तर ते आपण पुढच्या काळासाठीं सांठवून ठेवूं शकतों.

हा शोध फार महत्त्वाचा होता. कारण शिल्लक पडलेलें धान्य सांठवून ठेवण्यासाठीं म्हणून ते मातीचीं मडकीं करूं लागले. कोठारें बांधून ठेवण्याची कल्पना सुचली. या कुंभारकामातून पुढें स्वयंपाकाचीं भांडींहि तयार होऊं लागलीं. धान्यासाठीं कोठारें बांधता बांधता मोठमोठीं घरें व राजवाडे ते पुढें बांधूं लागले.

प्रथम स्वतःचे विचार ते तोंडानें सांगत. परंतु एक प्रकारची चिह्नलिपि त्यांनीं शोधून काढिली. हीं चिह्नें पवित्र चित्राचीं असत. लोकांना आपलीं शासनें अधिक बंधनकारक वाटावींत म्हणून पवित्र चित्रांची ही चिह्नलिपि शोधली गेली.

अशा रीतीनें मिसर देशांतील धर्मोपाध्यायांनीं प्रथम लेखनाचा शोध लाविला. मागच्या पिढीनें स्वतःचा मूर्खपणा पुढच्या पिढीसाठीं लिहून ठेवण्याची ही पद्धत अशा रीतीनें जन्माला आली.

देवदेवतांची इच्छा काय आहे तें धार्मोपाध्याय सांगत. या ब्राह्मणवर्गाबरोबरच दुसरा एक वर्ग उदयास आला. देवदेवतांची इच्छा प्रत्यक्ष मूर्त स्वरूपात आणणारा हा वर्ग होता. प्रबळ असा क्षत्रियांचा हा वर्ग किंवा जमीनदारांचा वर्ग. दुष्काळ केव्हा येईल व भरपूर केव्हा पिकेल तें धर्मोपाध्याय सांगत. उद्योगी लोक कठिण येणाऱ्या दिवसांसाठीं धान्य सांठवून ठेवीत. तें शेजाऱ्यांना पुढे उपयोगी पडे. इतर लोकाना जिवंत ठेवतां येईल अशीं साधनें मिळाल्यावर हे उद्योगी लोक इतरांचे पुढारी बनले. ते धनी झाले. जमीनदार झाले. त्यांच्यात जो अत्यंत हुशार व अत्यंत प्रबळ होता, जो सर्वांहून अधिक दुष्ट व कपटी होता, त्यानें इतर स्पर्धावंतांस स्पर्धाक्षेत्रांतून दूर केलें; आणि इतिहासांतील पहिला वैभवशाली राजा जन्माला आला. ईश्वरी इच्छेनें हा पहिला राजा जन्मला नाहीं; तर स्वतःच्या धूर्ततेनें तो राजा झाला.

राजसंस्थासुद्धां जमिनींत धान्य पेरण्यातूनच जन्मली असण्याचा बराचसा संभव वाटतो.

धान्य पेरण्याच्या कल्पनेंतूनच अमृतत्वाची कल्पना निघाली असावी. मृत व जमिनींत गाडलेलें धान्य पुन्हा अंकुरतें, त्यांतून नवीन जीवन बहरतें, यांत अमृतत्वाच्या कल्पनेचा उगम आहे. मातींत पुरलेल्या बीजांतून नवीन सजीव सस्यांकुर जन्मतात, त्याप्रमाणें मृत शरीरांतून पुन्हा सजीव आत्मे जन्माला येतील. म्हणून मृतांच्या शरीरांचा सांभाळ केला पाहिजे. मृत शरीरें नीट ठेवण्याची कला जन्मली. मृतांसाठीं या मिसरी लोकांनीं प्रचंड व भव्य मंदिरें बाधिलीं. मृतासाठीं जीं घरें बाधावयाचीं तीं टिकाऊ असलीं पाहिजेत. मजबूत व सुखसोयींनीं संपन्न अशीं असलीं पाहिजेत. जिवंतांच्या घरापेक्षा मृतांचीं घरें अधिक सुंदर व समर्थ अशीं असलीं पाहिजेत. कारण ते मृतात्मे या दगडी घरांतून कायमचे रहाणार!

अशा रीतीनें पिरॅमिड बांधले गेले. या कलेची वाढ फारच आश्चर्यकारक झपाट्यानें झाली. संस्कृति व सुधारणा यांची अशीच प्रगति होत असते.

हजारों वर्षें लंगडत, अडखळत एकादें पाऊल ती टाकते. नंतर एकदोन शतकें उड्या मारीत जणुं ती जाते. आणि पुन्हा आलस्याचीं शतकें सुरू होतात. हजारों वर्षें जणूं पुन्हा एक प्रकारची अर्धवट स्थगितता येते. पिरॅमिड बांधण्याचा काळ हा इजिप्तच्या सांस्कृतिक इतिहासांतील उड्या मारीत जाण्याचा काळ होता. एकदम प्रगतीची जशी उकळी आणि भरती आली! ओबडधोबड दगडांचीं थडगीं बांधण्यापासून तों गिझे येथील भव्यतम पिरॅमिड बांधण्यापर्यंत इजिप्तनें एकदम मजल मारली. ही आश्चर्यकारक प्रगति होती.

गिझे येथील हा पिरॅमिड वाळवंटाच्या कडेला बांधलेला आहे. आजच्या विसाव्या शतकांतील गगनचुंबी अमेरिकन इमारतींप्रमाणें हा पिरॅमिड उभा आहे. तो पांचशें फूट उंच आहे. त्याच्या पायानें तेरा एकर जमीन व्यापली आहे. जगांतील आजची सर्वांत मोठी इमारत घेतली तर तिचा पाया याच्या तिसऱ्या हिश्शानेंहि नाहीं असें दिसेल.

मिसर लोकांचें हें राष्ट्र कांहीं फारसें मोठें नव्हतें. परंतु त्यांच्या कल्पना प्रचंड असत. त्याची महत्त्वाकांक्षा उत्तुंग होती. स्वतःच्या महत्त्वाकाक्षेनेंच ते मेले. मृत राजांसाठीं हे प्रचंड पिरॅमिड तर त्यांनीं बांधलेच, देवतासाठीं प्रचंड आकाराचीं मंदिरे त्यांनीं उभारलींच; इतकेंच नव्हे, तर त्यांनीं त्यांचे ८०।८०, ९०।९० फूट उंचीचे पुतळे बनविले; आणि याबरोबरच प्राचीन इतिहासांतील अत्यंत शिस्तीचें असें सैन्यहि त्यांनीं उभारिलें. हें जें लष्करी भूत त्यांनीं उभारलें, त्यानेंच त्यांचा शेवटीं अधःपात झाला. कांहीं काळपर्यंत त्यांनीं इतर राष्ट्रांना जिंकलें. परंतु पुढें ते स्वतःच जिंकले गेले. आणि मानवजातीच्या रंगभूमीवरून निघून जाऊन दुसऱ्यांना त्यांनीं जागा करून दिली.

— ६ —

जगांतील प्रत्येक युद्धप्रिय राष्ट्र अशाच प्रकारें नष्ट झालें आहे असें आपणांस पुढें दिसेल. विजयाचा उन्माद, दुसऱ्यांस जिंकून घेण्याची अभिलाषा, शेवटीं जिंकणाऱ्यालाच धुळीस मिळविते असें इतिहास सांगत आहे. मेसापोटेमियांतील तैग्रीस-युफ्रातीस नद्यांच्या दुआबांतील संस्कृतीहि इजिप्तमधील संस्कृतीप्रमाणेंच बरीचशी होती. पंडितात पुष्कळ वर्षें वाद चालला आहे, कीं संस्कृति आधीं इजिप्तमध्यें फुलून ती मेसापोटेमियांत गेली, कीं आधीं मेसापोटेमियांत

फुलून ती इजिप्तमध्यें गेली. प्रथम सुमेरियन व इजिप्शियन लोकांनीं आपणांस शिल्पशास्त्र व लेखनकला यांचीं मूळाक्षरें शिकविलीं. इजिप्शियन लोक पेपरस नांवाच्या लहानशा रोपट्यांच्या पोकळ नळ्यांवर आपलीं तीं चित्रचिन्हें रंगवीत, तर तैग्रीस-युफ्रातीस नद्यांच्या खोऱ्यांतील सुमेरियन लोक आपली ती शरलिपि मातीच्या विटांवर लिहीत. सुमेरियन लोकांनींहि तो सुप्रसिद्ध बेबेल मनोरा बांधला. नाना ठिकाणाहून आलेले व नाना भाषा बोलणारे लोक हा मनोरा बांधण्याच्या कामाला लावण्यांत आले होते. नाना जातीजमाती अशा प्रकारें येथें एकत्र आल्या. एकमेकात प्रेमानें मिसळल्या. आणि यामुळे सुमेरियन लोकानीं उभारलेली व वाढविलेली संस्कृति जवळजवळ चार हजारांहूनहि अधिक वर्षें टिकली. या संस्कृतीशीं तुलना करतां आजची ही आपली संस्कृति म्हणजे नुकतें वाढूं लागलेलें एक लहानसें रोपटें आहे असें वाटतें. खाल्डिया (म्हणजेच सुमेरिया) मधील उर शहर सोडून अब्राहाम जेव्हां स्वतःच्या नशिबाच्या परीक्षेसाठीं कनावच्या वाळवंटांत शिरला, त्या वेळेस त्यानें पाठीमागें ठेवलेल्या उर शहराची परंपरा पॅरिस किंवा लंडन, बर्लिन किंवा माद्रिद या शहरांच्या परंपरेपेक्षां अधिक प्राचीन व अधिक गौरवास्पद अशी होती. परंतु सुमेरियनांची अशी ती बहरलेली संस्कृति अखेरीस कोठें गेली? त्यांचीं तीं भव्य पुरें-पट्टणें, ते विद्वान् लोक, ते सारे कोठें गेले? युद्धांच्या रणधुमाळींत ही संस्कृति शेवटीं काळाच्या पोटांत गडप झाली. आणि सुमेरियन लोकांचें नांव आज मूठभर पंडितांपलीकडे कोणाला फारसें माहीताहि नाहीं.

सुमेरियन लोकांवर शेवटचा प्राणान्तिक घाव आक्केडियन लोकांच्या राजानें घातला. या राजाचें नांव सारगान. सारगान त्याच्या काळातील जणुं जगज्जेता ज्युलियस सीझर होता. आक्केडियन हें लढवय्या लोकांचें राष्ट्र होतें. ते इतके लढवय्ये होते, कीं दोनशें वर्षांतच त्यांचें नांव नष्ट झालें. सुमेरियन लोकांप्रमाणेंच या आक्केडियन लोकांचें फक्त नांव राहिलें आहे.

आक्केडियनाच्या पाठोपाठ ॲमोराइट लोक आले. हम्यूराबि हा त्यांचा सुप्रसिद्ध राजा. इतिहासाला ज्ञात असलेलें पहिलें कायदेकोड त्यानें दिलें. परंतु हें ॲमोराइट लोकहि तलवारीवर भिस्त ठेवणारे होते. ते आपल्या असिलतांनींच शेवटीं अस्तास गेले.

आणि आतां प्राचीन इतिहासांतील ते अति महत्त्वाकांक्षी, ते अति अवडंबर माजवणारे, ते अत्यंत लढवय्ये असे असीरियन लोक पुढें आले. त्यांच्या त्या लांबरुंद जाड दाढ्या, लांब नाकें, त्यांचे ते जाडे जाडे ओंठ, असे हे लोक निनवी नगरीहून दिग्विजयार्थ बाहेर पडले. त्यांनीं नवीन रणरथांचा शोध लावला होता. कांहीं काळपर्यंत सर्व मानवजातीला त्यांनीं 'दे माय धरणी ठाय' करून सोडलें. सर्वांना त्यांनीं दशहत बसविली. त्या प्राचीन दुर्मीळतेच्या व दुर्भिक्ष्याच्या काळांत पुष्कळांना युद्ध करणें भाग पडे. ती एक गंभीर भयंकर अशी आवश्यकता असे. परंतु असीरियन लोक जरूर होती म्हणून नव्हते लढत. त्यांना युद्ध ही एक कला वाटे. सुंदर रमणीय कला! मारण-मरणाची कला! युद्धकैद्यांच्या आपण जीभा उपटीत आहोंत, त्यांचे डोळे आपण काढीत आहोंत, अशा प्रकारच्या स्वतःच्या प्रतिकृती बनवून घेण्यांत असीरियन राजांना मोठा आनंद वाटे. त्यांचें तें युद्धतंत्र अत्यंत निर्दोष होतें. साऱ्या जगाला पादाक्रांत करूं व कायमची त्याच्यावर सत्ता गाजवूं असें स्वप्न असीरियन लोक मनांत खेळवीत होते. परंतु त्यांना फक्त एकाच गोष्टींत यश आलें; ती गोष्ट म्हणजे स्वतःलाच नष्ट करणें! जगावर सत्ता गाजविण्याचें त्यांचें स्वप्न शें-दीडशें वर्षांतच धुळीस मिळालें.

अशा प्रकारें एकापाठीमागून एक नाना जाती-जमाती येत होत्या. एकमेकांस खो देत होत्या. तारे वाचणारे खाल्डियन, सर्व सुखसोयींनीं सज्ज अशा राजवाड्यांतून वावरणारे ते क्रिटन, ते हिट्टिटिस, इलॅमिट्स, कास्टिट्स, सिथियन, किती नांवें! परंतु कशाला सारीं नांवें सांगून तुम्हांला सतावूं? तुमच्या मेंदूला कशाला नामावळीचें ओझें? क्षणभर या जाती-जमाती चमकल्या आणि नंतर नष्ट झाल्या. त्यांच्या विनाशाचें एकच कारण; आणि तें म्हणजे केवळ पाशवी लष्करी सत्तेवर त्यांची सारी भिस्त असे. १९१८ मध्यें अमेरिकनांनीं जर्मनीवर मिळविलेला विजय आजपासून पांच हजार वर्षांनीं येणाऱ्या वाचकांस जितका कौतुकाचा व गौरवाचा वाटेल, तितकेंच कौतुक असीरियनांनीं बाबिलोनियावर मिळविलेल्या विजयाचें आपणास वाटतें. प्राचीन काळांतील हा इतिहास एकच गोष्ट रसरशीत निखाऱ्याप्रमाणें आपणांस शिकवीत आहे; ती गोष्ट ही कीं, युद्ध म्हणजे खूनच नव्हे तर आत्महत्याहि आहे. प्रत्येक आक्रमक राष्ट्र आपल्या शत्रूचा निःपात करतां करतां स्वतःहि नष्ट झालें आहे. दुसऱ्यास मारतां मारतां स्वतःलाहि त्यानें ठार केलें आहे.

परंतु इतक्यानेंच काम भागलें नाहीं. जे मानववंश अधिक युद्धप्रिय व अधिक विजिगीषु होते, त्यांनीं आपल्या या सैतानी धांगडधिंग्यानें मानवी प्रगतीला किती मागें ठेवलें आहे हें पहाल तर विस्मित व्हाल. दुसऱ्या एकाद्या ग्रहावरचा फिरस्ता येथें पाहील तर प्रगति-विरोधकांची ही लष्करशाही पाहून तो आश्चर्य-चकित होईल. आजपर्यंतचा मानवजातीचा इतिहास म्हणजे वेड्यांचा बाजार आहे असें वाटतें. एकाद्या कुटुंबांतले सारेच वेडे असल्यावर त्यांची जी गत होईल, त्यांचा जसा इतिहास बनेल, तसे या मानवजातीचें झालें आहे. सुंदरसा राजवाडा अत्यंत श्रमानें उभा करावा व पुन्हा तो धुळीस मिळवावा असले प्रकार या मानवजातीच्या इतिहासांत पदोपदीं दिसून येतात. आज आपण ज्या संस्कृतींत आहोंत ती प्राप्त व्हावयास आपणांस दहा हजार वर्षें लागलीं. जग जर युद्धमुक्त असतें, हा लढायांचा खणखणाट व दणदणाट जगांत नसता, तर एवढी प्रगति आपण पांच शतकांत करून घेऊं शकलों असतों. ह्या भूतलावरून युद्ध ही वस्तु अजि नष्ट झाल्याशिवाय खऱ्या प्रगतीला आरंभ होणार नाहीं.

आपणास शिकायची इच्छा असेल, तर इतिहासानें सर्वांत महत्त्वाची अशी शिकविलेली ही गोष्ट होय.

## प्रकरण २ रें

# बंडखोर राजपुत्र मूसा

## – १ –

प्राचीन काळांतील बहुतेक राष्ट्रे आतां नामशेष झालीं आहेत हें मागील प्रकरणांत आपण पाहिलें. त्यांतील कांहीं राष्ट्रें अद्याप जीव धरून कशींतरी राहिलीं आहेत. परंतु त्यांचा इतका अधःपात झाला आहे, कीं गेल्या कित्येक शतकांत त्याच्यामध्यें एकहि महापुरुष जन्मला नाहीं. परंतु प्राचीन काळची तीन राष्ट्रें अद्याप जगलीं आहेत; जगलीं आहेत एवढेंच नव्हे, तर मानवी संस्कृति व सुधारणा यांवर प्रभावी परिणाम तीं सारखीं करीत आहेत. आजहि करून राहिलीं आहेत.

कोणतीं हीं तीन राष्ट्रें ? चिनी लोक, हिंदू लोक व ज्यू लोक यांचीं राष्ट्रें. हीं तीन राष्ट्रें कां बरें टिकलीं ? आपण याचें कारण पाहूं तर आश्चर्यकारक

शोध लागेल. आपणांस असें दिसून येईल, कीं हिंदू, चिनी व ज्यू या लोकांनीं निराळ्याच प्रकारच्या वीरपुरुषाला वंदनीय ठरविलें. वीरत्वाचा, विभूतिमत्त्वाचा निराळाच आदर्श त्यांनीं मानिला. युद्धवीर दूर करून ज्ञानवीराला त्यांनीं पूजिलें. तरवार गाजवणाऱ्यापेक्षां नवीन हितकर विचार देणाऱ्या महापुरुषाला त्यांनीं श्रेष्ठ मानलें. हे लोकहि त्यांच्या आरंभींच्या इतिहासकाळीं कमी युद्धोत्सुक होते असें नाहीं. त्या काळांत जगांतील अन्नाचा सांठा फार कमी असे. स्वतःचा भाग मिळावा म्हणून सर्वांना निकरानें लढावें लागे. परंतु लौकरच या तीन लोकांत असे पुरुष जन्माला आले, कीं जे शांतीचीं स्वप्नें रंगवूं लागले. आसपास विजिगीषु अशा महत्त्वाकांक्षी युद्धोत्सुक राष्ट्रांचा गराडा असतां या लोकांत असे महापुरुष जन्मूं लागले, कीं जे शांतिधर्माविषयीं बोलत; शांतीचा संदेश देत; शांतीचीं स्वप्नें बघत. चीनमध्यें कन्फ्यूत्सी (कन्फ्यूशियस) व लाओत्सी झाले. भारतांत बुद्ध व महावीर जन्मले. ज्यू लोकांमध्यें ॲमास, इसैय्या वगैरे कितीतरी शांतिदूत झाले. या पुरुषांनीं आपापल्या देशवासीयांच्या हृदयांत नवीन उदार आशा-आकांक्षा ओतल्या. त्यांनीं तेथें शांतीची इच्छा व प्रेरणा रुजविली. स्वतः जगा व दुसऱ्यासहि जगूं द्या, नांदा व नादवा, हा त्यांचा संदेश होता.

शांतीचे प्रेषित ज्या या तीन राष्ट्रांनीं दिले तींच राष्ट्रें अद्याप जिवंत आहेत; केवळ मेल्याप्रमाणें जगत नसून त्यांच्यांत आध्यात्मिक सामर्थ्य व व तेज अद्याप तळपत आहे. त्यांचा तो वैचारिक व आंतरिक जोम अद्याप आहे. युद्धप्रिय राष्ट्रांनीं स्वतःच खची करून जणुं घेतलें; स्वतःची शक्ति नष्ट करून तीं मातींत गेलीं. हिंदू, चिनी व ज्यू लोकांनीं स्वतःची शक्ति वायां जाऊं दिली नाहीं. आणि म्हणून अद्याप हीं राष्ट्रें नीट उभीं आहेत. पांच हजार वर्षें निरनिराळ्या संकटांशीं झुंजत हीं राष्ट्रें उभीं आहेत. नाना विरोध व आपत्ती आल्या. नाना कठिण प्रसंगांतून त्यांना जावें लागलें, प्रचंड लाटा आल्या व हीं राष्ट्रें गिळंकृत केलीं जाणार असें वाटलें. परंतु नाहीं; हीं राष्ट्रें टिकलीं. एवढेंच नव्हे, तर आजहि सन्यत्सेन, बर्गसाँ व आइन्स्टीन, गांधी व टागोर अशीं महान् माणसें या राष्ट्रांनीं दिलीं आहेत.

राष्ट्राच्या जीवन-मरणाचा एक निश्चित नियम आहे असें म्हणावेंसें वाटतें. हा नियम थोडक्यांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल: ज्या राष्ट्राचें जीवन दीर्घतम

असतें तीं पृथ्वीवरचीं अत्यंत शांतिप्रधान राष्ट्रें असतात. म्हणजेच दुसऱ्या शब्दांत असें म्हणतां येईल, कीं जीं राष्ट्रें रणवीरांना सोडून विचारवीरांना व ज्ञानदेवांना भजतात, तीं राष्ट्रें तरतात.

— २ —

जगातील महान् प्रेषितांपैकीं पहिल्यानें होऊन गेलेल्यांत मूसा हा आहे. मूठभर अर्धवट रानटी गुलामांना त्यानें जवळ घेतलें व त्यांना त्यानें धर्म दिला. आणि त्यांची अशी एक प्राणमय संघटना बनविली, कीं तिच्यामुळें आज तीन हजार वर्षें लोटलीं तरीहि ज्यू-समाज टिकला आहे व आणखी तीन हजार वर्षें लोटलीं तरी टिकेल असें म्हणायला हरकत नाहीं.

मूसा झालाच नाहीं असें कोणी कोणी म्हणतात. होमर झाला नाहीं, ख्रिस्त झाला नाहीं, शेक्सपीअर झाला नाहीं असेंहि म्हणणारे कांहीं आहेत. जगांतील महापुरुषांचा अर्थ ज्यांना समजत नाहीं असे क्षुद्र लोक असे महापुरुष झालेच नाहींत असें म्हणून मोकळे होतात. म्हणजे मग त्या महापुरुषांच्या जीवनाचा अर्थ समजून घेण्याची वा समजून देण्याची गरजच उरत नाहीं. ईश्वरानें जर खरोखरच मूसाला जन्माला घातलें नसेल तर त्या काल्पनिक मूसाला निर्मून जुन्या बायबलाच्या निर्मात्यांनीं ईश्वराला त्याची चूक पटवून दिली हें बरें केलें. त्या प्राचीन ज्यूंना एकत्र आणूं शकणाऱ्या महापुरुषाची नितान्त आवश्यकता होती. त्यांचें राष्ट्र बनवणारा राष्ट्रपुरुष त्यांना हवा होता. आणि हें महान् कार्य ज्यानें यशस्वी रीतीनें पार पाडलें तो हा मूसा होय. हा मूसा खरोखरचा, हाडामांसाचा असा इजिप्तमध्यें जन्मलेला असो वा लोकांच्या हृदयांत विराजमान असणारी ही एक काल्पनिक विभूति असो ; ज्यूंच्या हृदयांतील हा मूसा त्यांना निराशेच्या रानावनांतून पुन्हा पुन्हा नवीन देवांकडे नेतो ; नवीन नवीन आशा त्यांना देतो ; नवीन नवीन कर्में त्यांना करायला लावतो.

मूसा ही काल्पनिक व्यक्ति असली तरी ज्यूंच्या भवितव्याला तिनें प्रत्यक्ष झालेल्या एकाद्या मूसा व्यक्तीपेक्षां कमी वळण दिलें आहे असें नाहीं. काल्पनिक वा सत्यमय अशा या मूसानें ज्यूंचें भवितव्य बनविलें आहे. ज्यूंच्या

भवितव्यावर त्यानें अपरंपार परिणाम केले आहेत. इतिहासांतील खरीखुरी एक व्यक्ति या दृष्टीनेंच त्याच्याकडे आपण पाहूं या.

जुन्या करारांतील कथेप्रमाणें ज्यू आईबापांच्या पोटीं मूसा जन्मला. परंतु एका इजिप्शियन राजकन्येनें स्वतःचा मुलगा म्हणून त्याला वाढविलें. राणी नील नदीवर स्नानास गेली होती. त्या वेळेस तिला हा बाळ पाण्यावर तरंगतांना आढळला. तिनें तो राजवाडयांत आणिला.

ही कथा जरा काल्पनिक वाटते. ज्याची जन्मकथा अशा असंभाव्य गोष्टींत गुरफटलेली आहे असा मूसा हा इतिहासांतील पहिलाच मनुष्य नव्हे. सुमेरियन लोकांचा राजा पहिला सारगान हा सुद्धां नदींतील एका नावेंत आढळला अशी गोष्ट आहे. राजघराण्यांतील अविवाहित स्त्रिया आपल्या मुलांची जन्मकथा अशा चमत्कारांनींच सांगत असत. जणूं ती पद्धत पडून गेली होती.

गोष्ट बहुधा अशी असावी, कीं ज्यू पुरुषापासून इजिप्शियन राजकन्येला हा बाळ झाला असावा. मूसाचा हा असा आकस्मिक जन्म झाला. इजिप्शियन व ज्यू दोघांनाहि या बाळाची जन्मकथा लपविण्याची इच्छा असणें स्वाभाविक होतें. म्हणून जुन्या करारांत अशी ही कल्पनारंजित कथा सांगितली गेली.

परंतु हा सारा तर्क आहे. कांहीं असो. मूसाचे आईबाप कोण होते हा प्रश्न कांहीं महत्त्वाचा नाहीं. त्याच्या अंगात ज्यू रक्त होतें ही गोष्ट खरी. इजिप्शियन राजपुत्राप्रमाणें तो वाढविला गेला हेंहि खरें. या दोन बाबतींत एकमेळ आहे. त्याचें मूसा हें नांवहि इजिप्शियन आहे. मूसा या शब्दाचा अर्थ अमक्या अमक्याचा मुलगा ' असा आहे. मूसाचा स्वभावहि अगदीं ज्यू होता.

मूसाच्या बाल्याची फारशी माहिती नाहीं. धर्मोपदेशकाचें शिक्षण त्याला देण्यांत आलें होते. लहान वयांतच थोर राजा अखनटन याच्या शिकवणीशीं त्याचा परिचय झाला. अखनटन हा इजिप्तचा शहाणा राजा. एकेश्वरीमताचा त्यानें शोध लावला होता. लोक त्याला वेडा मानीत.

मूसा वयानें मोठा झाला. हेलिमोपॉलिस ( म्हणजे सूर्याचें शहर ) येथील धर्ममंदिरांत शिक्षणार्थ तो जाई. तो दाढीमिशा काढी. चेंडूचे खेळ खेळे. विद्यार्थ्यांच्या मंडळांत भाग घेई. तो लौकरच एक मातबर इजिप्शियन सरदार

झाला असता. मेल्यावर सुंदरशा मर्मीत ( शवपेटिकेंत ) त्याचा देह मसाल्यांत घालून ठेवला गेला असता. परंतु मूसा बंडखोर होता. तो ज्यू होता.

— ३ —

खालच्या वर्गाच्या लोकांत तो जाऊं येऊं लागला. त्यांच्या भिकार वस्तींत बसूं उठूं लागला. शहरांतील इमारतींना लागणाऱ्या विटा भाजणाऱ्या मजुरांजवळ खरोखरच तो बोलत बसे. या श्रमजीवी लोकांजवळ बोलणें त्याला आवडूं लागलें. बरे आहेत हे लोक असें त्याला वाटलें. इजिप्शियन लोकांचा जसा इतिहास होता, तसा यांचाहि इतिहास होता. त्यांच्यांतहि मोठमोठे लोक होऊन गेले होते. त्यांच्या इतिहासांतहि सुवर्णक्षण येऊन गेले होते. हे लोक मूसाला म्हणाले, "थोर अब्राहाम आमचा पूर्वज. त्यानें ऊर हें खाल्डियन शहर सोडलें. स्वातंत्र्याचा शोध करीत तो निघाला. त्यानें समुद्र व वाळवंट यांच्यामध्यें एका प्रदेशांत हें नवीन स्वातंत्र्य स्थापिलें. कांहीं काळ अब्राहाम व त्याचे अनुयायी तेथें राहिले. गुराढोरांचीं त्यांचीं खिल्लारें वाढलीं. शेळ्यामेंढ्या वाढल्या. ते सुखी व संपन्न झाले. परंतु ज्यू म्हणजे अज्ञात व अस्थिर लोकांचें राष्ट्र. स्वस्थ बसणें त्यांना माहीत नाहीं. एका देशांतून दुसऱ्या देशांत असें करीत सर्व पृथ्वीवर भटकणें हेंच जणुं त्यांच्या नशिबीं. आणि आतां आम्ही या इजिप्शियन राजाच्या राज्यांत आलों आहोंत. आम्ही आज दास झालों आहोंत. तरीहि थोर पूर्वजांचा आम्हांला अभिमान वाटतो."

ज्यू लोक व त्यांचा इतिहास याचें मूसाला आकर्षण वाटलें. तो या ज्यू श्रमजीवींना भेटायला वरचेवर जाऊं लागला. मूसाची ही विचित्र वर्तणूक पाहून त्याचे पांढरपेशे प्रतिष्ठित मित्र त्याची गंमत करीत, टिंगल करीत. परंतु पुढें पुढें त्याच्या या वर्तनाचा ते धिक्कार करूं लागले. त्यांना तें बिलकुल पसंत नव्हतें. त्या असंस्कृत व परकी सेमिटिक भुक्कडाकडे जात जाऊं नकोस असें राजानें मूसाला बजावलें.

परंतु मूसानें या धमक्यांकडे व सूचनांकडे लक्ष दिलें नाहीं. एकदां हे ज्यू गुलाम काम करीत असतां मूसा तेथें गेला होता. एक इजिप्शियन सरदार एका गुलामाला निर्दयपणें फटके मारीत होता. मूसा संतापला. त्यानें त्या इजिप्शियनावर प्रहार केला व त्याला तेथल्या तेथें ठार केलें.

एका ज्यू गुलामाची बाजू घेऊन इजिप्शियनास ठार करणें म्हणजे अक्षम्य अपराध होता. मूसाला प्राणरक्षणार्थ वाळवंटांत पळावें लागलें.

— ४ —

मूसा आतां धनगर बनला. वाळवंटाच्या कडेला असलेल्या ओसाड भागांत, डोंगर-पहाडांत तो राही. त्याच्या शिक्षणांतील नवीन प्रकरण जणुं सुरू झालें. विद्यापीठांतील धुळीनें भरलेलीं तीं हस्तलिखितें सोडून तो बाहेर पडला. मृतांच्या छायामय जीविताविषयींच्या कल्पना व कथा सोडून तो बाहेर पडला. आतां रात्रीच्या वेळेस तो आकाशांतील तारे बघे. ईश्वराची ती जळजळीत तेजोमयी लिपि आकाशपटावर तो पाही. इजिप्शियन लोक गाय, कुत्रा वगैरेंनाहि देव मानीत. मूसानें ईश्वराविषयींच्या या साऱ्या पोरकट कल्पना आपल्या मनांतून काढून टाकल्या. तो निराळा नवा देव शोधूं लागला. अधिक उदात्त, भव्य व दिव्य असा परमेश्वर तो पाहूं लागला. वाळवंटांत उठणाऱ्या वादळांवर स्वार झालेला असा परमेश्वर कधीं त्याला दिसे. मेघांच्या गर्जनेंत, विजांच्या कडकडाटांत त्या प्रभूचा आवाज त्याला ऐकूं येई; आणि सकाळीं सूर्याचे किरण येत, वाळवंटातील झुडपांवर ते किरण पडत; आणि तीं झुडपें जणूं पेटल्याप्रमाणें दिसत. त्या प्रदीप्त झुडपांत प्रभूचें मुखमंडल जणूं तो प्रत्यक्ष समोर पाही.

मूसाला नवीन परमेश्वर सांपडला. त्या वाळवंटांत त्याला नवा देव मिळाला. हा परमेश्वर भयंकर होता. ओसाड रानावनांत सांपडलेला तो परमेश्वर होता. अरबी लोकांच्या परमेश्वराप्रमाणें कठोर व उग्र असा हा प्रभु होता. पर्वतांवरून उड्डाण करणारा, वाळवंटांतून पार जाणारा, भव्य भडक अशा तंबूंत राहणारा असा हा परमेश्वर होता. लोक झोंपले असतां त्याना तो सांभाळतो; त्यांना युद्धांत घेऊन जातो; निर्दयपणें आपल्या लोकांच्या शत्रूचा निःपात करतो; वाऱ्याप्रमाणें स्वतःचें मन बदलतो; मनांत येईल तसें करतो; अपमानाचा पट्कन् सूड घेतो; खोटें सांगून हेतुसिद्धि होत असेल तर हा देव खोटें बोलायलाहि मागें पुढें पहात नाहीं. हा असा देव आहे, कीं अन्याय ज्याला सहन होत नाहीं; परकीयांविषयींहि तो उदारता दाखवितो; पोरक्या पोरांचा तो प्रेमळ पिता बनतो; गरिबांवर दया करतो. अरबस्तानांतील बेडौनमध्यें जे जे गुण व दुर्गुण आहेत ते थोडक्यांत या

देवाच्या ठायीं आहेत. जणूं मूसानें आरशांत पाहिलें आणि स्वतःच्याच स्वरूपांत त्याला परमेश्वर आढळला. मूसानें जिहोवाचें जें चित्र रंगविलें आहे तें त्याचें स्वतःचेंच अनंत पटींनें वाढवलेलें असें चित्र आहे.

— ५ —

मूसा पुष्कळ वर्षें वाळवंटांतच राहिला. वाळवंटांतील ती अनंत शांति त्याला आवडे. त्या गंभीर शांतीनें मूसाचे विचार वाढले. विचारांचा विकास व्हायला अवसर मिळाला. वाळवंटांतील अपार शांति, तेथील तें निःस्तब्ध अनंत आकाश यांच्या संगतींत त्याच्या गूढ स्वभावाला, त्याच्या चिंतनशील मनाला भरपूर खाद्य मिळालें. एका सुखवस्तु बेडौन सरदाराच्या मुलीशीं त्यानें लग्न लाविलें आणि चिंतनशील शात जीवन तो कंठूं लागला.

परंतु इजिप्तमध्यें ज्या गुलामांना सोडून तो आला होता, त्यांच्याविषयींचा विचार त्याला साचिंत करी. आपल्या बेडौन मित्रांजवळ त्यांच्याविषयीं तो बोले. त्यांच्या उज्ज्वल भूतकाळाविषयीं व आजच्या अधःपतित स्थितीविषयीं तो सांगे. आपल्या या हतपतित बंधूंची करुण-कहाणी ऐकून बेडौन सहानुभूति प्रकट करीत. इजिप्तमधील हे लोक त्यांचेच होते. बेडौनांचाहि अब्राहाम हाच मूळ पुरुष. ज्या अब्राहामनें आपल्या जातीला नवें घर, नवें स्थान मिळावें म्हणून सर्व वाळवंटांतून धैर्याचें नव तेज पेटवलें, तोच अब्राहाम अरब बेडौनांचा व इजिप्तमधील दास्यमग्न ज्यूंचा पूर्वज.

हळूहळू मूसाच्या मनांत एक विचार आला. इजिप्तमधील दास्यमग्न ज्यूंनीं इकडे पळून यावें व वाळवंटांत स्वतंत्र व्हावें असें त्याला वाटलें आणि नंतर पूर्वजांचें तें पहिलें स्थान—कनान—तेथेंहि या सर्वांना आपण घेऊन जाऊं असें त्याला वाटलें. ज्यूंना त्यांचें पहिलें स्थान परत देणें, त्यांची जुनी मातृभूमि त्यांना परत देणें, त्यांना नवधर्म देणें! किती महनीय उदात्त असें हें ध्येय! हें भव्य दिव्य स्वप्न मनात खेळवीत मूसा सिनाई पर्वतावर शेळ्या-मेंढ्या चारीत बसे.

याच सुमारास इजिप्तमधील राजा मरण पावला. नवीन राजा गादीवर बसला. इजिप्तमधून पूर्वेकडे येणाऱ्या कारवानांच्या तोंडून तिकडील या घडामोडी मूसाला कळल्या. कृति करायला योग्य संधि आली होती. आणि मूसा

पुन्हा इजिप्तमध्यें गेला. तो त्या गुलामांत सर्वत्र हिंडूंफिरूं लागला. बंड करा असें तो त्यांना सांगूं लागला. " कामाचीं हत्यारें खालीं ठेवा. संप करा. काम बंद पाडा. दगड वाहूं नका; चढवूं नका; विटा भाजूं नका." असें तो सांगूं लागला. जुलमी धन्याचें काम काय म्हणून करावयाचें ?

इजिप्शियन राजपुत्र असणारा मूसा, अरबस्तानांत धनगर होऊन राहणारा मूसा आतां इजिप्शियन श्रमजीवींचा बंडखोर पुढारी झाला. इतिहासांतील विटा भाजणाऱ्या कामगारांचें पहिलें संघटन त्यानें निर्मिलें. तें पहिलें कामगार-युनियन.

— ६ —

मूसानें इजिप्शियन राजाकडे " ज्यूंना मुक्त करा " असा अर्ज केला. परंतु राजानें प्रथम लक्ष दिलें नाहीं. परंतु पुढें राजानें आपलें मन बदललें. हे ज्यू दास रोगग्रस्त होते. मरतुकडे होते. अत्यंत गलिच्छ वस्तींत ते रहात. इजिप्त राष्ट्राला अशा लोकापासून भय आहे असें राजाला वाटलें. इजिप्तमधील कितीतरी रोगांच्या सांथी ज्यूंच्या या भिकार वस्तींत प्रथम सुरू होत. मूसानेंहि ज्यूंना स्वच्छ सांगितलें कीं इजिप्तमधील दहा प्लेगांची जबाबदारी तुमच्यावर आहे. तुमच्या डोक्यावर तें पाप आहे. शेवटीं जेव्हा मूसाच्या नेतृत्वाखालीं ज्यू इजिप्तमधून निघाले तेव्हां त्यांना परवानगी देतांना इजिप्शियन राजाला वाईट न वाटतां उलट आनंदच झाला.

ज्यूंचें हें महाप्रयाण त्यांच्या इतिहासांत जरी अत्यंत महत्त्वाचें असलें, तरी इजिप्शियनांच्या इतिहासांत त्याला मुळींच महत्त्व नाहीं. जणूं एक साधी क्षुद्र गोष्ट असें त्यांना वाटलें. जुन्या करारांत या महाप्रयाणाच्या यात्रेची भव्य-भडक कथा रंगवलेली आहे. प्राचीन काळीं प्रत्येक राष्ट्राच्या इतिहासांत सत्य व कल्पना यांचें मिश्रण केलेलें असे. सत्यकथांत कल्पना मिसळलेली असे. ऐतिहासिक कादंबरी वा नाटक तयार केलें जाई.

मूसाबरोबर जे ज्यू आले ते रागडे होते. त्याच्यांत ऐक्य नव्हतें. वृत्तीनें ते भांडखोर होते. त्यांची नीट संघटना नव्हती. परंतु मूसाच्या अलौकिक प्रतिभेनें व बुद्धीनें या लोकांची अभेद्य अशी एकजूट जन्माला आली. हें अभंग ऐक्य एकाएकीं निर्माण झालें नाहीं. मूसाला त्यासाठीं कितीतरी वर्षें

प्रयत्न करावा लागला. या ज्यूंचें एक राष्ट्र बनविण्यापूर्वी मूसानें त्यांना नवीन स्मृति दिली; नवीन कायदे दिले. त्या ज्यूंमध्यें एक नवीन प्राण त्यानें फुंकिला. मूसा जन्मजात पुढारी होता. या ज्यूंच्या साध्या मनांवर परिणाम करण्यासाठीं त्यानें भव्य-दिव्य विधी निर्माण केले. मानवी मनाला स्तंभित करणाऱ्या भव्य अशा नैसर्गिक स्थानीं हे विधि करावयाचे. यासाठीं त्यानें तो सिनाई पर्वत पसंत केला. सिनाई पर्वताचीं तीं काळींकभिन्न अशीं, मेघांना फोडून वर जाणारी पांच शिखरें; पांढऱ्या वाळूचे घों करणारे लोंढे; सिनाई पर्वतांवरील ते दगडधोंडे, ते कडे, ज्यांतून ईश्वराचें अट्टाहास्य जणूं प्रतिध्वनित होई; ईश्वराचे आदेशच जणुं जेथून उद्घोषिले जात आहेत असें वाटे; अशी ही सिनाई पर्वताची जागा म्हणजे योग्य असें भव्य व्यासपीठ होतें. या व्यासपीठावर बसून स्वर्ग व पृथ्वी एकत्र आणणें शक्य झालें असतें.

या सिनाई पर्वतावर बसून मूसानें आपला तो नवधर्म दिला. तें अर्धवट रानटी व अर्धवट उदात्त असें नीतिशास्त्र त्यानें दिलें. त्या नीतिशास्त्रानें आजपर्यंत मानवांना मार्गहि दाखविला आहे व पदच्युतहि केलें आहे. मूसाच्या या उपदेशांत जरी प्रसंगविशेषीं क्रौर्य दिसत असलें, कोठें कोठें जरी बालिशता असली, तरी मानवी हृदयात मानवी विचार ओतण्याचा इतिहासकाळांतील तो पहिला थोर प्रयत्न होता. त्यानें तुझा डोळा फोडला तर तूं त्याचा डोळा फोड असें तो शिकवितो. परंतु त्या आरंभींच्या रानटी अवस्थेंतून जो नुकताच बाहेर पडत आहे, त्याच्यापासून तुम्ही असे आदेश ऐकलेत तर त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें तें काय? परंतु मूसाने गरिबांवर प्रेम करा व परकीयालाहि सहानुभूति द्या असेंहि सांगितलें आहे. आजचा सुसंस्कृत समजला जाणारा विसाव्या शतकांतील मनुष्य गरिबांना प्रेम देणें व परकीयांस सहानुभूति दाखविणें एवढें तरी करतो का? मूसाचा उपदेश तीन हजार वर्षें झालीं तरीहि आपण अद्याप आपलासा केला नाहीं. मूसा जितका उंच चढला तितकें तीन हजार वर्षें झालीं तरी आपण चढलों नाहीं. मूसा आपल्यापुढें गेलेला आहे. आणि आपण अद्याप मागासलेले व रानटी आहोंत. या मूसानेंच मनुष्याचे बळी देऊं नये म्हणून शिकविलें, हें आपण विसरतां कामा नये. मूसाची ही उदार आज्ञा, त्याची ही प्रेमळ शिकवण अद्यापहि आपण ऐकिली? नाहीं. १९१४ मध्यें लाखों आईबापांनीं आपल्या मुलांचे युद्ध-देवाला बळी दिले.

— ७ —

असें सांगतात, कीं ध्येयाला पोचण्यापूर्वीच मूसा मेला. जो प्रदेश त्याला पुन्हा मिळवावयाचा होता तेथें जाण्यापूर्वीच तो देवाघरीं गेला. त्यानें ज्या कामाचा आरंभ केला होता तें पुढें दुर्बळांच्या अंगावर पडलें. त्यांना तें झेपेना, पार पाडतां येईना. जगांतील मोठ्यांतील मोठ्या क्रांतिकारकांच्या बाबतींत सदैव हीच गत झाली आहे. मूसापासून तों लेनिनपर्यंत हाच दुर्दैवी अनुभव. परंतु मरण्यापूर्वी मूसानें स्वतःच्या दुबळ्या लोकांतील दुबळेपणा झडझडून पार फेंकून दिला होता. वाळवंटांतील स्वच्छ व जोरदार वारे आणून तो दुबळा रोगटपणा त्यानें नष्ट केला होता. त्यानें जगायला नालायक असणाऱ्या जुनाट दुर्बलांना खुशाल मरूं दिलें. त्यांच्याऐवजीं नव्या दमाची, उत्साही अशी अग्रेसरांची पिढी त्यानें उभी केली. मृतप्राय लोकांतील निराश असा अवशिष्ट भाग त्यानें वाळवंटांत आणला आणि त्याच्याकडून संघटित असें नवराष्ट्र त्यानें निर्मिलें. हें राष्ट्र कधीं मरणार नाहीं, मरायला कधींहि तयार होणार नाहीं.

## प्रकरण ३ रें

# इतिहासांतील पहिला युद्धविरोधी वीर जेरिमिया

— १ —

मूसाच्या मृत्यूनंतर कांहीं शतकांनीं आपण जगाचें दर्शन घेऊं या. संस्कृति व सुधारणांच्या दिशेनें मानव-कुटुंबाचीं कांहीं पावलें टाकलेलीं आपणांस दिसतील. ते पहा फोनिशियन लोक. व्यापाराची व सत्तेची त्यांना फार हाव. मोठींमोठीं लांब-रुंद गलबतें त्यांनीं बांधलीं. समुद्रावरून जातांना सुरवंटाप्रमाणें तीं दिसत. भूमध्य समुद्राच्या किनाऱ्याभोंवतीं कितीतरी भरभराटलेलीं नवीन शहरें त्यांनीं वसविलीं; गजबजलेल्या वसाहती निर्मिल्या. भूमध्य समुद्र म्हणजे बहरलेल्या बागेतील जणूं एक लहानसें तळें असें वाटूं लागलें. फोनिशियन लोक अति धूर्त. त्यांना प्रामाणिकपणा ठाऊक नव्हता, सदसद्विवेकबुद्धि त्यांना माहीत नव्हती. नफेबाजी हाच त्यांचा धर्म व भरलेली तिजोरी हें त्यांचें ध्येय. परंतु त्यांनीं नवीन लिपि शोधून काढली. इजिप्शियनांची ती चित्रचिह्नलिपि

किंवा सुमेरियनांची ती शरलिपि—त्या साध्या नव्हत्या. फार घोंटाळयाच्या व अवजड अशा त्या लिप्या होत्या. फोनिशियन लोक व्यापारी व व्यवहारी. त्याना सुटसुटीत व झपझप लिहितां येईल अशी लिपि हवी होती. त्यांनी लिपि सोपी केली व अक्षरें बावीसच केलीं. हीच लिपि थोड्याफार फरकानें आजच्या बहुतेक सुधारलेल्या देशांतून सुरू आहे.

फोनिशियन लोक दर्यावर्दी व्यापार करीत होते. आशियांतील कला व हत्यारें ते युरोपांत आणीत होते. आफ्रिकेंतील राष्ट्रांना देत होते. त्याच वेळेस खुष्कीनें व्यापार करणारे कारवानांचे तांडे चीनमधील रेशीम व चिनई मातीचीं भांडीं आणून त्यांऐवजीं मध्य आफ्रिकेंतील हस्तिदंत, स्पेन व ब्रिटन-मधून जस्त, तसेंच इतर देशांतून लोखंड, तांबें, पितळ, सोन्या-चांदीचे नक्षीदार दागिने, मसाले, मौल्यवान् हिरेमाणकें वगैरे घेऊन जात. हे कारवान पर्शिया व अरबस्तान यांतील वाळवंटांतून प्रवास करीत येत.

तो जो पहिला वानरसदृश क्षुद्र मानव, त्याचे वंशज आतां मोठमोठ्या शहरांतून रहायला शिकले होते. सुंदर सुंदर वस्तूंनीं स्वतःचीं शरीरें शृंगारावीं, स्वतःचीं घरें शोभवावीं, आपलीं मंदिरें भूषवावीं असें त्यांना वाटूं लागलें होतें. चाकांचा व रथांचा शोध लागला होता. रानटी घोडा माणसाळविण्यांत आला होता. आतां आपण वाऱ्यालाहि मागें टाकूं असें मानवांना वाटूं लागलें. संस्कृतीची परम सीमा आपण गांठली असें त्यांना वाटलें. मिळवायासारखें आतां जणुं कांहीं राहिलें नाहीं. इजिप्तमधील ज्यूंचें तें महानिर्याण, सालोमनचें मंदिर, ट्रोजनयुद्ध व होमरचीं महाकाव्यें—या गोष्टी आतां फार जुन्या झाल्या असें त्याना वाटूं लागलें. मध्ययुगांतील तीं धर्मयुद्धें जशीं आज जुनीं-पुराणीं वाटतात, तसेंच त्या लोकांना त्या प्राचीन युद्धांविषयीं वाटे.

इजिप्त, असीरिया व बाबिलोन यांच्यांत ज्यूंना आधीं कोण गिळंकृत करतो याची जणूं आतां स्पर्धा चालली होती. आणि सिथियन, इराणी व मीडीस हे इजिप्त, असीरिया व बाबिलोन यांना गिळंकृत करूं पहात होते; पहिला मान मिळविण्यासाठीं धडपडत होते.

खिस्तशकापूर्वीच्या सातव्या शतकाच्या अंतीं आपण उभे आहोंत. पृथ्वीवरचीं बलाढ्य राष्ट्रें एकमेकांचा निः[illegible] करण्यांत [illegible] आहेत असें

येथें दिसत आहे. आणि अशा वेळेस पॅलेस्टाइनमधील एका लहान गांवांत एक तरुण वाढत होता. या साऱ्या लंढाया म्हणजे मूर्खपणा आहे, असें तो म्हणूं लागला होता.

युद्ध-पराङ्मुख अशा त्या नवशांतिवाद्याचें नांव काय ? त्या तरुणाचें नांव जेरिमिया.

— २ —

जेरिमियाच्या जीवनकथेभोवतालच्या सर्व कल्पनारम्य कथा आपण दूर करूं या. अर्वाचीन मानसशास्त्राच्या कठोर प्रकाशांत हे जीवन अभ्यासूं या. या जीवनांतील भव्यता तोंडांत बोट घालायला लावते. हा महात्मा आजहि जिवंत असता तर आजच्या काळाच्या हजारों वर्षे तो पुढें आहे असें म्हणावें लागलें असतें. अत्याचार शांतपणें सहन करा असें तो सांगे. त्याचा हा धीरोदात्त संदेश आजहि बधिर कानांवरच पडेल. उपड्या घड्यावर पाणी ठरेल. आजच्या या सुधारलेल्या विसाव्या शतकांतहि जेरिमियाची ती शिकवण झेंपणार नाहीं, पचणार नाहीं. मग स्वतःच्या काळांत तो एक वेडा मनुष्य म्हणून ठरला यांत आश्चर्य तें काय ? त्याच्या समकालिनांनीं त्याला वेडा म्हणूनच वागविलें.

खेड्यातील एका धर्मोपाध्यायाचा तो मुलगा होता. बापाचा धंदा त्यानें पुढें चालवावा या हेतूनें त्याला धर्माचें शिक्षण देण्यांत आलें होतें. लहानपणीं त्यानें देशभर पसरलेल्या ज्या धर्मोपदेशकांविषयीं पुष्कळसें ऐकलें असेल ते ज्यू प्रेषित मोठे चमत्कारिक व जहाल मताचे असतात असें त्यानें ऐकलें. भटाभिक्षुकांना त्या प्रेषितांचा उपयोग नसे. ते प्रेषित म्हणजे भिकारडे जीव. गिरिकंदरांत ते रहात; कंदमुळें खात; ते बहुतकरून गरिबींत जन्मलेले असत. शेतकऱ्यांपैकीं असत. कधीं कधीं ते गवतसुद्धां खात. फुलें, मध यांवरहि जगत. ईश्वराची इच्छा काय तें आम्हीच फक्त सांगूं शकूं असें लोकांना ते ओरडून ओरडून सागत. जेरिमियाचा पिता एक अहंकारी उपाध्याय होता. त्याचें नांव हिल्किया. त्या ज्यू प्रेषितांचें वरीलप्रमाणें चित्र त्यानें आपल्या मुलासमोर अनेकदां रंगविलें असेल. सुशिक्षित पॅलेस्टाइन मनुष्य अशा भिकारड्या फकिरांना आपल्या घरीं कधीं बोलावील हें शक्य नव्हतें. त्या ज्यू धर्मप्रेषितांचे

विचार चमत्कारिक असत. एवढेंच नव्हे, तर ते विचार ज्या भाषेंत व ज्या पद्धतीनें ते मांडीत, ती भाषा व ती पद्धतीहि मोठी चमत्कारिक असे. त्यांची वागणूकहि विचित्र असे. उदाहरणार्थ, इसैआ जेरुसलेमच्या रस्त्यांतून दिगंबर फिरे. 'या शहरानें जें अपरंपार पाप केलें आहे त्याचें प्रायश्चित्त म्हणून सर्व नगर-वासियांना उघडें व्हावें लागेल ; त्यांच्या अंगावर चिंधीहि राहणार नाहीं.' हें पटविण्यासाठीं तो तसा नग्न होऊन हिंडे. दुसरा एक प्रेषित, स्वतःची भाकरी खाण्यापूर्वी तो ती अपवित्र करी, मलिन करी, व म्हणे ईश्वर या राष्ट्राला असेंच धुळीस मिळविणार आहे. यामुळें हे असले विचित्र प्रेषित उपहासास्पद होत असत. विशेषतः प्रतिष्ठित वर्ग तर या अवलियांची खूपच टिंगल करी.

परंतु जेरिमिया जसजसा वयानें मोठा होऊं लागला तसतशी त्याला नवीन दृष्टि आली. वेड्याप्रमाणें दिसणाऱ्या त्या ज्यू प्रेषितांकडे तो निराळ्या दृष्टीनें पाहूं लागला. हे प्रेषित नेहमीं गरिबांची बाजू घेतात, छळकांची बाजू न घेतां छळल्या जाणाऱ्याची घेतात, ही गोष्ट जेरिमियाच्या ध्यानांत आली. त्या प्रेषितांना न्यायाची तहान होती. जगांत न्याय असावा म्हणून ते तड-फडत असत. त्यांचें धैर्य असामान्य असे. राजाच्या राजवाड्यांत शिरून त्याच्या प्रत्यक्ष तोंडावर त्याच्या जुलमाविषयीं ते जळजळितपणें बोलत. त्याची कान-उघाडणी करीत. भय त्यांना माहीत नसे. मंदिरांतील पूजाविधींचें पोकळ अवडंबर त्यांना मुळींच खपत नसे. या दिखाऊ अवडंबराविरूद्ध त्यांचें बंड असे. ईश्वराला तुमच्या पूजाअर्चांची, तुमच्या प्रार्थनाची व यज्ञाची जरूर नाहीं असें ते उद्घोषीत. तुम्हीं न्यायानें वागावें व सर्वांवर प्रेम करावें, तुम्हीं दयाळू व मायाळू असावें, हीच ईश्वराची इच्छा आहे ; प्रभु एवढेंच तुमच्या-पासून अपेक्षितो, असें ते सांगत.

जेरिमियाला आणखी एक गोष्ट दिसून आली ती ही, कीं या धर्मप्रेषितांना शांतीचा ध्यास होता. ते धर्माचे प्रेषित निःशंकपणें पुढील भविष्यवाणी बोलत. " असा एक दिवस येईल, कीं ज्या वेळेस तुम्ही तुमच्या तरवारी मोडून त्यांचे नांगर बनवाल ; भाले मोडून त्यांचे विळे कराल ; शेतीचीं व बगीच्यांचीं हत्यारें, अवजारें बनवाल." असें बोलणें म्हणजे साधी गोष्ट नव्हती. ती एक धीरोदात्त अशी गोष्ट होती. अति मंगल व गंभीर अशी ती वाणी असे. परंतु तें शांतीचें उपनिषद् कोण ऐकणार ? " राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राविरुद्ध कधींहि तरवार उपसूं

नये, कोणत्याहि राष्ट्रानें युद्ध कसें करावें तें अतःपर शिकूं नये." ही त्याची शिकवण. थोर उदात्त शिकवण.

पुरेत आतां युद्धें; पुरेत हेवेदावे; पुरेत द्वेषमत्सर; आतां हल्ले नाहींत; वेढे नाहींत; रक्तपात नकोत; दुष्काळ नकोत; दुर्भिक्ष नको; रोग नकोत; साथी नकोत हें त्या धर्मप्रेषितांचें निश्चित ध्येय होतें. यासाठीं त्यांना जगायचें होतें. यासाठीं मरायचें होतें. जेरिमियाला स्पष्टपणें वाटे कीं, हे प्रेषित खरोखर दैवी प्रेरणेनें संस्फूर्त झालेले आहेत.

एक दिवस स्वतः जेरिमियाहि असाच संस्फूर्त कशावरून होणार नाहीं? जसजसा तो या विचाराकडे अधिकाधिक लक्ष देऊं लागला, तसतसा तो जरा वेड्यापिशासारखा वागूं लागला. त्याला स्वप्नें पडत. त्याला नाना दृश्यें दिसत. अद्‌भुत साक्षात्कार घडत. ईश्वर आपणांस नवीन दर्शनें घडवीत आहे, नवीन दृष्टि देत आहे असें त्याला वाटूं लागलें. ईश्वराची ही इच्छा जेरुसलेमच्या रहिवाशांना नीट समजावून सांगितली पाहिजे असें त्याला वाटूं लागलें. दैवी उन्मादानें तो जणूं मस्त झाला. थोर थोर कवी, जहाल विचारसरणीचे क्रांतिकारक लोकनायक दिव्य प्रेरणेनें असेच वेडे होत असतात. जेरिमिया प्रभुमत्त व शांतिमत्त झाला.

## — ३ —

प्रथम प्रथम तो लहानसहान वाईट गोष्टींविषयीं बोले. बारीकसारीक गोष्टींवर तो टीका करी. आपले देशबांधव दुसऱ्या बलाढ्य राष्ट्रांचें कौतुक करीत आहेत असें त्यानें पाहिलें. त्या बलाढ्य राष्ट्रांप्रमाणें आपलें राष्ट्रहि बलाढ्य व्हावें, असें त्याच्या देशबांधवांना वाटत होतें. जेरिमिया त्यांना म्हणाला, "दुसऱ्यांचें अनुकरण नका करूं. स्वतःशीं सत्यनिष्ठ रहा." पूर्वीं होऊन गेलेल्या प्रेषितांप्रमाणें तोहि लोकांची क्षुद्र गोष्टींविषयींच्या त्यांच्या आसक्तीसाठीं खरडपट्टी काढी. राजाला त्याच्या जुलमाविषयीं स्पष्ट शब्दांत तो सांगे. एकदां तेथील मुख्य मंदिरांत महोत्सव होता. मोठमोठे अधिकारी उपस्थित होते. स्वतः राजाहि तेथें हजर होता. इतक्यांत एकदम तो तरुण जेरिमिया तेथें आला. त्याचे केस पिंजारलेले होते; डोळे जणूं तेलानें पेटलेले होते; तो एकाद्या उन्मत्ताप्रमाणें हातवारे करीत होता; तो एकदम तेथील समारंभात

घुसला व तेथील प्रार्थनांना त्यानें अडथळा आणला. समजा, आज चर्चमध्यें प्रार्थना चाललेली असावी आणि एकाद्या समाजसत्तावादी माणसानें तेथें येऊन धर्मावर तोंडसुख घ्यावें. मग तेथें किती गडबड व प्रक्षोभ होईल त्याची कल्पना आपण करूं शकतों. तोच जरा अधिक तीव्रतेनें तेथें झाला. ते धर्मोपाध्याय रागावले. राजा संतापला. इतर भक्तगणांना सात्त्विक चीड आली. कांहीं वेळ सारे स्तब्ध होते. जेरिमिया त्याच्यावर वाग्बाणांचा वर्षाव करीत होता. चोऱ्या करतां, खून करतां, व्यभिचार करतां ; आणि हीं सर्व पापें करून येथें माझ्यासमोर येऊन उभे राहतां ! हें माझ्या नांवानें स्थापलेलें मंदिर, येथें का चोरांचा मेळावा जमावा ? हें मंदिर कीं चोरांच्या अड्ड्याची जागा ? तुम्ही असत्यवादी, लफंगे, खुनी आहांत. मोठ्यापासून छोट्यांपर्यंत सारे पापी आहांत. पक्ष्याचें घरटें जसें पिलां-पांखरांनीं गजबजलेलें असतें तशीं तुमचीं घरें पापांनीं व वंचनांनीं भरलेलीं आहेत. तुम्ही धष्टपुष्ट झालां आहांत, लठ्ठ झालां आहांत, धनकनकसंपन्न असे मान्यवर झालां आहांत. परंतु अनाथ व पोरके तुमच्या नांवानें खडे फोडीत असतात. जे गरीब आहेत, ज्यांना पदोपदीं वाण आहे, असे सारे लोक 'तुम्ही पापात्मे आहांत, धर्ममर्यादांचें उल्लंघन करणारे आहात' याला साक्षी आहेत.

"म्हणून प्रभूसमोर तुमचा नक्षा उतरला गेलाच पाहिजे. तुमचा गर्व धुळींत मिळाला पाहिजे. वाळवंटांतील एकाद्या प्रेताप्रमाणें हें तुमचें शहर होईल. उत्तरेकडून लांडगे येतील. आणि तुम्हांला फाडून खातील."

अशी ही मर्मांतिक टीका व निंदा कोण कोठवर सहन करणार ! ते सारे धर्मपूजक जेरिमियाच्या अंगावर धांवून आले. ठार करा याला असें सारे ओरडले. राजा शांत होता. त्यानें जेरिमियाच्या बचावासाठींहि कांहीं केलें नाहीं. जमावानें मन मानेल तसें वागावें असेंच जणूं तो सुचवीत होता. त्यांच्या इच्छेच्या आड तो नव्हता.

जेरिमियाचा खटला सुरू झाला. न्यायाधिशासमोर तो उभा होता. त्याच्यावर ज्यांनीं आरोप लादले होते त्यांच्यासमोर तो उभा होता. बोललेल्या शब्दांपैकीं एकहि शब्द मागें घ्यावयास तो तयार नव्हता. परंतु जे न्यायाधीश होते त्यांचा आत्मा राजाच्या आत्म्यापेक्षां अधिक उदात्त होता. त्या धर्मा-

त्याचें अलौकिक धैर्य पाहून ते विरघळले. त्या महान् संस्फूर्त पुरुषानें न्यायाधिशांना आपलेंसें केलें. त्यांनीं त्याला दोषमुक्त ठरविलें.

कांहीं काळ जेरिमिया जेरुसलेम सोडून स्वतःच्या जन्मग्रामीं जाऊन राहिला. परंतु तेथेंहि त्याला शांति नव्हती. त्याच्या क्रांतिकारक जहाल मतांमुळें भटभिक्षुक त्याच्यावर दांतओठ खात होते. त्या भटभिक्षुकांनीं कांहीं गुंड हाताशीं धरले. एकदां जेरिमिया एकटाच जात होता. रस्त्यांत कोणी नव्हतें. त्या मारेकऱ्यांनीं त्याच्यावर हल्ला केला. जेरिमिया मोठ्या मुष्किलीनें वांचला. तो कसातरी जिवानिशीं सुटला. पॅलेस्टाइनमधील संस्कृतिसंरक्षक, नीतिधर्मरक्षक निराश झाले. परंतु त्यांनीं जेरिमियाचा पिच्छा सोडला नाहीं. त्यांनीं जेरिमियाच्या घरांतील नोकरांना वश करण्याचे प्रयत्न केले. जेरिमियाच्या अन्नांत विष कालवलें जावें म्हणून त्यांनीं उद्योग केले. परंतु तो कट जेरिमियाच्या लक्षांत आला आणि तो वेळींच वांचला. तो पुन्हा जेरुसलेमला आला. आपल्या देशबांधवांच्या दुष्टपणासमोर आरसा धरण्याचें स्वतःचें जीवितकार्य त्यानें पुन्हा सुरू केलें.

मंदिरांत पुन्हा एकदां एक महोत्सव चालला होता. पुन्हा हा देवाचा खलिफा तेथें अकस्मात् गेला. या वेळेस त्याच्या हातांत मातीचा एक नवा खुजा होता. 'प्रार्थना बंद करून माझ्या पाठोपाठ या' असें तो त्याना म्हणाला. नंतर तो खुजा एकाद्या झेंड्याप्रमाणें हातांत उंच धरून तो बाहेर पडला. तें मडकें उंच धरून शहरांतील सारी घाण जेथें नेऊन टाकीत असत तेथें तो गेला. त्याच्याभोंवतीं आतां चांगलीच गर्दी जमली. त्या कचऱ्याच्या ढिगाऱ्याजवळ तो गेला. त्यानें तें मडकें तेथें फोडलें व त्याचे तुकडे त्यानें त्या कचऱ्यांत फेंकले. नंतर लोकांकडे तोंड करून तो म्हणाला, "याप्रमाणें तुमचे, तुमच्या या शहराचे मी तुकडे तुकडे करीन."

शांतताभंग करणारा, अव्यवस्थित वागणारा म्हणून त्याला अटक करण्यांत आली. घोड्याच्या चाबकानें त्याला फटके मारण्यांत आले. रात्रभर त्याला खोडा देण्यांत आला.

सकाळीं त्याला सोडून देण्यात आलें. सुटल्याबरोबर पुन्हा तो लोकांसमोर उभा राहिला. ती शापवाणी त्यानें पुन्हा उच्चारिली. सर्वांना विस्मय वाटला.

त्या पागल प्रेषिताची ती बंडखोरी, तो आडदांडपणा, ती निःशंक, निर्भय स्पष्टोक्ति थांबविण्याचा उपाय त्याना सांपडेना.

याच सुमारास उत्तरेकडून इजिप्त व दक्षिणेकडून बाबिलोन पॅलेस्टाइनचा चुराडा उडविण्यासाठीं तयारी करीत होते. जात्याच्या दोन तळ्यांच्यामध्यें मूठभर दाण्यांचा चुरा व्हावा तसें पॅलेस्टाइनचे होणार होतें. जेरुसलेमच्या गादीवर या वेळेस झेडेका हा राजा होता. तो मागील राजाप्रमाणें नव्हता. झेडेका शांतिप्रिय होता. परंतु तो दुबळ्या मनाचा होता. सल्लागार जो जो सल्ला देतील तसा तो वागे. नवे सल्लागार आले तर पुन्हा निराळा विचार. त्याला स्वतःचें निश्चित असें मतच जणूं नव्हतें. पॅलेस्टाइन या वेळेस नांवाला का होईना परंतु बाबिलोनच्या अधिसत्तेखालीं होतें. बाबिलोनचें हें जूं कांहीं फार जड नव्हतें. जेरुसलेममधील कांहीं चळवळ्यांनीं बाबिलोनच्या राजाविरुद्ध बंड पुकारावे असें राजाला सुचविलें. परंतु ही गोष्ट होऊं नये म्हणून जेरिमियानें आकाश–पाताळ एक केलें. तो पुरतेपणीं जाणत होता, कीं बंड होतांच बाबिलोनचा राजा जेरुसलेमला वेढा घालील. त्या वेढ्यांत जेरुसलेम टिकाव धरणार नाहीं ही गोष्टहि स्पष्ट होती. कोंकरानें सिंहाशीं झुंजावें तसा तो प्रकार झाला असता. जेरुसलेममधले उतावळे लोक बंडासाठीं फार मोठी किंमत द्यायला तयार होते. ते स्वतःचे प्राण द्यावयास तयार होते. इतकेंच नव्हे, तर स्वतःच्या बायकामुलांचेंहि बलिदान करावयास ते सिद्ध होते. जेरुसलेम शहराचें केवळ स्मशान झालेलें जेरिमियाच्या प्रखर कल्पनाशक्तीस दिसत होतें. सर्वत्र प्रेतांचे खच पडले आहेत, तरुण स्त्रियांची विटंबना होत आहे, मुलें पाण्याचा घोट मिळावा, भाकरीचा तुकडा मिळावा म्हणून दीनवाणीं हिंडत आहेत, तहानलेले कुत्रे धन्यांचें रक्त चाटीत आहेत, रस्त्यावर मृतांचीं व मृत प्राण्यांचीं शरीरें राशीवारी पडलीं आहेत, असें हें भीषण दृश्य जेरिमिया कल्पनाचक्षूनें पहात होता. त्या काळातील वेढा म्हणजे काय वस्तु असे तें जेरिमिया ओळखून होता. म्हणून स्वतःचें सारें वक्तृत्व उपयोगीं आणून त्या बंडाविरुद्ध तो प्रचार करीत होता. जेरिमिया म्हणाला, " बाबिलोनच्या राजाला सोन्याची खंडणी देणें पत्करलें, परंतु रणदेवतेला रक्ताचा नैवेद्य देणें नको. "

थोडा वेळ राजा झेडेकानें जेरिमियाचें ऐकलें. परंतु त्याच्या प्रमुख सल्लागारांचें मत लढाईला अनुकूल होतें. याच सुमारास इजिप्तमधून एक लष्करी शिष्टमंडळ

आलें होतें. सल्लागार राजाला म्हणाले, "इजिप्तच्या या लष्करी अधिकाऱ्यांस मेजवानी द्या. इजिप्तची मदत आपणांस मिळावी म्हणून प्रयत्न करा."

जेव्हां इजिप्तचे प्रतिनिधी जेरूसलेममध्यें आले तेव्हा जेरिमिया मानेवर जूं घेऊन रस्त्यावर आला. इजिप्शियन लष्करी अमलदारांचे गणवेष झगमगत होते. त्यांचीं तीं शस्त्रे लखलखत होतीं. आणि हा जेरिमिया कसा होता? भुरे-भुरे केस, मेंढ्याच्या कातड्याचा तो गबाळ वेष आणि मानेवरील जड जोखडानें वांकलेली अशी त्याची ती करुणास्पद मूर्ति होती! तेथील तो विरोध डोळ्यांत भरण्यासारखा होता.

लोकांनीं विचारलें, "मानेवरील या जोखडाचा अर्थ काय?"

जेरिमिया म्हणाला, "तुमच्या मुलाबाळांचा तरवारीला व दुष्काळाला बळी देण्यापेक्षां बाबिलोनचें जूं परवडले हा याचा अर्थ."

कितीतरी आठवडे जेरिमिया मानेवर जूं घेऊन रस्त्यावरून जात होता. शेवटीं एके दिवशीं लष्करी पक्षाचा एक उत्साही सभासद हनानिआ यानें तें जूं ओढून घेतलें व त्याचे तुकडे केले. तें मोडीत असतां हनानिआ म्हणाला, "याप्रमाणेंच बाबिलोनचें सर्व राष्ट्रांच्या मानेवर असलेलें जूं मी मोडून तोडून फेंकून देईन."

शेवटीं लष्करी पक्षाचें धोरण विजयी झालें. झेडेकानें इजिप्तशीं करार केला आणि इकडे बाबिलोनशीं त्यानें लढाई पुकारली. मूठभर लोक जेरिमियाच्या मताचे होते. परंतु राष्ट्रांत सर्वत्र युद्धोत्साह संचरला होता. सारे युद्धानें जसे बेहोष झाले होते! अशा या गदारोळांत जेरिमिया व त्याची मूठभर शांतिसेना यांचें कोण ऐकणार?

बाबिलोनच्या राजाचें नांव नेबुचदनेझ्झर. त्यानें इजिप्शियनांना ताबडतोब शरण आणिले आणि जेरुसलेमला वेढा घातला. अशा वेळेस देशात शांतीची गोष्ट काढणें म्हणजे देशद्रोह होता. परंतु जेरिमिया शांतीचा संदेश देतच राहिला. तो म्हणाला, "युद्ध पुकारलेंत ही चूक केलीत. परंतु अजूनहि बाबिलोनच्या राजाशीं तह करण्यास हरकत नाहीं." तो याच्याहि पुढें गेला. लढूं न शकणाऱ्या सर्व नागरिकांस तो म्हणाला, "मुलांनो, स्त्रियानो, म्हाताऱ्यानो, दुर्बलांनो! या शहरांत उद्यां उपासमारीनें उंदरांप्रमाणें मरण्या-

ऐवजीं तुम्ही खुशाल शत्रूकडे जा. तेथें तुम्हांला अन्नपाणी मिळेल, दवापाणी मिळेल. माझें ऐका." जेरिमिया हा पंचमस्तंभी आहे, बाबिलोनची बाजू घेणारा देशद्रोही आहे, असें सारे म्हणूं लागले. खरें पाहिलें तर जेरिमिया देशद्रोही नव्हता वा बाबिलोनचा पक्षपातीहि नव्हता. तो उदार हृदयाचा एक महात्मा होता. इतर सारे पिसाटाप्रमाणें वागत असतां तो समतोल वृत्तीनें वागत होता.

युद्ध पुकारणाऱ्या राष्ट्रांना एक प्रकारचें आंधळेंपण येत असतें. जेरिमियानें स्वतःची दृष्टि निर्मळ ठेविली होती, डोकें शाबूत ठेवलें होतें. लोकांनीं जेरिमियाला पकडले. चौकशीचा देखावाहि न करतां राजवाड्याखालच्या एका अंधाऱ्या व दुर्गंधीमय अशा नरककुंडांत त्यांनीं त्याला टाकलें.

इकडे अद्याप वेढा होता. आणि तिकडे त्या नरकात जेरिमिया खितपत पडला होता. शेवटीं गुप्तपणें राजानें त्याला बोलावलें. राजा भ्याड होता. परंतु त्या निर्भय व उदार महात्म्याविषयीं त्याला मनांतल्या मनांत आदर वाटे. जेरिमिया आपले विचार बदलावयास तयार नव्हता. सुटकेसाठीं स्वतःच्या आत्म्याशीं प्रतारणा करावयास तो तयार नव्हता. तो राजाला एवढेंच म्हणाला, "या नरककुंडांतून काढून मला तुरुंगांत ठेवा. मानवी प्राण्याला सडून मरायला या स्थानापेक्षां तुरुंग बरा."

राजानें ऐकलें आणि राजवाड्यांतच एके ठिकाणीं त्याला स्थानबद्ध करण्यांत आलें. पुन्हा पुन्हा तो झेडेकाला सांगत होता, कीं बाबिलोनच्या राजाला शरण जा. परंतु कोणी ऐकेना. त्या मूर्ख व हट्टी राजाचा अभिमान पार वाहून जाईल इतकें रक्त अद्याप सांडलें नव्हतें.

तेबुचदनेझ्झरानें शहराभोंवतालचे पाश अधिकच आवळले. शहरातील लोकांस काय करावें समजेना. आपला दुबळा राग कोणावर तरी काढावा असें त्यांना वाटूं लागलें. त्यांना जेरिमियाच्या रक्ताची तहान होती. त्याच्या प्राणांवर ते उठले. स्वतःच्या हालअपेष्टांनीं आंधळे होऊन, जो एक पुरुष त्यांना या हालअपेष्टांपासून वांचवूं पहात होता त्याच्यावरच ते उठले. लोकांनीं राजाला घेरलें. "जेरिमियाला पकडून चिखलाच्या खळग्यांत टाका" असें ते म्हणाले. चिखलाच्या एका खोल खळग्यांत त्याला टाकण्यांत आलें

तो जसजसा धडपडे तसतसा तो आणखी आणखी खालीं जाई. त्याचे पाय वर निघतना. जेरिमिया चिखलांत बुडणार, गुदमरून मरणार !

सुदैवानें एका नीग्रो गुलामाला दया आली. त्यानें जेरिमियाला चिखलांतून दोरीनें ओढून वर घेतलें आणि वेळींच त्याचे प्राण वांचविले.

जेरिमिया कोठें पळून गेला नाहीं. स्वतःचें जीवितकार्य त्याच्यासमोर होतें. तो पुन्हा राजाकडे गेला. ही शेवटची वेळ होती. शत्रूजवळ, 'ताबडतोब तह करा' असें पदर पसरून त्यानें मागणें मागितलें. परंतु झेडेकानें त्याला पुन्हा दूर घालविलें, आणि वेढा चालूच राहिला.

पुढें अठरा महिन्यांनीं शहर घेतलें गेलें. ज्यू राजाचे मुलगे ठार मारण्यांत आले. पित्याच्या डोळ्यांदेखत पुत्रांचे वध झाले. नंतर झेडेकाचे डोळे काढण्यांत येऊन त्याला शृंखलाबद्ध करून बाबिलोनला नेण्यांत आलें.

बाबिलोनच्या दरबारांत जेरिमियाला मानाची एक जागा देऊं करण्यांत आली. परंतु स्वतःच्या राष्ट्राचे तुकडे करणाऱ्या खुनी शत्रूशीं त्याला कांहींएक कर्तव्य नव्हतें. तो आपल्या देशबांधवांबरोबर वनवासांत गेला.

जेरिमियाला देशद्रोही समजून झेडेकानें छळलें. बाबिलोनच्या राजानें मूर्ख म्हणून त्याला हांकलून दिलें.

जेरिमियाचें शेवटीं काय झालें तें नक्की माहीत नाहीं. परंतु कांहीं प्राचीन इतिहासकारांचा पुरावा खरा मानला तर जेरिमियाला इजिप्तमध्यें दगड मारून ठार करण्यांत आलें असें म्हणावें लागतें.

रानवट लोकांना जेरिमियानें उपदेशिलें, "तुम्ही सज्जन माणसें बना, तुमच्यापासून प्रभूला ही अपेक्षा आहे." परंतु त्या रानवटांना तो अपमान वाटला. त्यांनीं त्याला ठार केलें.

— ४ —

मायकेल एंजेलो या विख्यात चित्रकारानें जेरिमियाचें फार योग्य अशा स्थितींत चित्र काढलें आहे. वृद्ध जेरिमिया निराश व भग्नहृदय असा बसलेला आहे. सभोंवतीं सारें शहर उध्वस्त झालेलें आहे. शहराच्या त्या ढिगाऱ्यावरच तो बसलेला आहे. त्याचे डोळे जमिनीकडे खालीं जसे खिळलेले आहेत ! आजूबाजूचें दुःख व विनाश पाहण्याचें त्याला धैर्य नाहीं. तो डोळे

वर करूं शकत नाहीं. त्याचें जीवन म्हणजे उद्विग्न करणारी विफळता होती; त्यानें शांतीचा संदेश दिला. परंतु जगानें तो ऐकला नाहीं. लक्ष न देणाऱ्या जगाला त्यानें शांतीचें उपनिषद् दिलें. स्वतःच्या नगरीचें वैभव रहावें, राष्ट्राचा प्राण वांचावा म्हणून त्याने प्राणपर कष्ट केले. परंतु धूळ व राख यांच्या राशीखालीं जेरुसलेम गडप झालें. आणि तेथले नागरिक वाळूच्या कणांप्रमाणें जगभर वारेमाप फेंकले गेले. त्या थोर इटॅलियन चित्रकारानें जेरिमिया म्हणजे 'मृतप्राय जातीचा पराभूत व भग्नमनोरथ असा प्रेषितच' जणूं रंगविला आहे.

परंतु मायकेल एंजेलोचें हें चित्र कित्येक शतकांपूर्वीचें आहे. आज जेरिमियाला आपण निराळ्या प्रकाशांत पाहूं शकतों. जूडा येथील टेकड्यावर उभा राहून जेरिमिया विजयी मुद्रा धारण करून शेंकडों, हजारों वर्षांच्या अंतरावरून पहात आहे. २५०० वर्षांपूर्वी त्यानें जी वाणी उच्चारिली ती वाऱ्यावर गेली. परंतु त्याचे ते शब्द आतां पकडले गेले आहेत. ज्यू लोकांचें जें अवशिष्ट असें विस्काळित राष्ट्र आहे त्यानें जेरिमियाचे ते शब्द परंपरेनें आजपर्यंत आणून पोंचविले आहेत. त्या शब्दांचा प्रतिध्वनि निःशस्त्रीकरणाच्या सभांतून, जागतिक न्यायमंदिराच्या विचारविनिमयांतून, राष्ट्रसंघाच्या बैठकींतून ऐकूं येत आहे. जेरिमिया उभा आहे. स्वतःच्या परिश्रमाला येणाऱ्या फळांकडे तो लांबून पहात आहे. त्याच्या सौम्य मुखमंडलावर विजयाचें मंदस्मित झळकत आहे. जीवनाचा खरा मार्ग शांतीचा आहे ही गोष्ट अस्पष्टपणें का होईना आतां मानवाच्या ध्यानांत येऊं लागली आहे.

अत्याचाराचा प्रतिकार करूं नका असें सांगणारा जेरिमिया हा महान् आचार्य होता. सर्व इतिहासांतील अत्यंत प्रचंड व भव्य अशा चळवळीचा तो संस्थापक होता.

## प्रकरण ४ थें

# देवत्व पावलेला नास्तिक बुद्ध

### — १ —

मानवजात जणूं एकाच कुटुंबाची आहे. एकाच कुटुंबाच्या अनेक शाखा सर्वत्र पसरल्या आहेत. आकाशांतील इतर तेजोगोलांच्या मानानें पृथ्वी ही

फारच लहान आहे. आणि लहानशा पृथ्वीवरील हें मानवकुटुंब म्हणून फारच लहान वाटतें. आणि या सर्व विश्वपसाऱ्यांत पृथ्वीवरील मानवासारखा प्राणी अन्यत्र नाहीं असें आजचें ज्ञान तरी सांगत आहे. सर्व विश्वांत अपूर्व व अद्वितीय असा हा मानव आहे. त्याच्या जातीचा प्राणी विश्वांत अन्यत्र नाहीं. मानवजातीचे सारे सभासद परस्परांशीं प्रेमानें व बंधुभावानें वागतील असें वाटणें स्वाभाविक आहे. परंतु आश्चर्य वाटतें, कीं दोन मानवजाती जर एकत्र आल्या तर त्यांचा परस्परांत पहिला परिचय जो होतो तो मारामारीच्या रूपाने होतो.

या मानवांत कांहीं तरी विचित्र वेडेपणा आहे असें वाटतें.

हा मानवी वेडेपणा आपण इजिप्तमध्यें, मेसापोटेमियामध्यें व पॅलेस्टाइन-मध्यें पाहिला. हा वेडेपणा दूर करूं पहाणाऱ्या कांहीं संस्फूर्त अशा दैवी पुरुषांचे प्रयत्नहि आपण पाहिले. आतां आपण आपलें लक्ष पृथ्वीच्या दुसऱ्या एका भागाकडे देऊं या. हिमालयाच्या खिंडींतून जे लोक हिंदुस्थानच्या मैदानांत उतरले, त्यांनीं ऐतिहासिक जीवनाची पहिली मंगलप्रभात कशी सुरू केली तें जरा पाहूं या.

कित्येक शतकें हिंदुस्थान जगापासून जसा अलग होता! एका बाजूस हिमालय, दुसऱ्या बाजूस अपरंपार सागर या दोन मर्यादांच्यामध्यें त्या हिम-युगांत आलेले कांहीं खुजे कृष्णवर्ण लोक येऊन राहिले होते. हे रानटी काळे लोक सदैव भटकत असत. आपले कळप बरोबर घेऊन त्यांना चारीत चारीत ते सर्वत्र हिंडत. हळूहळू त्यांनीं ओबडधोबड अशीं दगडी हत्यारें शोधलीं. पुढें कांहीं हजार वर्षांनंतर त्यांनीं तांब्याचा शोध लाविला. मेसापोटेमिया व इतर पाश्चिमात्य देश यांच्याशीं थोडाफार दर्यावर्दी व्यापार त्यांनीं सुरू केला.

जवळजवळ दहा हजार वर्षें या मूळच्या हिंदुस्थानी लोकांनीं हें प्राथमिक जीवन चालविलें. परंतु हिमालयापलीकडे दुसरी एक उत्साही मानवजात वाढत होती. हे लोक उंच, गौरवर्णी व सामर्थ्यसंपन्न होते. आशियाच्या वायव्य दिशेस कास्पियन समुद्राजवळ हे प्रथम रहात होते. पांच हजार वर्षां-पूर्वी त्यांच्यांत एक प्रकारची अस्वस्थता व प्रक्षुब्धता पसरली. त्यांच्यांत एकदम चैतन्य संचरलें. ते पृथ्वीच्या सर्व भागांत पसरूं लागले. कांहीं मध्य

आशियांतील इराणांत आले. आणि म्हणून या सर्वांनाच इराणियन किंवा आर्यन असें नांव मिळालें.

आंतरिक प्रेरणेनें हे आर्य सर्वत्र पसरले आणि बहुतेक सर्व युरोपियन राष्ट्रांचे पूर्वज बनले. तसेंच मेडीस, इराणी व हिंदु यांचेही ते पूर्वज होते. हिंदु व युरोपियन हे एकाच पूर्वजांपासून जन्मलेले आहेत हें स्पष्टपणें दाखविण्यासाठीं कांहीं इतिहासकार 'आर्य' या शब्दाऐवजीं 'इंडोयुरोपीय जात' असा शब्द वापरतात.

हे इंडोयुरोपियन किंवा आर्य जेव्हां पर्वत ओलांडून हिंदुस्थानांत येऊं लागले, तेव्हां या देशांत रहाणाऱ्या त्या खुजा व कृष्णवर्णी लोकांकडे ते तुच्छतेनें पाहूं लागले. या मूळच्या रहिवाशांना ते दस्यु म्हणत. ते त्यांचा निःपात करूं लागले. पुष्कळांना त्यांनीं गुलामहि केलें.

अशा रीतीनें हिंदुस्थानांत जातिभेद प्रथम जन्मला. नवीन आलेले आर्य हे वरिष्ठ वर्ग बनले आणि येथल्या जित लोकांना त्यांनीं अस्पृश्य केलें.

आर्यांमध्यें माणसां–माणसांत हे उच्चनीच भेद मानण्याची जी मूर्ख पद्धति होती ती अद्यापहि तशीच आहे. हिंदुस्थानांतच नव्हे तर युरोपांत व अमेरिकेंतहि वरतीं ब्राह्मण व खालीं तळाला अस्पृश्य असे प्रकार आहेत. ब्राह्मण व अस्पृश्य दोघेहि मेल्यावर निःपक्षपाती किड्यांना सारखीच गोड मेजवानी देतात ही गोष्ट दिसत असली तरीहि हे मूर्खपणाचे भेद केले जातच आहेत.

परंतु सध्यां प्राचीन हिंदुस्थानकडे पहावयाचें आहे.

ख्रिस्तशकापूर्वीं सुमारें दोन हजार वर्षांच्या सुमारास आर्य हिंदुस्थानावर स्वारी करूं लागले. आर्यांची ही स्वारी कित्येक शतकें सारखी सुरू होती. हे आर्य हिंदुस्थानांत आले. त्यांनीं ठायीं ठायीं राज्यें स्थापिलीं. या नव्या देशांत निरनिराळीं सोळा राज्यें त्यांनीं स्थापिलीं. प्रत्येक जण आपापल्या राज्यांत गुण्यागोविंदानें रहात होता. हत्तींची, वाघाची शिकार करीत, भूमीचें येणारें विपुल उत्पन्न उपभोगीत, एक प्रकारचें सुखी व निश्चित असें जीवन ते कंठीत. त्यांचें तें जीवन जणूं स्वप्नमय होतें. तें प्रत्यक्षापेक्षां कल्पनासृष्टींतीलच जणूं भासे. देश उष्ण होता. जमीन सुपीक होती, विपुल होती. आणि थोड्याशा श्रमानें भरपूर पिके. फारसा वेळ काबाडकष्टांत दवडावा

लागत नसे. भव्य महाकाव्यें रचायला व तत्त्वज्ञानें गुंफायला त्यांना भरपूर वेळ होता. पऱ्यांच्या गोष्टी लिहायला व जीवनाच्या गूढतेचा शांतपणें विचार करायला त्यांना वेळ होता. अशा या वातावरणांत त्या ज्यू प्रेषिताच्या—जेरिमियाच्या—जन्मानंतर पन्नास वर्षांनीं बुद्ध जन्माला आले.

– २ –

बुद्धांचें मूळचें नांव शाक्यमुनि सिद्धार्थ. शाक्य कुळांत त्यांचा जन्म झाला. हिमालयाच्या छायेखालीं उत्तर हिंदुस्थानच्या एका भागांत त्यांचा जन्म झाला. लहानपणीं त्या हिमालयाकडे त्यांनीं अनेकदां पाहिलें असेल. बर्फाचीं पांढरीं शुभ्र पागोटीं घालून शांतपणें उभ्या असलेल्या महाकाय देवांच्या जणूं मूर्तीच अशीं तीं हिमालयाचीं शिखरें बुद्धांना आकृष्ट केल्याशिवाय कशीं राहिलीं असतील? हिमालयाचीं तीं उत्तुंग धवल शिखरें खालच्या मुलांचे चाललेले खेळ मोठ्या करुणेनें पहात असतील व म्हणत असतील, ‘ किती पोरकट यांचे हे पोरखेळ ! ’

बुद्धांचा पिता शाक्य जातीचा राजा होता. राजवाड्यांत सुखोपभोगांत हा बाळ वाढला. बुद्ध अत्यंत सुंदर होते. राजवाड्यांतील महिलांचा तो आवडता असे. राज्यांत भांडणें नव्हतीं. लढाया व कारस्थानें नव्हतीं. खाणेंपिणें, गाणें, शिकार करणें, प्रेम करणें, मजा करणें म्हणजेच जीवन. वाटलें तर स्वप्नसृष्टींत रमावें. हिंदूंसारखे स्वप्नसृष्टींत रमणारे दुसरे लोक क्वचित्‌च असतील. एकोणिसाव्या वर्षीं गौतमाचें लग्न झालें. पत्नीचें नांव यशोधरा. सुखाचें गोड असें सांसारिक जीवन सुरू झालें. कशाचा तोटा नव्हता. एखाद्या पऱ्यांच्या गोष्टींतील राजाराणींप्रमाणें दोघें स्वप्नसृष्टींत जणूं रंगलीं. मानव जातीपासून जणूं तीं दूर गेलीं. अशीं दहा वर्षें गेलीं. अद्याप मूलबाळ नव्हतें. तीच काय ती उणीव होती. गौतम सचिंत झाला. ईश्वराने सारें दिलें. परंतु मुलाची सर्वोत्तम देणगी त्यानें कां बरें दिली नाहीं असें त्याच्या मनांत येई. अत्यंत सुखी अशा जीवनांतहि विफळ आशा कां बरें असाव्या? दुधांत मिठाचे खडे कां पडावे? हें जीवन जगण्याच्या लायकीचें तरी आहे का?

एके दिवशीं रथांत बसून तो हिंडायला बाहेर पडला होता. सारथी छन्न बरोबर होता. रस्त्यावर एक जीर्णशीर्ण म्हातारा मनुष्य त्यांना आढळला.

त्याचें शरीर गलित झालें होतें. जणूं सडून जाण्याच्या बेतांत होतें. त्याचा सारथी म्हणाला, 'प्रभो, जीवन हें असेंच आहे. आपणां सर्वांची शेवटीं हीच दशा व्हायची आहे.'

पुढें एकदां एक रोगग्रस्त भिकारी त्यांना आढळला. सारथी म्हणाला, "हें जीवन असेंच आहे. येथें नाना रोग आहेत."

गौतम विचारमग्न झाला. इतक्यांत न पुरलेलें असें एक प्रेत दिसलें. तें प्रेत सुजलेलें होतें, विवर्ण झालें होतें. घाणीवर माशांचे थवे बसावे त्याप्रमाणें त्या प्रेताभोंवतीं माशा घोंघावत होत्या. सारथी छन्न म्हणाला, 'जीवनाचा शेवट असा होत असतो.'

इतके दिवस गौतम राजवाड्यांतील सुखांत रंगलेला होता. अशीं दुःखद दृश्यें त्यानें पाहिलीं नव्हतीं. परंतु आज जीवनांतील सारे दुःखक्लेश त्यानें प्रत्यक्ष पाहिले. या जीवनाची शेवटीं चिमूटभर राख व्हायची हें त्यानें जाणलें. जीवनाचा हा केवढा अपमान! साऱ्या खटाटोपांची का अशीच इतिश्री व्हायची? त्या ज्यू प्रेषितांप्रमाणें बुद्धांनींहि निश्चय केला. मानवी दुःखावर उपाय शोधून काढण्याचें त्यांनीं ठरविलें. ज्यू धर्मात्मे 'मनुष्य प्राणी मूर्ख आहे' म्हणून ओरडत होते. परंतु बुद्ध एक पाऊल पुढें गेले. ईश्वराच्या दुष्टपणाविरुद्ध बुद्धांनीं बंड आरंभिलें.

— ३ —

अति सुखामुळें गौतम उदासीन झाले होते. त्या सुखाचा त्यांना वीट आला होता. आपल्या या उदासीनतेंतून अधिक उच्च व उदात्त असें सुख शोधण्यासाठीं ते उभे राहिले. परिव्राजक यति व्हावयाचें त्यांनीं ठरविलें. सर्वसंगपरित्याग करून बाहेर पडण्याचें त्यांनीं ठरविलें. चिंतनानें, उपवासानें मानवी भवितव्याचें कोडें सोडवतां येईल असें त्यांना वाटत होतें.

इतक्यांत आपल्याला मुलगा झाला आहे असें त्यांना कळलें. नवीन एक बंधन निर्माण झालें. परंतु तीं सारीं कोमल व प्रेमळ बंधनें निग्रहानें तोडण्याचें त्यांनीं नक्की केलें. एके दिवशीं पुत्रजन्मानिमित्त मेजवानी होती. बुद्धांच्या पित्यानें खास सोहळा मांडला होता. आणि त्याच दिवशीं मध्यरात्रीं निघून जाण्यासाठीं बद्धांनीं सिद्धता केली. सारी मंडळी दमून भागून झोंपलेली होती.

बुद्ध उठले. पत्नीकडे त्यांनीं शेवटचें पाहिलें. लहान बाळ तेथें आईच्या कुशींत होतें. बुद्धांच्याच जीवनांतील जीवनानें तें सुंदर सोन्याचें भांडें भरलेलें होतें. त्या मायलेंकरांचें चुंबन घ्यावें असें त्यांना वाटलें. परंतु तीं जागीं होतील या भीतीनें त्यांनीं तसें केलें नाहीं. ते तेथून निघाले. त्यांनीं आपल्या सारथ्याला दोन वेगवान् घोडे तयार करण्यास सांगितलें. त्या घोड्यांवर बसून दोघे दूर गेले. सर्व प्रेमळ बंधनें तोडण्यासाठीं त्यांना लांब जाणें भाग होतें. जीवनाचें रहस्य शोधण्यासाठीं जो मार्ग त्यांना घ्यावयाचा होता तो मार्ग अनंत होता. पाठीमागें एकदांहि वळून न पहाता सकाळ होईपर्यंत ते खूप दूर गेले.

आतां उजाडलें होतें. आपल्या पित्याच्या राज्याच्या सीमांच्या बाहेर ते होते, एका नदीतीरीं ते थांबले. बुद्ध घोड्यावरून उतरले. त्यांनीं आपले ते लांब सुंदर केस कापून टाकले. अंगावरचे रत्नालंकार त्यांनीं काढले. ते छन्नाला म्हणाले, " हा घोडा, ही तरवार, हीं हिरेमाणकें, हें सारें परत घेऊन जा." छन्न माघारा गेला. बुद्ध आतां एकटे होते. ते पर्वतावर गेले. तेथील गुहांतून ऋषी-मुनी जीवन-मरणाच्या गूढाचा विचार करीत रहात असत.

वाटेंत स्वतःचीं वस्त्रेंहि एका भिकाऱ्याजवळ त्यांनीं बदललीं. त्यांच्या अंगावर आता फाटक्या चिंध्या होत्या. राजवैभवाचा त्यांना वीट आला होता. ज्ञानशोधार्थ बुद्ध आतां एकटे फिरूं लागले.

ते त्या ऋषीमुनींच्या सान्निध्यांत गेले. तेथील एका गुहेंत ते राहिले. प्रत्यहीं ते खालच्या शहरांत जात. हातांत भिक्षापात्र असे. ते भिक्षा मागत. पोटासाठीं अधिक कष्ट करण्याची जरूरी नव्हती. तेथील आचार्यांच्या चरणांपाशीं बसून गौतम त्यांचीं प्रवचनें ऐकत. जन्ममरणाच्या फेऱ्यांतून जीव कसा जात असतो आणि शेवटीं हा जीव अत्यंत मधुर अशा शांत निर्वाणाप्रत कसा जातो तें सारें ते ऐकत. जीवन मालवणें हें अंतिम ध्येय. तें ध्येय प्राप्त व्हावें म्हणून शरीराला अन्न-पाणी देऊं नये, शरीर-दंडनानें स्वर्गप्राप्ति होते, असें त्या ऋषीमुनींचें मत होतें. जणूं शरीरदंडनाच्या जादूनें सर्व सिद्धी मिळतात.

या तामसी व रानटी विचारांची मोहिनी कांहीं दिवस बुद्धांच्या मनावर राहिली. हळूहळू त्यांनीं आपलें अन्न कमी केलें. शेवटीं शेवटीं तर केवळ चार शितकण ते खात. त्यांच्या हातापायांच्या केवळ काड्या झाल्या. शरीर सुकलें.

केवळ हाडे राहिलीं. मरण जवळ आलें. परंतु सत्य अद्याप दूरच होतें. मरणाची छाया जवळ आली तरी सत्यप्रकाश प्राप्त झाला नव्हता.

उपासतापास, ही शरीरदंडना म्हणजे ज्ञानाचा मार्ग नव्हे, जीवनाच्या अर्थाचा शोध अशा उपायांनीं लागणार नाहीं, असें बुद्धांना कळून आलें. ते पुन्हा अन्नपाणी घेऊं लागले. शरीर पुन्हा समर्थ झालें. ते एका झाडाखालीं विचार करीत बसले. एके दिवशीं सर्व रात्रभर ते ध्यानमग्नच होते. सारें जग त्यांच्या पायापाशीं झोंपलेलें होतें. आणि तिकडून मंगल उषा आली आणि त्याबरोबरच जीवन-मरणाचें कोडेंहि सुटलें. मानवी दुःखांचा निरास करण्याचा मार्ग सांपडला. अतःपर ते बुद्ध झाले—बुद्ध म्हणजे ज्यांना ज्ञान-प्रकाश मिळाला आहे असे.

— ४ —

बुद्ध काशी क्षेत्रीं आले. तेथील उपवनांत ते राहिले. त्यांना पांच शिष्य मिळाले. त्या शिष्यांना त्यांनीं तें नवीन ज्ञान दिलें. नंतर ते त्यांना म्हणाले, "आता हिंदुस्थानभर जा. सर्वत्र हा धर्म द्या." त्या पांचांचे पुढें साठ झाले. त्यांची कीर्ति हिंदुस्थानभर पसरली. लोक त्यांची पूजा करूं लागले. त्यांनीं नवीन ज्ञान दिलें म्हणून नव्हे, तर ते कांहीं चमत्कार करतात असें ऐकून. ख्रिस्ताची अशीच पूजा होई. ख्रिस्ताप्रमाणेंच बुद्धहि पाण्यावरून चालत जातात अशी कथा पसरली. ते हवेंत उंच जातात, वाटेल तेव्हां अदृश्य होतात, इत्यादि चमत्कारकथा वाऱ्यावर सर्वत्र गेल्या. एके दिवशीं बुद्ध आपल्या शिष्यांसह एका नदीजवळ आले. ती नदी दुथडी भरून वहात होती. प्रचंड पूर! परंतु बुद्धांनीं मनांत आणलें आणि काय आश्चर्य! सशिष्य ते एकदम पैलतीरास गेले. अशा गोष्टी सर्वत्र पसरत होत्या. बुद्धांची पूजा होऊं लागली. त्यांनीं नवीन दृष्टि दिली म्हणून नव्हे, तर ते एक थोर जादूगार आहेत, अद्भुत चमत्कार करणारे आहेत म्हणून.

कांहीं थोड्यांनीं बुद्धांचें तत्त्वज्ञान समजून घेण्याची धडपड केली. आणि फारच थोड्यांनीं त्यांचें जीवन आपल्या कृतींत आणण्याची खटपट केली. बुद्ध हे चांगलें जीवन कसें जगावें तें शिकवणारे महान् आचार्य होते.

बुद्धांचें तत्त्वज्ञान व चांगल्या जीवनाविषयींचे त्यांचे विचार आपण थोडक्यांत पाहूं या.

— ५ —

प्रथम भटांभिक्षुकांचें बंड त्यांनीं मोडलें. ते विधी, ते यज्ञ, त्या नाना भ्रामक रूढी, सर्वांच्या मुळावर बुद्धांनीं घाव घातला. मोक्षासाठीं, स्वतःचा उद्धार व्हावा यासाठीं या गोष्टींची कांहीं एक जरूरी नाहीं असें ते स्वच्छ सांगत. देवांचे हे सेवक आधीं दूर करून नंतर त्यांनीं देवांनाहि दूर केलें. देव नकोत व हे भटजीहि नकोत. देव आहेत कीं नाहींत याविषयीं बुद्ध कांहींच बोलत नसत. होय वा नाहीं कांहींच ते सांगत नसत. त्यांनीं त्या गोष्टीची जणूं उपेक्षा केली. जर कोणीं देवदेवतांविषयीं त्यांना प्रश्न केला तर ते खांदा जरा उडवीत व म्हणत, "या देवांचा प्रश्न मला महत्त्वाचा वाटत नाहीं. मला जिवंत माणसांचा प्रश्न अधिक महत्त्वाचा वाटतो."

परंतु त्यांची एक चूक झाली. स्वर्गांतून देवांची हकालपट्टी त्यांनीं केली. परंतु मानवांना, हिंदूंना त्यांनीं स्वर्गांत भरलें. प्रत्येक मानवप्राणी नाना जन्म घेत घेत शेवटीं स्वर्गांत जातो असें ते मानीत. प्रथम त्या ऋषीमुनींच्या सांगण्याप्रमाणें या जन्ममरणाच्या फेऱ्यावर त्यांचा विश्वास होता. अनेक जन्मांतून जीव जात असतो असें ते मानीत. जीव नाना देहांतून जातां जातां शेवटीं मुक्त होतो असें ते सांगत. मग जन्ममरण खुंटतें. निर्वाण किंवा स्वर्गीय आनंद प्राप्त होतो. आपल्या शिष्यांस स्वतःच्याहि अनेक जन्मांच्या कथा ते सांगत. मी एका जन्मीं गोगलगाय होतों असें ते एकदां म्हणाले.

बुद्ध जसजसे परिणतवयस्क होऊं लागले तसतसें हें जन्ममरणाच्या फेऱ्याचें त्यांचें तत्त्वज्ञान अधिकच काव्यमय होऊं लागलें. पुढें पुढें बुद्ध निराळ्याच रीतीनें बोलूं लागले. प्रत्येक जीव स्वतः अनेक जन्मांतून जातो असें ते आतां सांगत नसत. ते आतां म्हणत, "प्रत्येक जीव म्हणजे एक पेटती मशाल आहे. दुसऱ्या मशालीस ती जाऊन मिळते. आणि याप्रमाणें प्रत्येक जीवाची ज्योत अमृतत्वाच्या विश्वव्यापक ज्योतींत विलीन होते. किंवा घंटांची उपमा वापरली तर असें म्हणतां येईल, कीं प्रत्येक जीवाचें जीवन म्हणजे उघड्या खोलींतील घंटेचा नाद आहे. कालसोपानावरील सर्व जीवांच्या जीवन–घंटांतून नाद निघण्यास हा व्यक्तिगत जीवन–घंटेचा नादहि कारणीभूत होत असतो आणि शेवटीं हा नाद स्वर्गाच्या विश्वव्यापक संगीतांत विलीन होतो.

या मताभोंवतालचें काव्य दूर केलें म्हणजे शेवटीं माथितार्थ इतकाच उरतो, कीं प्रत्येक जीवनाचे फार दूरवर पोचणारे परिणाम होत असतात आणि प्रत्येक मानवप्राणी हा मानवजातीचा एक महत्त्वाचा घटक आहे.

वैयक्तिक अमृतत्वावर बुद्धांचा विश्वास नव्हता. त्यांना त्याची पर्वाहि नव्हती. प्रत्येक मानवी जीव, प्रत्येक मानवात्मा विश्वात्म्याचा भाग आहे, जगदात्म्याचा अंश आहे. वैयक्तिक अमृतत्वाची इच्छा करणें म्हणजे सर्वांचा प्रश्न दूर सोडून केवळ स्वतःपुरतें पाहणें होय, अंशीला दूर झुगारून अंशानें आपल्यापुरतें पहाणें होय. बुद्ध शिष्यांना सांगत, “जगांतील सारें दुःख आपल्या स्वार्थी महत्त्वाकांक्षांमुळें आहे. मग या स्वार्थी महत्त्वाकांक्षा ऐहिक असोत वा पारलौकिक असोत.”

परंतु जो मानवजातीच्या विशाल व महान् आत्म्यासाठीं स्वतःचा क्षुद्र आत्मा दूर करतो, स्वतःचा आत्मा मानवजातीच्या सेवेत जो रमवतो, तो जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त व्हायला पात्र असतो. चिरशांतीच्या निर्वाणाप्रत तो जातो.

बुद्ध निर्वाण या शब्दानें निश्चित काय समजत असत तें त्यांनीं कधीं स्पष्ट केलें नाहीं. कदाचित् त्यांना तें शब्दांत सांगतां येत नसेल. किंवा त्यांनाहि नीट कळलें नसेल. शिष्यांनीं निर्वाणाविषयीं पुष्कळदां विचारलें. परंतु बुद्ध उत्तर देण्याचें टाळीत. अशा वेळेस ते नेहमीं गंभीर असें मौन पाळीत. या मौनाची शिष्य क्षमा करीत. तें मौन त्यांना जणूं पूजाहि वाटे, पवित्र वाटे. स्वर्गाची, त्या निर्वाणाच्या अंतिम दशेची कल्पना बुद्ध शब्दांत कशी आणून देणार असा त्या मौनाचा अर्थ शिष्य करीत. जेव्हां जीव निर्वाणाप्रत जातो तेव्हां त्याला स्वतःची जाणीव कोठून उरणार? त्या वेळेस त्याला सत्‌हि म्हणतां येत नाहीं, असत्‌हि म्हणतां येत नाहीं; जणूं तो मृतहि नाहीं, सजीवहि नाहीं. ती अत्यंत परमकोटीच्या आनंदाची स्थिति असते. जीवनाहून वा मरणाहून पर, दोहोंहूनहि श्रेयस्कर अशी ती स्थिति असते. बुद्धांचे शिष्य निर्वाणाचा अशा प्रकारचा कांहीं तरी अर्थ लावीत. जेव्हां बुद्ध मरण पावले तेव्हां शिष्य म्हणाले, “बुद्ध आतां अपरंपार अनंत सागराप्रमाणें गंभीर झाले आहेत; सदसतांच्या पलीकडे ते गेले आहेत. सदसतांच्या संज्ञा, ही परिभाषा त्याना आतां लावतां येणार नाहीं.”

म्हणजे बुद्धांचा जीवात्मा जणूं अवर्णनीय अशा अनंताचें स्वरूप धारण करिता झाला. अनाकलनीय अशा शाश्वततेचें चिंतन करणारे ते जणूं अनंत परब्रह्मच झाले. शाश्वत निःस्तब्धतेच्या, अखंड शांतीच्या संगीतांत शून्यत्वाचा डंका ते वाजवीत राहिले.

माझ्या समजुतीप्रमाणें निर्वाणाचा खरा अर्थ हा असा आहे.

— ६ —

बुद्धांनीं कल्पिलेल्या स्वर्गाची कल्पना जरी बालिश वाटली तरी चांगल्या जीवनाची त्यांनीं केलेली कल्पना, चांगल्या जीवनाविषयींची त्यांची शिकवण अति उदात्त आहे. ते म्हणतात, "या दुःखमय संसारांत आपण सारे भाऊ-भाऊ आहों. जणूं आपण एका कुटुंबांतील आहों." या आपल्या विशाल कुटुंबांत बुद्ध केवळ मानवप्राण्यांचाच अंतर्भाव करीत असें नव्हे, तर सर्व सजीव सृष्टीचा ते अंतर्भाव करीत. जे जे जीव जन्मतात, दुःखें भोगतात, मरतात, ते ते सारे एकाच कुटुंबांतले. बुद्धांना प्रत्येक प्राणमय वस्तु, प्रत्येक जीव म्हणजे करुणेचें काव्य वाटे. मानवी वेदनांची भाषा जितक्या कोमलतेनें ते जाणत तितक्याच कोमलतेनें पशुपक्ष्यांचीहि अस्पष्ट वेदना त्यांना कळे. मूसाप्रमाणें बुद्धांनींहि वागण्याचे दहा नियम दिले आहेत. त्या दहा आज्ञांतील पहिली व सर्वांत महत्त्वाची आज्ञा "कोणत्याहि स्वरूपांत जीवाची हिंसा करूं नका" ही आहे. ज्याअर्थीं आपणांस जीव निर्माण करतां येत नाहीं, त्या अर्थीं त्याची हिंसा करण्याचाहि हक्क आपणांस नाहीं. त्यांच्या सर्व शिकवणीचा हा मुख्य बिंदु आहे, हा मुख्य आधार आहे.

बुद्धांच्या नीतिशास्त्रांतील दुसरीं महत्त्वाचीं तत्त्वें म्हणजे नेमस्तपणा, सहनशीलता, प्रेम, इत्यादि होत.

स्वतःच्या कृतीनें नेमस्तपणाचें, संयमाचें महत्त्व त्यांनीं पदोपदीं दाखवून दिलें आहे. अत्यंत सुखसंपन्न अशा घराण्यांत ते जन्मले होते. परंतु त्या सुखांना ते लवकरच विटले. नंतर ते स्वतःच्या देहाला अत्यंत क्लेश देऊं लागले. परंतु या आत्यंतिक देहदंडनेचाहि त्यांना वीट आला. शेवटीं मध्यम मार्ग त्यांनीं पसंत केला. मध्यम मार्गांत सुख आहे असें त्यांनीं सांगितलें. अतिरेक कशाचाहि नको, अति तेथें माती, मनाचे लाड पुरविण्यापेक्षां मनावर

अंकुश ठेवणें हेंच हिताचें, असें त्यांनीं शिकविलें. भोगांध होणें, सत्तांध होणें, विजयांध होणें इत्यादींचा त्यांनीं धिक्कार केला. या तिन्हीं गोष्टींनीं मनुष्य शेवटीं बुद्धिभ्रष्ट होतो असें ते म्हणत. अतिमहत्त्वाकांक्षा आत्म्याच्या रोगटपणाची खूण होय. दुर्बलांवर सत्ता चालवूं पहाणें, युद्धांत विजय मिळविण्याची इच्छा करणें, या साऱ्या आत्म्याच्या विकृति होत. विजय म्हणजे मृत्यूची जननी; विजयी होण्याची इच्छा करणें म्हणजे आपल्याच बंधूंचा हेवादावा करणें, त्यांचा द्वेष करणें; आणि आपल्या भावांचा द्वेष करणें ही गोष्ट मृत्यूहूनहि वाईट होय.

परंतु मानवी मनांत विजयतृष्णा आहे. ही विजयतृष्णा कशी जिंकायची? बुद्ध म्हणाले, "सहनशीलतेनें." जो जिंकायला येईल त्याला क्षमा करा. त्या विजिगीषु माणसाची कींव करा. तें एक रोगी बालक आहे असें समजा. द्वेषाची परत फेड मैत्रीनें व स्नेहानें करा. याच मार्गानें जगांतील हीं भांडखोर व रानटी मुलें एके दिवशीं सुसंस्कृत व शांतिप्रिय अशीं माणसें होतील. दुसऱ्याला दुःख न देतां स्वतः सारें सहन करण्याचें शौर्य त्यांनीं शिकविलें. दुसऱ्याची हिंसा न करतां स्वतः मरण्याचें धैर्य त्यांनीं शिकविलें. एक गोष्ट खरोखर त्यांनींच शिकविली. ती म्हणजे सहनशीलपणा. सारें मुकाट्यानें सहन करा. पौर्वात्यांची ही सोशिकता निस्सीम आहे. तसेंच सहिष्णुताहि त्यांनीं शिकविली. बुद्ध धर्मी मनुष्य म्हणजे पृथ्वीवरचा अत्यंत सहिष्णु प्राणी होय. मुसलमानांप्रमाणें किंवा खिस्ती लोकाप्रमाणें धर्मयुद्ध करीत बुद्ध धर्मीयांनीं कधींहि रक्त सांडलें नाहीं. बुद्धांच्या नांवानें कोणाहि परधर्मीयाचा त्यांनीं कधींहि छळ केला नाहीं.

बुद्धांनीं परमेश्वराचें वैभव शिकविलें नाहीं तर प्रेमाचें सामर्थ्य शिकविलें. "सारा संसार प्रेमानें आनंदमय करणें" हें त्याचें ध्येय होतें. दुःखी, दरिद्री लोकांत रहाण्यासाठीं त्यांनीं राज्यत्याग केला. बुद्धांची शांति देणारी परममंगल वाणी कानीं पडावी म्हणून एक भिकारी त्यांच्याकडे आला. या भिकाऱ्याला मंगल आशीर्वाद देणें हें जीवनांतील त्यांचें शेवटचें कर्म होतें. ते आतां ८० वर्षांचे झाले होते. लोहार जातीचा त्यांचा एक शिष्य होता. त्या गरीब शिष्याकडे ते जेवले आणि त्यांना आजार जडला. ते कसे तरी

मोकळ्या शेतांत गेले. ते आपल्या शिष्यांना म्हणाले, "पर्णमय शय्येवर मला ठेवा." पुन्हा ते म्हणाले, "मी आजारी पडलों म्हणून त्या लोहाराला नका हो नांवें ठेवूं."

बुद्धांचे प्राण निघून जाण्याची वेळ आली. बुद्धांजवळ कांहीं उपदेशपर शब्दांची भिक्षा मागण्यासाठीं एक अस्पृश्य आला होता. त्या अतिशूद्राला त्यांनीं आपल्याजवळ बोलावलें. त्या मरणोन्मुख महात्म्यानें, त्या आसन्नमरण राजर्षीनें त्या भिकाऱ्याचा हात आपल्या हातांत घेतला. त्या दुःखी बंधूजवळ प्रेमाचे व करुणेचे दोन शब्द तो बोलला आणि त्याचा प्राण गेला.

जवळजवळ दोन हजार वर्षें बुद्धांच्या शिकवणीचा निम्म्या मानवजातीवर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष परिणाम होत आहे. भूतदया, सहनशीलता, सहिष्णुता, प्रेम यांची त्यांनीं दिलेली थोर शिकवण परिणाम करीत आहे. आतां उरलेली निम्मी मानवजातहि बुद्धांची ती वाणी ऐकायला उभी रहात आहे, तो संदेश ऐकायला आरंभ करीत आहे.

## प्रकरण ५ वें

# ख्रिस्ताचा आध्यात्मिक पिता कन्फ्यूशियस

## — १ —

जेव्हां रस्त्यांत एकादा चिनी आपणांस भेटतो, तेव्हां अहंकार-प्रदर्शक तुच्छतेनें आपण त्याच्याकडे पहातों. परंतु चिनी मनुष्यहि त्याच तुच्छतेनें आपणांकडे पहात असतो असें तुम्हांला सांगितलें तर तुम्हांला एकदम धक्का बसल्यासारखें होईल नाहीं ? चिनी मनुष्य आपणां पाश्चिमात्यांस अडाणी, अहंकारी अशी जगली लोकांची एक जात असें मानतो. तीन हजार वर्षेंपर्यंत चिनी जनतेनें ज्ञानी पुरुषांचीच वीरपुरुष समजून पूजा केली. तरवारीची पूजा न करतां त्यांनीं ज्ञानाची पूजा केली. जीं राष्ट्रें आपल्या सैनिकांना नि आपल्या कुबेरांना श्रेष्ठ नागरिक समजतात, अशा राष्ट्रांविषयीं चिनी मनुष्य आदर दाखविणें सुतराम् अशक्य आहे.

चिनी लोकांना स्वतःच्या इतिहासाचा फार अभिमान वाटतो. त्यांच्या दंतकथांप्रमाणें त्यांची संस्कृति वीस हजार वर्षांची जुनी आहे. या दंतकथा

आणखी असें सांगतात, कीं चिनी लोकांचे पूर्वज हे जवळजवळ पशुसम स्थितींतच होते. ते गुहांमध्यें रहात, कातडीं पांघरीत. नंतर कित्येक शतकांनीं एक महान् राजवंश आला. त्या राजांनीं लोकांना शेती शिकविली; त्यानीं त्यांना सुधारणा नि संस्कृति दिली.

डार्विनच्यापूर्वी कित्येक हजार वर्षें ज्ञानगाथा रचणाऱ्या त्या चिनी ऋषी-मुनींना उत्क्रान्तीची अंधुक का होईना कल्पना असावी असें वाटतें.

संस्कृतीच्या पुरातनत्वाविषयींची त्यांची कल्पना अतिशयोक्तीची आहे, काव्यमय आहे. चीन देशातील संस्कृतीच्या प्रत्यक्ष खुणा ख्रिस्तपूर्व दोन हजार वर्षांपासूनच्या सांपडतात. या वेळेस त्यांनीं चित्रलिपीचा आरंभ केला होता. तिची वाढ ते करूं लागले होते.

चीनच्या आरंभींच्या इतिहासांत शत्रूंच्या स्वाऱ्यांचा त्यांना त्रास झालेला दिसत नाहीं. चीनलाहि विजयध्वज मिरवीत जाण्याची इच्छा नव्हती. चीन-मध्यें सैनिक हा खालच्या दर्जाचा मानला जाई. सैनिकाची प्रतिष्ठा तेथें नव्हती. खाटीक, व्यापारी, सैनिक हे एकाच दर्जाचे. वरचें स्थान ज्ञानोपासकांना असे. राजाची स्तुति त्यांच्या दिग्विजयांसाठीं केली जात नसे, तर ते शांतता ठेवीत म्हणून. चिनी प्रजा युद्धाचा तिरस्कार करी. जीवन सुसंकृत असावें असें त्यांना वाटे. सज्जन व सुसंस्कृत अशा उदात्त जीवनाची भक्ति त्याच्या ठायीं होती. अशा निर्मळ जीवनाविषयीं त्यांना परमादर वाटे. रेशमाच्या किड्यांची त्यानीं वाढ केली. रेशमाचा व्यापार त्यानीं सुरू केला. पागोडाचें अद्‌भुत शिल्प त्यांनीं निर्मिलें व त्याची वाढ केली. एकावर एक तंबू उभारल्याप्रमाणें त्यांचें हें शिल्प दिसतें. त्यानीं वैद्यकीचा अभ्यास केला, काव्याची जोपासना केली. ताऱ्यांच्या गतींशीं त्यांनीं परिचय करून घेतला. बहुजनसमाजाला शिक्षण मिळावें व राज्यकारभार नीट चालावा म्हणून पंडितवर्गाची, मांदारिनवर्गाची संस्था त्यांनीं स्थापिली. या वर्गांत देशाला मान नसून ज्ञानाला मान असे. येथें ज्ञानाची प्रतिष्ठा होती. एकादा झाडूवाल्याचा मुलगाहि मांदारिन होऊं शकत असे. अवश्यक असे ज्ञान त्यानें मिळविलेलें असलें म्हणजे झालें. उलट एकादा मांदारिनाचा मुलगाहि जर त्याला विद्वत्ता नसेल तर झाडूवाला होत असे.

हे मांदारिन म्हणजे आळशी लोक नव्हते. ते सनदी नोकरींत शिरत. राजाला देशाची व्यवस्था ठेवण्यासाठीं ते मदत करीत. चीनमध्यें राजसत्ता

होती, परंतु अनियंत्रित जुलूम नव्हता. बहुतेक चिनी प्रांतांना प्रबुद्ध अशा राजसत्तेचा अनुभव येई.

परंतु असें समजूं नका, कीं त्या काळांतील चीन म्हणजे निर्दोष भूमि होती. राजाला मदत करणारे हे पंडित नेहमींच प्रामाणिक असत असें नाहीं. राजाची मर्जी मिळविण्यासाठीं खुशामतीचा वक्र रस्ताच अधिक जवळचा असतो असें त्यांना आढळून आलें होतें. लांचलुचपतीस भरपूर वाव होता. धनार्जन करण्याच्या संधी येत आणि तत्त्वज्ञानी असणारे हे मुत्सद्दीहि मोहाला बळी पडल्याशिवाय रहात नसत. कधीं कधीं तत्त्वज्ञान्यालाहि स्वतःचे खिसे सोन्यानें भरलेले असावे असें वाटतें. तसेंच हे तत्त्वज्ञानी जर कधीं प्रामाणिक निघाले तर राजे त्यांचा सल्ला ऐकतच, असें होत नसे. म्हणून या प्राचीन चिनी लोकांत पूर्णता होती असें समजण्याचें कारण नाहीं. कांहीं अतिरंजित इतिहासकारांनीं चीन म्हणजे जणूं स्वर्ग असें चित्र रंगविलें आहे तें बरोबर नाहीं.

चिनी लोकांमध्यें इतरत्र आढळणारा आणखी एक दोष होता. ते फार अहंकारी होते. जे जे परकी येत, ते त्यांना सैतानी वाटत. परकीयांना ते सदैव तिरस्कारानें वागवीत. त्यांच्या देशाचें प्राचीन नांव “ मध्यदेश ” असें होतें, “ मध्यराज्य ” असें होतें. त्याची अशी समजूत होती, कीं परमेश्वरानें आपणांस पृथ्वीच्या मध्यभागीं ठेवलें आहे. इतर राष्ट्रांपेक्षां आपणच प्रभूचे अधिक लाडके असें त्यांना वाटे. आपणच काय ते श्रेष्ठ असें मानण्याचा मूर्खपणा करण्यांत ते अर्वाचीनांच्या बरोबरीचे होते.

परंतु कितीहि दोष असले तरी चिनी लोक खिस्तीशकाच्या नवव्या शतकांत उच्च संस्कृतीवर होते ही गोष्ट नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. परंतु नंतर दुर्दिन आले. हूणाशीं त्यांचा संबंध आला. हे हूण चीनच्या पश्चिमेस होते. ते शेळ्या-मेंढ्या पाळीत. ते रानटी होते. शांतताप्रिय चिनी लोकांत लष्करी सत्तेचें विष टोंचलें गेलें. हे पाश्चिमात्य जंतू त्यांच्यांत शिरले. चीनमध्यें आजहि पाश्चिमात्य लष्करशाहीचे जंतू शिरतांना दिसत आहेत. हूणांशीं संबंध आल्यामुळें सत्तालालसेचें जें विष चिनी राष्ट्रांत शिरलें तें नष्ट करावयास बरींच वर्षें लागलीं. किती तरी यादवी युद्धें झालीं. आणि नंतर अराजकतेचा काळ आला. सारा देश जणूं वेडापिसा बनला. सर्वत्र हाणामारी! वाटेल त्यानें उठावें

व लहान राज्य स्थापावें. देशाचे शत खंड झाले. अनेक छोटीं छोटीं राज्यें सर्वत्र निर्माण होऊन तीं परस्परास नष्ट करूं पहात होतीं. या वेळीं बाहेरचे रानटी लोक आले. विस्कळित चीन या रानटी टोळधाडीपुढें टिकाव धरूं शकला नाहीं.

परंतु सुदैवानें याच सुमारास चीनमध्यें थोर विचारवंत जन्माला आले. त्यांनीं लोकांना पुन्हा समतोलपणा दिला, विवेक दिला.

या ज्ञानी व चारित्र्यसंपन्न लोकांत दोन मुकुटमणी होते. एक लाओत्से व दुसरा कन्फ्यूशियस.

— २ —

लाओत्से खि. पू. सहाव्या शतकांत जन्मला. कन्फ्यूशियसपेक्षां लाओत्से पन्नास वर्षांनीं वडील. अतिपूर्वेकडील भागांतील लाओत्से, बुद्ध व कन्फ्यूशियस हे तीन परम थोर महात्मे. मानवजातीचे हे सद्‌गुरू एकाच शतकांत झाले, ही महत्त्वाची गोष्ट ध्यानांत धरण्यासारखी आहे. धन्य तें शतक !

जॉन दी बॅप्टिस्ट हा जसा ख्रिस्ताचें आगमन सुचविणारा होता, त्याप्रमाणें लाओत्से कन्फ्यूशियसचा जणूं अग्रदूत होता. त्यानें कन्फ्यूशियससाठीं भूमिका तयार करून ठेवली. त्यानें कन्फ्यूशियसच्या आगमनाचें जणूं शिंग फुंकिलें. परंतु कन्फ्यूशियसची विचारसरणी जशी स्पष्ट असे, त्याची भाषा जशी साधी व सरळ असे तसें लाओत्सेचें नसे. लाओत्सेच्या विचारांत विशदता नव्हती. तो थोडा गूढवादी होता. लाओत्से लोकांना उपदेशी, " न्यायावर प्रेम करा, नेमस्त व संयमी बना, प्रमाण राखा, देहान्त शिक्षा रद्द करा, युद्धाचा धिक्कार करा, जगण्यासाठीं हें जग अधिक सुखाचें व आनंदाचें करा. "

हीं ध्येयें अति सुंदर होतीं यांत शंका नाहीं. परंतु प्राथमिक अवस्थेंतील राष्ट्राला हीं ध्येयें जरा अमूर्तच होतीं ; अर्थहीन, दूरचीं अशीं होतीं. लाओत्से पुष्कळ वेळां रहस्यमय बोले, गूढ बोले. त्याच्या म्हणण्याचा भावार्थ फारच थोड्यांच्या लक्षांत येई. त्या बेबंदशाहीच्या काळांत चीनला जर कशाची खरोखर जरूर असेल तर ती व्यवहार्य व समजण्यास सोप्या अशा निश्चित आचार-नियमांची होती. दैनंदिन व्यवहारांत सर्वांनीं कसें वागावें तें सांगणारी व सर्व-संग्राहक अशी सोपी, सुटसुटीत स्मृति त्यांना हवी होती. लाओत्से हें करूं

शकत नव्हता. तो फार उंच पडे. लोकांनीं लाओत्सेला देव बनविलें. आणि भविष्यकालीन मोक्षप्राप्तीसाठीं ते त्याची प्रार्थना करूं लागले. परलोकासाठीं लाओत्से, परंतु इहलोकीं कन्फ्यूशियसच त्यांचा खरा मार्गदर्शक होता.

— ३ —

कन्फ्यूशियस किंवा कुंग–फू–त्सी या नांवाचा, "तत्त्वज्ञानी कुंग" असा अर्थ आहे. त्याच्या पित्याचें नाव शुहलिंग. तो पित्याचें बारावें अपत्य होता. शुहालिंग हा सैनिक होता. कू प्रांतांत तो रहात असे. चीनमध्यें सैनिकांना सामान्यतः मान कमी. परंतु त्या वेळेस सैनिकांची किंमत जरा वाढली होती. नैतिक मूल्यांचें जरा पुन्हा मूल्यमापन केलें गेलें. त्या वेळेस सर्वत्र लष्करी धिंगाणे चालले होते. गांवांचें, शहरांचें रक्षण करणें अगत्याचें असे. कोण कधीं हल्ला करील याचा नेम नसे. म्हणून सैनिकाची प्रतिष्ठा जरा वाढली होती. शुहालिंग हा शूर शिपाईगडी होता. त्याला खूप मानमान्यता मिळाली होती, अनेक पदव्या मिळाल्या होत्या. तथापि तो सुखी नव्हता. त्याला नऊ मुली झाल्या, परंतु मुलगा नव्हता. त्याची एक रखेली होती. तिच्यापासून त्याला दोन मुलगे झाले. परंतु ते औरस नव्हते. सनातनी चिनी मनुष्यास एक तरी औरस पुत्र असावा असें वाटे, जसें सनातनी ज्यूस अद्याप वाटतें. मृत पित्यासाठीं जे विधी करावयाचे ते चिनी लोकांत व ज्यू लोकांत फक्त औरस पुत्रच करूं शकतो.

म्हणून शुहलिंगने पुन्हा लग्न करण्याचें ठरविलें. त्याचें वय सत्तराहून अधिक होतें. नऊ मुलांची माता—ती पहिली पत्नी—त्यानें दूर केली आणि एका लहान मुलीबरोबर त्यानें लग्न केलें. चीनमध्यें पत्नीला पुत्र होत नाहीं ही सबब काडीमोडीसाठीं पुरे होई आणि हें जें अप्रस्तुत व असमान असें विषम लग्न लागलें, त्याचें फळ म्हणून पूर्वेकडील अत्यंत शहाणा मनुष्य जन्माला आला. ख्रि. पू. ५५१ मध्यें कन्फ्यूशियस जन्मला.

वयाच्या तिसऱ्या वर्षीं कन्फ्यूशियस पितृहीन झाला. कन्फ्यूशियस अति बुद्धिमान् होता. लहान वयांतच त्याची अलौकिक बुद्धि दिसूं लागली. त्याच्या ह्या निरोगी व धष्टपुष्ट शरीरांत अत्यंत प्रभावी असें मन होतें; अति प्रभावशाली बुद्धि होती. तो व्यायामाचा फार भोक्ता होता. परंतु त्यापेक्षांहि काव्याचा

व संगीताचा अधिक भक्त होता. भराभरा त्यानें सारें ज्ञान आत्मसात् केलें. वयाच्या पंधराव्या वर्षीच त्याचे गुरुजन त्याला म्हणाले, " तुला शिकवायला आतां आमच्याजवळ कांहीं उरलें नाहीं. "

पुढें दोन वर्षांनीं त्याला अकस्मात् स्वतःचा अभ्यास सोडावा लागला. त्याची आई गरीब होती. तिला त्याची मदत हवी होती. आईला आधार देणें त्याचें कर्तव्य होतें. आपल्या देशाच्या लहान राज्यांतील शेतीखात्यांत तो कारकून झाला. सतरा वर्षांच्या मुलाला ती जागा झेंपायला जरा कठिणच होती. परंतु कन्फ्यूशियसनें कुरकूर केली नाहीं. वास्तविक स्वतःचा जेवढा बोजा, त्याहूनहि तो अधिक उचली. त्याला जणूं ती संवयच होती. कारकुनी डोक्यावर असतांनाच लग्न करून त्यानें बायकोचा आणखी बोजा उचलला. लग्नाच्या वेळेस त्याचें वय केवळ एकोणीस वर्षांचें होतें. एका वर्षानें त्याला पहिला मुलगा झाला. त्याचें हें लग्न सुखप्रद झालें नाहीं. कां तें कळत नाहीं. कदाचित् त्याच्या पत्नीला सुंदर सुभाषितापेक्षा अधिक रुचकर व स्वादिष्ट अशा अन्नाची जरूरी असावी. कन्फ्यूशियस आपल्या शिष्यांना उपदेशाचें, सुंदर सूत्रमय वचनांचें खाद्य देई. परंतु पत्नी त्या शब्दांनीं थोडीच संतुष्ट होणार ! तिला प्रत्यक्ष पोटभर अन्न हवें होतें.

चोविसाव्या वर्षी त्याची आई त्याला सोडून गेली. सनातनी चिनी रूढी-प्रमाणें मातृशोकप्रदर्शनार्थ त्याने नोकरी सोडली. मातृशोकप्रदर्शनाची मुदत अडीच वर्षांची असे. कन्फ्यूशियसनें ती अक्षरश पाळली. कन्फ्यूशियस आपल्या देशाचे सारे रीतरिवाज पाळण्यांत अत्यंत दक्ष असे.

कन्फ्यूशियस जरी तरुण होता, वयानें अद्याप फारसा मोठा नव्हता, तरी स्वतःच्या मित्रमंडळांत सौम्य व शांत स्वभावाचा, तसेंच अति बुद्धिमान् म्हणून त्याची ख्याति झाली. त्याची बुद्धि खरोखरच तेजस्वी होती. त्याचें मन प्रगल्भ होतें. मित्रांनीं आग्रह केल्यावरून तो फिरता आचार्य झाला, परिव्राजक, उपदेशक झाला. तो जेथें जेथें जाई तेथें तेथें निष्ठावंत शिष्याचा मेळावा त्याच्याभोंवतीं जमे. एका बैलगाडींत बसून तो या गावाहून त्या गांवीं जात असे. मधूनमधून विश्रांतीसाठीं तो मुक्काम करी, एखाद्या नदीकांठीं थांबे, शिष्यांना प्रवचन देई. प्रश्नोत्तरे चालत, चर्चा होई. कधीं भाताच्या शेताजवळ मुक्काम पडावा. कधीं चेरी झाडांनीं सुगंधित केलेल्या स्थानीं ते थांबत. अशा

रीतीनें सर्वत्र संचार करीत असतां संसाराला उपयोगी असें ज्ञान तो सर्वत्र पेरीत जाई. ते विचार देशभर पसरले. जे श्रीमंत असत त्यांच्याजवळून तो थोडी गुरुदक्षिणा घेई. जे गरीब असत त्यांनीं मूठभर तांदूळ किंवा वाळलेला मांसखंड दिला तरी त्याला समाधान असे. उदार व उदात्त जीवनाची शिकवण त्यानें सर्वत्र दिली. तोच त्याचा अविरत उद्योग होता. श्रेष्ठ अशा मानवांचा एक नवीन वंशच तो चीनमध्यें जणूं निर्मू पहात होता. जणूं श्रेष्ठ पुरुषांचें प्रतिष्ठित असें राष्ट्रच निर्माण करण्याचें त्याचें ध्येय होतें.

लोकांना नीट वळण द्यायचें असेल तर आधीं न्यायी राज्यव्यवस्था हवी, ही गोष्ट कन्फ्यूशियसच्या लक्षांत आली. तो हेतु मनांत धरून तो सर्व प्रांतांतून भटकला. तो निरनिराळ्या राजांना भेटला व म्हणाला, “ मी तुमचा प्रधान होऊं का? चांगला राज्यकारभार निर्माण करतों. माझे विचार प्रत्यक्षांत आणतों.” हा तत्त्वज्ञानी अशा राजाच्या शोधांत होता. इतिहासांतील अत्यंत विचित्र व आश्चर्यकारक असा हा शोध होता.

कधीं कधीं वाटे, कीं त्याच्या शोधांत त्याला यश येईल, एकादा राजा त्याला प्रयोगाला वाव देईल. त्या वेळचा ‘चि’ प्रांत म्हणजे अति बंडखोर प्रांत होता. त्या प्राताच्या राजानें आपल्या दरबारीं कन्फ्यूशियसला महत्त्वाची जागा देऊं केली. परंतु एका मत्सरी मंत्र्यानें राजाचे कान फुंकले आणि आयत्या वेळेस राजानें नकार दिला. कन्फ्यूशियस पुन्हा आणखी एकादें प्रयोगाई राज्यक्षेत्र शोधीत निघाला.

तो आपल्या स्वतःच्या लू प्रांतीं आला. लू प्रांताच्या राजानें त्याला एका शहराचा मेयर म्हणून नेमलें. नंतर त्यानें त्याला सर्व राज्यांतील मुख्य न्यायाधीश म्हणून नेमलें. तो न्यायमंत्री झाला. कन्फ्यूशियस सम्राटाला म्हणाला, “ लोकांना सदैव शांति दे व पोटभर अन्न दे. पिता ज्याप्रमाणें मुलांबाळांची तरतूद ठेवतो, त्यांची सर्व काळजी घेतो, तसें राजानें प्रजेचें केलें पाहिजे. एकाद्या महत्त्वाच्या खटल्यांत निकाल देण्यासाठीं कन्फ्यूशियसला जर बोलावण्यांत आलें तर एकदम निकाल देण्यापूर्वी तो आधीं पुष्कळशा शहाण्या लोकांचा विचार घेई व मग न्याय देई. पुढें भविष्यकाळांत जी ज्यूरी-पद्धति जगात आली तीच जणूं कन्फ्यूशियसच्या डोळ्यासमोर होती.

गुन्हेगारांना शिक्षा देणें हें त्याचें मुख्य ध्येय नसून गुन्हे कमी कसे होतील हें तो आधीं मुख्यतः पाही. त्या वेळेस साऱ्या चीन देशभर भुरट्या चोरांचा व उचल्यांचा बुजबुजाट झाला होता! याला आळा कसा घालावा म्हणून प्रमुख नागरिक त्याला प्रश्न करीत. तो म्हणे, " चोरी बंद करायचा एकच मार्ग आहे. आणि तो म्हणजे तुम्ही तुमचा स्वार्थ कमी करा, तुमची हांव कमी करा. तुम्हीं लोभ सोडला म्हणजे चोरांनीं न्यावें इतकें जास्त तुमच्याजवळ उरणारच नाहीं."

आपल्या राजाची कीर्ति वाढावी, आपलें राष्ट्र सुधारलेलें व्हावें, म्हणून कन्फ्यूशियसचे जे प्रयत्न चालले होते त्यांत त्याला बरेंचसें यश येत होतें. परंतु ली प्रांताचा राजा लू प्रांताचा मत्सर करी, द्वेष करी. कन्फ्यूशियसच्या नेतृत्वाखालीं लू प्रांताची कीर्ति पसरत आहे ही गोष्ट ली प्रांताधिपतीस सहन झाली नाहीं. कन्फ्यूशियसचें लू प्रांताच्या राजावर जें वजन होतें तें नष्ट व्हावें म्हणून त्यानें एक साधी युक्ति केली. त्यानें लू राजाकडे ऐशीं नृत्यांगना पाठविल्या. युक्ति सफल झाली. राजा त्या नृत्यांगनात इतका रमला, कीं तो कन्फ्यूशियस व त्याचे प्रयोग सारें विसरून गेला.

कन्फ्यूशियसला या गोष्टीचा तिटकारा आला. तो आपला स्वतःचा लू प्रांत सोडून रागानें निघून गेला आणि पुन्हा जगभर भटकूं लागला. जगाच्या करुणेवर, जगाच्या आधारावर त्यानें स्वतःला सोंपविलें.

— ४ —

या वेळेपर्यंत कित्येक हजार शिष्य त्याला मिळाले होते. तरीहि आपलें जीवन विफल आहे असें त्यास वाटे. राजे पशुसमान होते, प्रजा अडाणी होती आणि त्याचें उत्तम पुरुषाचें ध्येय अद्याप स्वप्नांतच होतें. मानवजातीस स्वतःप्रमाणें बनविण्याचा त्यानें प्रयत्न केला. परंतु ज्या मातीवर तो प्रयत्न करूं पहात होता ती माती टणक होती. त्याचीं सौम्य बोटें त्या मातीला आकार देऊं शकतना. प्रवास करितांना पुष्कळ वेळां खुनी व दरोडेखोर त्याच्यावर हल्ला चढवीत. पुष्कळ वेळां त्याला अन्नाशिवायाहि दिवस काढावे लागले, तरीहि तो ध्येयापासून च्युत झाला नाहीं; स्वीकृत कार्य त्यानें सोडलें नाहीं.

या वेळचें स्वतःचें एक सुंदर शब्दचित्र त्यानें काढलें आहे. तो लिहितो :- " कन्फ्यूशियस ज्ञानासाठीं इतका तहानलेला आहे, कीं पुष्कळ वेळां खाण्यापिण्याची सुद्धां त्याला आठवण रहात नाहीं. आपल्या प्रयत्नांना यश येत आहे असें जरा दिसलें, कीं त्या आनंदांत तो सारें दुःख विसरून जातो. ज्ञानोपासना करतां करतां व ध्येयार्थ धडपडत असतां वार्धक्य जवळ येत आहे हें त्याच्या लक्षांतहि येत नाहीं. "

हातीं घेतलेले उद्योग निराशेनें सोडून द्यायला तो अद्याप तयार नव्हता. जनतेला दैनदिन व्यवहारांत मार्गदर्शन व्हावें म्हणून प्राचीन ग्रंथांचें संपादन व संकलन त्यानें सुरू केलें. जुन्या चिनी बायबलांतून त्यानें जणूं नवीन बायबल, नवा करारच चिनी जनतेस दिला. कन्फ्यूशियसहि बुद्धांप्रमाणें नास्तिक होता. स्वर्ग किंवा नरक यांवर त्याचा विश्वास नव्हता. त्याचा एकाच गोष्टीवर अपरंपार विश्वास होता, तो म्हणजे स्वतःच्या मानवबंधूंवर. कन्फ्यूशियसची श्रद्धा होती, कीं जर शंभर वर्षें नीट सुव्यवस्थित राज्यकारभार चालेल तर पृथ्वीवरचा सारा अत्याचार नाहींसा होईल.

या ध्येयानें प्रेरित होऊन लोकांवर कशा रीतीनें राज्य चालवावें याविषयींची निश्चित सूत्रावलि त्यानें लिहून ठेविली आहे. तसेंच जनतेंत शिस्त यावी म्हणून नानाविध विधिविधानें त्यानें सांगितलीं आहेत. जीवनांतील प्रत्येक गोष्ट त्यानें कोणत्या तरी विधीशीं जोडली आहे. हें विधींचें अवडंबर मोठें डोळ्यांत भरण्यासारखें आहे. झोंपडींत रहाणारा शेतकरी राजवाड्यांतील राजाइतकाच प्रतिष्ठित. राजाला राजाचे विधी, शेतकऱ्याला शेतकऱ्याचे. परंतु उभयतांच्याहि जीवनांत त्या त्या गंभीर विधींमुळें एक प्रकारची प्रतिष्ठा आली. कन्फ्यूशियसनें आपल्या लोकांवर जे हे औपचारिक असे नानाविध बाह्य विधी लादले, त्यांचें आपणांस आज हंसूं येतें. अति गुंतागुंतीचे व कांहीं कांहीं बाबतींत तर ते हास्यास्पद असे दिसतात. या विधींमुळें चिनी राष्ट्र हें सर्व जगांत अगदीं बारीकसारीक गोष्टींकडेहि फार पहाणारें, बाह्य देखाव्यावर भर देणारें असें झालें. परंतु यामुळें एक प्रकारचा स्वाभिमानहि त्यांच्यांत आला. दुसऱ्यास मान देणें व स्वतःचाहि मान सांभाळणें या दोन्ही गोष्टी तें शिकलें. राजाहि पूजार्ह आणि मी शेतकरीहि पूजार्ह. कन्फ्यूशियसच्या शिकवणीचें सार एका वाक्यांत सांगायचें झालें तर असें म्हणतां येईल, कीं

"स्वतःशीं प्रामाणिक रहा व शेजाऱ्यांशीं प्रेमानें व सहिष्णुतेनें वागा." दुबळ्या निःस्वार्थतेच्या तत्त्वज्ञानाऐवजीं त्यानें त्यांना उदार आणि दुसऱ्याच्या डोळ्यांत न खुपणारा असा सुसंस्कृत स्वार्थ शिकविला. स्वार्थ तुमच्याजवळ असणारच. परंतु तो शहाणा स्वार्थ असूं दे. कन्फ्यूशियसच्या मनांत चीन हें प्रतिष्ठित नागरिकांचें राष्ट्र करावयाचें होतें. असहिष्णु व अहंकारी लोकांची जात निर्मिण्याऐवजीं सभ्य अशा सद्‌गृहस्थांची जात त्याला निर्मावयाची होती. चिनी राष्ट्र सद्‌गृहस्थांचें व्हावें असें स्वप्न रात्रंदिवस तो मनात खेळवीत होता. राजाला वा रंकाला तो स्वतः समानतेनें वागवी. राजाचें स्थान वैभवाचें व थोर म्हणून त्याला तो मान देई आणि गरीब थोर मनानें व उदात्ततेनें कसे कष्ट सोशीत आहे हें पाहून तो त्यालाहि मान देई.

ज्यांना ज्यांना जीवनांत दुःख, क्लेश आहेत, ज्यांची जीवनें विकल नि विफल झालीं आहेत, ज्यांना अपयश आलें आहे, अशा सर्वांच्या दुःखांत तो सहभागी होऊ इच्छीत असे. कन्फ्यूशियसवर त्याचा एक शिष्य यामुळे एकदां रागावला. "दरिद्री लोकांशीं, सर्वसामान्य जनतेशीं मिसळण्याची तुमची ही वृत्ति आम्हांला आवडत नाहीं." असें तो शिष्य म्हणाला. कन्फ्यूशियस त्याला शांतपणें म्हणाला, "दुःखीकष्टी दुनियेशीं मी एकरूप नको होऊं तर कोणाबरोबर होऊ?"

परंतु दरिद्री नारायणाविषयीं जरी त्याला सहानुभूति वाटत असली तरी बुद्धांप्रमाणें तो केवळ करुणासागर नव्हता. भावनांनीं वाहून जाणारा, विरघळून जाणारा तो नव्हता. तो आपला तोल, सुवर्णमध्य कधीं विसरत नसे. त्याची सहानुभूतीहि व्यवहारी होती. मानवजातीला ओलांडून सर्व प्राणिमात्रास कवटाळूं पहाणारी अशी त्याची सहानुभूति नव्हती. तो म्हणे, "जगापासून दूर निघून जाणें अशक्य आहे. ज्या पशुपक्ष्यांशीं आपलें कांहीं साधर्म्य नाहीं त्यांच्याशीं एकरूप कसें व्हायचें?" कन्फ्यूशियस पशुपक्ष्यांसाठीं तहानेला नव्हता. देवदूतांना भेटायला हपापलेला नव्हता. त्याच्या डोळ्यांसमोर स्वतःची ही मानवजात नेहमीं असे. तिचा तो विचार करी. तिचें सुखदुःख पाही.

तसेंच बुद्धांची आत्यंतिक अहिंसाहि त्याच्याजवळ नव्हती. अपकाराची फेड उपकारानें करावी, द्वेषाला प्रेमानें जिंकावें, अहंकारासमोर नम्रता घ्यावी, असा संदेश त्यानें कधीं दिला नाहीं. एका गालावर मारलें तर दुसरा गाल पुढें करावा असें त्याचें मत नव्हतें. हें मत त्याला शहाणपणाचें वाटलें नाहीं.

"शत्रूबरोबर न्यायानें वागा व मित्राबरोबर प्रेमानें वागा" असा त्याचा दूरदर्शी उपदेश आहे. शत्रूबरोबर न्यायानें वागा, परंतु त्याच्यावरहि प्रेम करून त्याला चिडवूं नका. अशानें तो शत्रु अधिकच रागावेल. 'मला लाजवतां काय?' असें तो म्हणेल. आगींत तेल ओतल्याप्रमाणें तें होईल. दुसऱ्यानें इजा केली असतां त्याचा सूड घेऊं पहाणें हें पशुवृत्तीचें द्योतक आहे. परंतु त्याची क्षमा करणें हेंहि मूर्खपणाचें आहे. एकंदर गोष्टीचा नीट विवेकानें निर्णय करा व तदनुसार वागा. शत्रूचे हक्कहि सांभाळा व स्वतःची प्रतिष्ठाहि सांभाळा. आपल्या अन्यायी शेजाऱ्यांशीं वागण्याचा सुसंस्कृत माणसाचा हाच एक मार्ग आहे.

एकदां त्याच्या शिष्यांनीं त्याला विचारलें, "एका शब्दांत तुमच्या शिकवणीचें सार सांगा." कन्फ्यूशियस म्हणाला, "जशास तसें." शिष्य म्हणाले, "याचा अर्थ अधिक स्पष्ट करा." तो म्हणाला, "जें तुम्ही स्वतःच्या बाबतींत करूं इच्छिणार नाहीं तें दुसऱ्यांच्या बाबतींत करूं नका."

कन्फ्यूशियसनें जो हा सुवर्णनियम सांगितला तोच पांचशें वर्षांनीं पुढें ख्रिस्तानेंहि सांगितला. परंतु दोघांचेंहि म्हणणें त्यांच्या समकालीनांनीं ऐकलें नाहीं. समकालीन जनतेनें दोघांचीहि उपेक्षाच केली.

त्याचे अखेरचे दिवस दुःखाचे होते. त्याचे प्रिय शिष्य मरण पावले. पत्नीशीं काडीमोड करूनहि तिच्यावर तो प्रेम करी. तीही मेली. त्याचा एकुलता एक मुलगाहि वारला. तो म्हणाला, "आतां मीहि जाणें बरें. माझीहि वेळ आतां आलीच आहे."

तो अत्यंत दारिद्र्यांत निवर्तला. त्याचें वय बहात्तर वर्षांचें होतें. त्याचे हेतू विफल झाले होते. त्याचीं स्वप्नें धुळीस मिळालीं होतीं. मानवावरचा त्याचा विश्वास ढांसळला होता. फारच थोड्या लोकांनीं त्याचे शब्द हृदयाशीं धरले. आणि जे त्याच्या शिकवणीप्रमाणें वागत त्यांचा छळ होई. आरंभीं ख्रिश्चनांचा त्यांच्या क्रांतिकारक जहाल मतांबद्दल जसा छळ झाला तसाच कन्फ्यूशियसच्या शिष्यांचाहि झाला. एका चिनी सम्राटानें कन्फ्यूशियसचीं सारीं पुस्तकें जाळण्याचा हुकूम त्याच्या मृत्यूनंतर दोन वर्षांनीं दिला. पुष्कळ श्रद्धावान् पंडितांनीं भक्तीमुळें ग्रंथ न जाळतां लपवून ठेविले. परंतु कायदेभंग करणाऱ्या अशा पंडितांना जिवंत पुरण्यांत आलें.

परंतु आज पाश्चिमात्यांत बायबल जितकें लोकप्रिय आहे तितकेच चीन-ध्यें कन्फ्यूशियसचे ग्रंथ लोकप्रिय आहेत. खिस्ताप्रमाणें कन्फ्यूशियसहि आतां देव झाला आहे. खिस्त व कन्फ्यूशियस दोघांनींहि सज्जन मानवांची एक नवीन जात निर्माण करण्याचा महान् उद्योग केला. शिष्ट मानव नव्हेत तर खऱ्या अर्थानें सौम्य व शांत असे सद्गृहस्थ. परंतु आतांपर्यंत खिस्त व कन्फ्यूशियस या दोघांचेंहि कोणीं ऐकलें नाहीं. दोघांच्याहि शिकवणीपासून जग दूरच राहिलें आहे. कोट्यवधि चिनी लोक कन्फ्यूशियसच्या नांवाची पूजा करतात; परंतु कन्फ्यूशियससारखें आपलें मत उदार व उदात्त व्हावें अशी खटपट कितीसे करीत असतील ? तसेंच जे स्वतःला खिश्चन म्हणवतात अशांपैकीं किती जणांना खिस्तानें शिकवलेला धर्म समजला असेल, समजत असेल ?

## प्रकरण ६ वें

# ज्यानें साम्राज्य मिळविलें पण संस्कृति विध्वंसिली असा सायरस

— १ —

ज्या राष्ट्रांनीं ज्ञान-देवांची, धर्म-प्रेषितांची थोर विभूति म्हणून, हेच खरे महावीर म्हणून, पूजा केली अशा राष्ट्रांचें आपण धांवते दर्शन घेतलें. आतां आपण अशा एका देशाकडे वळूं या, कीं जेथें योद्धा म्हणजेच परमश्रेष्ठ मनुष्य मानला जाई, जेथें विषय-लंपटता, पशुता व स्वार्थ हेच परमोच्च सद्गुण मानवी सद्गुण मानले जात. हिंदुस्थान व चीन यांना इतर आशियापासून अलग करणाऱ्या पर्वतांना ओलांडून आपण पलीकडे जाऊं या. आपण पश्चिमेकडे जाऊं या. तें पहा इराणचें मैदान. आपण मागें पाहिलें आहे, कीं काहीं आर्यशाखा येथें वसाहती करून राहिल्या होत्या. या सर्व शाखांना मेडीज किंवा पर्शियन असें संबोधण्यांत येतें. हे अर्धवट जंगली, साहसी, रक्ततृषार्त असे लोक होते. पायांपासून डोक्यापर्यंत कातड्यांचा पोषाख करीत, अति ओबडधोबड असें अन्न खात. दोनच गोष्टी ते शिकत : घोड्यावर बसणें व लढणें. शांततेनें शेती किंवा व्यापार करणें ही गोष्ट त्यांना कमीपणाची वाटे. त्यांना ज्या गोष्टीची जरूर वाटे ती ते

बुशाल लुटीत. स्वतःला लागणाऱ्या वस्तू जे विकत घेत त्यांना ते दुबळे म्हणून संबोधीत, बावळट म्हणून ते त्यांचा उपहास करीत. सर्वत्र लूटमार करीत ते रोढूं लागले. ठायीं ठायीं त्यांनीं पुरें-पट्टणें धुळीस मिळविलीं. सारें आशिया खंड उध्वस्त व दग्ध नगरांच्या धुळीनें व राखेनें भरून गेलें. आतांपर्यंत एवढें मोठें साम्राज्य कोणीं मिळविलें नव्हतें अशी शेखी ते मारूं लागले.

प्रचंड साम्राज्य बांधणारे मेडीज हे पहिले होत. त्याचें अनुकरण पर्शियानें केलें. ख्रि. पू. ६०६ मध्यें मेडीज लोकांनीं निनवी शहर घेतलें. असीरियन लोकांची सत्ता त्यांनीं कायमची नष्ट केली. भूतलावरून त्यांनीं त्यांचें उच्चाटन केलें. त्यानंतर छप्पन वर्षांनीं सम्राट् सायरस पुढें आला. सायरसनें मेडिजी लोकांच्या वैभवाचा बुडबुडा फोडला. पर्शियाच्या साम्राज्यवादी महत्त्वाकांक्षाच्या मोठ्या बुडबुड्याचा धक्का लागून मीडियन सत्तेचा बुडबुडा नष्ट झाला.

ख्रिस्तपूर्व सहाव्या शतकाच्या मध्याला ही गोष्ट झाली. याच शतकांत चीनमध्यें आणि हिंदुस्थानांत लाओत्से, कन्फ्यूशियस व बुद्ध झाले. इतिहासाच्या ग्रंथांतून या तीन शांतिप्रधान महात्म्यांविषयीं फारसें लिहिलेलें नसतें. कारण ते रणधुमाळी माजविणारे नव्हते. ते स्वप्नसृष्टींत रमणारे अवलिये होते. प्रचंड सैन्यें घेऊन त्यांनीं कधीं परराष्ट्रावर स्वाऱ्या केल्या नाहींत. परंतु सायरस आदळआपट करणारा वीर होता. तो जागतिक साम्राज्याचा निर्माता होता. तो आपल्या पायांखालीं सारें आशिया खंड तुडविणारा सेनानी होता. आणि यासाठीं मूर्ख इतिहासकारांनीं त्याला " मोठा " ही पदवी दिली आहे. थोर सम्राट्, महान् सम्राट्, असें त्याला संबोधण्यांत येतें.

सायरस मोठा होता. परंतु कशांत ? तो अहंकारानें मोठा होता. कारस्थानें करण्यांत मोठा होता, लांचलुचपती घेण्यांत मोठा होता, अनियंत्रित सत्ता गाजविण्यात मोठा होता, भोगलालसेंत मोठा होता. इतर कशांतहि तो मोठा नव्हता.

— २ —

सायरसच्या जन्माविषयीं, त्याच्या आरंभींच्या जीवनाविषयीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं. पर्शियन दंतकथा सांगतात, कीं त्याच्या आईबापांस एक स्वप्न पडलें. तें एक दुष्ट स्वप्न होतें. तें स्वप्न सायरसविषयींचें होतें. आईबापांनीं

भीतीनें सायरसचा त्याग केला. त्याला त्यांनीं रानावनांत नेऊन सोडलें. तेथें तो वास्तविक मरावयाचाच. परंतु एका कुत्रीनें त्याला पाळलें आणि अत्यंत आश्चर्यकारक रीतीनें तो जगला, वांचला. नतर एका धनगराला तो आढळला. त्यानें त्याला मुलगा म्हणून पाळलें.

तो मोठा झाला. पुढारीपणाचे गुण जन्मजातच त्याच्याजवळ होते. ते दिसून येऊं लागले. पुढारी अर्थातच लोक समजतात त्या अर्थानें. पुढारीपणाचे गुण म्हणजे पहिल्या नंबरचें दुष्ट असणें, गुंड असणें. सायरसनें स्वयंसेवकाचा संघ गोळा केला. आजोबा अस्त्यगस यांना त्यानें पदच्युत केलें, आणि मेडीज व पर्शिया यांचा तो राजा झाला.

परंतु एवढ्यानें त्याचें समाधान झालें नाहीं. सुखी व समाधानी अशा लहानशा राज्याचा राजा होऊन रहाणें हें त्याला पुरेसें वाटेना. त्याची महत्त्वाकांक्षा अमर्याद होती. कॅन्सरच्या रोगाप्रमाणें--काळपुळीप्रमाणें--आपलें साम्राज्य सर्व खंडभर पसरावें असें त्याला वाटत होतें. अत्युष्ण कटिबंधापासून तो अति शीत कटिबंधापर्यंत आपलें साम्राज्य पसरलें पाहिजे असें त्याला वाटत होतें ते त्याला पर्शियाविषयीं खूप प्रेम वाटत होतें म्हणून नव्हे, पर्शियाचें नाव सर्वत्र व्हावे म्हणून नव्हे, त्याला फक्त स्वतःविषयीं प्रेम होतें. तो स्वतःचा पुजारी होता. तो तृष्णांध होता, लालसोन्मत्त होता.

— ३ —

सायरसनें पर्शियाचें राज्य बळकावलें त्याच्या आधीं दहाच वर्षें क्रोशियस हा लीडियाचा राजा झाला होता. आशियामायनरमधील ग्रीक वसाहतींच्या समुदायाला 'लीडिया' म्हणत. इजियन समुद्राच्या पूर्व बाजूस ह्या वसाहती पसरलेल्या होत्या. राजा क्रोशियस हा प्राचीन काळांतील जणूं कुबेर होता! प्राचीन काळातील जे. पी. मॉर्गन होता. स्वतःजवळच्या संपत्तीचा त्याला अत्यंत अभिमान होता. तो प्रत्येक देशांतील यात्रेकरूंस बोलावी. हेतु हा, कीं त्यानीं आपल्या या संपत्तीची कीर्ति सर्वत्र न्यावी. तो त्या परदेशीय पाहुण्या-समोर आपलीं सारीं माणिकमोतीं, सारें जडजवाहीर मांडी आणि नंतर त्यांना विचारी, "पृथ्वीवरील सर्वांहून सुखी असा प्राणी मी नाहीं का?" त्याच्या या अहंकारी प्रश्नाला ग्रीक तत्त्वज्ञानी सोलोन यानें स्पष्ट उत्तर दिलें

होतें, कीं " मनुष्य मेल्याशिवाय त्याला सुखी म्हणतां येणार नाहीं." मनुष्य जन्मभर सुखी होता कीं दुःखी हें त्याच्या मरणकाळच्या स्थितीवरून कळतें.

जेव्हां सायरसनें आपले दिग्विजय सुरू केले, तेव्हां क्रोशियसला मनांत वाटलें, कीं त्याच्याआधीं आपणच दिग्विजयाची दौड मारावी. म्हणून त्यानें देवाला कौल लावून विचारलें, " इराणच्या सम्राटाबरोबर लढाई पुकारली तर तें शहाणपणाचें होईल कीं मूर्खपणाचें ? " परंतु देवानें नेहमींप्रमाणें द्व्यर्थी उत्तर दिलें. देवानें सांगितलें, ' जर तूं सायरसच्याविरुद्ध जाशील तर मोठें साम्राज्य नष्ट करशील.' याचा अर्थ सायरसचें साम्राज्य नष्ट होईल किंवा स्वतः क्रोशियसच आपलें साम्राज्य गमावील असा होतो. देवानें दिलेला निर्णय निर्दोष होता. या ना त्या बाजूनें देवाचें म्हणणें खरेंच होणार होतें. देवानें दिलेला कौल नेहमींच खरा होत असतो.

परंतु देवानें दिलेल्या उत्तराचा क्रोशियसनें स्वतःला अनुकूल असा अर्थ लाविला. क्रोशियसनें असा अर्थ लावला, कीं जर आपण सायरसशीं लढाई केली तर आपण विजयी होऊं व सायरसचें साम्राज्य रसातळास जाईल. समतोल विचारसरणीच्या व डोकें शाबूत असलेल्या त्याच्या एका प्रधानानें युद्ध करूं नका असें सांगितलें. तो म्हणाला, " युद्ध करून कांहींहि मिळणार नाहीं. उलट सारें गमावून बसाल. युद्ध ही भयंकर गोष्ट आहे, तशीच ती मूर्खपणाचीहि आहे. युद्ध ही गोष्ट निसर्गाच्या व्यवस्थेच्या विरुद्ध आहे. कारण युद्धामुळें बापांना मुलाची प्रेतक्रिया करावी लागते. वास्तविक मुलांनीं वडिलांना मूठमाती द्यायची असते, परंतु युद्धामुळें हे असे विपरीत प्रकार होतात. युद्ध ही अनैसर्गिक वस्तु आहे."

परंतु क्रोशियसनें तो उपदेश झिडकारला. त्यानें सायरसवर स्वारी केली. त्याचा पराजय झाला. घाईघाईनें तो आपल्या सार्डिस राजधानीस परत आला. परंतु सायरस पाठीवर होताच. त्यानें सार्डिस शहराला वेढा घातला व फार त्रास न पडतां ती राजधानी जिंकली.

सायरसनें क्रोशियसला कैद केलें. आशियामायनरमधील ग्रीकांना शरण आणण्यासाठीं हार्पागॉस (या नांवाचा अर्थ 'लुटणारा' असा आहे.) नावाच्या आपल्या अधिकाऱ्यास मागें ठेवून सायरस पूर्वेस खाल्डिआकडे दिग्विजयार्थ

निघाल.. बाबिलोन ही खाल्डियाची राजधानी. बाबिलोन अति सुंदर शहर होतें. किती भव्य प्रासाद, किती उद्यानें—उपवनें ! तेथील स्त्री—पुरुष अत्यंत सुसंस्कृत होते. लंडनच्या आकाराचीं पांच शहरें मावतील एवढा बाबिलोनचा विस्तार होता. आजच्या न्यू यॉर्कमधील सुधारणा व संस्कृति यांशीं शोभेल अशा तेथील सुधारणा व संस्कृति होत्या. बाबिलोनमध्यें न्यू यॉर्कपेक्षां धांवपळ कमी असेल, गति, वेग जरा कमी असेल, परंतु सदभिरुचि व सुसंस्कृतता यांत कमीपणा नव्हता. तें शहर एका विस्तृत मैदानाच्या मध्यभागीं वसलेलें होतें. शहराभोंवतीं साठ मैल घेराच्या प्रचंड भिंती होत्या. त्या भिंतींना धातूंचे भक्कम दरवाजे होते. तें शहर चुना व पितळ यांच्या एकाद्या प्रचंड मनोऱ्या-प्रमाणें आकाशांत उंच गेलें होतें. शहरांतील अत्यंत उंच अशा इमारतींहूनहि उंच जागीं शहरांतील झुलत्या बागा होत्या. कृत्रिम बागांचे मजल्यावर मजले उभारण्यात आले होते. मागील राजा नेबुचद्नेझ्झर यानें आकाशाला मिठी मारायला जाणारी अशी ती उद्यानांची इमारत उभारली होती. बागांचा फुलता—झुलता असा हा मनोरा मोठा अपूर्व होता. जणूं फुललेल्या वृक्षवेलींचा घवघवीत असा प्रचंड पुष्पगुच्छच बाबिलोन शहर आकाशांतील प्रभूच्या चरणीं अर्पीत होतें. शहराच्या मध्यभागांतून नदी युफ्रेतीस वहात होती. तिच्यावर प्रचंड दगडी पूल होता. अफाट दळणवळणांत व्यवस्था असावी म्हणून नदीखालूनहि एक बोगदा होता. नदीच्या खालून व नदीच्या वरून असे हे रस्ते होते. नदीतीरावरच्या राजवाड्यांत सुंदर ग्रंथालय होतें. तेथें खाल्डियाचा ज्ञानोपासक राजा नबोनिडस आपल्या राष्ट्राच्या इतिहासाचा काळजीपूर्वक अभ्यास करीत बसे आणि मातीच्या विटांवर तो इतिहास लिहून ठेवीत असे. युद्धाच्या गोष्टींपासून त्याचे विचार दूर होते. सभोंवतालचे राजे युद्धें व कारस्थानें करीत असतां राजा नबोनिडस ज्ञानोपासनेंत रमला होता. आणि अकस्मात् सायरस आला ! प्रचंड वादळाप्रमाणें तो आला. त्यानें शहरांतील सैनिकांना व भटांभिक्षुकांना लांचलुचपती दिल्या. ते धर्माधिकारी लांच-लुचपतीला बळी पडले. फितुरीस यश आलें. लढाईशिवायच सायरस राज-धानीच्या दरवाजातून आंत आला.

बाबिलोनिया जिंकून सायरसनें इजिप्तकडे दृष्टि वळविली. पहिलें पाऊल म्हणून त्यानें बाबिलोनमधील ज्यूंना पॅलेस्टाइनमध्यें परत पाठविलें. बाबिलोन-

मध्यें जवळजवळ सत्तर वर्षें हे ज्यू कैदी म्हणून रहात होते. त्यांना सायरस जणूं उद्धारकर्ता वाटला ! परंतु सायरसनें ज्यूंना त्यांची मातृभूमि परत दिली, ती उदारपणानें व निरपेक्षपणें दिली नव्हती. पर्शियाच्या साम्राज्यशाही धोरणांतील तो एक भाग होता. पॅलेस्टाइनमध्यें मित्र-राष्ट्र असण्याची सायरसला फार जरूर होती. कारण इजिप्तमध्यें घुसण्याचा मागचा दरवाजा म्हणजे पॅलेस्टाइन.

सायरसच्या डोळयांसमोर आयुष्यभर एकच ध्येय होतें. तें म्हणजे साम्राज्य-निर्मितीचें. ही एकच महत्त्वाकांक्षा त्याला होती. पर्शियन साम्राज्याच्या बाहेर सूर्य कोठें प्रकाशणार नाहीं एवढें मोठें साम्राज्य त्याला स्थापावयाचें होतें.

परंतु इजिप्त जिंकून घेण्यापूर्वीच सायरस मारला गेला. एका युद्धात तो स्वतः जातीनें लढत होता. आपला भव्य देह त्यानें शत्रूंच्या शस्त्रास्त्रांसमोर उभा केला आणि तो ठार झाला. प्रदेश, आणखी प्रदेश, असें करणाऱ्या सायरसला शेवटीं योग्य तें उत्तर मिळालें. त्याच्या तृप्त न होणाऱ्या तृष्णेला अंतिम जबाब मिळाला. सहा फूट लांबीच्या त्याच्या देहाला भरपूर पुरेल असा जमिनीचा तुकडा त्याला मिळाला. मर्त्यलोकींचा पुरेपूर वांटा त्याला लाभला.

— ४ —

सायरसनें आरंभलेलें दिग्विजयाचें कार्य त्याच्या मुलानें—कंबायासिसनें—पुढें चालविलें आणि कंबायासिसचें काम पुढें डरायसनें हातीं घेतलें. कंबायसिसनें इजिप्त उध्वस्त केला, डरायसनें बाबिलोनचा पुरा विध्वंस केला. एक हजार वर्षांची पुंजीभूत होत आलेली संस्कृति त्यांनीं धुळीस मिळविली. त्या संस्कृतीला मागें खेंचून पुन्हा आपल्या रानटीपणापाशीं त्यांनीं ती आणून ठेवली. त्यांना यापेक्षां अधिक चांगलें कांहीं माहीत नव्हतें. कारण ते वेडेपीर होते. सारे लष्करी आक्रमक—सायरस, अलेक्झांडर, हॅनिबॉल, सीझर, नेपोलियन—सारे एकजात वेडेपीर होते, मूर्खशिरोमणी होते. ज्याचें म्हणून डोकें ठिकाणावर असेल तो कधींहि आपल्याच मानवबंधूंच्या कत्तली करून आपली कीर्ति वाढवावी अशी इच्छा करणार नाहीं; रक्ताचे पाट वाहवून तो स्वतःचा गौरव वाढवूं इच्छिणार नाहीं. आपलें हें जग अद्याप अर्धवट

रानटी स्थितींतच आहे. अजूनहि, दिग्विजय करूं पहाणाऱ्या या भूतकाळांतील खाटकांची आपण पूजा करीत असतों. मागील जेत्यांना आपण भजतों व आजचे जे जेते आहेत त्यांना तरुणांच्या डोळ्यांसमोर अनुकरणीय आदर्श म्हणून आपण ठेवतों. आपण जेव्हां खरोखर सुधारूं, सुसंस्कृत होऊं, तेव्हा जग जिंकूं पहाणाऱ्या या साऱ्या तरवारबहाद्दरांना आपण वेड्यांच्या दवाखान्यांत ठेवूं; अत्याचारी अशा माथेफिरू वेड्यांच्यामध्यें त्यांना ठेवूं; कारण या संहारकारी सैतानांचें खरें स्थान तेंच होय.

## प्रकरण ७ वें

# अथेन्सचा लोकप्रिय लोकशाही पक्ष-नेता पेरिक्लीस

— १ —

पर्शियनांनीं आशिया जिंकून घेतला आणि आतां त्यांनीं आपली गिधाडी दृष्टि युरोपकडे वळविली. इजियन समुद्राच्या पलीकडे ग्रीस देश होता, भूमध्य-समुद्रांत आपले दांत खोल रुतवीत ग्रीस उभा होता. पर्शियांतल्याप्रमाणें ग्रीस देशांतहि आर्यन शाखेचेच लोक होते. आर्यांच्या त्या सर्वत्र पसरण्याच्या वेळींच हे आर्य इकडे येऊन ग्रीस देशांत घुसले. तेथल्या मूळच्या रहिवाशांची त्यांनीं हकालपट्टी केली आणि नंतर स्वतःच्या संस्कृतीचा त्यांनीं आरंभ केला. फोनिशियनांपासून ते नौकानयन शिकले. इजियन समुद्र ओलांडून आशियामायनरच्या किनाऱ्यावर त्यांनीं अनेक वसाहती वसविल्या. नकाशांत तुम्ही पहाल तर तुमच्या तत्काळ ध्यानांत येईल, कीं इजियन समुद्र हा एक अरुंद जलमार्ग आहे. अनेक बेटें या रस्त्यावर वाटोवाट उभीं आहेत. जणूं त्यांनीं सेतूच बांधला आहे. दंतकथा रचणाऱ्या ग्रीकांनीं हीं बेटें ईश्वरानें तेथें कां रोविलीं याचीं दोन कारणें दिलीं आहेत : ग्रीकांनीं यांच्यावरून पावलें टाकीत जावें म्हणून देवानें हीं बेटें ठायींठायीं उभीं केलीं हें एक कारण; दुसरें कारण म्हणजे एका खंडांतून दुसऱ्या खंडांत जाणाऱ्या प्रवाशांनीं वाटेंत विसांवा घ्यावा म्हणून हीं बेटें प्रभूनें उभीं केलीं होतीं. या बेटांमुळें फार प्राचीन काळापासून ग्रीकांनीं आशियाशीं संबंध ठेवला होता आणि त्यामुळें ते पाश्चिमात्यांस पौर्वात्यांचा परिचय करून देणारे बनले. पौर्वात्यांसाठीं ते

पाश्चिमात्यांचे दुभाष्ये बनले. ते पूर्वेचा अर्थ पश्चिमेस विशद करणारे आचार्य झाले.

ग्रीक लोक व आशियांतील लोक याच्यांत व्यापार चाले आणि तदनुषंगानें लढायाहि होत. त्या शेंकडों युद्धांचा भीषण इतिहास आपणांस नको आहे. परंतु त्यांतील महायुद्ध जें ट्रोजन वॉर, तें होमरनें आपल्या काव्यामुळें अमर करून ठेवलें आहे. आंधळा महाकवि होमर! दोन रानटी जातींतील क्षुद्र भांडणांचा विषय घेऊन अमर सौंदर्याचें महाकाव्य त्यानें जगाला दिलें.

या ग्रीक लोकांचें खरोखर एक अपूर्व वैशिष्टय होतें. ज्या ज्या वस्तूला ते स्पर्श करीत, तिचें ते शुद्ध शंभर नंबरी सोनें करीत. साध्या वस्तूला स्पर्श करून तिचें काव्याच्या शुद्ध सुवर्णांत ते परिवर्तन करीत. ही दैवी देणगी, ही अद्भुत कला त्यांच्या ठायीं कशी आली तें सांगणें कठिण. त्यांच्या देशाच्या विशिष्ट भौगोलिक रचनेमुळें हा गुण त्यांच्या अंगीं आला असें अर्वाचीन इतिहासकार सांगतात. ग्रीस हे द्वीपकल्प आहे. हा देश शेंकडों लहान लहान दऱ्यांखोऱ्यांमुळें विभागला गेला आहे. प्रत्येक खोरें दुसऱ्या खोऱ्यापासून सभोंवतालच्या डोंगरपहाडांनीं सुरक्षित असे आहे. कधीं कधीं समुद्राचा बाहूहि रक्षणार्थ आला आहे. याप्रमाणें पृथक् पृथक् अशा त्यांच्या शाखा झाल्या. त्या त्या लहान खोऱ्यांत जीवनाचा विकास करीत ते राहिले. लहान वस्तूंतहि पूर्णता ओतायची कला ते शिकले. निर्दोष भावगीतें, निर्दोष नाटकें, निर्दोष भांडीं, निर्दोष शिल्प, निर्दोष मंदिरें—सर्वत्र परिपूर्णता आहे. परंतु ग्रीक लोकांप्रमाणेंच इतर ठिकाणींहि असणाऱ्या लोकांना अशी भौगोलिक रचना मिळालेली का नाहीं? मिळालेली आहे. परंतु ग्रीक लोकांप्रमाणें जीवनांतील पूर्णता, हा ज्ञानविज्ञान–कलांचा अभिनव विलास व विकास त्यांना दाखवितां आलेला नाहीं. प्रामाणिकपणानें म्हणावयाचें झालें तर आपणांस असेंच म्हणावें लागेल, कीं ग्रीक हे सौंदर्योपासक कां झाले, ज्यू हे शांतीचे उपासक कां झाले, याचें कारण सांगतां येणार नाहीं.

— २ —

ग्रीकांची मनोरचना अपूर्व होती. त्यांची मनोरचना वैशिष्टयपूर्ण होती. त्यांना निर्मितींत जेवढा आनंद वाटे तेवढाच विध्वंसांतहि वाटे. त्याना मेळ, सुसंवादिता आवडे; परंतु त्यांच्या राजकीय जीवनात मात्र कधींच मेळ

नसे. तेथें नेहमींच विसंवाद व भांडणें. ते संयमाचा नि नेमस्तपणाचा उपदेश करीत; परंतु भांडणें शोधण्यांत नेहमीं वेळ दवडीत. ते देवांशीं बोलत, संवाद करीत आणि इकडे शेजाऱ्यांना फसवीत व लुबाडीत. ग्रीक लोक उदात्तता व मूर्खता यांचें मिश्रण होते. एस्पायलॅस हा त्यांचा सर्वांत मोठा नाटककार. परंतु स्वतःजवळच्या दैवी नाट्यकलेचा त्याला अभिमान वाटत नसे. आपण एक शिपाईगडी आहों यांतच त्याला सारा पुरुषार्थ वाटे. ग्रीक लोकांना युद्धासाठीं म्हणून युद्ध आवडे. जणूं तो त्यांचा एक आनंद होता! विध्वंसनाचा, मारणमरणाचा आनंद! सौंदर्यासाठीं ज्याप्रमाणें ते सौंदर्याची पूजा करीत, त्याप्रमाणेंच लढण्यासाठीं म्हणून लढत. ते प्रतिभावंत परंतु जंगली असे लोक होते. कलेमध्यें अद्वितीय होते, दैवी होते, परंतु परस्परांशीं वागतांना जंगलीपणाने वागत. एकाद्या पुतळयाचें बोट जरा बिघडलें तर तें त्यांना अक्षम्य पाप वाटे. परंतु युद्धकैद्यांचीं बोटें तोडणें त्यांना थोर कर्म वाटे, देशभक्तीचें कर्म वाटे.

ग्रीस देशांत अनेक नगरराज्यें होतीं. अशा या नगरराज्यांत तो देश विभागला गेला होता. प्रत्येक राज्य स्वतंत्र होतें. प्रत्येक दुसऱ्याचा नाश करूं पहात होतें. परंतु त्यांचे द्वेषमत्सर कितीहि असले तरी ओबडधोबड स्वरूपाची व स्थूल प्राथमिक पद्धतीची अशी लोकशाही त्यांनीं निर्माण केली यांत शंका नाहीं. प्रथम त्यांनीं राजांना नष्ट केलें. नंतर मूठभर प्रतिष्ठितांची—सरदार-वर्गाची—सत्ता त्यांनीं नष्ट केली. खि. पू. सातव्या शतकांतच अथेन्समध्यें पूर्ण लोकसत्ता होती. ती लोकसत्ता सर्वसामान्य जनतेची नव्हती, तर असामान्य जनतेची—वरिष्ठ वर्गाची—होती. अथेन्समधील फक्त एक-पंचमांश लोकांनाच तेथील लोक-सभेंत वाव होता. ज्यांचे आई-बाप अथीनियन असत, त्यांनाच त्या लोकसभेंत प्रवेश असे. उरलेल्या चार-पंचमांश लोकात परके असत, गुलाम असत, गुन्हेगार असत; आणि स्त्रियांना तर सार्वजनिक व राजकीय कामांत संपूर्णपणें प्रतिबंधच होता. या सर्वांना सर्वसाधारणपणें शूद्र असें संबोधण्यांत येई, असंस्कृत रानटी लोक असें समजण्यांत येई.

ग्रीस देशांतील ही लोकशाही अशा प्रकारें जरी प्राथमिक स्थितींतील असली, तरी तिच्यामुळें पर्शियनांच्या उरांत धडकी भरली. ग्रीक लोक या

लोकशाहीमुळें वाईट उदाहरण घालून देत आहेत, उद्यां आपल्या आंगलट येणारा नवीन पायंडा पाडीत आहेत असें त्यांना वाटलें. ग्रीकांचा लोकशाहीचा प्रयोग यशस्वी झाला तर अनियंत्रित सत्तेचा पायाच उखडला जाईल अशी भीति पर्शियन साम्राज्यवाद्यांस वाटूं लागली. लोकशाहीचे पुरस्कर्ते ग्रीक लोक म्हणजे प्राचीन काळचे बोल्शेव्हिक होते. त्या ग्रीकांना जिंकून घेण्याचें पर्शियनांनीं निश्चित केलें. लोकशाहीचा हा धोका नष्ट करण्याचें त्यांनीं ठरविलें.

ग्रीस देशावर स्वारी करायला त्यांना चांगलें कारणहि सांपडलें. आशिया-मायनरमध्यें ज्या ग्रीक वसाहती होत्या त्यांनीं क्रोशियसच्या पुढारीपणाखालीं मागें एकदां पर्शियनांवर हल्ला चढविला होता. म्हणून त्या ग्रीक वसाहतींचा मायदेश जो ग्रीस त्याच्यावर हल्ला करून सूड घेणें अत्यंत न्याय्य आहे असें पर्शियनांनीं ठरविलें.

ग्रीस देशावरील डरायसची स्वारी, माराथॉनची लढाई, झर्सिसची दहा लाख सैन्य बरोबर घेऊन आलेली टोळधाड, थर्मॉपिली येथील लिओनिदास याचा शौर्यधैर्यात्मक प्रतिकार, त्या खिंडीतील त्यानें मांडलेलें अभंग ठाण, सालामिसच्या सामुद्रधुनीमध्यें थेमिस्टाक्लिसनें लढविलेले डावपेंच, प्लाटिआ येथील लढाईत पर्शियनांचा झालेला पराभव, इत्यादि गोष्टी इतक्यांदां सर्वत्र सांगितल्या गेल्या आहेत, कीं त्या पुन्हा सांगण्यांत फारसें स्वारस्य नाहीं. लष्करी डावपेंचांची ज्यांना आवड आहे, आपल्या मानवबंधूंना मारण्यासाठीं लष्करी हालचाली कशा कराव्या, शत्रूंस कसें कोंडींत धरावें हें समजून घेण्याची ज्यांना आवड आहे, माणसें मारण्याची सुंदर कला ज्यांना शिकायची आहे, त्यांनीं समर-चमत्कारांचें ते रक्ताळ व क्रूर इतिहास वाचावे. कोणत्याहि ग्रीस देशाच्या इतिहासांत या गोष्टींचीं इत्थंभूत वर्णनें आढळतील. एक गोष्ट समजली म्हणजे पुरे, कीं या युद्धांत अखेरीस ग्रीकांनीं इराण्यांचा पूर्ण पाडाव केला.

पूर्वेकडून आलेलें तें प्राणघातकी संकट नष्ट केल्यावर पुन्हा ग्रीक लोक आपापसांत कुरबुरी करूं लागले. लहान शहरें अथेन्सचा द्वेष करीत, अथेन्स स्पार्टाला पाण्यांत पाही आणि स्पार्टा सर्वांचाच हेवादावा करी. पर्शियनांनीं जर कदाचित् पुढें पुन्हा हल्ला केला तर त्यांना नीट तोंड देतां

यावें म्हणून सर्व ग्रीक नगरराज्यांनीं एक संरक्षणसमिति नेमिली होती. या समितीचें प्रमुखपण अथेन्सकडे होतें. या संरक्षणसमितीचें काम नीट चालावें म्हणून प्रत्येक नगरराज्यानें आरमारी गलबतें तरी द्यावीं किंवा पैसा तरी पुरवावा असें ठरलें होतें. येणारा सारा पैसा डेलॉस येथील ॲपॉलोच्या मंदिरांत ठेव म्हणून ठेवण्यांत येई. डेलॉस हें इजियन समुद्रांतील एक बेट होतें. या संरक्षणसमितीला डेलॉससंघ असेंहि संबोधिलें जाई.

जसजसे दिवस जाऊं लागले तसतसें संरक्षण-समितीच्या कामात मंदत्व येऊं लागलें. कोणी फारसें लक्ष देईना, कोणी आरमारी गलबतें पाठवीना, तर कोणी पैसे देईना. अथीनियन हे प्रमुख असल्यामुळें जमलेल्या पैशांतून ते स्वतःसाठींच गलबतें बांधूं लागले. तोंडानें अर्थात् ते म्हणत, कीं या आरमाराचा उपयोग सर्व ग्रीस देशाच्या रक्षणार्थच होईल. जमा झालेल्या पैशाचा अधिकच मुक्तहस्तें उपयोग करतां यावा म्हणून डेलॉस येथील तिजोरी आतां त्यांनीं अथेन्स येथेंच आणिली आणि अशा रीतीनें अथेन्स जणूं साम्राज्यच बनलें. इतर नगरराज्यें म्हणजे जणूं खंडणी देणारीं मांडलिक सामंत राज्यें ! इतर ग्रीक लोक अथेन्सची जणूं प्रजा ! इतर नगरराज्यांच्या हक्कांची पायमल्ली करून अथेन्स सर्वसत्ताधीश साम्राज्यवादी होऊं पहात होतें आणि त्यामुळें सर्व ग्रीस देशांत असंतोष पसरला.

कांहीं सभासद-नगरराज्यांनीं आतां उघडपणेंच पैसा देण्याचें नाकारलें. परंतु अथेन्सनें त्यांच्याविरुद्ध आपलें आरमार पाठविलें आणि त्यांना शरण आणिलें. अशा रीतीनें स्वेच्छेनें दिलेल्या किंवा सक्तीनें उकळलेल्या वार्षिक पैशांची जवळजवळ वीस लक्ष रुपये रक्कम जमा होई. त्या काळांत वीस लक्ष रुपये म्हणजे लहान रक्कम नव्हती. या पैशाचा अथेन्सनें फार चांगला उपयोग केला. जगांतील नामांकित कलावंतांना अथेन्सनें आमंत्रण दिलें, त्यांना उदार आश्रय दिला. अथेन्स मातीच्या झोंपड्यांचें एक गांव होतें. परंतु आतां तें संगमरवरी पाषाणांचें व सोन्याचांदीचें अमरनगर झालें. मातीचें जणूं महाकाव्य झालें !

हें सारें योजनापूर्वक घडवून आणणारा लोकशाही पक्षाचा लोकप्रिय पुढारी पेरिक्लीस हा होय.

— ३ —

पेरिक्लीस हा अथेन्समधील एका सरदाराचा मुलगा होता. पेरिक्लिसचा बाप पर्शियाशीं झालेल्या लढायांत लढला होता. आईकडून तो क्लेस्थेनीस घराण्यांतील होता. अथेन्समध्यें लोकशाही स्थापणाऱ्यांपैकीं क्लेस्थेनीस हा एक होता. ग्रीक लोकांचा जो शिक्षणक्रम असे तो सारा पेरिक्लिसनें पुरा केला. व्यायाम, संगीत, काव्य, अलंकारशास्त्र, तत्त्वज्ञान, सारे विषय त्याने अभ्यासिले. लहान वयांतच राजकारणाची आवड त्याला लागली. त्या विषयांत तो रमे. त्याच्या अनेक आचार्यांपैकीं सुप्रसिद्ध तत्त्वज्ञानी झेनो हा एक होता. झेनोची वाणी दुधारी तरवारीप्रमाणें होती. तो कोणत्याहि विषयावर दोन्ही बाजूंनीं तितक्याच समर्पकतेनें व परिणामकारकपणें बोलूं शके. पुढें यशस्वी मुत्सद्दी होण्याची महत्त्वाकांक्षा धरणाऱ्या तरुण पेरिक्लिसला अशा वादविवादपटु बुद्धिमान् गुरूजवळ शिकायला सांपडलें ही चांगलीच गोष्ट झाली. परंतु पेरिक्लिसचा सर्वांत आवडता आचार्य म्हणजे अॅनॅक्झेगोरस हा होता. अॅनॅक्झेगोरस हाहि मोठा तत्त्वज्ञानी होता. तो थोडासा अज्ञेयवादी होता. "या जगाचा कारभार भांडखोर व क्षुद्र वृत्तीचे देव चालवीत नाहींत, होमरच्या महाकाव्यांतील देवताहि चालवीत नाहींत, तर परमश्रेष्ठ अशी चिन्मयता जगाचा कारभार चालवीत आहे" असें तो म्हणे. अॅनॅक्झेगोरस विज्ञानांतहि फार पुढें गेलेला होता. मनुष्यांच्या डोळ्यांना सूर्य जरी बचके-एवढा दिसत असला तरी तो खरोखर फारच प्रचंड आहे असें तो म्हणे. सूर्याचा आकार निदान पेलापॉनेसच्याइतका म्हणजे शंभर चौरस मैलांचा तरी असला पाहिजे असा त्यानें अंदाज केला होता.

ज्या प्रदेशांत ग्रीक रहात होते तो प्रदेश खरोखरच फार लहान होता.

पेरिक्लीस अशा गुरुजनांजवळ शिकला. जेव्हा त्याचें शिक्षण संपलें त्या वेळेस विश्वाच्या पसाऱ्याचें जरी त्याला फारच थोडें ज्ञान असलें तरी त्याच्या स्वतःच्या शहरांतील राजकारणाचें मात्र भरपूर ज्ञान होतें. तो उत्कृष्ट वक्ता होता. प्रतिपक्षीयांचीं मतें तो जोरानें खोडून टाकी. विरुद्ध बाजूनें मांडलेल्या मुद्यांची तो राळ उडवी. त्याचें अशा वेळचें वक्तृत्व म्हणजे मेघांचा गडगडाट असे, विजांचा कडकडाट असे. अशा वेळेस कोणीहि त्याच्यासमोर टिकत नसे.

परंतु पेरिक्लीस एकदम राजकारणांत शिरला असें नाहीं. प्रथम त्यानें लष्करांत नोकरी धरिली. ज्याला जीवनांत यशस्वी व्हावयाचें असेल त्यानें लष्करी पेशाची पायरी चढणें आवश्यक असतें.

आणि पुढें त्याचें सार्वजनिक आयुष्य सुरू झालें. गरिबांचा पुरस्कर्ता म्हणून तो पुढे आला. स्वभावानें तो भावनाशून्य व जरा कठोर होता. तो अलग रहाणारा, दूर रहाणारा, जरा अहंकारी असा वाटे. तो विसाव्या शतकांतील जणूं वुड्रो वुइल्सन होता. प्रथम प्रथम लोकांचा विश्वास संपादणें त्याला जड गेलें. पुराणमतवादी पक्षाचा किमॉन हा त्याचा प्रतिस्पर्धी होता. किमॉन अधिक चळवळ्या व गुंडवृत्तीचा होता. हा किमॉन गरिबांना मेजवानीस बोलावी. स्वतःच्या खासगी फळबागांतील फळें गोळा करायला, त्या बागांतून खेळायला तो गरिबांना परवानगी देई. रस्त्यांतून जातांना त्याचे गुलाम वस्त्रांचे गठ्ठे घेऊन त्याच्या पाठोपाठ येत असत. आणि रस्त्यांत जे जे कोणी वस्त्रहीन दिसत, ज्यांच्या अंगावर फाटक्या चिंध्या असत, त्यांना किमॉन वस्त्रें वांटीत जाई.

पेरिक्लिसनें हें सारें पाहिलें. लोकप्रियता मिळविण्याच्या युक्त्या त्यानें ओळखल्या. तोहि तसेंच करूं लागला. अत्यंत विपन्न व निराधार लोकांना तो पैशांच्या देणग्या पाठवूं लागला. लोकसभेला जे हजर रहातील त्यांनाहि तो पैसे देई. राज्यकारभारांत जे प्रत्यक्ष भाग घेतील त्यांनाहि तो बक्षिशी देई. लोकप्रियतेचा कांटा लवकरच पेरिक्लिसच्या बाजूला झुकला आणि जवळजवळ चाळीस वर्षेपर्यंत—मरेपर्यंत—त्यानें लोकांवरील आपलें प्रभुत्व व वजन राखलें.

पेरिक्लिसशीं कसें वागावें तें त्याच्या विरोधकांस समजत नसे. प्रक्षुब्ध अशा वादविवादाच्या प्रसंगीं सारे हमरीतुमरीवर आले असतांहि तो मनाचा तोल सांभाळूं शके, विनोदी वृत्ति राखूं शके. तो कधीं प्रक्षुब्ध होत नसे. स्वतःच्या मनावर त्याचा अपूर्व ताबा होता. प्लुटार्कनें पेरिक्लिसविषयींची एक आख्यायिका दिली आहे. त्या आख्यायिकेनें पेरिक्लिसच्या स्वभावावर चांगलाच प्रकाश पडतो. एकदां तो मुख्य बाजारपेठेंतून—फोरममधून—जात होता. रस्त्यांत विरुद्ध पक्षाचा एक राजकारणी पुरुष त्याला भेटला. तो पेरिक्लिसला भरबाजारांत शिव्या देऊं लागला. पेरिक्लिसनें त्याला उत्तर दिलें नाहीं. उत्तर देणें त्याला कमीपणाचें वाटलें. पुढें न जातां तो परत माघारा वळला, घरीं जायला

निघाला. परंतु तो शिवराळ प्रतिपक्षी त्याच्या पाठोपाठ शिव्यांची लाखोली देत येतच होता. अत्यंत कटु व नीच अशी ती वाग्बाणवृष्टि होती. घरीं पोंचेपर्यंत पेरिक्लीस शांत होता. जणूं त्या शिव्यांकडे त्याचें लक्षच नव्हतें ! घरीं पोंचला तों बाहेर चांगलाच अंधार पडला. पेरिक्लीस आपल्या गुलामाला म्हणाला, " मशाल पेटवून त्या सद्गृहस्थांना घरीं पोंचव. बाहेर अंधार आहे."

खासगी आचरणांत पेरिक्लीस जरा अहंमन्य होता, जरा शिष्ट व फाजील प्रतिष्ठित होता. तो फारसें कधीं कोणाचें आमंत्रण स्वीकारीत नसे. क्वचित् प्रसंगींच तो सार्वजनिक सभासंमेलनांस, मेजवान्यांस उपस्थित राही. आपल्या आप्तेष्टांच्या घरींहि तो क्वचितच जाई. त्याच्या स्वभावांत अशी ही दूर रहाण्याची वृत्ति होती. परंतु ही उणीव भरून काढण्यासाठींच कीं काय तो हाताचा उदार होता. त्याची पिशवी दुसऱ्यासाठीं सदैव मोकळी असे. नागरिकांचें जीवन अधिक सुखमय व्हावें म्हणून सार्वजनिक फंडांना तो सढळ हातानें वर्गणी देई. नागरिकांचें जीवन म्हणजे जणूं त्याचें खेळणें ! तो त्यांच्यासाठीं प्रदर्शनें भरवी, खाने देई, कवायती व खेळ करवी. जगांतील उत्तमोत्तम कलावंतांना तो अथेन्सला बोलावी आणि अथीनियन जनतेला कलात्मक आनंद देई. सर्व प्रकारच्या खेळांना व कसरतींना त्यानें उत्तेजन दिलें. त्यानें साऱ्या ग्रीस देशाचें जणूं अखंड क्रीडांगण केलें. त्यामुळें लोकांची भरपूर करमणूक होई, सर्वांना मजा वाटे.

उधळेपणाचा आरोप त्याचे शत्रू त्याच्यावर करीत. लष्करी सामर्थ्य वाढावें म्हणून योग्य खर्च न करतां हा या खेळांवर व कलांवरच भरमसाट खर्च करीत बसतो असें ते म्हणत. विरोधी पक्षाचे लोक म्हणत, " आमची ही अथेन्स नगरी अलंकारांनीं व सुंदर वस्त्रांनीं नटलेल्या एकाद्या स्त्रीप्रमाणें दिसावी हें आम्हांला लज्जास्पद आहे. आमच्या आत्म्याचा, आमच्या शौर्याचा हा अपमान आहे."

परंतु पेरिक्लीस म्हणे, " अथेन्स युद्धार्थहि सदैव सिद्ध आहे. शहराला सुंदर करण्यांत पैसा खर्च होतो ती उधळपट्टी नसते. हजारों लोकांना त्यामुळें उद्योगधंदा मिळतो, काम मिळतें. या लोकांना उद्योग न मिळाला तर ते निरुपयोगी होतील, नाना प्रकारचीं वाईट कृत्यें करूं लागतील."

अथेन्समधील साऱ्या जनतेंत सृजनशक्तीचा दिव्य प्रवाहच जणूं वाहूं लागला. सारे कलात्मक निर्मितींत रंगले. जगांतील शिल्पकारांचा मुकुटमणि जो फिडियस तो अथेन्समधील शिल्पकामावरचा मुख्य अधिकारी होता. त्याच्या योजनेप्रमाणें सारें होत होतें. सर्वत्र फिडियसची देखरेख असे. फिडियस म्हणाला, " सर्वत्र सौंदर्य फुलूं दे. " आणि शहरभर ठायीं ठायीं अप्रतिम पुतळे उभे राहिले. रमणीय व भव्य मंदिरें बांधलीं गेलीं.

ग्रीक लोक आपलीं मंदिरें, आपलीं शिल्पकलेचीं कामें रंगवीतहि असत. पार्थेनॉन येथील पडके अवशेष आज पाहून पूर्वीच्या सौंदर्याची खरी कल्पना आपणांस येणार नाहीं. तें अस्थिपंजराचें सौंदर्य राहिलें आहे. पूर्वीच्या सौंदर्याचा नुसता हाडांचा सांगाडा जणूं राहिला आहे. प्रोपिलिआचें भव्य चित्र कल्पनेनें डोळ्यांसमोर आणा. तेथील ते हारीनें वरपर्यंत जाणारे रमणीय स्तंभ, तें अॅक्रॉपॉलिसचें स्थान आणि तो संगीताचा सुंदर दिवाणखाना ! टेंकडीवर असलेला अॅथीनी देवतेचा स्वर्गीय पुतळा ! जमिनीवरून व समुद्रावरून तो पुतळा लांबून दिसे. आणि सौंदर्याचें माहेरघर असे तें पार्थेनान ! पर्वतशिखरावर एकाद्या नक्षीदार हिऱ्याप्रमाणें तें चमकत असे. निळ्या अथीनियन आकाशाखालीं हीं सर्व शिल्पकामें अत्यंत सुंदर रंगांत शोभत असत, चमकत असत. चुनखडी, पितळ, आरसपानी दगड यांच्या ज्यांना पाकळ्या आहेत अशीं जणूं खरोखरचीं फुलें तेथल्या शिल्पांत दिसत. फिडियसच्या हाताचा जादूचा स्पर्श होतांच दगडांधोंड्यांतून फुलें फुलतांना पाहून ग्रीक लोकांचें हृदय उचंबळून येत असेल यांत काय शंका ? या शिल्पनिर्मितीनंतर कित्येक शतकांनीं झालेल्या प्ल्युटार्कनें जेव्हा हें कलेचें अप्रतिम प्रदर्शन पाहिलें तेव्हां तो चकित झाला. रंग व रेषा यांचें तें निर्दोष मिश्रण पाहून त्याची जणूं समाधि लागली ! तो सांगतो, " या शिल्पाकृतींवर अद्यापहि एक प्रकारचा ताजेपणा आहे. काळाच्या स्पर्शापासून हा ताजेपणा या शिल्पाकृतींना सांभाळीत आहे. जणूं या सौंदर्यमय कृतींत अमर असा आत्माच वास करीत आहे ! या शिल्पाकृती निर्माण करीत असतांना, यांचें मिश्रण तयार करतांना, जणूं अमर अशी स्फूर्ति व सजीवताच तेथें मिसळली जात होती !

अशा रीतीनें पेरिक्लीस अथेन्सला सौंदर्यखनि करीत असतां त्याचे शत्रू त्याच्या आसनाखालीं सुरुंग लावीत होते. खुद्द पेरिक्लिसवरच हल्ला करण्याचें

धैर्य त्यांना नव्हतें. तेव्हां त्याच्या मित्रांवरच त्यांनीं हल्ला चढवि
अॅथीनी देवतेचा पुतळा अलंकृत करण्यासाठीं एकानें सोनें दिलें होतें. त
सोन्यांतील कांहीं भाग फिडियसनें चोरला असा त्याच्यावर आरोप करण्यां
आला. परंतु फिडियसनें त्या आरोपाला उत्तर दिलें. स्वतःवरचा आरोप त्या
खोडून काढला. परंतु फिडियसला पुन्हा अटक करण्यांत आली. त्याच्या
धर्माची विटंबना करण्याचा, नास्तिकतेचा आरोप करण्यांत आला. देवतेच
ढालीवर त्यानें स्वतःची व पेरिक्लिसची प्रतिकृति काढण्याचा मूर्खपणा के
होता. अथीनियनांच्या दृष्टीनें तो अक्षम्य अपराध होता. त्यांनीं त्याला तुरुंगां
टाकलें. तेथें तो आजारी पडला. त्याला एक रोग जडला व तो मेला. को
म्हणतात त्याला विष देण्यांत आलें.

फिडियसनें अथेन्सची जी अमोल सेवा केली, तिचे बक्षीस या यथा
अथीनियन पद्धतीनें अथीनियन जनतेनें त्याला दिलें. फिडियसला दूर करू
पेरिक्लिसचे शत्रू आतां अॅनॅक्झेगोरसकडे वळले. हा पेरिक्लिसचा आवड
आचार्य होता आणि आतां त्याचा उत्कृष्ट मित्रहि होता. त्याच्यावर अज्ञेय
वादाचा आरोप लादण्यांत आला. धार्मिक बाबतींतील मतस्वातंत्र्य नवी
कायदा करून नष्ट करण्यांत आलें. हा नवा कायदा म्हणजे जणूं पेरिक्लिसला
आह्वानच होतें. कारण धार्मिक बाबतींत देवादिकांविषयींचीं त्याचीं मतें सनातन
पद्धतीचीं नव्हतीं. परंतु सार्वजनिकरीत्या धार्मिक मतांची चर्चा तो टाळ
आणि अशा रीतीनें तो काळजी घेऊं लागला. कारण किती झालें तरी त
मुत्सद्दी होता, तत्त्वज्ञानी नव्हता.

परंतु त्याची वारांगना अस्पाशिया हिला अटक करण्यांत आली. त्याच्याव
हा सर्वांत प्रखर असा प्रहार होता, हा फार मोठा आघात होता.

— ४ —

अस्पाशिया ही मूळची इजियन समुद्रावरच्या मिलेट्स शहरची रहाणार
अथेन्समध्यें अर्थात्च तीं परदेशी होती. कायदेशीररीत्या तिचा व पेरिक्लिसच
विवाह होऊं शकत नव्हता. परंतु तरीहि पतिपत्नी म्हणून दोघे एकत्र रहा
होतीं. पेरिक्लिसनें आपल्या पहिल्या पत्नीशीं काडीमोड केली होती. अस्पाशिय
व पेरिक्लीस यांचें एकमेकांवर फार प्रेम होतें. अस्पाशिया ही क्षुद्र वारांगन

नव्हती. सुसंस्कृत, सुशिक्षित व सुंदर अशा वारांगनांचा एक विशिष्ट वर्ग अथेन्समध्यें होता, त्यांत शोभणारी ती होती. अथेन्समधले लोक स्वतःच्या मातीच्या झोंपड्यांपेक्षां सार्वजनिक इमारतींवर ज्याप्रमाणें अधिक प्रेम करीत, त्याप्रमाणें स्वतःच्या पत्नीपेक्षां ते या वारयोषितांवर अधिक प्रेम करीत. अथेन्समधील स्वतंत्र नारी--मग त्या विवाहित असोत वा अविवाहित असोत--कमी मानल्या जात. कारण त्या अशिक्षित असत. त्यांना घराबाहेर पडण्याची मुभा नव्हती. घरांतील गुलामांबरोबर व गुरांढोरांबरोबर त्यांनीं रहावें. एकाद्या प्रतिष्ठित अथीनियन पुरुषाला बुद्धीनें आपल्या बरोबरीची अशी एकादी स्त्री सार्वजनिक संगतीसाठीं हवी असली तर तो थेट त्या वारयोषितांकडे जाई. या विशिष्ट वर्गांतील वारयोषितांना बौद्धिक शिक्षण मिळालेलें असे. जो सुप्रसिद्ध पुरुष त्यांच्याकडे येई त्याला शारीरिक व बौद्धिक आनंद द्यायला त्या समर्थ असत.

या ज्या धंदेवाईक सहचरी नारी असत, त्यांच्यामध्यें अस्पाशियाँ ही अत्यंत सुंदर व अति बुद्धिमती अशी होती. अथेन्समधील बुद्धिमंतांच्या मंडळांतील ती तेजस्वी तारका होती. ती जणूं त्या मंडळाची अभिजात नेत्री होती! तिच्या मंदिरांत तत्त्वज्ञानी, मुत्सद्दी, संगीतज्ञ, कवि, कलावान् सारे जमत. इतरहि सुसंस्कृत अशा विलासिनी वारांगना तेथें गोळा होत असत. अस्पाशिया जमलेल्या लोकांना बौद्धिक मेजवानी देई. ती तात्त्विक वादविवाद करी आणि मोठमोठे तत्त्वज्ञानीहि माथा डोलवीत. तेथें जमा होणाऱ्या इतर विलासिनींहि आलेल्या प्रतिष्ठितांची करमणूक करीत. सॉक्रेटीस अस्पाशियाकडे वरचेवर जाणारापैकीं एक होता. कितीतरी पुरुषमंडळी आपल्या बायकांना घेऊन अस्पाशियाकडे येत. अस्पाशियाबरोबरच्या सुंदर व मार्मिक अशा चर्चा कानीं पडून आपल्या बायका जरा शहाण्या व सुसंस्कृत व्हाव्या असें त्यांच्या पतींना वाटे.

सर्वोच्च अशी जी जीवनाची कला तींत अस्पाशिया पारंगत होती.

परंतु दुर्दैव, कीं धार्मिक बाबतींत ती स्वतंत्र मताची होती. अॅनॅक्झेगोरसचीं अज्ञेयवादी मतेंच तिनेंहि स्वीकारलीं होतीं. पेरिक्लिसच्या शत्रूंना प्रेमाच्या बाबतींत ती बंधनातीत आहे, प्रेमाच्या बाबतींत तिचे स्वतंत्र विचार आहेत याचें कांहीं वाटलें नाहीं. परंतु देवांवर अविश्वास दाखविणें हें फार वाईट

असें त्यांना वाटलें. अथेन्समध्यें अशा अपराधाला मरणाची शिक्षा असे. अस्पाशिया गिरफदार केली गेली. तिच्या बचावाचें काम स्वतः पेरिक्लिसनें आपल्या शिरावर घेतलें. न्यायाधीशांसमोर भाषण करतां करतां तो भावनाविव्हल होऊन रडूं लागला. त्या निर्मळ व उत्कट अश्रूंनीं न्यायाधीशांवर परिणाम झाला. अस्पाशिया मुक्त केली गेली.

अस्पाशियाचा खटला ज्यूरीसमोर चालला होता. ही ज्यूरी-पद्धति पेरिक्लिसनेंच सुरू केली होती. लोकशाहीच्या विकासांतील ती एक नवीन गोष्ट होती. पूर्वी वरिष्ठ वर्गांतील न्यायाधीशांचें अेरिओपागस नांवाचें न्यायमंदिर असे. परंतु त्यांची सत्ता काढून घेऊन लोकनियुक्त न्यायाधीशांच्या ज्यूरीकडे ती सत्ता देण्यांत आली. हें जें लोकनियुक्त न्यायमंदिर त्याला दिकास्टेरीस या नांवानें संबोधण्यांत येत असे. ही लोकशाही ज्यूरीची पद्धत पेरिक्लिसनें सुरू केलेली नसून ती सोलोननें सुरू केली असें कांहींचें म्हणणें आहे. परंतु या सर्व ज्यूरर्सना सरकारी तिजोरींतून पगार मिळावा असा कायदा पेरिक्लिसनेंच केला. या बाबतींत मात्र सर्व इतिहासकारांचें एकमत आहे. म्हणून पेरिक्लिसलाच ज्यूरी-पद्धतीचा पिता असें मानण्यांत येतें.

आजकालच्या आपल्या ज्यूरीपेक्षां अथीनियन ज्यूरी निराळ्या प्रकारची होती. ज्यूरींतील सभासद चिठ्या टाकून निवडण्यांत येत. परंतु खटला चालविण्यासाठीं बाराच ज्यूरर्स नसत, तर शेंकडों असत. एकाद्या महत्त्वाच्या खटल्याच्या वेळेस कधीं कधीं एक हजारपर्यंत ज्यूरर्स बसत. ज्यूरर्स जास्त नेमण्यांत लांचलुचपतीच्या प्रकारास आळा बसावा असा हेतु असे. शेंकडों ज्यूरर्स असले म्हणजे किती जणांस लांचलुचपत देणार !

अथीनियन ज्यूरी-पद्धतींतील गुणदोष कांहींहि असोत, तीमुळें पेरिक्लिसला ज्यूरर्सच्या भावना उचंबळवून अस्पाशियाला वाचवतां आलें हें खरें. ज्यूरर्सच्या मनोवृत्ती त्यानें आपल्या वक्तृत्वानें व अश्रूंनीं विरघळविल्या. तुरुंगापासून व मृत्यूपासून अस्पाशिया सुटली. पूर्वींचे ते प्रतिष्ठित वर्गांतील भावनाशून्य न्यायाधीश तेथें असते तर पेरिक्लिसला आपल्या प्रियकरणीचे प्राण वांचविणें कठिण गेलें असतें. पेरिक्लिसनें जें नवीन न्यायदानयंत्र निर्माण केलें, त्याच्यायोगानें अस्पाशियाचे प्राण वांचावे यांत एक प्रकारें काव्यमय न्याय आहे. त्या मिळालेल्या न्यायांत जणूं नवरसांचें मिश्रण आहे !

— ५ —

स्थानिक कारभार चालविण्यांत पेरिक्लिसचा हात धरणारा कोणी नव्हता. तो अद्वितीय मुत्सद्दी होता, परंतु त्याची दृष्टि मर्यादित होती. अथेन्सच्या भिंतीपलीकडे त्याला पहातां येत नसे. विनवुडरीड आपल्या "मनुष्याचें हौतात्म्य" या उत्कृष्ट पुस्तकांत लिहितो, "पेरिक्लीस हा चांगला अथीनियन होता, परंतु वाईट ग्रीक होता." तो अथेन्सचें कल्याण पाही. परंतु सर्व ग्रीकांचें हित, मंगल पाहणारी उदार व विशाल दृष्टि त्याला नव्हती. आपलें अथेन्स शहर पहिलें असलें पाहिजे अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती. परंतु दुसऱ्या एका ग्रीक शहराला अशीच महत्त्वाकांक्षा होती. स्पार्टालाहि पहिलें स्थान मिळविण्याची उत्कट इच्छा होती. स्पार्टातील सारे लोक युद्धकर्माला पूजीत. प्रत्येक जण शिपाई होता, शूर लढवय्या होता. स्पार्टन लोक प्रामाणिकपणापेक्षां धैर्याला महत्त्व देत. लढाईतील शौर्य म्हणजे परमोच्च सद्गुण असें मानलें जाई. या स्पार्टन लोकांत पहिल्या नंबरचे कलावान् नव्हते; पहिल्या दर्जाचे कवी, तत्त्वज्ञानी त्यांच्यांत नव्हते. परंतु ते पहिल्या दर्जाचे उत्कृष्ट लढवय्ये होते. त्यांनीं ग्रीसचें लष्करी नेतृत्व आपणांकडे पाहिजे अशी घोषणा केली आणि अथेन्सनें मूर्खपणानें तें आव्हान स्वीकारलें. दोन्ही शहरें निकरावर आलीं, हातघाईवर आलीं. आणि एक ग्रीक दुसऱ्या ग्रीकाशीं भिडल्यावर रक्त वाहिल्याशिवाय कसें राहील?

हें युद्ध टळावें म्हणून पेरिक्लिसनें कांहींहि खटपट केली नाहीं. उलट तें युद्ध पेटावें म्हणून त्यानें वाराच घातला. त्याची लोकप्रियता कमी होत होती म्हणून युद्ध पेटलें तर बरें असें कदाचित् त्याला वाटलें असेल. जें युद्ध धुमसत होतें, रेंगाळत होतें, त्याचा भडका उडावा, सोक्षमोक्ष व्हावा असें त्याला वाटलें असेल. एकदां युद्ध पेटलें म्हणजे अथेन्स शहर पुन्हा त्यालाच शरण जाणार. त्याच्याशिवाय अथेन्सला कोण वांचवणार? 'तुम्हीच आमचे नेते, तुम्हीच तारक' असें मला अथीनियन म्हणतील. मावळणारी लोकप्रियता पेटत्या युद्धाबरोबर पुन्हा वाढेल असें का त्याला वाटलें? त्यानें शेवटीं स्वतःची महत्त्वाकांक्षाच जनतेच्या कल्याणापेक्षा श्रेष्ठ मानली. स्वतःच्या वैयक्तिक महत्त्वाकांक्षेसाठीं युद्धाचा वणवा पेटवायला तो उभा राहिला. इतिहासांतील हे नेहमींचेच प्रकार. पेरिक्लिसहि त्याच मार्गानें गेल

आणि शेवटीं व्हायचें तें झालें. लोकांचा सर्वनाश झाला. पेरिक्लीस एका सार्वजनिक सभेंत म्हणाला, "तुम्ही युद्ध न कराल तर तें दुबळेपणाची कबुली दिल्याप्रमाणें होईल." स्पार्टावर अथेन्सचें प्रभुत्व स्थापावयाचेंच असा त्यानें निर्धार केला. परंतु स्पार्टाहून अथेन्स श्रेष्ठ आहे हें सिद्ध करण्यासाठीं का रक्तपाताचीच जरूर होती ?

युद्ध पुकारलें गेलें. आणि त्याचबरोबर दुष्काळ आला. रोगांच्या सांथी आल्या. अथेन्समधील निम्मी जनता रोगांना बळी पडली. स्पार्टन लोक आक्रमण करीत, हाणामाऱ्या करीत पुढें येत होते, म्हणून आसपासचे सारे लोक रक्षणार्थ अथेन्स शहरांत शिरले. अथेन्समधील आरोग्याची व्यवस्था नीट नव्हती. सर्वत्र घाण झाली. जणूं दुसरा नरक झाला ! पेरिक्लिसची बहीण प्लेगनें मेली, त्याचे दोन मुलगेहि मेले आणि शेवटीं पेरिक्लिसलाहि प्लेगची गांठ आली आणि त्यानेंहि राम म्हटला !

पुन्हाहि का हा काव्यमय न्याय त्याला मिळाला ? परंतु मूर्खपणाच्या गोष्टीसाठीं केवढी किंमत द्यावी लागली ! हें युद्ध जवळजवळ एक पिढीपर्यंत चाललें. ख्रि. पू. ४३१ ते ४०४ पर्यंत हें युद्ध सुरू होतें. आणि शेवटी अथेन्स हरलें. अथेन्सनें जगाला एकच गोष्ट दाखविली, कीं अथेन्स चांगल्या लोकांची भूमि असेल, परंतु स्पार्टापुढें अथेन्सचे शिपाई रद्दीच !

## प्रकरण ८ वें

# अधिक चांगल्या जगाचें स्वप्न खेळविणारा प्लेटो

## – १ –

इतिहासकारांनीं युद्धातील विजयांवर फार भर दिला आहे. परंतु संस्कृतीची गति पाहिली कीं युद्धांतील विजयांत वैभव नाहीं आणि पराजयांत लज्जास्पद असें कांहीं नाहीं ही गोष्ट दिसून येईल. संस्कृतीच्या विकासाचा व वाढीचा युद्धांतील जयापजयाशीं काहींहि संबंध नाहीं. एकाद्या राष्ट्राला किंवा शहराला मोठेपणा मिळविण्यासाठीं युद्धांतील विजयाचीच आवश्यकता असते असें नाहीं. स्पार्टानें पेलापोनेशियन युद्धांत विजय मिळविला, परंतु त्यामुळें स्पार्टाचें महत्त्व

वाढलें नाहीं. त्याची कीर्ति वाढली नाहीं. स्पार्टन लोक अज्ञात व रानटी राहिले. अथेन्सचा त्या लढाईत पराजय झाला, परंतु मानवी प्रगतीचें निशाण हातीं घेऊन अथेन्सच पुढें सरसावलें.

विजयाची पूजा करणाऱ्या मानवजातीच्या शिक्षकाना ह्या ऐतिहासिक गोष्टीचा सहज कसा विसर पडला कोणास ठाऊक! विजयाचीं स्तोत्रें गाणाऱ्या या लोकांना आठवण करून देण्याची जरूरी आहे कीं, प्लेटो व ॲरिस्टॉटल ह्या ग्रीक इतिहासांतील अलौकिक बुद्धीच्या विभूती पराभूत राष्ट्राच्याच नागरिक होत्या.

— २ —

खि. पू. ४२७ मध्यें प्लेटोचा जन्म झाला. पेरिक्लीसच्या मरणानंतर एक वर्षानें तो जन्मला. गटेप्रमाणें प्लेटोलाहि ईश्वरानें सर्व प्रकारच्या देणग्या दिल्या होत्या. कोणतीहि उणीव नव्हती. सुखी आईबाप, सुंदर शरीर, निरोगी-निकोप मन, आरोग्य, सारें त्याच्याजवळ होतें. प्लेटो या शब्दाचा अर्थ रुंद खांद्यांचा. तो होताच तसा. पेलापोनेशियन लढाईच्या धुमश्चक्रीच्या काळांत तो लहानाचा मोठा होत होता. त्याला प्रारंभीं लष्करी पेशा आवडला. परंतु वयाच्या विसाव्या वर्षी सॉक्रेटिसाची व त्याची गांठ पडली. साक्रेटिसाचा प्रभाव त्याच्यावर पडला आणि युद्धाचा धंदा सोडून तो ज्ञानोपासनेकडे वळला.

त्या दिवसापासून सॉक्रेटिसाच्या मरणापर्यंत तो त्याचा शिष्य होता. सॉक्रेटिसाच्या अवतींभवतीं असणाऱ्या तरुण बुद्धिमंतांच्या मेळाव्यांत तोहि शिरला. हे सारे तरुण कधीं सॉक्रेटिसाबरोबर जात, तर कधीं त्याला आपापल्या घरीं ते बोलावीत. तेथें मग विचार-भोजनाची मोठी मौज असे. अथेन्समधील मी मी म्हणणारे तत्त्वज्ञ व पंडित तेथें गोळा होत. सॉक्रेटीस त्या सर्वांना वादविवादांत कोंडीत नेई. आणि शेवटीं आपला मूर्खपणा ते कबूल करीत. त्या चर्चा ऐकणें म्हणजे ज्ञानामृताची मधुर मेजवानी होती. सॉक्रेटीस दिसायला कुरूप होता. परंतु वृत्तीनें तो संत होता. शांत स्वभावाचा व सौम्य वृत्तीचा तो होता. थट्टाविनोद त्याला आवडे. कधीं कधीं संस्फूर्त

होऊनच जणूं तो बोले. पायांत काहीं न घालणारा हा थोर तत्त्वज्ञानी अथेन्स-मधील कोणासहि वादांत हटवीत असे. धंद्यानें तो शिल्पकार, मूर्तिकार होता; परंतु बहुधा कधींहि तो तें काम करीत नसे. तिकडे त्याच्या कुटुंबीयांची उपासमार होत असे. आणि इथें तो सामाजिक न्यायावर प्रवचनें देत असे. तो स्वतःला अत्यन्त शहाणा समजे. कारण तो म्हणे, “ मला कांहीं समजत नाहीं, एवढें तरी मला समजतें; परंतु इतरांना एवढेंहि समजत नाहीं.” त्याच्यापूर्वी होऊन गेलेल्या तत्त्वज्ञान्यांनीं जीवनाचें कोडें सोडविण्याचा प्रयत्न केला होता. सॉक्रेटिसाला त्यात गोडी नव्हती. तो म्हणे, “ जग जाणण्याची हिंमत नका धरूं. तो अहंकार आहे. तुम्हीं स्वतःला समजून घेतलें तरी पुष्कळ होईल.”

“ स्वतःला समजून घ्या.” हें त्याच्या तत्त्वज्ञानाचें सार आहे. सॉक्रेटीस म्हणे, “ ज्ञान म्हणजे सद्गुण.” लोक दुष्टपणामुळें चुका करतात असें नव्हे, तर ते अडाणी असतात. गुन्हेगार हा मूर्ख तरी असतो किंवा माथेफिरू तरी असतो. परंतु दोन्ही प्रकारच्या गुन्हेगारांना आपण काय करतों तें कळत नसतें.

तत्त्वज्ञान्याचें मुख्य कर्तव्य ज्ञान कसें मिळवावें, शहाणें कसें व्हावें, हें शिकवणें हें होय. सॉक्रेटिसानें लोकांना शहाणें करण्याचें, त्यांना शिकवण्याचें व्रत आमरण चालविलें. लोकांस आवडो वा नावडो, तो त्याना शिकवीत राही. तो गमतीनें एकदां म्हणाला, “ मी सुईण आहें. लोकाच्या मनांत जे विचार असतात, त्यांच्या पोटांत ज्या गोष्टी असतात, त्या नीट सहजपणें बाहेर पडाव्या यासाठीं मी लोकाना मदत करीत असतों.”

परंतु दुसऱ्यानें आपणास शिकवावें, आपणांस सुचवावें, हें कोणासच आवडत नसतें. विचार करणें ही गोष्ट सुखाची नाहीं. विचारप्रसूति वेदनांशिवाय नाहीं. म्हणून पुष्कळ जण विचार करणेंच टाळतात. कशाला त्रास असें ते म्हणतात. तसेंच रस्त्यांत किंवा सार्वजनिक जागीं आपल्या अज्ञानाचें सर्वांसमोर प्रदर्शन व्हावें, चारचौघांत आपल्या मूर्खपणाची शोभा व्हावी ही गोष्ट कोणास रुचणार? ज्यांचा मूर्खपणा तो प्रकट करी ते त्याला विदूषक म्हणत. कधीं कधीं ते त्याला मारहाण सुद्धां करीत. त्याच्या अंगावर हात

टाकीत. परंतु सॉक्रेटीस कधीं रागावत नसे. तो स्वतःचा विनोदी स्वभाव गमावून बसत नसे.

तो रस्त्यांतच माणसांना थांबवी व गोंधळून टाकणारे प्रश्न त्यांना विचारी. यामुळें पुष्कळ जण त्याचे शत्रू बनले. विशेषतः राजकारणी लोकांचा मूर्खपणा चव्हाट्यावर आणण्यांत त्याला फार आनंद वाटे. ह्या मुत्सद्द्यांना व राजकारणपटूंना चांगल्या राज्यकारभाराचें काडीइतकेंहि ज्ञान नाहीं असें तो सभोंवतीं असणाऱ्या लोकांना दाखवून देई आणि नंतर त्या मुत्सद्द्यांना म्हणे, "तुम्हांला कांहीं कळत नाहीं तर राज्यकारभार कशाला चालवतां ? चांभारानें गलबत चालवूं पाहण्याप्रमाणें हा अव्यापारेषु व्यापार आहे."

शहरांतील तरुणांमध्ये त्यानें बौद्धिक जिज्ञासा निर्माण केली. नवीन नवीन विचार त्यांच्या डोक्यांत त्यानें भरले. आणि तरुण मुलें हे नवीन विचार घेऊन घरीं येत व आपल्या आईबापांशीं त्या बाबतींत चर्चा करीत. आपलीं पोरें आपणांपेक्षां शहाणीं होत चाललीं हें पाहून अडाणी आईबाप चिडत, रागावत. सारे वृद्ध शेवटीं सॉक्रेटिसावर रागावले. ते म्हणूं लागले, "हा आमच्या मुलांना बिघडवीत आहे."

आणि एके दिवशीं बाजारांतील प्रमुख ठिकाणीं 'सॉक्रेटिसावर अमुक अमुक आरोप आहेत' असें पत्रक लागलें.

"सॉक्रेटिसावर असा गुन्हा केल्याचा आरोप आहे कीं, ज्या देवदेवतांची हें शहर पूजा करतें त्या देवदेवतांची पूजा तो करीत नाहीं, एवढेंच नव्हे तर आपल्या कल्पनेप्रमाणें नवीनच देवदेवता निर्मीत आहे, प्रचारांत आणीत आहे. दुसरी गोष्ट म्हणजे तरुणांना तो बिघडवीत आहे. या अपराधास शिक्षा म्हणजे मरण."

ज्या सरकारी धर्ममार्तंडांनीं—धर्मरक्षण करणाऱ्या ज्या सरकारी कुत्र्यांनीं—सॉक्रेटिसावर हा आरोप लादला होता, त्यांचा सॉक्रेटिसावर वैयक्तिक दात होता; म्हणून त्याच्या रक्तासाठीं ते तहानले होते. आरोप करणाऱ्या अधिकाऱ्यांपैकीं एकाचें नांव ॲनिटस असें होतें. सॉक्रेटिसानें त्याच्या मुलाला बिघडवलें होतें. बापाबरोबर धंद्यांत शिरूं नको असें सॉक्रेटिसानें त्याला सांगितलें होतें. ॲनिटस हा कातड्याचा व्यापारी होता. त्याचा मोठा भरभराट-

लेला धंदा होता. आपल्या कौटुंबिक कारभारांत सॉक्रेटिसानें ढवळाढवळ करावी याचा त्याला राग आला. कातड्याच्या धंद्यांत आपल्या मुलाचें सहकार्य आपणांस मिळावें म्हणून सॉक्रेटिसास ठार करण्याचें त्यानें ठरविलें.

ज्या ज्युरीसमोर सॉक्रेटीस उभा होता, तिच्यांतील लोक निःपक्षपाती व न्यायी निर्णय देतील असें चिन्ह नव्हतें. तशा मनःस्थितींत ते ज्यूरर्स नव्हते. नुकतेंच एक दीर्घकालीन युद्ध संपलें होतें. क्रान्ति, प्रतिक्रान्ति वगैरे प्रकार होऊन गेले होते. यामुळें अॅथीनियन लोकांचा विवेक, समतोलपणा नष्ट झाला होता. तरीहि सॉक्रेटिसानें बचावाची नीट तयारी केली असती तर तो सुटता. परंतु जाणूनबुजून त्यानें तसें करण्याचें नाकारलें. तो आतां जवळजवळ सत्तर वर्षांचा झाला होता. तो म्हणाला, "सत्तर वर्षे जगलों. पुष्कळ नाहीं का झालें ? पुरे कीं आतां." तो पुन्हां म्हणाला, "मनाच्या व बुद्धीच्या सर्व शक्ती शाबूत, अविकृत असतांच मरण येणें बरें नाहीं का ? पुढें आणखीं म्हातारें होणें व दुसरें बाल्य अनुभविणें, इंद्रियांच्या सर्व शक्ती नष्ट झाल्यावर जगणें, यापेक्षां निरोगी मरण बरें."

त्यानें जें भाषण केलें त्यांत बचावासाठीं म्हणून तो बोलला नाहीं. स्वतःचे प्राण वांचावे म्हणून त्यानें तें भाषण केलें नव्हतें. त्यानें आपलें तत्त्वज्ञानच त्या भाषणांत पुन्हां नीट मांडलें. तो म्हणाला, "मी रडेन, प्राणांची भीक मागेन, तुमच्या पायां पडेन अशी अपेक्षा तुम्हीं कदाचित् केली असेल. माझ्या मुलांबाळांनीं, आप्तेष्टांनीं, तुमच्यासमोर येऊन माझ्यासाठीं पदर पसरावा असें कदाचित् तुम्ही अपेक्षीत असाल. परंतु मी अशी प्रार्थना करीन तर मीं गुन्हा मान्य केला असें नाहीं का होणार ? माझें कर्तव्य एकच आहे : तुम्हांलाहि खरें ज्ञान देणें, तुम्हांला शिकविणें, तुमचें मतपरिवर्तन झालें तर बघणें." ज्ञानसंशोधनासाठीं त्यानें आयुष्य वेंचलें. शहाणपणा, सत्य विचार यांसाठीं सारें जीवन अर्पिण्याचा त्याचा कृतनिश्चय होता. हेंच त्याचें जीवनध्येय होतें. तो स्वतःचें व दुसऱ्याचें परीक्षण करी, पृथक्करण करी. खरें काय तें शोधूं पाही. जरी मृत्यूच्या छायेंत तो उभा होता, जरी त्याच्यासमोर मरण उभें होतें, तरी त्या क्षणींहि स्वतःवर आरोप लादणाऱ्यांस तो शिकवूं इच्छीत होता. त्यांनीं आपणांवर दया करावी म्हणून तो तेथें बोलूं इच्छीत नव्हता.

न्यायाधिशांनीं त्याला विचारिलें, "आम्हीं तुम्हांला कोणती शिक्षा द्यावी असें तुम्हांला वाटतें ?" सॉक्रेटीस म्हणाला, "मीं तुमच्या व या शहराच्या हितासाठीं म्हणून जें कांहीं केलें त्यांत तुम्हीं मला पाठिंबा दिला पाहिजे. मीं जी सेवा केली तिच्यासाठीं तुम्हीं मला उरलेल्या आयुष्यभर जनतेच्या तिजोरींतून पोसलें पाहिजे."

परंतु न्यायाधिशांनीं निराळाच विचार केला, निराळाच निर्णय घेतला. त्यांनीं त्याला मरणाची शिक्षा सांगितली आणि स्वतःच्या तोंडाला चिरंतन काळोखी फांसून घेतली.

सॉक्रेटीस तीस दिवस तुरुंगांत होता. त्याला शृंखलाबद्ध करून ठेवण्यांत आलें होतें. एकाद्या सामान्य गुन्हेगाराप्रमाणें त्याला अंथरुणावर खिळवून ठेवण्यांत आलें होतें. शेवटीं विषाचा तो पेला त्याला दिला गेला. त्या वेळेस त्याच्या त्या कोठडीसमोर त्याचे जे निकटवर्ती परमप्रिय मित्र जमले होते, ते रडले. त्यांना शोकावेग आंवरेना, अश्रू आंवरतना. परंतु शेवटपर्यंत सॉक्रेटीस मात्र शांत व आनंदी होता.

— ३ —

सॉक्रेटीस मेल्यावर अथेन्स शहर सोडून जाणें बरें असें प्लेटोस वाटलें. तत्त्वज्ञानी लोकांनीं त्या वेळेस अथेन्समध्यें राहणें सुरक्षितपणाचें नव्हतें. प्लेटो परिव्राजक बनला. बारा वर्षें तो जगभर हिंडला. तो इटलींत व सिसिलींत गेला. तेथें पायथॅगोरसच्या संप्रदायाशीं त्याचा परिचय झाला. पायथॅगोरसला "माणसें पकडणारा" असें म्हणत. त्याच्या संप्रदायांत गूढता होती. या पायथॅगोरसला अंकगणितांत उपनिषदें दिसत, भूमितींत दैवी सत्यें भेटत. अशा या अध्यात्मवादी पंथाशीं परिचित झाल्यावर प्लेटो गलबतांत बसून इजिप्तमध्यें गेला. इजिप्तमधील प्राचीन ज्ञानाचे मधुबिंदू त्यानें गोळा केले. ज्यूडा व हिंदुस्थान या देशांतहि तो गेला होता असें म्हणतात; परंतु याबाबत शंका आहे; कारण ज्यू वा हिंदु लोकांच्या प्रेषितांची, त्यांच्या अध्यात्मिक विचारांची किंवा न्यायासाठीं, सत्यासाठीं जी एक प्रखर व उत्कट अशी शोधक वृत्ति त्यांच्यामध्यें होती तिची प्लेटोला माहिती होती असें दिसत नाहीं. प्लेटोला वाटत होतें कीं, "न्यायासाठीं तहानलेले आपणच

या पृथ्वीवरचे पहिले." ज्या विषयावर आपण लिहीत आहों त्यावर तसें आजपर्यंत कोणींहि लिहिलेलें नाहीं असें त्याला वाटे. जे विचार आपण देत आहों ते या जगांत प्रथम आपणच देत आहों असा त्याचा विश्वास होता, अशी त्याची प्रामाणिक समजूत होती. तो लिहितो, "आजपर्यंत न्यायाची स्तुति कोणीं केली नाहीं. अन्यायाचा धिक्कार कोणीं केला नाहीं. आपल्या हृदयांत असणाऱ्या असत्प्रवृत्तींतील सर्वांत दुष्ट प्रवृत्ति म्हणजे अन्यायाची आहे. परंतु ही गोष्ट आजपर्यंत कोणाच्याच लक्षांत आली नाहीं. ही अन्याय-प्रवृत्ति आपल्या हृदयांत कां दृढमूल होऊन बसली आहे, याचें संशोधन आजपर्यंत कोणींहि केलें नाहीं. तसेंच मनुष्यांतील सर्वांत थोर सत्-प्रवृत्ति म्हणजे न्यायाची होय. तिचाहि विचार कोणीं केला नाहीं." प्लेटोसारख्या थोर विचारवंताचा हिंदु वा ज्यू तत्त्वज्ञान्यांशीं परिचय असता तर त्यानें असें लिहिलें नसतें.

प्रवासानंतर तो परत आला त्या वेळेस त्याचें वय चाळीस वर्षांचें होतें. अथीनियन लोकांच्या भावना शांत झालेल्या होत्या, वातावरण पुन्हां स्वतंत्र विचाराला अनुकूल होतें. भूतकाळांत प्राण अत्यंत स्वस्त झाले होते तसें आतां नव्हतें. जीवनाची किंमत लोक पुन्हां समजूं लागले होते. तत्त्वज्ञान शिकविण्यांत आतां धोका नव्हता. परंतु फार क्रांतिकारक विचार सांगण्याचें काम अद्यापहि जरा जपूनच करायला हवें होतें. नाजूक प्रवृत्तीच्या नागरिकांचें मन दुखावेल असें कांहीं केलें नाहीं म्हणजे झालें; अगदींच पाखंडी मतें नसलीं म्हणजे झालें; सनातनी मतांविरुद्ध उघड बंड नसलें म्हणजे झालें. तेवढी काळजी घेऊन विचारस्वातंत्र्य राखायला हरकत नव्हती.

प्लेटोनें तत्त्वज्ञानमंदिर उघडलें. त्या ज्ञानमंदिरांत बसून आपल्या विद्यार्थ्यांशीं तो जीवनमरणाच्या प्रश्नांवर चर्चा करी, मानवी जीवनाच्या भवितव्याविषयीं बोले. फावल्या वेळीं तो लिही. ज्या जगानें सॉक्रेटिसास मरणाची शिक्षा दिली, त्या जगाला प्लेटो विटला होता. तो मनामध्यें अधिक निर्दोष जगाचीं स्वप्नें खेळवीत बसे. तें आपलें आदर्श जग, तें आपलें पूर्णतेचें स्वप्न, त्यानें त्या जगद्विख्यात संवादाच्या रूपानें जगासमोर मांडलें आहे. ते नाट्यरूप संवाद अमर आहेत, अद्वितीय आहेत. त्या संवादांत सॉक्रेटीस हें प्रमुख पात्र आहे. परंतु सॉक्रेटिसाच्या तोंडीं घातलेले विचार मात्र सॉक्रेटिसाचे नसून प्लेटोचे

आहेत. प्लेटोचें स्वप्न सॉक्रेटीस बोलून दाखवीत आहे. आवाज सॉक्रेटिसाचा आहे, परंतु विचार प्लेटोचे आहेत.

सॉक्रेटिसानें स्वर्गांतील तत्त्वज्ञान भूतलावर आणलें असें म्हणतात. प्लेटोनें तें तत्त्वज्ञान पुन्हां वर स्वर्गांत नेलें. किंवा असें म्हणूं या कीं, पृथ्वीच स्वर्गाची प्रतिमा व्हावी म्हणून या पृथ्वीचीच पुनर्रचना करण्याचा त्यानें प्रयत्न केला. तो लिहितो, " ही पृथ्वी म्हणजे एक खोल अंधारी गुहा आहे. बुद्धीचा व ज्ञानाचा प्रकाश तेथें पोंचूं शकत नाहीं ; आपण या गुहेंत शृंखलाबद्ध करून ठेवलेले कैदी आहों. जे पदार्थ आपण येथें पाहतों ते सत्यतेच्या छाया आहेत. आपल्या डोळ्यांसमोर सद्वस्तूंच्या या छाया काळ्या अंधाऱ्या भिंतीवर क्षणभर नाचतात व नाहींशा होतात. सत्यमय जगत्, परिपूर्ण जगत् कल्पनेंत आहे. वस्तूंचें सद्रूप, वस्तूंचें अंतिम, परिपूर्ण स्वरूप, तेथें वर, स्वर्गांत आहे. ज्या जगांत आपण जगतों तें त्या सद्रूप व परिपूर्ण सृष्टीचें अपूर्ण असें प्रतिबिंब आहे." मूसाप्रमाणें प्लेटोहि स्वतःमधील दिव्यतेचेंच अनंतपटीनें वाढविलेलें स्वरूप म्हणजे परमेश्वर असें मानतो. स्वतःमधील ज्ञान व साधुता, शिवता व सुंदरता यांचें परिपूर्ण रूप म्हणजेच प्लेटोचा परमेश्वर. प्लेटो ज्याप्रमाणें आपल्या तत्त्वज्ञानाच्या उद्यानांत बसे, त्याप्रमाणें त्याचा तो परमेश्वरहि स्वर्गांतील त्या परिपूर्ण अशा 'परमधामां'त असतो. प्लेटो ज्याप्रमाणें आपल्या उपवनांत बसून सुंदर जगाच्या परिपूर्ण कल्पनेचा विचार करीत बसे, जवळ असलेल्या अपूर्ण व सदोष वस्तुजातांतून त्या आदर्श जगाची प्रतिकृति करूं बघे, तद्वतच तो परमेश्वरहि जणूं वरतीं करीत असतो. दगडांधोंड्यांतून, कांट्यांकुट्यांतून परमेश्वर स्वर्ग निर्मूं पाहत होता; परंतु स्वर्गाचें ध्येय दूर राहून ही पृथ्वी मात्र त्यानें निर्मिली. मातींतून देवदूत निर्माण करण्याच्या ध्येयानें प्रभु काम करूं लागला ; परंतु देवदूताऐवजीं त्याच्या हातून हा मानवच घडला.

परंतु प्लेटोच्या अध्यात्मांत रमायला आपणास अवसर नाहीं व त्याची जरूरीहि नाहीं. त्याला स्वतःलाच त्या बाबतींत निःशंकता नव्हती. तो धुक्यांतच वावरत असे. सारे अध्यात्मवादी एक प्रकारच्या संदिग्धतेंत, अस्पष्टतेंतच, वावरत असतात. सौंदर्याची कल्पना व परमेश्वर यांचा संबंध काय ? आदर्शभूत सौंदर्य व ईश्वर एकरूपच का ? जो स्वर्गीय विश्वकर्मा सौंदर्याची कल्पना मानवांच्या रूपानें आविर्भूत करूं पाहतो, त्या विश्वकर्म्याचें व त्या

ध्येयभूत सुंदरतेचें नातें काय ? ती निर्दोष सौंदर्याची कल्पना ईश्वराचाच एक भाग का ? ती ध्येयभूत सौंदर्यवस्तु म्हणजे का प्रभूच्या हातांतील योजना, त्याच्यासमोर असणारा नकाशा ? का ही सौंदर्यवस्तु ईश्वराहून स्वतंत्र आहे, स्वयंभू आहे ? ईश्वरातीत आहे ? ईश्वराच्या बाहेर आहे ? जर ही आदर्शभूत सौंदर्याची कल्पना ईश्वरानिरपेक्ष व ईश्वराहून स्वतंत्र अशी निराळी असेल तर त्या कल्पनेचे विशिष्ट गुणधर्म काय ? ही ध्येयभूत वस्तु कोणीं, कधीं, केव्हां निर्मिली ? एवंविध कांहीं प्रश्नांना प्लेटोजवळ उत्तर नाहीं. येथें प्लेटो निरुत्तर आहे. काहीं प्रश्नांना तो गुळमुळीत व संदिग्ध अशीं उत्तरें देतो. परंतु तीं उत्तरें म्हणजे खात्री न पटविणारीं अशीं गूढगुंजनें आहेत. अज्ञानाच्या अनंत सिंधूंत तो फारच पुढें जातो. स्वतःस न झेंपणाऱ्या खोल पाण्यांत तो शिरतो. त्याच्या पाठोपाठ जाण्यांत अर्थ नाहीं; आपण बुडूं. जगांतील सर्वांत थोर व बुद्धिमान् ॲरिस्टॉटल, तत्त्वज्ञान्यांचा व बुद्धिमंतांचा तो अनभिषिक्त सम्राट्, त्यालाहि कधीं कधीं प्लेटोच्या त्या गूढगुंजनांचें आकलन होत नसे.

ईश्वराविषयींच्या कल्पनांचें जाळें विणणें जेव्हां प्लेटो थांबवितो, ईश्वराविषयींचे सिद्धान्त मांडीत बसणें बंद करतो व स्वतःच्या मनांतील विचार बोलूं लागतो, तेव्हां जगांतील परम थोर आचार्य म्हणून तो यथार्थपणें शोभतो. प्लेटो कधीं जुना वाटत नाहीं. तो चिरंजीवपणें अर्वाचीन आहे. तो नित्य नवीन आहे. कोणत्याहि युगांत तो नवीनच वाटेल. त्याचीं राजकीय व सामाजिक मतें त्याच्या काळाच्या फार पुढें होतीं; एवढेंच नव्हे, तर आजच्या काळाच्याहि फार पुढें गेलेलीं आहेत असें म्हणावें लागेल. तो विसाव्या शतकांतील विचाराच्याहि पुढें गेलेला आहे. आजचा असा एकहि अत्यंत महत्त्वाचा प्रश्न नाहीं कीं, जो प्लेटोनें चर्चिला नाहीं. मानवी नाटकाचें सर्वांगीण व सर्वंकष असें निरीक्षण, परीक्षण, त्यानें केलें आहे. मानवाचें विश्वबंधुत्व, सुप्रजाजनन-शास्त्र, संततिनियमन, सामुदायिक पत्नीत्व, कुटुंबपद्धतीचा अस्त, मुलांची स्टेटकडे मालकी, स्त्रीपुरुषांची समानता, खासगी मालमत्तेचा अस्त, अनिर्बंध मोकळें प्रेम, ग्रंथनियंत्रण, दारूबंदी, इत्यादि शेंकडों प्रश्नांवर प्लेटोनें प्रकाश पाडला आहे. त्या संवादांतून अशा अनेक समस्यांवर त्यानें चर्चा केली; परंतु या ज्या चर्चा त्यानें केल्या, त्यांचा हेतु काय ? प्लेटोसमोर एकच ध्येय होतें, एकच उद्दिष्ट होतें. पृथ्वीवर

न्यायाची प्रस्थापना व्हावी हाच एक ध्यास त्याला लागलेला आहे. अंतर्बाह्य न्याय—राज्यसंस्थेंत न्याय, व्यक्तीच्या अंतरंगांत न्याय. त्याला अशा प्रकारची शासनव्यवस्था हवी होती, असें जग हवें होतें कीं, जेथें सॉक्रेटिसासारख्यांचा वध न होतां त्यांना राजा म्हणून सिंहासनावर बसवितां आलें असतें.

— ४ —

प्लेटोच्या त्या अमर ग्रंथाचें नांव 'रिपब्लिक' असें आहे. या रिपब्लिकमध्यें प्लेटोनें आपलें तें आदर्श जगत् मांडलें आहे. प्लेटोच्या रिपब्लिकची आपणांस नीट कल्पना येण्यासाठीं आपण त्या रिपब्लिकमधील नागरिकांच्या जीवनाकडे पाहूं या. जन्मल्यापासून मरेपर्यंत ते आपलें जीवन कसें कंठितात तें पाहूं या.

त्या रिपब्लिकमधील मुलें म्हणजे सामाजिक सामुदायिक संभोगाचीं फळें आहेत. उत्कृष्ट संतति जन्मावी म्हणून उत्कृष्ट पुरुषांचा उत्कृष्ट स्त्रियांशीं संयोग घडवून आणावयाचा. पुरुषांची या स्त्रियांवर जणूं सामुदायिक मालकी! वैयक्तिक विवाह नाहींत, खासगी कुटुंबें नाहींत! मुलें जन्मतांच शासनसंस्थेनें तीं ताब्यांत घ्यावयाचीं; आईबापांपासून घेऊन त्यांना सरकारी बालसंगोपनगृहांत नेऊन ठेवायचें. आईबापांना मुलें आणि मुलांना आईबाप ओळखतां येत नाहींत असें होईल तरच मानवी विश्वबंधुत्व कल्पनेंत न राहतां प्रत्यक्षांत येणें शक्य होईल; कारण अशा साम्यवादी शासनसंस्थेंत प्रत्येक जण खरोखरच दुसऱ्याचा भाऊ होणें शक्य होईल.

आईबापांनीं आपले लैंगिक अनुभव त्या त्या ठरीव व्यक्तीपुरतेच मर्यादित ठेवावे असें नाहीं. मुलें सरकारच्या स्वाधीन केल्यावर त्यांना स्वेच्छाविलास करण्याची इच्छा असेल तर त्यांनीं खुशाल तसें करावें. परंतु त्यांनीं अशा संभोगांतून मुलें जन्माला येऊं देतां कामा नये. त्यांनीं गर्भपात करण्याची दक्षता घ्यावी. अशा रीतीनें अनिर्बंध प्रेमाची गोष्ट व्यक्तीच्या सारासारविवेकावर सोंपवून दिली आहे. या बाबतींत स्त्रियांना व पुरुषांना सारखीच मोकळीक. नागरिकांच्या खासगी जीवनांत सरकारनें लुडबूड करूं नये. आतां आपण त्या मुलांकडे वळूं या. जन्मतांच मुलांस सरकारी संगोपन-

गृहांत पाठवायचें. या सर्व मुलांना तीं वीस वर्षांचीं होईपर्यंत एकत्र शिक्षण द्यावयाचें. या प्राथमिक शिक्षणांत संगीत आणि शरीरसंवर्धक व्यायाम यांचा अन्तर्भाव व्हावा. व्यायामानें शरीर प्रमाणबद्ध व सुंदर असें होईल. संगीतानें आत्म्याचें सुसंवादीपण वाढेल, मनाची प्रसन्नता वाढेल. "ज्या माणसाच्या आत्म्यांत संगीत नाहीं, तो विश्वासार्ह नाहीं." अशा माणसाचें मन खुरटलेलें असतें, पंगू व विकृत असतें; अशाचे वासनाविकार असंयत असतात; तेथें ताळ ना तंत्र; संयम ना विवेक; सदसताबद्दलच्या अशा माणसाच्या कल्पना सदैव दूषित व विकृत असतात. त्याची सदसद्विवेक शक्तीच जणूं भ्रष्ट होते. संगीत म्हणजे प्लेटोला परम ऐक्य वाटे, परम सुसंवादिता वाटे. संगीत ऐकूं येणारें असो वा ऐकूं न येणारें असो, तें बाह्य असो वा आंतरिक असो, ध्वनीचें असो वा आकाशांतील ताऱ्यांचें असो, सर्व विश्वाच्या पाठीमागें संगीताचें परम तत्त्व आहे; तें नसतें तर या जगाचे, या विश्वाचे, कधींच तुकडे झाले असते व जगांत साराच स्वैर गोंधळ माजला असता, सर्वत्र अव्यवस्थेचें साम्राज्य पसरलें असतें. संगीत म्हणजे विश्वाचा प्राण, विश्वाचा आत्मा. ग्रह व तारे म्हणजे विश्वाचें शरीर. हें संगीत जर या विश्वशरीरांत नसेल, संगीताचा प्राण जर या पृथ्वींत नसेल, तर ही पृथ्वी म्हणजे निःसार वाटेल. मग पृथ्वी म्हणजे केवळ जळून गेलेला कोळसा, केवळ निःसार राख! स्वर्गांत व अंतरिक्षांत जर संगीत नसेल, या अनंत ताऱ्यांत व ग्रहांत जर संगीत नसेल, तर हे तारे, हे सारे तेजोगोल, म्हणजे चिमूटभर राखच समजा.

म्हणून प्रत्येकाच्या शिक्षणांत संगीत हा महत्त्वाचा व अवश्यक भाग असला पाहिजे. मुलगा व मुलगी वीस वर्षांचीं होण्यापूर्वीं त्यांना संगीताचें सम्यक् शिक्षण दिलें पाहिजे. तसेंच व्यायामाचेंहि. ज्या शाळांतून हें शिक्षण द्यावयाचें त्या शाळा मुलांमुलींसाठीं अलग नकोत. एकत्रच शिक्षण असावें. मुलांमुलींनीं एकत्र काम करावें, एकत्र खेळावें. व्यायाम करतांना मुलगे व मुली यांनीं कपडे काढले पाहिजेत. प्लेटो म्हणतो, 'माझ्या आदर्श राज्यांतील स्त्रियांना सद्गुणांचीं भरपूर वस्त्रें असतील." खोटी लज्जा करायची काय? मूर्खपणाचें लाजणें नको. मानवी शरीर उघडें दिसलें म्हणून त्यांत लाजण्यासारखें किंवा अश्लील वाटण्यासारखें काय आहे? तेथें असमंजसपणें हंसण्याची, थट्टामस्करी करण्याची, जरूरी नाहीं.

मुलांच्या शिक्षणांत घोकंपट्टी नको, कंटाळवाणेपणाहि नको; केवळ पढीकपणा नको, केवळ हमालीहि नको; केवळ बैठेपणा व पुस्तकीपणा नको, केवळ शारीरिक श्रमहि नको. शिक्षणाचा बोजा न वाटतां तें परम आनंदप्रद वाटलें पाहिजे. शिक्षण म्हणजे आपला छळ असें मुलांमुलींना वाटतां कामा नये. योग्य अशा गुरुजनांच्या देखरेखीखालीं सर्वसाधारण मुलाला मनाची व शरीराची योग्य वाढ करून घेतां येईल, तें भरपूर खेळेल व भरपूर ज्ञानानंदहि मिळवील. शाळा म्हणजे मनोबुद्धींचा आखाडा, बौद्धिक क्रीडांगण. तेथें विचारविनिमयाचा मनोहर खेळ खेळण्यांत मुलें सुंदर स्पर्धा करतील, ज्ञानांत व विचारांत एकमेकांच्या पुढें जाण्यासाठीं पराकाष्ठा करतील, स्वतःमधील उत्कृष्टत्व प्रकट करण्यासाठीं धडपडतील.

वयाचीं वीस वर्षें होईपर्यंत अशा प्रकारचें शारीरिक व मानसिक शिक्षण या आदर्श राज्यव्यवस्थेंत मुलांना दिलें जाईल. मुलें वीस वर्षांचीं झालीं म्हणजे एकदां चाळण मारायची, निवड करायची. पुढें आणखी शिकायला जीं असमर्थ असतील त्यांना शूद्र वर्गांत घालावयाचें, त्यांनीं शारीरिक श्रम उचलायचे, तसेंच वैश्यकर्महि उचलायचें. शेतकरी, कामकरी व वैश्य हे सारे या वर्गांत. आदर्श राज्यव्यवस्थेंमधील हे हीन धातू. यांना काढून टाकल्यावर जे राहतील त्यांचें शिक्षण पुढें चालू करायचें.

पुढें आणखी दहा वर्षें म्हणजे मुलें तीस वर्षांचीं होईपर्यंत त्यांना विज्ञान-विद्या शिकवायची. अंकगणित, भूमिति, ज्योतिर्विद्या, हे विषय शिकवायचे. हे विषय व्यवहारोपयोगी म्हणून नाहीं शिकवायचे, तर सौंदर्यदृष्टि यावी, प्रमाण-बद्धता यावी, म्हणून शिकवायचे. अंकगणिताचा उपयोग केवळ बाजारांत-देवघेवीसाठीं करणें हें कमीपणाचें आहे, असें प्लेटोच्या आदर्श राज्यामधील प्रतिष्ठित सज्जन मानीत. गणिताचा उपयोग हिशोबासाठीं किंवा इमारती बांधण्यासाठीं, पूल बांधण्यासाठीं किंवा यंत्रें करण्यासाठीं करणें हें आदर्श राज्यांतील सन्मान्य नागरिक कमी प्रतीचें मानीत. प्लेटो या बाबतींत सम कालीन ग्रीकांशीं सहमत होता. ग्रीक लोकांना यांत्रिक संशोधनांत किंवा भौतिक सुधारणा करण्यांत गोडी वाटत नसे; त्यांना ती आवड नव्हती. तिकडे त्यांची प्रवृत्ति नसे. मूर्त व प्रत्यक्ष इंद्रियगम्य ज्ञानापेक्षां अमूर्त व अप्रत्यक्ष इंद्रियातीत ज्ञानाकडेच ते भरारी मारूं पाहत. अंकगणिताचा अभ्यास प्लेटोच्या

मतें फक्त दोन गोष्टींसाठींच करणें बरें. वस्तूंच्या दृश्य विविधतेंतून शाश्वत एकतेकडे जाण्यासाठीं तत्त्वज्ञान्याला गणिताचें साह्य होतें; दुसरी गोष्ट म्हणजे लष्करी सेनापतीला त्यायोगें आपले शिपाई नीट रांगांत उभे करतां येतात, त्यांच्या चारचारांच्या रांगा करतां येतात, निरनिराळया छोट्यामोठ्या पलटणी करता येतात, दहांच्या, शंभरांच्या, हजारांच्या अशा टोळया करतां येतात. गणिताचा सखोल अभ्यास फक्त तत्त्वज्ञानी व सेनानी यांनींच करावा.

तीस वर्षांचें वय होईपर्यंत मुलांचा विज्ञानाचा अभ्यास पुरा होईल. आणि मग पुन्हां चाळण मारायची, पुन्हां निवड. अधिक उच्च शिक्षण घेण्यास जे असमर्थ ठरतील त्यांना बाजूस काढायचें, त्यांचा मध्यम वर्ग बनवायचा. शिपायांचा, सैनिकांचा, लढवय्यांचा हा वर्ग. आदर्श राज्याचे हे पालनकर्ते, रक्षणकर्ते. प्लेटो जरी परम थोर विचारस्रष्टा होता तरी चिनी, हिंदू व ज्यू यांची थोर दृष्टि त्याच्याजवळ नव्हती. शांतीचें ध्येय ग्रीक मनोबुद्धीच्या कक्षेच्या पलीकडचें होतें. अति उत्कृष्ट असें ग्रीक मत, अति सुसंस्कृत व परमोन्नत असें ग्रीक मत सुद्धां शांतीचें ध्येय, शांतीचा आदर्श कल्पूं शकत नव्हतें. प्लेटोच्या आदर्श राज्यांत सैनिकांना महत्त्वाचें कार्य आहे. 'सैनिकांशिवाय राष्ट्र' ही गोष्ट 'गुलामांशिवाय राष्ट्र' याप्रमाणेंच अशक्य वस्तु आहे असें प्लेटोला वाटे. राज्य म्हटलें म्हणजे तेथें दास हवे तसे सैनिकहि हवे! प्लेटोच्या भव्य-दिव्य प्रतिभेचें व अपूर्व बुद्धिमत्तेचें कौतुक वाटतें. आपणांस त्याच्याबद्दल परम आदर वाटतो. परंतु युद्धावरचा त्याचा विश्वास व गुलामगिरीला त्यानें दिलेली परवानगी या दोन गोष्टींचा कलंक त्याच्या प्रतिभाचंद्रिकेला लागलेला आहे.

आपण दोन वर्ग पाहिले. शेतकरी, कामकरी व व्यापारी यांचा खालचा वर्ग व नंतर हा क्षत्रियांचा दुसरा मध्यम वर्ग. विसाव्या वर्षी ज्यांची मनोबुद्धि कमी दर्जाची दिसेल त्यांचा खालचा वर्ग. तिसाव्या वर्षी मनोबुद्धीचा अधिक विकास करून घ्यायला जे असमर्थ दिसतील त्यांचा मध्यम वर्ग. या दोन चाळण्यांनंतर जे उरतील त्यांनीं तत्त्वज्ञानाचा अभ्यास करावयाचा. आतां हीं तीस वर्षांचीं वेंचक मुलें आहेत. आदर्श राज्यकारभार चालवण्यास योग्य अशी ही मंडळी. प्लेटोच्या आदर्श राज्यांत लैंगिक समानता आहे. स्त्रीपुरुषांना विकासाची, गुणवर्धनाची, पूर्ण मोकळीक आहे, समानता आहे. दोघांनाहि समान शिक्षण, समान संधि; जीवनाचीं महत्त्वाचीं कामें अंगावर घेतांना

स्त्रीपुरुषांना कोणतेंहि स्थान आपापल्या योग्यतेनुरूप घेण्याची मुभा आहे. पांच वर्षें तत्त्वज्ञानाचा अभ्यास केल्यावरहि अभ्यासक्रम पुरा झाला असें नाहीं. चांगला राज्यकारभार चालवायला हीं मुलें अद्याप समर्थ नाहीं झालीं; अजून कसोटी आहे. विचाराच्या राज्यांतून प्रत्यक्ष कार्यक्षेत्रांत उतरून त्यांनीं आतां परीक्षा द्यावयाची. दुसऱ्यांच्या जीवनाला वळण देण्याची जबाबदारी उचलण्यापूर्वीच जीवन काय आहे हें त्यांनीं अनुभवलें पाहिजे, जगांतील टक्केटोणपे त्यांनीं खाल्ले पाहिजेत, पंधरा वर्षें प्रत्यक्ष जगांत त्यांनीं वावरलें पाहिजे. आतां वय पन्नास वर्षांचें होईल. आतां तत्त्वज्ञानी राजे–राण्या व्हायला तीं सारीं समर्थ ठरतील. आदर्श राज्यांत तत्त्वज्ञानीच शास्ता होण्यास पात्र असतो. "तत्त्वज्ञानी तरी शास्ते झाले पाहिजेत किंवा शास्त्यांनीं तरी तत्त्वज्ञानी बनलें पाहिजे. जोंपर्यंत अशी स्थिति येत नाहीं तोंपर्यंत जगांतील दुःखांचा अंत होणार नाहीं." शिक्षणामुळें व नैसर्गिक योग्यतेमुळें तत्त्वज्ञानी हेच उत्कृष्ट स्त्री-पुरुष. शासनसंस्थेनें जे उत्कृष्ट स्त्री-पुरुष निर्माण केले ते म्हणजे हे तत्त्वज्ञ. आणि जे उत्कृष्ट आहेत त्यांनींच राज्यकारभाराचें सुकाणूं हातीं घेणें योग्य. या तत्त्वज्ञानी शासकांचा शेवटचा, तिसरा, परमोच्च वर्ग. खालच्या व मधल्या वर्गांनीं या उच्च वर्गाचें ऐकलेंच पाहिजे. या उच्च वर्गीय शास्त्यांत प्रामाणिकपणा असावा म्हणून त्यांची खासगी मालमत्ता असतां कामा नये. त्यांचें जें कांहीं असेल तें सारें सामुदायिक. ते सार्वजनिक भोजनालयांत जेवतील, बराकींतून झोंपतील. स्वार्थी वैयक्तिक हेतु नसल्यामुळें हे शास्ते लांचलुचपतीच्या अतीत राहतील. एकच महत्त्वाकांक्षा सदैव त्यांच्या डोळ्यांसमोर असेल आणि ती म्हणजे मानवांमध्यें न्यायाची कायमची प्रस्थापना करणें.

— ५ —

आदर्श शासन-पद्धतीचें असें हें संपूर्ण चित्र आपण पाहिलें. या आदर्श राज्य-पद्धतीच्या नगरीच्या दरवाजावर "न्यायाची नगरी ती ही" अशीं अक्षरें आपण खोदून ठेवूं या. या न्यायाच्या नगरींत शिरून तिच्यांतील कांहीं मनोहर विशेष, कांहीं प्रसन्न व गंमतीचे प्रकार, पाहूं या. पहिली गोष्ट म्हणजे या तत्त्वज्ञानी शासकांनीं ग्रीकांचा धार्मिक आचार्य व उद्गाता महाकवि जो होमर त्याला व त्याच्या महाकाव्यांना हद्दपार केलें आहे. त्या महाकाव्यांतील

देव वासनांविकारांनीं बरबटलेल्या मानवांप्रमाणेंच आदळआपट करितात. इलियडमधील देवदेवता पोरकट वाटतात. किती त्यांचे अहंकार! किती त्यांचे काम-क्रोध! असला हा धर्म निकामी आहे; त्याची शुद्धता केली पाहिजे; त्याच्यांतील सारा रानटीपणा नष्ट केला पाहिजे. दुष्ट रूढि, भ्रामक कल्पना, चमत्कार, इत्यादि गोष्टी धर्मांतून हद्दपार केल्या पाहिजेत. मानवी बुद्धीला न पटणारा, तिच्याशीं विसंगत असणारा असा धर्म असण्यापेक्षां धर्मच नसलेला बरा.

प्लेटोच्या आदर्श राज्यामध्यें देवदेवतांची ही अशी दुर्दशा आहे. परंतु मानवां-मानवांतील संबंध कसे राखायचे? मानवांतील व्यवहार कसे चालवा-यचे? मुख्य गोष्ट म्हणजे या सर्व व्यवहारांत न्यायबुद्धि असावी. केवळ धंदे-वाईकपणा ही गोष्ट त्याज्य आहे. ती मानवाचा अधःपात करणारी आहे. धंदेवाईक माणसाला यशस्वी रीतीनें धंदेवाईक होणें व प्रामाणिकहि असणें या दोन्ही गोष्टी कशा साधतील? प्लेटोच्या आदर्श राज्यांत गुन्हेगारांना करुणेनें वागविण्यांत येतें, त्यांच्यावर अंकुश असतो, बंधनें असतात; परंतु त्यांना शिक्षा देण्यांत येत नाहीं. मनुष्य गुन्हा करतो; कारण त्याला नीट शिक्षण मिळालेलें नसतें. ज्याला स्वतःचें ज्ञान नाहीं, आपल्या सभोंवतालच्या बंधूं-विषयींहि ज्याला ज्ञान नाहीं, अशा अज्ञानी पशुसम मनुष्याची कींवच करायला हवी. खोडसाळ व दुष्ट घोडा फटके मारून साळसूद होणार नाहीं, वठणीवर येणार नाहीं. ज्या मनुष्याला सामाजिक बुद्धि नाहीं, सर्वांशीं मिळून-मिसळून कसें वागावें, सर्वांच्या हितसंबंधांस अविरोधी वर्तन कसें ठेवावें हें ज्याला कळत नाहीं, अशा मनुष्याला केवळ बहिष्कृत किंवा अस्पृश्याप्रमाणें मानून तो सुधारेल असें नाहीं. गुन्हेगार वेडा असेल तर त्याचें वेडेपण तुम्हीं दूर केलें पाहिजे. तो अज्ञानी असेल तर तुम्हीं त्याचें अज्ञान दूर केलें पाहिजे. परंतु सूडबुद्धीनें तुम्हीं त्याला कधींहि, केव्हांहि, शासन करतां कामा नये, शिक्षा देतां कामा नये.

मानसिक रोगटपणाप्रमाणेंच शारीरिक रोगटपणाहि अज्ञानजन्यच असतो. नीट काळजी घेतली तर रोगराई बऱ्याच प्रमाणांत कमी करतां येईल, आरोग्य वाढवतां येईल. परंतु ज्यांचे रोग दुःसाध्य आहेत त्यांना मरायचें असेल, आत्महत्या करायची असेल, तर कारुण्यबुद्धीनें त्यांना तशी

परवानगी देण्यांत येईल. कारण अशा घुटमळणाऱ्या व कंटाळवाण्या रोगापेक्षां मरण बरें.

वकील म्हणजे एक पीडाच. परंतु आदर्श राज्यांत त्यांची जरूरी राहणार नाहीं. या अनवश्यक आपत्तीचा त्रास प्लेटोच्या राज्यांत नाहीं. कारण जेथें ज्ञान आहे, समंजसपणा आहे, तेथें कोर्टकचेऱ्यांची, फिर्यादींची वगैरे जरूरीच नाहीं. आदर्श राज्यांत कायदे फारच थोडे असतील आणि त्यांचा अर्थ करणें सोपें व सरळ असेल. आदर्श राज्यांतील तत्त्वज्ञानी शास्त्यांस पुरतेपणीं माहीत असतें कीं, एकादा नवीन कायदा करणें म्हणजे गुन्हेगारांचा आणखी एक नवीन वर्ग निर्माण करणें होय. भाराभर कायदे केल्यानें गुन्हे कमी होत नसतात. आदर्श राज्यांतील तत्त्वज्ञानी राज्यकर्ते स्वतःचें नियंत्रण कसें करावें, स्वतःवर संयम कसा ठेवावा, आपलें मन, आपल्या वासना, आपल्या इच्छा यांच्यावर ताबा कसा ठेवावा हें जनतेस शिकवितील तर मग देखरेख करण्याची, पोलीस वगैरे राखण्याची फारशी जरूरी राहणारच नाहीं.

आदर्श राज्यांतील शासनसंस्था एकच गोष्ट सदैव पाहील. प्रजेचें हित, मंगल कसें होईल, प्रजेला सुख कसें लाभेल, याच एका गोष्टीकडे तेथले शास्ते रात्रंदिवस पाहतील. सुख, स्वास्थ्य, शांति, निरामयता, इत्यादि गोष्टी प्रजेस देणें हें शासकांचें काम राहील. इमर्सन म्हणतो, “ मला आरोग्य द्या व प्रकाश द्या. मग मी मोठ्या सम्राटांचा दिमाखहि हास्यास्पद करीन. त्यांच्याहून मी अधिक सुखी व खुष असेन. ” प्लेटोच्या दृष्टीनें आरोग्य, समाधान व प्रकाशपूर्ण आयुष्य––सौंदर्यमय असा हा जीवनक्रम म्हणजे सुखाची सीमा होय. निळ्या आकाशांत सुंदर सोनेरी प्रकाश असावा, तद्वत् जीवनांत सुखसमाधान असावें, सौंदर्य असावें. प्लेटोचें ध्येय काय ? सौंदर्याचें जीवन, न्यायाचें जीवन, प्रेममय जीवन, ‘ सत्यं–शिवं–सुंदरं ’चें जीवन. प्लेटोचें हें ध्येय आहे. प्लेटोच्या तत्त्वज्ञानांत हे तिन्ही शब्द जणूं समानार्थकच आहेत. सज्जन मनुष्य म्हणजेच सुखी मनुष्य; सुखी असणें म्हणजेच सज्जन असणें, चांगलें असणें; आणि हा सज्जन नेहमीं न्यायी असतोच. जो सुखी व सज्जन असतो त्याच्या जीवनात अविरोध असतो, त्याच्या जीवनांत प्रमाण असतें, मेळ असतो ; म्हणून त्याच्या जीवनांत शांतीचें संगीत असतें. असा मनुष्य सौंदर्यासाठीं तहानलेला असतो. सर्वत्र मधुरता असावी, सुंदरता असावी, अशी उत्कंठा व असोशी त्याला

असते. सौंदर्य सर्वत्र व्हावें, दिसावें, म्हणून तो प्रयत्न करीत राहतो ; सौंदर्य-निर्मितीसाठीं तो धडपडतो. आपल्या सुंदर मुलांच्या रूपानें, कलात्मक कृतींच्या रूपानें किंवा उदात्त व उदार अशा कर्मांच्या रूपानें, तो स्वतःमधील सौंदर्यच प्रकट करीत असतो. शारीरिक, बौद्धिक व आंतरिक सौंदर्य तो मूर्त करूं पाहतो. सौंदर्य ही अमृतत्वाची जननी आहे. जेथें सौंदर्य आहे तेथें अमरता आहे. सौंदर्य असेल तर अमृतत्वाचा अमरपट्टा मिळेल. सुंदर वस्तु निर्मून आपण मृत्यूवर विजय मिळवितों, मरणाला जिंकून घेतों.

— ६ —

बुद्ध प्रेमधर्मांचे आचार्य, कन्फ्यूशियस न्यायाचे उद्गाते, जेरेमिया शांतीचा संदेश देणारे आणि प्लेटो सौंदर्याचे महान् सद्गुरु. सौंदर्याची उपासना प्लेटो शिकवितो. त्यानें अशी एक नगरी बांधली कीं, जींत थोर मानव नांदत. ही नगरी प्रकाश-देवतेला—अपोलोला त्यानें अर्पण केली. ही नगरी त्यानें तारामंडळांत ठेवून दिली. अशा हेतूनें कीं, भविष्यकालीन शिल्पकारांनीं आदर्श म्हणून, स्वतःच्या क्रांतिकारक स्वप्नांसाठीं एक दिव्य उदाहरण म्हणून, तिच्याकडे सदैव बघावें.

परंतु केवळ नवीन समाजसृष्टीचें एक स्वप्न खेळवून, एक दिव्य चित्र रंगवूनच, समाधान मानणारा प्लेटो नव्हता. कन्फ्यूशियसप्रमाणें स्वतःच्या तात्त्विक व ध्येयवादी विचारांना प्रत्यक्षांत आणण्यासाठीं त्यानें धडपड केली. सायराक्यूसचा राजा डायोनिशियस यानें प्लेटोला आदरानें बोलावलें. प्लेटो सिसिली येथें गेला. त्यानें डायोनिशियसला शहाण्या माणसाप्रमाणें राज्य कसें करावें हें शिकविलें. परंतु प्लेटोचे कांहीं क्रांतिकारक विचार ऐकून तो राजा घाबरला. त्यानें प्लेटोला गुलाम करून विकलें व प्लेटोच्या क्रांतींतून स्वतःला वांचविलें.

प्रामाणिक व न्यायी राज्यपद्धतीला जग अद्याप तयार नव्हतें. प्लेटोच्या एका शिष्यानें त्याची खंडणी भरली आणि प्लेटो मुक्त झाला ; त्याचें स्वातंत्र्य त्याला मिळालें. तो पुन्हां अथेन्सला आला, आणि आपल्या त्या तत्त्वज्ञानमंदिराच्या उपवनांत बसून तो पूर्वीप्रमाणें पुन्हां तात्त्विक विचार देत राहिला, आपलीं उपनिषदें देत राहिला. किती तरी वर्षें असा हा महान् ज्ञानयज्ञ त्यानें

चालविला होता; तो प्रकाश देत होता आणि आतां तो एक्याऐंशीं वर्षांचा झाला. एका तरुण मित्राचें लग्न होतें. आशीर्वाद देण्यासाठीं म्हणून तो तेथें गेला होता. तेथें लग्नांतील थट्टाविनोद चालला होता. सर्वत्र गडबड, हंशा, आनंद होता. तो आनंदी गोंधळ त्याच्या प्रकृतीस मानवला नाहीं. तो थकला. 'माफ करा' असें म्हणून तो जरा विश्रांति घेण्यासाठीं, थोडी झोंप घ्यावी, डुलकी घ्यावी म्हणून शेजारच्या खोलींत गेला. इकडे थट्टामस्करीस ऊत आला. खानपानगान जोरांत चाललें. त्या लग्नाच्या वऱ्हाडाला जणूं त्या थकल्याभागलेल्या वृद्ध तत्त्वज्ञान्याची विस्मृतिच झाली! इकडे हा सारा धांगडधिंगा चालला असता थोडी विश्रांति मिळावी म्हणून तो तिकडे घडपडत होता.

परंतु त्या पलीकडच्या खोलींत प्लेटोला गाढ झोंप लागली होती— शेवटचीच गाढ झोंप! या जगांतील अर्थहीन आवाज, निरर्थक गोंगाट अतःपर त्याची शांति भंगविणार नाहींत, त्याची विश्रांति मोडणार नाहींत. तत्त्वज्ञान्यांचा हा राजा, तत्त्वज्ञान्यांचा हा सम्राट्, याला शेवटीं समदृष्टि अशा त्या मृत्युदेवाच्या आदर्श राज्यांतील आमंत्रण आलें.



## प्रकरण १ लें

# स्वतः व ईश्वर यांत जगाची वांटणी करणारा अलेक्झांडर

— १ —

इकडे प्लेटो आदर्शभूत राज्याचीं स्वप्नें खेळवीत असतां, तिकडे ग्रीक शहरें क्षुद्र व निरर्थक युद्धांनीं व क्षुद्र वैरांनीं स्वतःचा नाश करून घेत होतीं! अथेन्स विरुद्ध कॉरिन्थ, कॉरिन्थ विरुद्ध थीब्स, थीब्स विरुद्ध स्पार्टा व स्पार्टा विरुद्ध अथेन्स असा हा चक्रव्यूह होता. परस्पर–द्वेष व परस्पर–संशय यांचें हें असें कधीं न संपणारें रहाटगाडगें, द्वेष–मत्सरांचें हें चक्र जणूं गंमतीनें फिरत होतें. विषारी, मारक असा हा खेळ खराच; पण त्यांतच त्यांना जणूं रस वाटत होता, गोडी वाटत होती! बारीकसारीक गोष्टींसाठींहि ते एकदम युद्ध पुकारीत. युद्ध ही एक नित्याची, मामुली बाब बनली. उत्तमोत्तम माणसें रणांगणावर मरत होतीं. सारी ग्रीक संस्कृति विनाश पावणार असें दिसत होतें. साऱ्या ग्रीक संस्कृतीवर गडप होण्याची वेळ आली होती.

अथेन्समधील आयसॉक्रेटीससारख्या कांहीं मुत्सद्दयांनीं हा धोका ओळखला व आपल्या राष्ट्राचे प्राण वांचावे म्हणून ग्रीसचें एक संयुक्त संस्थान बनवावें असें त्यांनीं सुचविलें. तो विचार उत्कृष्ट होता; परंतु तो प्रत्यक्षांत यावा, ती योजना अमलांत यावी यासाठीं ज्याची योजना करण्यांत आली तो माणूस योग्य नव्हता. चुकीच्या माणसाची निवड झाली. मॅसिडोनियाचा राजा फिलिप्स याच्यावर हें संयुक्त संस्थान बनविण्याचें काम सोंपविण्यांत आलें. मॅसिडोनिया म्हणजे ग्रीस देशाचा उत्तर भाग. हा जरा रानटी होता, इतर भागांइतका सुसंस्कृत नव्हता. सर्व ग्रीकांचें एक संयुक्त राष्ट्र बनविण्यासाठीं आयसॉक्रेटीसनें दिलेलें आमंत्रण त्यानें स्वीकारलें. फिलिप्सनें मॅसिडोनियन लोकांची एक सेना उभारलेली होतीच; ती बरोबर घेऊन युद्धानें त्रस्त झालेल्या व कंटाळून गेलेल्या या द्वीपकल्पावर तो तुटून पडला व त्यानें सारी

स्वतंत्र ग्रीक शहरें जिंकून त्याचें एक संयुक्त राष्ट्र बनविलें. अशा रीतीनें ग्रीक गुलामांचें हें संयुक्त राष्ट्र जन्माला आलें.

— २ —

राजा फिलिप हा अलेक्झाडरचा बाप. फिलिप सुशिक्षित पण जंगली मनुष्य होता. तो ग्रीक लोकांच्या ज्ञान-विज्ञानांचें कौतुक करी. त्यानें त्यांच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला, त्यांची संपत्ति लुटण्याला तो अधीर झाला. तो सायरसच्या नमुन्याचा योद्धा होता. तो युद्ध पुकारावयाला भिणारा नव्हता. तो स्वतः सैन्याबरोबर असे. त्याची महत्त्वाकांक्षा अमर्याद होती. त्याला सारें जग खेळवावयाला हवें होतें. इराणवर हल्ला करण्यासाठीं त्यानें आधीं ग्रीस हातांत घेतला. तो ग्रीसमधून पार्शियावर उडी मारणार होता. साम्राज्यें निर्मिण्याची अपूर्व बुद्धिमत्ता असणाऱ्यांमध्यें फिलिप हा 'साम्राज्यांचा संस्थापक' या नात्यानें अद्वितीय होता. त्याच्या कुटुंबाव्यतिरिक्त बाहेर सर्वत्र त्याचा शब्द म्हणजे कायदा होता एपिरसच्या राजाची मुलगी ऑलिम्पियस ही त्याची पत्नी. तिच्याच पोटीं अलेक्झांडर जन्मला. ती धर्मवेडी होती. ती आपल्या नवऱ्याचा फार तिरस्कार करी व त्याचें जीवन करतां येईल तितकें दुःखी करणें हा आपला धर्म मानी. तो चिडावा, संतापावा, म्हणून ती म्हणे, "अलेक्झांडर माझ्या पोटचा असला तरी तुमचा नाहीं ! रात्रीं एक देव सर्परूपानें येऊन मला भोगून गेला. हा पुत्र देवोद्भव आहे." या दंतकथेवर फिलिपचा विश्वास होता कीं नाहीं कोण जाणे ; परंतु अलेक्झांडरचा मात्र मरेपर्यंत संपूर्ण नसला तरी अर्धवट विश्वास होता. अलेक्झांडर अनेकदां आग्रहानें सांगे, "मी दैवी आहें— देवापासून जन्मलों आहें."

मॅसिडोनियाच्या राजाच्या राजवाड्यांतील जीवनांत सदोदित कांहीं ना कांहीं धर्म-विधी चाललेले असावयाचेच ; त्यांत भांडणें, मारामाऱ्या, द्वेषमत्सर यांचेंहि मिश्रण असे. आई अलेक्झांडरला फूस देई व तो बापाचा अपमान करी. राजवाड्यांत एकदां एक मोठी मेजवानी चालली होती ; पिता व पुत्र दोघेहि दारू पिऊन बेहोष झाले होते. अलेक्झांडरनें फिलिपचा अपमान केला ; बाप मुलाला भोसकण्यासाठीं धांवला. पण सुरा नीट खुपसण्याइतकी

शुद्ध त्याला नसल्यामुळें तो तोल जाऊन जमिनीवर पडला आणि भावी आयुष्यांत व्यभिचार, बदफैलीपणा व दिग्विजय करण्यास अलेक्झांडर वांचला.

— ३ —

अशा वातावरणांत अलेक्झांडर वाढला. पित्यानें त्याला ग्रीक शिक्षण चागलें मिळावें म्हणून खटपट केली. त्यानें मुलासाठीं अति उत्कृष्ट व नामांकित शिक्षक जमविले. कवि, तत्त्वज्ञानी, संगीतज्ञ, वैयाकरणी, अलंकार-शास्त्रज्ञ सारे राजवाड्यांत येऊन अलेक्झांडरला सुसंस्कृत करूं लागले, त्याला माणसाळवूं लागले. कारण, तो जरा रानवट होता. त्याला थोडी तरी माणुसकी यावी म्हणून हे सारे आचार्य खटपट करूं लागले. या नामांकित शिक्षकांत जगत्प्रसिद्ध ॲरिस्टॉटलहि होता. ॲरिस्टॉटल म्हणजे विद्वत्तेचें व ज्ञानाचें आश्चर्यकारक भाण्डार! एका लहानशा डोक्यांत इतक्या विद्या मावत तरी कशा! शंभर माणसांचें ज्ञान त्याच्या एकट्याच्या डोक्यांत होतें. तो सर्व विषयांवर सारख्याच अधिकारानें लिहूं व बोलूं शके. राजकारण, नाटक, काव्य, सृष्टिज्ञान, वैद्यक, मानसशास्त्र, इतिहास, तर्क, ज्योतिर्विद्या, नीतिशास्त्र, गणित, अलंकारशास्त्र, प्राणिशास्त्र,—थोडक्यांत बोलावयाचें तर सर्व ज्ञानें व विज्ञानें त्याच्या समोर हात जोडून उभीं राहत. तरीहि त्याला अलेक्झांडरवर फारसा परिणाम करतां आला नाहीं; इतकेंच काय, पण राजघराण्यांतील कोणावरच त्याचा फारसा प्रभाव पडला नाहीं. फिलिप, अलेक्झांडर, ऑलिम्पिअस, हीं तीनहि माणसें 'ग्रीक संस्कृतीचीं पूजक' म्हणून मिरवीत; परंतु तें नुसतें सोंग होतें. ग्रीक संस्कृतीच्या झिरझिरीत बुरख्याखालीं त्यांचा रानवटपणा लपलेला होता. हीं तीनहि माणसें अंतरंगीं रानमांजरां-सारखींच दुष्ट व हलकट होतीं. फिलिप पर्शियावर स्वारी करावयास निघणार तोंच त्याचा खून झाला. त्याच्या पत्नीच्याच चिथावणीमुळें तो खून झाला असें म्हणतात. मृत सम्राटाला जो मान दिला गेला होता तोच मारेकऱ्याच्याहि प्रेतास मिळावा, तितक्याच थाटानें व समारंभानें मारेकऱ्याचाहि देह पुरला जावा असा हट्ट तिनें धरला होता.

— ४ —

फिलिप मेला तेव्हां अलेक्झांडर वीस वर्षांचा होता. कसलेल्या व शिस्तशीर सैन्याचा तो मालक होता. पूर्वेकडील देशांवर तुटून पडावयाला सारी सिद्धता

होती. सैनिक अपूर्व अशा सेनानीची जणूं वाटच पाहत होते. ज्याला कल्पना-शक्ति व प्रतिभा आहेत, अहंकार आहे, साहसी वृत्ति आहे, परिणामाचा विचारहि न करता जो बेछूटपणें पुढें जाईल, सर्व जगावर स्वामित्व मिळविण्याचें कार्य हातीं घेण्याइतपत ज्याच्याजवळ हिंमत व कौशल्य आहेत असा सेनापति सैन्याला हवा होता. अशा सेनापतीच्या नेतृत्वाखालीं वाटेल तेथें जावयाला ते तयार होते. हे सारे गुण तर अलेक्झांडरच्या ठायीं होतेच, पण यांशिवाय आणखीहि पुष्कळ होते. आपल्या कर्तृत्वाविषयीं अद्यापि कोणाला कांहीं शंका असेल तर ती दूर करण्यासाठीं तो एकदम उभा राहिला. मॅसिडोनियाच्या उत्तरेकडील जातींजमातींना त्यानें शरण यावयास लावलें आणि नंतर मॅसिडोनियाचें जूं झुगारून देऊन पुन्हां स्वतंत्र होऊं पाहणाऱ्या इतर ग्रीक शहरांवर तो विजेसारखा चालून गेला. फिलिपच्या मरणाची वार्ता ऐकून हीं शहरें बंड करून उठलीं होतीं. अलेक्झांडरनें थीब्स शहराला वेढा घातला व फारशी अडचण न पडतां तें जिंकून घेतलें. आपल्या रक्ताळ मुठीचा इतरहि सर्व ग्रीक लोकांना कायमचा धाक बसावा म्हणून त्यानें थीब्स शहराचा संपूर्ण विध्वंस केला, शहरांतील सहा हजार लोकांस ठार मारलें व तीस हजार लोकांना गुलाम करून बाजारांत विकलें.

नंतर तो दक्षिणेकडच्या ग्रीक राज्यांकडे वळला. जेथें जेथें तो जाई तेथें तेथें त्याच्याभोंवतीं खुशामत्ये गोळा होत, त्याची खोटी स्तुति करीत, कोणी त्याला भेटी देत. बंडखोर ग्रीकांना प्रायश्चित्त मिळालेंच होतें, त्यामुळें नीट धडा शिकून त्यांनीं अलेक्झांडर हाच आपला पुढारी अशी घोषणा केली व ते त्याच्या पूर्वेकडील विस्तृत प्रदेशावरच्या स्वारींत सामील झाले.

अलेक्झांडरनें ग्रीस देशांत सर्वत्र विजय-संचार केला. त्याला कोणीहि कोठेंच विरोध केला नाहीं असें नाहीं. तरवारीनें विरोध करणारे जरी त्याला फारसे भेटले नाहींत, तरी निराळ्याच रीतींनीं त्याला गप्प बसविण्याचे प्रकार कांहीं ठिकाणीं झाले. अलेक्झांडराविषयीं आपणांस खरोखर काय वाटतें हें त्याच्या तोंडावर सांगण्याइतपत धैर्य व स्वातंत्र्य असलेले कांहीं लोक अद्यापि होते. अलेक्झांडर जेव्हां कॉरिन्थ येथें आला तेव्हां विजयी वीराला शोभेसें त्याचें स्वागत झालें, हजारोंनीं जयघोष केले, पण तेथें जमा झालेल्या स्तुतिपाठकांत त्याला डायोजिनीस दिसेना. डायोजिनीस हा या जगांत कशांतहि कांहीं अर्थ

नाहीं, सारें पोकळ व भोंगळ, दिखाऊ व व्यर्थ आहे असें मानणारा 'सिनिक' होता. कॉरिंथमधल्या एकाच माणसाला अलेक्झांडर किंमत देई; तो म्हणजे डायोजिनीस. त्यानेंहि आपली स्तुति करावयास यावें असें अलेक्झांडरला वाटत होतें; पण तो वृद्ध पाखंडी आला नाहीं. कॉरिन्थजवळच्या एका खेड्यांत तो शांतपणें व निश्चितपणें बसला होता. जेत्यांचा गर्व व सम्राटांचा दिमाख दोहोंहिविषयीं तो बेपर्वा होता; त्याला त्यांचें काडीइतकेंहि महत्त्व वाटत नव्हतें, तो मॅसिडोनियन सैन्याची ती प्रचंड व विजयी मिरवणूक पाहावयाला आला नाहीं कीं विजयी राजाचें दर्शन घडावें म्हणून त्यानें धडपडहि केली नाहीं.

डायोजिनीस आपणांकडे येत नाहीं असें पाहून अलेक्झांडरनेंच त्याच्याकडे जावयाचें ठरविलें. डायोजिनीस एकटाच सूर्यप्रकाशांत ऊन खात बसला होता, तेथें जाऊन मैत्रीची व उदारपणाची बतावणी करीत त्यानें विचारलें, 'मी तुम्हांला काय देऊं? तुमच्यासाठीं मीं करण्यासारखें कांहीं आहे काय?'' "होय," तो वृद्ध व बेरकी डायोजिनीस म्हणाला, "एक गोष्ट तुम्ही खास करूं शकाल: सूर्यप्रकाशाच्या व माझ्या दरम्यान तुम्ही उभे आहां तेवढे दूर व्हाल तर बरें."

त्या म्हाताऱ्याच्या या उद्धटपणाबद्दल त्याला शासन न करतां विचार-चिंतन करण्यासाठीं त्याला तेथेंच सोडून अलेक्झांडर निघून गेला! ॲरिस्टॉटलचा शिष्य तो उगीच नव्हता झाला. तो आपल्या एका खुशामत्यास म्हणाला, "मी जर अलेक्झांडर नसतों तर डायोजिनीस होणें मीं पसंत केलें असतें." या म्हणण्यावर उत्तर द्यावेंसें डायोजिनीस याला वाटलेंच असतें तर तो म्हणाला असता, "मी जर डायोजिनीस नसतों तर अलेक्झांडरखेरीज दुसरा कोणीहि व्हावयाला मी तयार झालों असतों."

— ५ —

अलेक्झांडर अति महत्त्वाकांक्षी होता. त्याच्या महत्त्वाकांक्षेनें त्याच्या डोक्यातलि सारें तत्त्वज्ञान पिटाळून लावलें होतें, इतर सारे विचारहि पार हांकलून दिले होते. तो मागेंपुढें पाहणारा नव्हता; तो बेछूट व बेदरकार असा केवळ सैतान होता! जेथें पाऊल टाकण्यासहि इतरांस भय वाटे, तेथें तो खुशाल उडी घेई व निःशंकपणें घुसे जें सर्वस्वीं अशक्य वाटे त्याबाबतहि

तो जुगार खेळे व बहुतकरून विजयी होई. एकादी दुस्तर नदीहि अलेक्झांडर सहज तरून जाई. एकाद्या दुर्लंघ्य डोंगरावरून शत्रूला हुसकावयाचें असेल तर तो ती टेकडी चढून जाई व शत्रूला पळावयाला लावी. देव नेहमीं त्याच्या बाजूनें लढतात अशी लोकांची समजूत झाली होती. तो सरळ, साधाभोळा प्ल्युटार्क लिहितो, "पॅंपिलियन किनाऱ्याजवळील समुद्राच्या लाटा तेथील खडकाळ टेकड्यांच्या अगदीं पायथ्यापर्यंत येतात. पण अलेक्झांडरला नीट जातां यावें म्हणून या लाटाहि मागें हटल्या व त्यांनीं त्याला रस्ता दिला." जेव्हां त्यानें फोनिशियनांच्या टायर शहराला वेढा घातला, तेव्हां तेथील लोकांनीं शहरांतील ॲपोलो देवाचा पुतळा दोरखंडांनीं जाम बांधून टाकला व 'आतां कसा ॲपोलो अलेक्झांडरच्या बाजूला जातो, पाहूं या' असें ते स्वतःशीं म्हणाले. त्या देवानें आपणांस सोडून अलेक्झांडरकडे जाऊं नये म्हणून त्यांनीं त्याला खिळे मारून जागच्या जागीं खिळवून टाकलें. पण प्ल्युटार्क सांगतो, "टायरमधील जनतेचे ते सारे प्रयत्न झुगारून देऊन ॲपोलो अखेर अलेक्झांडरकडे गेला तो गेलाच. त्याचें शरीर दोरखंडांनीं व खिळ्यांनीं जखडून टाकण्यांत आलें असलें तरी मन मोकळेंच होतें; त्यामुळें ॲपोलोचा आत्मा अलेक्झांडरच्या वतीनेंच लढला."

अलेक्झांडर आश्चर्यकारक वेगानें आशियांतील देश एकामागून एक घेत चालला. त्याला हे असंभाव्य विजय सारखे मिळत गेल्यामुळें त्याचे शत्रूहि एक प्रकारच्या भोळसट आदरानें त्याच्याकडे पाहूं लागले. हा कोणी देवच आकाशांतून पृथ्वीवर अवतरला आहे असें त्यांस वाटूं लागलें. अलेक्झांडर एकाच वेळीं अनेक ठिकाणीं असतो अशा कथा पसरूं लागल्या. त्याच्याविरुद्ध शत्रूंनीं उभारलेल्या प्रचंड फौजा न लढतां आपोआप मोडल्या. शत्रूचे सैनिक लढेनासेच झाले. त्या प्रचंड सेनांचा पराजय अलेक्झांडरनें नाहीं केला, तर अलेक्झांडरविषयीं त्यांना वाटणाऱ्या भीतीनें केला.

अलेक्झांडर वेडा होता खराच, पण तो तेजस्वी वेडा होता. त्याचें वेडेपण क्षुद्र नव्हतें; त्यांतहि एक प्रकारची ऐट होती. आपण देव आहों असें त्यालाहि वेडाच्या लहरींत वाटे. देव समजून आपली पूजाअर्चा लोकांनीं करावी असा आग्रह तो धरी. एकदां त्याच्या मांडीवर प्रहार झाला तेव्हां इतरांच्या रक्ताप्रमाणेंच आपलेंहि रक्त आहे असें पाहून त्याला विस्मय

वाटला. कारण अमर अशा देवांच्या नसांतून जें दिव्य रक्त वाहतें तेंच आपल्याहि नसांत आहे अशी त्याची समजूत होती. लढाईच्या वेळीं तो आकाशांतील देवतांना आपल्या साह्यास बोलावी; तो त्यांना उद्देशून म्हणे, "मी तुमचा भाईबंद आहें; मी मर्त्य नाहीं हें विसरूं नका."

त्याचे उत्कट व निष्ठावंत भक्तहि त्याचा हा अहंकारी पागलपणा पाहून कधीं कधीं थक्क होऊन जात! स्वतःच्या क्षुद्र अहंकाराच्या आरशांत तो आपलें रूप पाही. जगांतल्या साऱ्या क्षुद्र व दुबळ्या लोकांमध्यें आपण ज्युपीटरप्रमाणें शोभत आहों असें त्याला वाटे. ज्युपिटर म्हणजे ग्रीकांचा युद्धदेव, जणूं ग्रीकांचा देवेन्द्रच! अधिक पुढें जावयाचें नाहीं असें ठरविल्यावर हिंदुस्थानांतून जेव्हां तो परत फिरला तेव्हां त्यानें आपल्या घोड्यांचे लगाम, चिलखतांचे तुकडे व शिरस्त्राणांचे भाग मुद्दाम मार्गे ठेवले. या साऱ्या वस्तू हेतुपुरस्सरच आकारानें प्रचंड अशा बनविण्यांत आल्या होत्या. त्या पाहून मॅसिडोनियन सैन्यांतील लोक व घोडे प्रचंड आकाराचे, अजस्र होते असें हिंदूंना वाटावें असा हे अवशेष मागें ठेवण्यांत त्याचा हेतु होता. त्याला स्वतःचें सर्व कांहीं पवित्र वाटे. आशियांतील एका नव्या शहराला त्यानें आपल्या घोड्याचें व दुसऱ्याला आपल्या कुत्र्याचें नांव दिलें! त्याची ही आत्मप्रदर्शनाची वृत्ति, त्याची ही जाहिरातबाजी तिरस्करणीय व किळसवाणी वाटते. जेव्हां त्याची विजयी सेना कार्मानियांतून जात होती, तेव्हां त्यानें एका प्रचंड व्यासपीठावर मेजवानी मांडली होती! तें व्यासपीठ आठ घोडे ओढीत होते व त्यावर खान–पान चाललें होतें! त्या चालत्या व्यासपीठावर तो आपल्या खुशमस्कऱ्यांसह खात–पीत बसला होता. शहरामधून मूर्खांची ती मिरवणूक गेली तेव्हां मॅसिडोनियन मेजवानीमधील पोकळ ऐट व क्षुद्र अवडंबर पाहून पौर्वात्य दिङ्मूढ झाले! हा मूर्खपणा कीं पराक्रम हें त्यांना समजेना.

त्याची वृत्ति इंग्लंडमधील हवेप्रमाणें चंचल होती. त्याचा स्वभाव क्षणाक्षणास पालटे. एका क्षणांत तो सौम्यपणा सोडून सैतानीपणा स्वीकारी! एकदां त्याच्या सेना वाळवंटांतून जात असतां एका शिपायानें आणून दिलेलें पेय त्यानें नाकारलें. कारण, सेनापतीनेंहि सर्वसामान्य शिपायांबरोबर तहान सोसली पाहिजे, त्यांचे जीव तहानेनें व्याकूळ होत असतां आपण पेय पिणें योग्य नव्हे,

असें त्याला वाटलें. पण पेय देणाऱ्या एका नोकराकडून त्याचा एकदां चुकून अपमान झाला त्याबरोबर त्यानें दोन्ही हातांनीं त्याचे केस धरून त्याचें डोकें जोरानें भिंतीवर आपटलें! त्याचें डोकें ठिकाणावर असे तेव्हां तो होमर वाची. निशेच्या भरांत त्यानें आपला प्रियतम मित्र क्लायटस याला ठार मारलें; पण शुद्धीवर आल्यानंतर त्याला झालेला पश्चाताप त्याच्या दारूच्या धुंदींतील खुनशीपणाइतकाच तीव्र होता. स्तुति करणाऱ्यांना तो लुटींतील भाग देई. पण कॅलिस्थेनिस नामक एक तत्त्वज्ञानी त्याची देव म्हणून पूजा करीना म्हणून त्यानें त्याला फांशीं दिलें! त्याचा सर्वांत मोठा डरायस नामक शत्रु मेला तेव्हां तो रडला. पण रोजची करमणूक म्हणून तो हजारों युद्ध-कैद्यांची कत्तल करी!

तो स्वतःच्या प्राणांविषयीं जसा बेफिकीर होता, तसाच इतरांच्याहि प्राणां-विषयीं बेपर्वा होता. त्याचा एक आवडता शिपाई आजारी पडला व वैद्याच्या सल्ल्याप्रमाणें न वागल्यामुळें मेला. पण अलेक्झांडरनें 'या वैद्यानें माझा शिपाई मारला' असें म्हणून त्या वैद्याला क्रॉसवर चढविलें! तरीहि त्याचें मित्रवियोगाचें दुःख कमी होईना तेव्हां त्याचा विसर पडावा म्हणून तो अकस्मात् एका शहरावर चालून गेला व त्यानें तेथील सर्व नागरिकांची कत्तल करून त्यांचा आपल्या मृत मित्राला बळी दिला. शत्रूकडील सेनापति त्याच्या हातीं पडत तेव्हां त्यांना कधीं कधीं तो अत्यंत उदारपणें वागवी, तर कधीं कधीं जवळच्या झाडावर फांशीं देई. अलेक्झांडरची स्वारी कशी वागेल हें त्या त्या प्रसंगीं त्याची जी लहर असेल तीवर अवलंबून असे. एकाद्याला ठार करावें असें त्याच्या मनानें घेतलें कीं तो स्वतःच आरोप करणारा, न्याय देणारा व न्यायाची अमलबजावणी करणारा म्हणजे ठार मारणारा बने. शत्रूंना छळण्या-साठीं नवनव्या क्लृप्त्या शोधून काढण्यांतहि त्याचें डोकें कमी चालत असे असें नाहीं. प्ल्युटार्क म्हणतो, "एकदां दोन झाडें वांकवून त्यांच्यामध्यें त्यानें एका कैद्याला बांधविलें व मग मुद्दाम वांकवून भिडविलेलीं तीं झाडें एकदम सोडून देण्याचा हुकूम केला. तसें करतांच तीं झाडें इतक्या वेगानें आपल्या मूळ स्थितीप्रत गेलीं कीं, त्या दुर्दैवी कैद्याचे उभे दोन तुकडे झाले व प्रत्येक झाडानें त्याचें अर्धें अर्धें रक्तबंबाळ शरीर उचलून वर नेलें व जणूं विजयाची ढाल म्हणून मिरविलें!

त्या कैद्याचा अशा राक्षसी छळणुकीनें वध केल्यावर अलेक्झांडर होमर वाचीत पडला ! त्याच्या बहुमूल्य वस्तूंत होमरच्या काव्यांची एक सुंदर प्रत सदैव असे. इलियडमधील युद्धप्रसंग वाचणें आपणांस फार आवडतें असें तो म्हणे. इलियडमधील समर-वर्णनें वाचूनच तो युद्धप्रिय बनला होता. विजयध्वजा सर्वत्र मिरवावी, अजिंक्य म्हणून सर्वत्र गाजावें असें त्याला त्यामुळेंच वाटूं लागलें होतें. होमरच्या काव्यांनींच त्याला समर-स्फूर्ति दिली होती.

— ६ —

तो लढत नसे किंवा होमरहि वाचीत नसे तेव्हां तो दारू पिऊन पडत असे. रणांगणावरील पराक्रम असोत किंवा दुसरीं दुष्कृत्यें अथवा व्यसनें असोत, तो सर्वच बाबतींत इतरांवर ताण करी. जेथें जाऊं तेथें आपण बिन-जोड असलों पाहिजे असेंच जणूं तो म्हणे ! सामान्य लोकांइतपत अतिरेक त्यास पसंत पडत नसे. त्याचा अतिरेक अमर्याद, अतुल असे. तो पिऊं लागला कीं पिपेंच्या पिपें रिकामीं करी आणि मग दारूच्या धुंदींत एखाद्या मत्त देवाप्रमाणें वाटेल तें करीत सुटे. एकदां तो एक मेजवानी देत असतां एका वेश्येचा सन्मान करीत होता; निशा केलेली ती रमणी त्याला म्हणाली, " इराणी राजाच्या राजवाड्याला आग लावा. " आणि त्यानें आग लावली ! एकदां तर त्यानें एक फारच मोठी गंमत केली. दारू पिण्याची मॅराथॉन शर्यत लावून सर्वांत जास्त दारू पिणारास त्यानें सोन्याचा मुकुट बक्षीस म्हणून ठेवला ! ज्यानें तो सुवर्ण-मुकुट मिळविला तो तीन गॅलन दारू प्याला होता ! पण त्या निशेंतच तो मेला. दुसरे एकेचाळीस जणहि त्या दारूच्या स्पर्धेत भाग घेऊन मरण पावले.

एकदां नाचरंग, मेजवानी असा स्वैराचार रात्रंदिवस सारखा चालल्यामुळें तो तापानें आजारी पडला व थोड्याच दिवसांनीं खि. पू. ३२३ या वर्षी तो मरण पावला. मरण-समयीं तो केवळ तेहतीस वर्षांचा होता; पण येवढ्या लहान वयांत इतके देश उध्वस्त करणारा, मानवांवर इतके अन्याय करणारा, त्यांच्यावर दुःखांच्या इतक्या प्रचंड राशी ओतणारा, त्यांच्या अशा कत्तली करणारा प्राचीन इतिहासांत दुसरा कोणी आढळेलसें वाटत नाहीं.

— ७ —

अलेक्झांडरचें अवास्तव स्तोम माजविणाऱ्या इतिहासकारांनीं त्याच्याभोंवतीं एक तेजोवलय निर्माण करून ठेवलें आहे. जें जें उच्च आहे, थोर आहे, सद्गुणी आहे, त्या सर्वांची आदर्शभूत मूर्ति म्हणजे अलेक्झांडर असें त्यांनीं लिहून ठेवलें आहे. नवनवीं पुरें-पट्टणें वसविणारा, रानटी जातींना माणसाळविणारा, राष्ट्राराष्ट्रांत व्यापार वाढविणारा, रस्ते बांधून दळणवळण वाढविणारा, इत्यादि प्रकारें त्याचें वर्णन करण्यांत येत असतें.

परंतु अशा या दुष्ट-शिरोमणीला, या हडेलहप्प सैतानाला, अशा रीतीनें दिव्य संतपण दिलेलें पाहून शिसारी येते! संस्कृति, सुधारणा यांचा थोडाहि विचार या घमेंडखोराच्या डोक्यांत येत नसे. अलेक्झांडर फक्त अलेक्झांडरलाच पूजी. अलेक्झांडरचीच पूजा, अलेक्झांडरचीच स्तुति! त्यानें शहरें बांधलीं तशींच धुळीसहि मिळविलीं! ती उभारणी वा संहारणी त्याच्या स्वतःच्या वैभवासाठीं होती. मानवजातीचा विचारहि त्याच्या डोक्यांत शिरत नसे. जी थोडीफार शहरें त्यानें वसविलीं त्याबद्दल त्याचे पोवाडे गाण्यांत येतात; पण त्यानें शेंकडों शहरांची राखरांगोळी केली त्याचें काय? अलेक्झांडरच्या युद्धांमुळें ग्रीक संस्कृतीचीं बीजें आशियाभर पेरलीं गेलीं असें मानणें हा केवळ मूर्खपणा होय. वस्तुतः त्यानें संस्कृतीचीं बीजें पेरलीं नसून सूडाचीं, द्वेष-मत्सरांचीं व भावी युद्धांचीं मात्र बीजें सर्वत्र पेरलीं. युरोपची संस्कृति पूर्वेकडे पसरली ती खरोखर अलेक्झांडरच्या तरवारीमुळें नव्हे, तर सोलोन, हिराडोटस, प्लेटो यांसारख्या ग्रीक कवींनीं व तत्त्वज्ञान्यांनीं केलेल्या कामगिरीमुळें. जग सुधारावें, तें अधिक उदार व सुसंस्कृत करावें, त्याची अधिक चांगली सहकारी संघटना करावी, अशीं भव्य ध्येयें अलेक्झांडरच्या डोळ्यांसमोर कधींहि नाचलीं नाहींत! अशा ध्येयांनीं त्याचें अहंकारी मन कधीं उच्च बनलेंच नाहीं. आपल्या बुसिफालस नामक घोड्याला त्यानें जसें फटके मारून वठणीवर आणलें, त्याच्यावर स्वार होतां यावें म्हणून त्याला ज्याप्रमाणें माणसाळविलें, त्याप्रमाणें मानवांवर आपणाला सत्ता गाजवितां यावी म्हणून त्यानें त्यांना तरवार दाखवून हीन-दीन केलें.

## प्रकरण २ रें

# हंसरा, दुःखवादी एपिक्यूरस

– १ –

कसें मारावें हें माणसांना अलेक्झांडरनें शिकविलें; कसें जगावें हें त्यांना तत्त्वज्ञान्यांनीं शिकविलें. १९१४ सालच्या महायुद्धामुळें ज्याप्रमाणें तरुण पिढीच्या डोळ्यांवरील भ्रमपटलें दूर झालीं, त्याचप्रमाणें प्राचीन काळीं अलेक्झांडरच्या जागतिक युद्धामुळें नवीन पिढी निर्भ्रान्त झाली. जे संशयात्मे होते ते जीवनाच्या मूल्यांविषयीं व देवाच्या विचित्र लहरींविषयीं प्रश्न करूं लागले. जे निरर्थवादी होते, कशांतच कांहीं अर्थ नाहीं असें म्हणणारे होते, ते सर्व मानवी आशा-आकांक्षांची टर उडवूं लागले. विरून जाणाऱ्या चंचल ढगांच्या पाठोपाठ पळत जाण्याप्रमाणें, मावळणाऱ्या इन्द्रधनुष्याच्या पाठीमागें लागण्याप्रमाणें, या आपल्या आशा-आकांक्षा निष्फळ ठरणार आहेत, म्हणून त्यांच्यासाठीं धडपडण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें ते म्हणत. निराशावादी व दुःखवादी तत्त्वज्ञानी तर याच्याहि पलीकडे जाऊन म्हणत, "हें जीवन जरी कितीहि सुखमय व आनंदपूर्ण दिसलें तरी तेथें दुःखाची नांगी आहेच; अत्यंत आनंदाच्या क्षणांतहि दुःख लपलेलें असतें; प्रत्येक फुलांत डंख मारणारी गांधीलमाशी असते; प्रत्येक सुखाभोंवतीं दुःखाचा विळखा असतो! दोन झोंपांमधलें एक अत्यंत कटु स्वप्न म्हणजे जीवन! जीवनाआधीं शून्य; जीवनानंतरहि शून्य! दोन शून्यावस्थांमधला क्षणिक बुडबुडा म्हणजे जीवन! हा बुडबुडा जितक्या लवकर फुटेल, हें स्वप्न जितक्या लवकर विराम पावेल, भंगेल, तितकें चांगलेंच." हेगेसियस नांवाचा एक अत्यंत निराशावादी व दुःखवादी तत्त्वज्ञ होता. तरुणांनीं करण्यासारखी सर्वोत्कृष्ट गोष्ट म्हणजे आत्महत्या हें आपल्या विद्यार्थ्यांस पटवून देण्यासाठीं तो सारखी खटपट करी. ही गोष्ट प्रतिपादण्यांत त्यानें आपलें सारें आयुष्य वेंचिलें; पण तो स्वतः मात्र ऐशीं वर्षांचा होऊन अगदीं स्वाभाविकपणें हें जग सोडून जाण्याची पाळी येईपर्यंत जगला! आत्महत्या करा असें तो लोकांना सांगे; पण त्यानें स्वतः मात्र कधींच आत्महत्येचा प्रयत्नहि केला नाहीं. त्याला जेव्हां कोणीं तरी प्रश्न केला कीं, 'जें तुम्ही लोकांना उपदेशितां तें स्वतःच कृतींत कां आणीत नाहीं?'

तेव्हां त्यानें उत्तर दिलें, " मला माझ्या इच्छेविरुद्ध मोठ्या कष्टानें व दुःखानें जगावें लागत आहे. मरणें किती चांगलें हें लोकांना पटवून देण्यासाठीं तरी जगणें मला भाग आहे ! काय करावयाचें !"

— २ —

या तत्त्वज्ञान्यांच्याविरुद्ध दुसरा एक अशा तत्त्वज्ञान्यांचा वर्ग होता कीं, त्यांना निरर्थक दिसणाऱ्या या जीवनांतहि आशा-तंतु दिसल्यासारखा वाटे. जीवनाच्या या अर्थहीन दिसणाऱ्या विणावटींतहि बुद्धिमान् अशा विणकराचा हात दिसतो असें ते म्हणत. या जीवनांत कांहीं तरी हेतुमयता, योजकता आहे, हें अगदींच निःसार व पोकळ नाहीं, यांत थोडाफार अर्थ आहे, असें त्यांना वाटे. ते 'सर्वसह'वादी स्टोइक म्हणत कीं, "हें जीवन आशीर्वाद-रूप आहे. आपणांस जीं संकटें वाटतात तीं वस्तुतः दुःखरूप नसून आपलें मन अधिक खंबीर व गंभीर व्हावें, अधिक सामर्थ्यसंपन्न व काटक व्हावें म्हणून आपल्या मार्गांत मुद्दाम टाकलेले अडथळे असतात ; त्या संकटांतहि आईची मंगल कृपाच असते. जे पापाची शक्ति मान्य करतात, त्यांच्यावरच जगांतल्या दुःखांची व जगांत जें जें असत् आहे त्याची सत्ता चालू शकते ; पापाची शक्ति मान्य करणारांनाच पाप अपाय करूं शकतें ; भुताला भिणाऱ्यांच्याच छातीवर भूत बसतें. दुःखाला स्वतःची अंगभूत शक्ति नाहीं. दुःखानें रडणारा कोणीच न भेटला तर दुःख काय करील ? तुमच्या दुबळेपणामुळेंच दुःख प्रबळ आहे. त्या दुःखाचा इन्कार करा म्हणजे तें तुमच्यापुरतें तरी नष्ट झाल्यासारखेंच आहे." हे स्टोइक म्हणजे ख्रिस्तपूर्व जगांतील आशावादी शास्त्रज्ञ. यांच्याउलट दुसरे सुखवादी तत्त्वज्ञानीहि होते. ते दुःख आहे असें मानीत, पण सुखोपभोगांत रंगून माणसानें स्वतःला दुःखाचा विसर पाडावा असें शिकवीत. त्यांना 'उदरंभर तत्त्वज्ञ', 'शिश्नोदरपरायण तत्त्वज्ञानी' अशीं नांवें ठेवण्यांत येत. त्यांना शांत व सौम्य अशा मानसिक व बौद्धिक आनंदा-पेक्षां प्रक्षुब्ध व मत्त करणारे शारीरिक आनंद आवडत. 'खा, प्या, मजा करा', हें त्यांचें ब्रीदवाक्य होतें. 'उद्यां एकादा अलेक्झांडर येईल व तुम्हांला मरावयास सांगेल ; म्हणून मिळेल तेवढा क्षण सुखांत घालवा.' असें ते सांगत. या न समजणाऱ्या जगांत, या अनाकलनीय संसारांत कसें वागावें हें न समजल्यामुळें हे सारे तत्त्वज्ञानी जणूं प्रयोगच करूं पाहत होते. या जगाशीं

कसें जमवून घ्यावें हेंच जणूं ते पाहत होते. कोणी दुःखावर भर देई, कोणी सुखावर. कोणी दुःखेंहि आशीर्वादरूप असें सांगत, कोणी सुख मिळेल तेवढें भोगून पदरांत पाडून घ्या असें सांगत. अलेक्झांडरनें जीं सारखीं युद्धें पेटविलीं त्यांमुळें मानवी मन अस्वस्थ झालें होतें. रबरी चेंडूप्रमाणें मानवी मन केव्हां या बाजूला तर केव्हां त्या बाजूला, केव्हां वर तर केव्हां खालीं, फेंकलें जात होतें, केव्हां इकडे तर केव्हां तिकडे ओढलें जात होतें. कोणी त्याला आशेकडे ओढी तर कोणी निराशेकडे; कोणी त्याला भोगाकडे ओढी तर कोणी त्यागाकडे. कोणी म्हणे, 'दुःखें भोगा', तर कोणी सांगे, 'सुखें भोगा.' कोणी विषयलंपटतेचें तत्त्वज्ञान पसरवीत तर कोणी 'जें जें होईल तें तें पाहावें' असें सांगत. जगांत धर्म राहिला नव्हता. जुन्या ईश्वरानें मानवी मनाची व मनोरथांची वंचना केली होती व मानवजात ज्याच्यावर विश्वास टाकूं शकेल असा नवीन ईश्वर अद्यापि लाभला नव्हता. 'जुना ईश्वर गेला, नवीन ईश्वराचा पत्ता नाहीं,' अशी स्थिति होती.

परंतु या सुमारास सॅमॉस बेटांत एक तरुण वाढत होता. त्याचें नांव एपिक्यूरस. धर्म नसतांहि सुखी कसें व्हावें हें तो शिकविणार होता, देव-देवतांच्या मदतीशिवाय हें जीवन नीट कसें जगतां येईल हें शिकविणार होता.

— ३ —

एपिक्यूरस अलेक्झांडरच्या जन्मानंतर पंधरा वर्षांनीं म्हणजे इ. स. ३४१ मध्यें जन्मला. त्याचा बाप अथीनियन होता. तो शिक्षकाचा धंदा करी. परंतु त्याला पगार फारच थोडा होता. त्यामुळें त्याच्या पत्नीला धार्मिक गंडे, मंतरलेले ताईत वगैरे विकून महिन्याचीं दोन्ही टोंकें पुरीं करावीं लागत. ती अंगारे-धुपारे, जप-जाप्य करून संसार चालवी. ती मनुष्यांना भुतां-खेतापासून, प्रेतांपिशाच्चांपासून मुक्त करणारी बिनपदवीची वैदू होती. लहानग्या एपिक्युरसला आईच्या या फसव्या धार्मिक जादूटोण्यांत मदत करावी लागे. या गोष्टी पाहून त्याला बाळपणींच धर्माविषयीं मनापासून तिटकारा वाटूं लागला.

अगदीं तरुणपणींच अध्यात्माविषयीं त्याची आवड व तीव्र बुद्धिमत्ता या दिसून आल्या.

एके दिवशीं गुरुजी शिकवितांना म्हणाले, "हें जग मूळच्या अव्याकृत प्रकृतींतून जन्माला आलें." एपिक्युरसनें विचारलें, "पण ती अव्याकृत प्रकृति कोणीं उत्पन्न केली ?" पंतोजी म्हणाले, "मला ठाऊक नाहीं. त्याचें उत्तर एखादा खरा तत्त्वज्ञानीच तुला केव्हां तरी देईल."

त्याच क्षणीं—त्याच वेळीं—एपिक्युरसनें तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्याचें नक्की केलें. ज्या अव्याकृत प्रकृतींतून हें प्रत्यक्ष जगत् निर्माण झालें ती मूळची अव्याकृत प्रकृति कोणीं निर्मिली या प्रश्नाचें उत्तर शोधून काढावयाचें असें त्यानें ठरविलें.

वयाच्या अठराव्या वर्षी तो अथेन्सला गेला. ती त्याच्या पित्याची जन्मभूमि होती; तेथें तत्त्वज्ञानांतील नाना पंथांशीं व संप्रदायांशीं त्याचा परिचय झाला, पण कोणत्याच विचारसरणीकडे त्याचें मन आकृष्ट झालें नाहीं. नंतर तो पूर्वेकडे गेला. तो कित्येक वर्षें ज्ञानशोध करीत हिंडत होता. तो ज्ञानाचा यात्रेकरू झाला. पौर्वात्य देशांतील ज्ञानाच्या सोन्याच्या लगडी आणण्यासाठीं तो मोठ्या उत्सुकतेनें गेला व खरोखरच ज्ञानसंपन्न होऊन वयाच्या पस्तिसाव्या वर्षी अथेन्सला परत आला. अथेन्सजवळच्या एका खेडेगांवांतलें एक घर त्यानें विकत घेतलें. त्या घराभोंवतीं बाग होती. त्यानें तेथें तत्त्वज्ञान शिकविणारी 'आकाशाखालची' शाळा उघडली. मोकळी, उघडी शाळा.

तत्त्वज्ञानाचें हें उघडें मन्दिर स्त्री-पुरुष दोघांहिसाठीं होतें. कोणींहि यावें व शिकावें. ही संस्था फारच लवकर लोकप्रिय झाली. एपिक्युरसचे श्रोते त्याचे ईश्वरविषयक नवीन नवीन व आधुनिक पद्धतीचे विचार ऐकून डोलत, तन्मय होत. ते विचार ऐकून कधीं त्यांच्या मनाला धक्का बसे, तर कधीं अपार आनंद होई. या विश्वाचें स्वरूप काय, मानवी भवितव्य काय, इत्यादि गहन-गंभीर प्रश्नांवर तो बोले. भविष्यकालीन म्हणजेच मरणोत्तर जीवन अशक्य आहे हें तो अथेन्समधील तरुण-तरुणींना पटवून देई. भविष्य जीवन नसल्यामुळें शक्य तितके आनंद व रस या जीवनांतूनच मिळविले पाहिजेत हा विचार तो त्या तरुण श्रोत्यांच्या मनावर बिंबवी. या मिळालेल्या जीवनाचाच जास्तींत जास्त उपयोग करून घेतला पाहिजे असें तो शिकवी व पटवून देई. आपल्या काळीं तो अत्यंत लोकप्रिय तत्त्वज्ञानी झाला. त्याचीं

लहानमोठीं तीनशें पुस्तकें त्या वेळेस प्रसिद्ध झालीं होतीं. जे त्याच्या प्रवचनांना उपस्थित राहूं शकत नसत ते त्याचीं पुस्तकें विकत घेत.

एपिक्युरसचीं बहुतेक पुस्तकें नष्ट झालीं आहेत. परंतु ल्युक्रेशियस नामक प्रतिभावान् कवीनें 'वस्तूंचें स्वरूप' या आपल्या महाकाव्यांत एपिक्युरसच्या तत्त्वज्ञानाची संपूर्ण रूपरेषा दिली आहे. एपिक्युरसनंतर दोनशें वर्षांनीं ल्युक्रेशियस कवि झाला. तो रोममध्यें राही. तो एपिक्युरियन पंथाचा होता. 'वस्तूंचें स्वरूप' हें ल्युक्रेशियसचें महाकाव्य साहित्याच्या इतिहासांतील एक अति अपूर्व व आश्चर्यकारक अशी वस्तु आहे. वास्तविक हें महाकाव्य अति निष्ठुर तर्कपद्धति शिकविण्यासाठीं लिहिलें आहे; पण त्यांत ती अत्यंत उत्कट भावनांनीं शिकविण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. भावनोत्कट भाषेनें निष्ठुर तर्क शिकविणारें हे अपूर्व महाकाव्य 'मनुष्याच्या सुखा-व्यतिरिक्त जगांत दुसरी दैवी व उदात्त गोष्ट नाहीं' असें मानणाऱ्या एका नास्तिकानें लिहिलें आहे. तें म्हणजे अधार्मिकांचें—कशावरच विश्वास न ठेवणाऱ्यांचें–बायबल होय.

थोडा वेळ आपण ल्युक्रेशियसला भेटीला बोलावूं या व एपिक्युरसच्या तत्त्वज्ञानाची रूपरेषा थोडक्यांत सांगण्याची विनंति त्याला करूं या. एपिक्युरसच्या मतें जीवनाचा हेतु जीवनांतला आनंद अनुभवणें हा होय. या जगांत आपणांला दुसरें कर्तव्य नाहीं, आणखी कसलेंहि काम नाहीं. आपण दयाघन परमेश्वराचीं लेंकरें नसून बेफिकीर निसर्गाचीं सावत्र मुलें आहों. हें जीवन म्हणजे या यंत्रमय विश्वांतली एक अकल्पित व आकस्मिक घटना होय. पण आपली इच्छा असेल तर आपणांस हें जीवन सुखमय व रसमय करतां येईल, कंटाळवाणें वाटणार नाहीं असें करतां येईल. आपणांस आपल्या सुखासाठीं दुसऱ्यावर विसंबून राहून चालणार नाहीं, स्वतःवरच विसंबून राहिलें पाहिजे. हें विश्व विश्वंभरानें निर्मिलेलें नसून अनंत अशा अवकाशांतल्या अणुपरमाणूंच्या गर्तीतून तें कसें तरी सहजगत्या बनलें आहे.

एपिक्यूरस हा परमाणुवादी होता. ही मीमांसा त्यानें डेमॉक्रिटस नामक पूर्वीच्या ग्रीक तत्त्वज्ञापासून घेतली. डेमॉक्रिटस ही फारशी कधीं न आढळणारी प्राचीन काळांतली अपूर्व व्यक्ति होती. एकादें शास्त्रीय सत्य

शोधणें हें त्याला एकादें साम्राज्य मिळविण्यापेक्षांहि अधिक महत्त्वाचें वाटे. असलीं माणसें प्राचीन काळांत फारशीं नव्हतीं. हें जग कसें तरी यांत्रिक रीतीनें अणुपरमाणूंतून बनलें आहे, या जगाच्या उपपत्तींतच पुष्कळशा महत्त्वाच्या अर्वाचीन शोधांचें बीज आहे. डेमॉक्रिटसनें जणूं आजच्या पदार्थविज्ञान-शास्त्रांतील बऱ्याचशा शोधांची पूर्वकल्पनाच केली होती.

डेमॉक्रिटसच्या या अणुमीमांसेच्या पायावर एपिक्युरसनें आपल्या तत्वज्ञानाची इमारत उभारली. तो म्हणे —आपण सारे अणूंचे संघात आहों, कोठून तरी शून्यांतून आपण येथें फेंकले गेलों असून पुनः त्या शून्यांतच परत फेंकले जाणार आहों. हें अणू सदैव खालीं खालीं असे या अनंत शून्यांत (पोकळींत) फिरत राहतात. कधीं कधीं हे अणुसंघात या किंवा त्या बाजूला कलल्यामुळें संघर्ष होतात. सूर्यकिरणांतील त्रसरेणु एकमेकांवर आदळतात तद्वत्च हें घडतें. हे अणू नाना रूपांचे व आकारांचे असतात. हे अखंड भ्रमन्तीमुळें व परस्परांच्या संघर्षांमुळें हळूहळू संघटित होतात व त्यांपासून नाना पदार्थ बनतात. चंद्र, पृथ्वी, तारे —हें विश्व अशा रीतीनें या अणूंच्या संघातांतून जन्मलें. आणि आपलें विश्व हें एकच अशा प्रकारचें आहे असेंहि नव्हे. असलीं अनंत आश्चर्यकारक व अवाढव्य जगें, विश्वें, ब्रह्माण्डें आहेत. त्या दुसऱ्या विश्वांतहि आपल्या पृथ्वीसारखीच पृथ्वी असेल व तीवर पर्वत, समुद्र, मानव, पशू, पक्षी, असतील. आपणच तेवढे या अनंत समुद्राच्या अनंत किनाऱ्यावरील वाळूचे कण आहों असें नव्हे. कारण, हे अणू पुनः पुनः त्याच त्याच प्रकारच्या समवायांत व संघातांत एकत्र येतात व तशाच वस्तु पुनः पुनः सर्वत्र घडतात. जेथें जेथें तशी परिस्थिति असेल तेथें तेथें तसेंच वस्तुजात या भ्रमणशील व संघर्षशील अणूंतून निर्माण होतें. या अणूंची ही अखंड भ्रमंती गति अधोगामी असते. अणूंची ही सारी हालचाल स्वयंस्फूर्त असते. तींत कोणा विश्वसूत्रचालकाचा हात नाहीं; तिला कोणी योजक वा मार्गदर्शक लागत नाहीं. देवदेवताहि अणूंपासूनच बनतात. फरक इतकाच कीं, माणसें ज्या अणूंपासून बनतात त्यांपेक्षां हे अणू अधिक शुद्ध व निर्दोष असतात. पण या देवदेवताहि माणसांप्रमाणेंच नाशवंत असतात. निरानिराळ्या विश्वांमधल्या अनंत अवकाशांत या देवदेवता राहतात, मानवी अस्तित्वा विषयीं त्यांना फिकीर नसते, मानवी जीवनाविषयीं त्यांना फारसें कांहीं

वाटत नाहीं. शेवटच्या विनाशकालाची—प्रलयाची–वाट पाहत आपण पृथ्वीवर वावरतों, ते स्वर्गांत, इतकाच फरक. देव व मानव ज्या अणूंतून जन्माला येतात, त्याच अणूंत त्यांचें पुनः पर्यवसान होतें. ज्याअर्थी हे अणू सारखे भ्रमणशील आहेत, एका वस्तूंतून फुटून दुसऱ्या वस्तूंत मिळतात, त्याअर्थी एक गोष्ट सिद्ध आहे कीं, हें जग झिजत आहे व एक दिवस ही पृथ्वीहि कोळशाच्या राखेप्रमाणें, विझलेल्या निखाऱ्याप्रमाणें शून्य होणार आहे. विझलेल्या, थंडगार होऊन गेलेल्या अनंत विश्वांच्या उकिरड्यावर ही पृथ्वीहि एके दिवशीं गार होऊन पडेल.

— ४ —

एपिक्युरसच्या योजनेंत देवांचें स्थान काय हें मात्र नीट समजत नाहीं. त्यांना मानवांचें महत्त्व वाटत नाहीं, मानवांना त्यांचें वाटत नाहीं. एपिक्युरसला धर्म म्हणजे एक क्षुद्र, नजीवी, अर्थहीन वस्तु वाटत असे. तरीहि तो अनेक देवदेवतांवरचा विश्वास सोडावयास तयार नव्हता. अर्थात्च हे देवहि नाशवंत अणू आहेत व त्यानें देवांनाहि शून्याच्या किनाऱ्यावरील सुखी लोकांच्या बेटावर हद्दपार करून टाकलेलें आहे हें खरें, पण त्यांना बेटाच्या कडेला ओढून विस्मृतीच्या समुद्रांत कायमचें लोटून देण्याचें धैर्य मात्र त्याला झालें नाहीं.

एपिक्युरसच्या विश्वांत या देवदेवतांचें अस्तित्व असलें तरी त्यांना या सृष्टीशीं कांहीं एक कर्तव्य नाहीं. त्यांना या आपल्या मर्त्य जगांतील घडामोडींचें सोहेर, सुतक, कांहींहि नाहीं! हें जीवन म्हणजे एक मूर्खांचा बाजार आहे. दैवी मेंदूंतून असल्या जगाची कल्पना निघणें शक्य नाहीं. कोणताहि देव स्वतःच्या पूजेसाठीं मन्दिर बांधावयाला सांगून तें आपल्याच विजेच्या गोळ्यानें भस्म करणार नाहीं. देव असा कसा असूं शकेल? दयाळू देव एकाद्या मुलाला आजारांतून बरा करून पुनः लढाईत मरावयाला पाठवील हें कसें शक्य आहे? एपिक्युरसच्या मतें या अकस्मात् उत्पन्न झालेल्या जगांत देव व मानव दोघेहि भयभीतपणें वावरत असतात. हें जग देवांनीं निर्मिलें नाहीं, मानवांनींहि निर्मिलें नाहीं, दोघेहि या जगांत अपरिचित पाहुणे आहेत. त्यांना सदैव धास्ती वाटते. देवांना स्वतःचीच काळजी वाहावी लागते,

चिंता लागलेली असते. माणसांनीं देवांच्या नांवानें हांका मारण्यांत काय अर्थ? जगांत चाललेल्या झगड्यांमध्यें देवहि माणसांप्रमाणेंच निराधार आहेत.

हें जग दुसऱ्या कोणीं निर्मिलेलें नसून अणूंच्या आकस्मिक संघातांतून आपोआप बनलेलें आहे. तें स्वयंभू आहे. पण मग अणूंच्या संघातांतून बनलेल्या या जगांत फळें-फुलें, पशु-पक्षी, देव-मानव, इ० विविध प्रकार कसे झाले? या अणूंतून कोणत्या प्रक्रियेनें व बनावानें डेमॉक्रिटससारखे शास्त्रज्ञ व एपिक्युरससारखे तत्त्वज्ञ जन्मले? एपिक्यूरस म्हणतो, "प्रसंगानें, नाना चुका होत होत, नाना प्रक्रिया होत होत, हें सर्व झालें." हे अणू उत्तरोत्तर अधिकाधिक शुद्धतेकडे जात असतात—त्यांचा उत्तरोत्तर विकास होत असतो. ओबडधोबड आकारांतून सुंदर आकारांकडे वस्तू जात असून जें अयोग्य आहे तें दूर, नष्ट होत असतें, गळून जात असतें व योग्य असेल तें कायम होत असतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे या निरनिराळ्या वस्तू उत्क्रांतीच्या योगानें बनत आल्या आहेत. डार्विनपूर्वी बावीसशें वर्षें इतक्या प्राचीन काळीं एपिक्युरसनें उत्क्रांतीचें तत्त्व मांडलें आहे.

— ५ —

एपिक्युरियन मीमांसेनुसार मनुष्य कसा जन्मला, निरनिराळ्या योनी कशा जन्मल्या याचें मोठें सुंदर वर्णन ल्युक्रेशियसनें दिलें आहे. अनंत काळापासून फिरणाऱ्या अणूंपरमाणूंतून पुष्कळशा घटना व विघटना होत होत शेवटीं त्यांतून एके दिवशीं हें आपलें जग निर्माण झालें. आरंभीं या पृथ्वीवर जीव नव्हते. ती म्हणजे एक नुसता मातीचा गोळा होती. पण हळूहळू त्या गोळ्यांतून हिरवें गवत वर आलें व त्याचा विकास होत होत त्यांतूनच एक दिवस झुडुपें व फुलें दिसूं लागलीं. पशूंच्या अंगावर केस येतात किंवा पक्ष्यांना पिसें फुटतात, त्याप्रमाणें वृक्षांना व वनस्पतींना फुलें आलीं. नंतर जीव उत्पन्न झाले, पक्षी उडूं लागले, आकाशांत गाऊं लागले, पशू जमिनीवर हिंडूं-फिरूं लागले, जंगलांतून गर्जना करूं लागले, पशुपक्ष्यांच्या कांहीं विशिष्ट जाती त्या त्या वातावरणास अनुकूल होत्या म्हणून त्या तेथें तेथें जगल्या व वाढल्या. या जातींच्या ठायीं धैर्य व धूर्तताहि असल्यामुळें त्या वांचल्या.

कांहीं जाती दुबळया होत्या, कांहींना कमी दिसे, कांहींना ऐकूं येत नसे, कांहींना हलण्या-चालण्याची साधनें नव्हतीं, त्या नष्ट झाल्या. निसर्गाच्या लहरींतून हे दुबळे प्रकार जन्मास आले व नष्ट झाले. हेतुहीन, योजनाहीन अशा या जगांतील अंधळ्या प्रयोगाचे ते बळी होते व नष्ट होणें हेंच त्यांचें भवितव्य होतें. विनाशच त्यांच्या नशिबीं होता. मानवप्राणी हा या मनोरंजक नाटकातला बलवान् प्राणी होय. तो या योजनाहीन नाटकांत शेवटीं येऊन उभा राहिला. तो काटक होता, रानटी होता, उघडा-बोडका होता, इतर प्राण्यांप्रमाणेंच तोहि या भूतलावर भटकत होता, पाला, कंदमुळें कवचीचीं फळें यांवरच जगत होता व रात्रीं उघड्यावरच निजत होता.

पण अधिक भयंकर हिंस्र श्वापदांनीं मानवांवर हल्ले चढविले तेव्हां त्यांना गुहांमध्यें आश्रय शोधणें भाग पडलें. हे पशुसम मानवी जीव एकेका गुहेंत समुदायानें राहूं लागले. त्यांच्यांत भाषा प्रकट झाली. त्यांना एकमेकांबद्दल आपलेपणा, करुणा, मैत्री वाटूं लागली. त्यांना स्वप्नांत जे विचित्र आकार दिसत, त्यांना देव मानून आणि अमर जीवन व अपरंपार शक्ति त्यांच्या ठायीं कल्पून, त्या काल्पनिक देवदेवतांची ते पूजा करूं लागले. पुढें त्यांना धातूंचा शोध लागल्यावर ते अधिक चांगलीं हत्यारें तयार करूं लागले व स्वतःचा बचाव आणि दुसऱ्यांचा संहार करण्याच्या क्रियांत अधिक तरबेज झाले. निरनिराळे मानवसमुदाय परस्पराशीं विचारविनिमय व वस्तुविनिमय करूं लागले, मालाची अदलाबदल व ठोशांची देवाण-घेवाण करूं लागले आणि अशा रीतीनें ते नाना कला व उद्योग शिकले. देवघेव, व्यापार, नौकानयन, शेती, काव्य, संगीत, शिल्प, राजकारण, मुत्सद्देगिरी, भांडणतंटे, फिर्यादी, मारामाऱ्या, लढाया, सारें कांहीं ते शिकले. थोडक्यांत म्हणजे ही संस्कृति—ही सुधारणा—हळूहळू उत्क्रान्तीनें होत आली आहे. आपत्तींनीं भरलेल्या या जगांत स्वतःचें सारें कसें जुळवून घ्यावयाचें हें मानव हळूहळू ठरवीत होता. तो बदल करीत, फरक करीत चालला होता. जीवनार्थ चाललेल्या या अखंड झगड्यांत थोडा वेळ जगतां यावें म्हणून मनुष्य प्रयत्न करीत आहे. हें सारें जीवन म्हणजे एक अखंड, अविरत झगडा आहे. या जगांत मरणाशिवाय शांति नाहीं.

— ६ —

आणि अशा रीतीनें आपण एपिक्युरसच्या विज्ञानांतूनच त्याच्या तत्त्वज्ञानाकडे येतों. ज्या पृथ्वीवर आपण जगत असतों ती जणूं आपणांस थोडा वेळ भाड्यानेंच मिळाली आहे. येथून निघून जाण्याची वेळ आली कीं आपलें सारें लुचाडलें जातें व अकिंचन होऊनच आपणांस येथून जावें लागतें. पण आपणांस मरणावर जय मिळवितां आला नाहीं तरी मरणाच्या भयावर आपण जय मिळवूं या. मानवी जीवन अल्प आहे म्हणून दुःख करीत बसण्याचें कारण नाहीं. उलट तें अल्प आहे म्हणून आनंदच मानूं या. मरणानंतर जाणीव नाहीं; मरणानंतर ना दुःख ना वेदना, ना शिक्षा ना बक्षीस, ना स्वर्ग ना नरक! या पृथ्वीवर केलेल्या चुकांबद्दल आपणांस मरणोत्तर कोणी सजा देणार आहे असें नाहीं. मृत्युदेवाचा तो कारुण्यपूर्ण शुभ्र हात आपणांस थोपटतो व स्वप्नहीन, चिर, मधुर निद्रेंत नेऊन सोडतो. जगद्रूपी वेड्यांच्या घरांतून होणाऱ्या आपल्या सुटकेच्या कागदावर सही करणारा प्रेमळ रक्षक म्हणजे मृत्यु. सर्व रोगांहून भयंकर रोग म्हणजे हें जीवन. जीवनाच्या दुर्धर व भीषण रोगापासून आपणांस मुक्त करणारा सौम्य व शांत वैद्यराज म्हणजे मृत्यु.

पण तुम्हांपैकीं कांहींना जरी हें जीवन सुखाचें, चिरसुखोपभोगांची जणूं मेजवानीच अशा स्वरूपाचें लाभलें असलें तरी तुम्हीं नेहमींच चैन करीत व अघाशासारखें खातपीत राहावें हें बरें का? ओ येईपर्यंत खात बसणें बरें नव्हे. पोटाला तडस लागण्यापूर्वींच उठावें. दोन घांस कमीच खाल्लेले बरे. एकाद्या दमलेल्या पण सुखी अशा मेजवानी झोडलेल्या माणसाप्रमाणें प्रसन्नपणें व हंसतमुखानें सुखाची झोंप घ्यावयाला जाणें बरें नव्हे का? एक दुर्दिन येईल व तुमच्या जीवनांतील सारें नष्ट होईल याचें तुम्हांला वाईट वाटतें. पण हा जो अखेरचा दिवस येणार आहे तो या नानाविध हव्यासांतून, वासनांतून व इच्छांतून सोडविणारा आणि हें हवें, तें हवें अशा धांवपळीपासून मुक्त करणारा असेल ही गोष्ट तुम्ही विसरतां.

मरणाची भीति झुगारून द्या व या जीवनांत जे जे मंगल आनंद मिळतील त्यांकडेच लक्ष द्या. एपिक्यूरस व 'सर्वंसह'वादी स्टोइक लोक यांचें येथपर्यंत

एकमत आहे. दैव बलवत्तर असल्यामुळें जें जें होईल तें तें सहन करणें हें ध्येय सामान्य; पण यापुढें मात्र दोघांत तीव्र मतभेद आहेत. स्टोइक म्हणत कीं, ज्या सुखांमुळें आपली प्रवृत्ति सद्‌गुणांकडे होत नाहीं, जीं सुखें सत्कर्मास प्रेरक होत नाहींत, तीं त्याज्य होत. सुखांनीं आपली समुन्नति व्हावी. याच्या-उलट एपिक्यूरस म्हणे, " जीं सत्कर्में सुखावह होत नाहींत तीं कुचकामी होत." प्रथम प्रथम केवळ सुखवादी लोकांप्रमाणें तोहि क्षुद्र शारीरिक सुखें वानी, वाखाणी व आपल्या विद्यार्थ्यांना सदैव शिकवी कीं, " जें जें सुख मिळेल तें तें भोगा, जी जी सोन्याची संधि सांपडेल ती ती पकडा." पण केवळ शारीरिक सुखांनीं कायमचें समाधान थोडेंच लाभणार ! क्षणभर जिभेचें सुख मिळवाल, शारीरिक सुख मिळवाल, पण कदाचित् एकादे वेळीं जीवनांत कायमचे रोगी अगर दुःखीकष्टी होऊन जाल. क्षणिक सुखाचें पर्यवसान कायमच्या दुःखांत होणें शक्य असतें. क्षणिक आनंदाच्या जीवनांत असणाऱ्या प्रक्षुब्धतेपेक्षां, वाटणाऱ्या जोमापेक्षां, सतत टिकणाऱ्या सुखाची शांत स्थिति अधिक चांगली. म्हणून स्थूल व क्षुद्र शारीरिक आनंदापेक्षां वेगळा असा एक नवीन शांत मनाचा आनंद तो शिकवूं लागला: या जीवनांतील गोंधळ व सुख-दुःखें यांकडे अनासक्त व अत्रस्त दृष्टीनें पाहणें, पाण्यांतील कमळाप्रमाणें अलिप्त राहणें. एपिक्यूरस म्हणे, " हें जीवन म्हणजे एक कटु देणगी आहे. ती इतकी कटु आहे कीं, जीवनांत आपण रडत ओरडत येतों व रडत ओरडतच जीवन सोडतों. आद्यन्तीं दुःखप्रद असें हें जीवन आहे. पण आपल्या या दुःखांतूनहि सुख निर्मितां येईल. म्हणून आपण दुःखाला सुखाची जननी करूं या. गत दुःखांच्या आठवणी आपणांला मागाहून सुखप्रद वाटत नाहींत का ?

" म्हणून थोडा विनोद शिका; विनोदी, मोकळी वृत्ति ठेवण्याचा यत्न करा. जरा प्रमाणबद्धता शिकलां म्हणजे हें साधेल. दुःख आलें तर त्या दुःखाचेंच अति करीत नका बसूं. ' यायचेंच कीं जरा दुःख ! बदल नको का कांहीं ! ' असें गंमतीनें म्हणा. आपणांसभोंवतालचें हें अनंत विश्व बघा, म्हणजे आपल्या चिंता व आपलीं दुःखें हीं इतकीं क्षुद्र वाटतील कीं, तुम्हांला हंसूंच येईल. स्वतःला जीवनाच्या विराट् नाटकांतील एक पात्र समजून सुखदुःखें भोगा-वयाला, येवढेंच नव्हे तर एकाद्या प्रेक्षकाप्रमाणें आपल्या दुःखांकडे बघून जरा हंसावयाला शिका.

“ वासना, इच्छा कमी करा. त्यांना मर्यादा घाला. गरजा कमी करा. जें मिळालें आहे त्यांत समाधान माना. महत्त्वाकांक्षा पूर्ण करणें शक्य नसेल तर जेवढें मिळणें शक्य असेल तेवढ्याचीच महत्त्वाकांक्षा धरा. फार उच्च महत्त्वाकांक्षा बाळगून त्या फलद्रूप होणार नसतील तर त्या जरा कमी उंच करा.” एपिक्यूरस स्वतः अत्यंत साधा मनुष्य होता. तो आपल्या कोणाहि अनुयायापेक्षां कमी एपिक्यूरियन होता. त्याला लालसा नव्हती, सुखाची ओढ नव्हती. साधी ज्वारी-बाजरीची भाकरी त्याला पुरे होत असे; पण ती कोणा मित्राबरोबर खावी असें त्याला वाटे. खातांना एकादा मित्र बरोबर असला म्हणजे झालें; मग त्याला आणखी कांहीं लागत नसे. “ आपण काय खाणार यापेक्षां कोणाबरोबर खाणार हीच गोष्ट अधिक महत्त्वाची आहे ” असें तो म्हणे.

एपिक्यूरस सर्वांचा मित्र होई; मैत्री जोडण्यांत तो अद्वितीय पुरुष होता. मैत्री कशी जोडावी हें तोच जाणे. आपल्या सुखांत सर्वांना सहभागी करणें हाच सुखी होण्याचा खरा मार्ग होय. आपलें सुख सर्वांना द्या. असें करणें मोठें उदापणाचें अगर उदात्तपणाचें आहे म्हणून मात्र नव्हे, तर जरुरीचें आहे म्हणून. आपल्या जगण्यांत शहाणपणा नसेल, न्यायीपणा नसेल, गोडपणा नसेल, तर आपणांस आनंदानें जगतां येणार नाहीं, सुखासमाधानानें नांदतां येणार नाहीं. प्राचीन काळांतील कन्फ्यूशियसप्रमाणें व आपल्या काळांतील बरट्रांड रसेलप्रमाणें एपिक्यूरस शहाणा व अविरोधी स्वार्थ शिकवीत असे. तो म्हणे, “ जर दुसऱ्यांनीं आपल्या सुखाआड येऊं नये असें तुम्ही इच्छीत असाल तर तुम्हीहि दुसऱ्यांच्या सुखाआड येऊं नका. स्वतःला अपाय होऊं नये म्हणून तरी दुसऱ्यांस अपाय करूं नका. तुम्हांला त्रास नको असेल तर दुसऱ्यांसहि त्रास देऊं नका. स्वतः जगा आणि दुसऱ्यांसहि जगूं द्या. प्रक्षुब्धता टाळा. उगाच धोके पत्करूं नका. युद्धाच्या रानवटपणापासून दूर राहा. राजकारणाच्या घाणींत नका शिरूं. प्रेमाचा अतिरेक नको तसाच अति द्वेषहि नको. मैत्रीचा गोड गुण जोडा. मैत्री जोडणें हा धर्म माना. मैत्रीची पूजा करा. कारण, मैत्री ही अत्यंत मधुर, अति पवित्र व सुंदर वस्तु आहे. या जगांत निश्चितपणें सुखाची गोष्ट जर कोणती असेल तर ती म्हणजे खऱ्या मैत्रीनें मिळणारी सहानुभूति. बाकी सारें कितपत किंमतीचें आहे याविषयीं शंकाच आहे; पण मैत्रीचा आनंद

ही मात्र निःशंक गोष्ट आहे. जीवनांतील दुःखक्लेशांमुळें आपण मरणालाहि मिठी मारतों, त्याप्रमाणें मैत्रीच्या आनंदासाठीं हें जीवन कितीहि कटु वाटलें तरी आपण त्याला कवटाळूं या."

एपिक्युरसला मित्रांचें सुख होतें म्हणूनच त्याला साऱ्या आपत्ती सुखानें सहन करतां आल्या. दारिद्र्य, प्रियजनांचा वियोग, दुखणीं, यांमुळें त्याचें जीवन खरोखरच निःसार झालें होतें. पण मृत्युशय्येवरूनहि तो आपल्या एका मित्राला पुढील पत्र लिहितांना दिसतो :—"माझ्या आयुष्यांतला हा शेवटचाच सुखाचा दिवस आहे आणि मी तुला लिहीत आहें. मला मूत्राशयाचा रोग झाला आहे. वेदना इतक्या होत आहेत कीं, याहून आणखी कांहीं दुःखदायक असूं शकेल असें मला तरी वाटत नाहीं. पण या अपरंपार दुःखाच्या विरुद्ध बाजूच्या पारड्यांत आपण कितीदां प्रेमानें बोललों व एकत्र अनेक गोष्टी केल्या त्यांच्या प्रेमळ स्मृतींचा आनंद घातला कीं हें असीम दुःखहि मला नसल्यासारखेंच वाटतें. दुःखाचें पारडें हलकें होतें."

आयुष्याच्या त्या शेवटच्या दिवशीं त्यानें या ओळी लिहिल्या व एकाहत्तर वर्षेंपर्यंत रोज रात्रीं तो ज्याप्रमाणें डोळे मिटीत असे त्याचप्रमाणें त्यानें त्या रात्रींहि शांतपणें, समाधानानें व सहजतेनें डोळे मिटले ते कायमच. दुसरे दिवशीं सकाळीं आपण उठूं कीं न उठूं, जागे होऊं कीं कायमचेच झोंपीं जाऊं याचें त्याला काय होय ? तो जागा झाला असता वा कायमचा झोंपीं गेला असता तरी त्याला असा काय मोठासा फरक वाटणार होता ? जीवन, मरण, दोन्ही त्याला जणूं सारखींच सुखप्रद होतीं !

## प्रकरण ३ रें

# द्वेष-मूर्ति हॅनिबॉल : कार्थेजियन राजपुत्र

— १ —

ग्रीक व इतर आर्य युरोपच्या मध्यभागीं कर्मक्षेत्रांत उतरले असतां तिकडे फोनिशियन लोक फार अशांत व अस्वस्थ झाले होते. टायर शहरांतील फोनिशियन स्त्री-पुरुष तेथील परिस्थितीला कंटाळले होते. जरा सुरेख नवें घर मिळावें म्हणून त्यांची धडपड सुरू झाली; नवें घर शोधावयाला ते बाहेर

पडले. गलबतांत बसून ते भूमध्यसमुद्रांतून पश्चिमेकडे निघाले. आफ्रिकेंतल्या अगदीं उत्तरेच्या एका लहान प्रदेशावर ते उतरले. तो टापू सुपीक होता. फोनिशियन तेथें वसाहत करूं लागले. त्यांनीं तेथल्या मूळच्या रहिवाशांची कत्तल केली. हे मानवी बळी देऊन त्यांनीं आपल्या देवाची प्रार्थना केली व त्याचे आभार मानले. समुद्राभिमुख अशी नवी वसाहत उभी राहिली व हळूहळू वाढूं लागली. लवकरच तेथें भव्य व भरभराटलेलें कार्थेज नगर उभें राहिलें.

कार्थेजियननांनीं फोनिशियनांपासून दोन गोष्टी घेतल्या : व्यापारातील कौशल्य व नरमेधांवरील विश्वास. आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर तशींच फ्रान्सच्या दक्षिण भागांत व स्पेनमध्येंहि त्यांनीं किती तरी व्यापारी ठाणीं बसविलीं. भूमध्यसमुद्राच्या अर्ध्या भागावर त्यांचें प्रभुत्व होतें व उरलेल्या अर्ध्या भागावरहि प्रभुत्व प्रस्थापित करण्यासाठीं ते आपले अधाशी गिधाडी डोळे फिरवूं लागले. यज्ञप्रिय मोलोक्को देवाची सदिच्छा प्राप्त व्हावी, त्याची कृपादृष्टि असावी व त्यामुळें व्यापारांत व लष्करी साहसांत आपणांस यश यावें म्हणून ते पुनः पुनः नरमेध करून त्याला मानवी मांसाची मेजवानी देत, लांच देत. कांहीं असो, कांही होवो, मोलोक्कोला त्याचा पोटभर वांटा नेहमीं मिळे. कार्थेजियन लढाईत विजय मिळवून परतले तर युद्धकैद्यांतल्या अत्यंत सुंदर कैद्याचा नैवेद्य ते भीषण मोलोक्को देवाला अर्पण करीत व पराभूत होऊन परत आले तर आपल्यांतल्याच मोठमोठया घराण्यांतील मुलेंबाळें होळींत फेंकीत. जय, पराजय कांहींहि झालें तरी मोलोक्को देवाची चैनच होती.

राज्यासाठीं आपल्या मुलांबाळांचे बळी देण्याची पद्धत आजतागायत सर्वत्र सुरूच आहे. कार्थेजियन जरी आपल्या मुलांबाळांना बळी देत तरी एकंदरींत ते सुसंकृतच होते. त्यांची संस्कृति उच्च दर्जाची होती व म्हणून ज्या ज्या देशांशीं ते व्यापार करीत त्या सर्व देशांकडे ते तुच्छतेनें बघत. विशेषतः रोमन लोकांच्या रानवट चालीरीती पाहून तर त्यांना गंमतच वाटे. हे आडदांड व रांगडे रोमन इटलीच्या पश्चिम किनाऱ्यावर भूमध्यसमुद्राच्या पलीकडे राहत. कार्थेजमध्येंहि येऊन कांहीं रोमनांनीं दुकानें वगैरे घातलीं. ते रस्त्यामध्येंच दुकानें मांडून बसत. त्यांची वागण्याची पद्धत खेडवळ होती व त्यांचीं शरीरें बुटकीं होतीं. पण त्यांचा रुबाब मात्र मोठा होता. त्यांची ती शिष्टपणानें वागण्याची पद्धत व

सुसंस्कृत भाषा पाहिल्यावर दोहोंतील विरोध चांगलाच डोळयांत भरे. कार्थेज-मध्यें रोमची पुढीलप्रमाणें टिंगल करण्यांत येत असे : सबंध रोमन शहरांत चांदीचें ताट एकच आहे व कोणा सीनेटरला कोणास मेजवानी द्यावयाची असली म्हणजे त्याला तें ताट उसनें आणावें लागतें !

— २ —

पण रोमन लोकांत सभ्यता, संस्कृति किंवा श्रीमंती नसली तरी ते महत्त्वाकांक्षी लढवय्ये होते. ज्या वेळीं आर्य लोक उत्तरेकडून आल्प्स पर्वत ओलांडून खालीं आले त्या वेळेस त्यांच्यापैकीं येथें राहिलेल्या आर्य लोकांचे वंशज ते हे इटालियन. हे इटालियन लोक जेव्हां त्या पायाच्या आकाराच्या भूभागांत गेले तेव्हां त्यांना तेथें आधींच येऊन राहिलेल्या दोन जाती आढळल्या. रानटी आयबेरियन व सुसंस्कृत युट्रस्कन तेथें होते. इटालियनांनीं आयबेरियनांचा निःपात केला. युट्रस्कन लोकांपासून ते रस्ते बांधणें, शिल्पकाम, वैद्यकी, औषधें, ज्योतिषशास्त्र, इ० नाना गोष्टी शिकले व मग त्यांनीं आयबेरियनांप्रमाणें त्यांचाहि निःपात केला, त्यांचेंहि उच्चाटन केलें.

हे इटालियन सारे एकजुटीनें लढत नव्हते. त्यांचे निरनिराळे संघ होते. ते एकमेकांपासून पृथक् राहून सर्वत्र लूटमार करीत व सर्व देशाला सळो कीं पळो करून सोडीत. त्यांच्या जथ्यांपैकीं एक जथा तर फारच रानवट होता. पळून गेलेले गुलाम, अतिशूद्र लोक व ठिकठिकाणचे परित्यक्त व बहिष्कृत लोक अशांचा तो जथा होता. त्यांनीं टायबर नदीच्या मुखाजवळचा डोंगराळ प्रदेश जिंकून घेतला, त्याची तटबंदी केली व जे जे गुलाम पळून येत, चोर-दरोडेखोर न्याय चुकविण्यासाठीं आधार शोधीत जात, त्या सर्वांना तेथें आश्रय देण्यास सुरुवात केली. अशा रीतीनें रोम शहर स्थापलें गेलें.

प्रथम त्यांच्या या वसाहतींत बायका नव्हत्या. पण ज्या ज्या गोष्टीची जरुरी भासेल ती ती गोष्ट मिळवून घ्यावयाचीच असा रोमन लोकांचा बाणा होता. जवळच्या सबाइन लोकांवर ते तुटून पडले व त्यांच्या बायकांपैकीं अत्यंत सुंदर व धट्टयाकट्टया बायकांना घेऊन गेले. त्या बायकाहि जावयाला फारशा नाखुष होत्या असें नाहीं. विजयी रोमनांच्या बायका होण्यास त्या

तयारच होत्या. या आपल्या नव्या बायकांच्या मदतीनें त्यांनीं सबाइन लोकांशीं मैत्री केली व नंतर सारें इटालियन द्वीपकल्प पादाक्रांत करण्यासाठीं ते निघाले.

त्यांची प्रगति फार झपाट्यानें झाली नाहीं; पण जेथें ते पाय रोंवीत तेथें ते तो मक्कम करीत. त्यांचें लष्करी यंत्र हळूहळू पण निश्चितपणें शत्रूंस चिरडून टाकी व शरण यावयास लावी. रोम शहराभोंवतालची शंभर मैल घेराची जागा जिंकून घ्यावयास त्यांना तीनशें वर्षें लागलीं. पण एकदां तो प्रदेश जिंकून इटली ताब्यांत घेतल्यावर इटलींत कोणीहि त्यांच्याविरुद्ध डोकें वर काढूं शकला नाहीं. शस्त्रांनीं लढून ते जो जो नवीन प्रदेश मिळवीत, तेथें तेथें ते लगेच रोमन वसाहत स्थापीत. अशा रीतीनें रोमला अनुकूल अशा लोकांचे संबंध सर्वत्र पसरून सर्व इटली देश त्यांनीं आपल्या ताब्यांत ठेवला.

पण या बाहेरच्या विजयी मुलुखगिरीस घरच्या भांडणांमुळें मधूनमधून अडथळा येई. रोमन लोकांसारखे आपसांत भांडणारे लोक जगाच्या इतिहासांत दुसरे क्वचितच दिसून येतील. त्यांनीं प्रथम युट्रस्कन लोकांतील राजांचें शासन मान्य केलें; पण हळूहळू त्यांना या राजांचा वीट आला व त्यांनीं निराळी शासनपद्धति सुरू केली. दरसाल दोन पालनकर्ते निवडले जात. तसेंच प्रतिष्ठित नागरिकांचें एक पार्लमेंट असे. हे दोन पालनकर्ते या पार्लमेंट-मधील प्रतिनिधींच्या सल्ल्यानें राज्यकारभार चालवीत. या प्रतिष्ठित प्रति-निधींना पॅट्रिशियन म्हणत. ज्या गुलामांनीं व दरोडेखोरांनीं रोम स्थापिलें त्यांच्या वंशजांना पॅट्रिशियन किंवा वरच्या वर्गाचे लोक म्हणण्यांत येई. हे इतर लोकांचे जणूं मायबापच ! जे गरीब व दरिद्री लोक असत त्यांना प्लीबि-यन म्हणण्यांत येत असे. वरिष्ठ वर्गाच्या अहंमन्यतेमुळें व दुष्टतेमुळें हे सामान्य लोक शेवटीं बंड करून उठले. त्यांनीं सार्वत्रिक संप पुकारला. ते जवळच्या एका टेकडीवर गेले व तेथें प्रतिस्पर्धी असें दुसरें शहर उभारण्याची त्यांनीं धमकी दिली. रोमच्या दरवाजाजवळच असा एक प्रबळ शत्रु उत्पन्न झाला म्हणून प्रतिष्ठित पॅट्रिशियनांना भीति वाटली. त्यांनीं प्लीबियनांना बोलावून त्यांनाहि राज्यकारभारांत भाग देण्याचें कबूल केलें. तेव्हांपासून हे सामान्य लोकहि आपले प्रतिनिधी पाठवूं लागले. बहुजनसमाजाच्या या प्रतिनिधींना

' ट्रायब्यून्स ' म्हणत. अमुक एक कायदा आपल्या मतदारांच्या हिताविरुद्ध आहे असें वाटलें तर ते तो कायदा नामंजूर करूं शकत.

जरी या तडजोडीमुळें रोमन लोकांचीं आपसांतील भांडणें तात्पुरतीं मिटलीं तरी भांडणांचे व द्वेष-मत्सरांचे वणवे पुनः पुनः पेटतच. असंतुष्ट लोकांचीं दुःखें, अति महत्त्वाकांक्षी लोकांच्या परस्परविरोधी महत्त्वाकांक्षा वगैरेमुळें रोम शहर म्हणजे जणूं खाटिकखानाच बने! पण दरवाजाच्या आंत जरी ते आपसात लढत असले तरी बाहेर मात्र ते रोमची सत्ता वाढवीतच राहिले.

टायबर नदीच्या उत्तरेकडील जाती-जमाती रोमनांच्या ताब्यांत प्रथम आल्या. नंतर दक्षिणेकडील मॅग्ना-ग्रीशियांत वसाहत केलेल्या लोकांस रोमनांच्या पोलादी मुठीचें बक्षीस मिळालें. या वसाहती ग्रीकांनीं वसविल्या होत्या हें मॅग्ना-ग्रीशिया या नांवावरूनच दिसून येत आहे. रोमनांनीं त्यांना शस्त्रास्त्रांनीं जिंकलें तर उलट ग्रीकांनीं त्यांना—आपल्या लष्करी जेत्यांना—स्वतःच्या उच्च संस्कृतीनें जिंकलें. रोमनांनीं ग्रीकांचें संगीत घेतलें, त्यांचें काव्य उचललें, त्यांचें तत्त्वज्ञान, त्यांच्या देवदेवता सारें घेतलें; पण त्याचा त्यांना नीट उपयोग मात्र करून घेतां आला नाहीं. हंसणारे-खेळणारे थोर ग्रीक आदर्श घेऊन त्यांतून त्यांनीं उग्र व भीषण चेहऱ्यांचे व नेहमीं खिन्न आणि रुष्ट असणारे प्रकार बनविले. रोमन लोक जेव्हां ग्रीकांचें अनुकरण करीत, तेव्हां एकादा हत्ती एकाद्या सुंदर नृत्यकुशलाचें अनुकरण करीत आहे असें वाटे.

पण झगड्यावांचून मात्र ग्रीक वसाहती रोमनांना शरण गेल्या नाहींत. ग्रीकांनीं एपिरसचा राजा पिऱ्हस याला मदतीस बोलाविलें. एपिरस देश म्हणजे अलेक्झांडरच्या आईचें माहेर. राजा पिऱ्हस याला आपण दुसरे अलेक्झांडर होणार असें वाटे. आपण रोमन लोकांचा तेव्हांच धुव्वा उडवून देऊं अशी त्याची कल्पना होती. रोमन लोकांची चटणी उडवून पुढें कार्थेजियनांसहि जिंकावें व सारें जग जिंकून घेण्यास अशा रीतीनें आरंभ करावा असे विचार त्याच्या मनांत आले.

पिऱ्हसच्या स्वारीचा धोका समोर असल्यामुळें रोमनांनीं व कार्थेजियनांनीं एक होऊन परस्पर-संरक्षक करार केला. रोम व कार्थेज हीं दोन्ही समोरा-समोरचीं शहरें भूमध्यसमुद्रावरून परस्परांकडे मत्सरानें पाहत असत. त्यांना

एकमेकांचें वैषम्य वाटे. आफ्रिकेच्या खाद्यावर बसलेलें वैभवोन्मत्त कार्थेज शहर साऱ्या जगाचें आह्वान स्वीकारावयास तयार होतें; इटली ताब्यांत घेणारें रोमहि स्वतःच्या महत्त्वाकांक्षांचें क्षितिज वाढवूं लागलें होतें. या दोघांच्या दरम्यान समृद्ध व संपन्न सिसिली बेट होतें. दोघांच्याहि बुभुक्षित जिभांना सिसिली पाहून पाणी सुटत होतें. सिसिलीचा कबजा कोणीं घ्यावयाचा या प्रश्नावर आज ना उद्यां त्यांची जुंपणारच होती. पण पिऱ्हसनें जेव्हां मॅग्ना-ग्रीशियावर स्वारी केली तेव्हां परस्परस्पर्धालु रोमन व कार्थेजियन लोक आपसांतील भांडणें तात्पुरतीं विसरून समान शत्रूशीं लढण्यासाठीं एक होऊन एका झेंड्याखालीं जमले. त्यांनीं आपसांतील मतभेद पुढें मिटवावयाचे असें ठरविलें.

फारशी अडचण न पडतांच रोमला पिऱ्हसवर विजय मिळाला व नंतर रोमनें कार्थेजकडे नजर वळविली.

— ३ —

रोम व कार्थेज यांमधील पहिलें युद्ध तेवीस वर्षें (ख्रि. पू. २६४ ते ख्रि. पू. २४१) टिकलें. 'पहिलें प्यूनिक (फोनेशियन) युद्ध' या नांवानें तें प्रसिद्ध आहे. तें मुख्यतः आरमारी युद्ध होतें. सुरुवातीला कार्थेजियन अधिक हुषार खलाशी ठरले. पण युद्धाच्या हालचाली करण्यांत रोमन लोक फार पटाईत होते. युद्धांतील गोष्टी ते झट्कन् शिकत. प्रथम प्रथम त्यांचे आरमारी पराजय झाले, पण त्या पराजयांतूनच ते विजयाचे पेंचप्रसंग शिकले. आरमारी लढाया कशा जिंकाव्या हें शिकून शेवटीं आरमारी लढायांत त्यांनीं आपल्या गुरूंचा पराजय केला. रोमनांनीं सिसिली जिंकली. तह होऊन एकमेकांच्या वर्चस्वाखालचे प्रदेश नक्की झाले व परस्परांचा अडथळा न होतां दोघांनाहि खुशाल लुटालूट करण्यास भरपूर वाव मिळावा अशी व्यवस्था त्यांनीं करून टाकली.

पहिल्या प्यूनिक युद्धांतील कार्थेजियनांचा पुढारी हमिल्कर बार्का हा होता. रोमनांनीं पराजय केल्यावर पांच वर्षांनंतरची गोष्ट. हमिल्कर आपल्या नऊ वर्षांच्या मुलाला घेऊन एके दिवशीं रात्रीं बालच्या मन्दिरांत गेला व मोलोक्कोच्या मूर्तीपुढें त्यानें त्याला "मी मरेपर्यंत रोमनांचा द्वेष करीन"

अशी शपथ घ्यावयास लावलें. मानवी यज्ञाहुति मिळण्यांत मोलोक्को देवाला फार आनंद वाटत असे.

हॅनिबॉल ही शपथ कधींहि विसरला नाहीं. स्वतःच्या पित्यासमोर, स्वतःच्या देशाच्या देवासमोर केलेल्या प्रतिज्ञेचें विस्मरण होणें कसें शक्य आहे ?

— ४ —

जवळजवळ पंचवीस वर्षें रोमन व कार्थेजियन यांच्यांत शांतता नांदली ; पण ख्रि. पू. २१८ मध्यें दोघांच्याहि सहनशीलतेला जणूं तडेच पडले ! दोघेहि केलेल्या कराराला कागदाच्या कपट्याप्रमाणें मानूं लागले. प्रत्येक जण दुसऱ्याच्या वर्चस्वाखालील प्रदेशावर आक्रमण करण्याची तयारी गुप्तपणें करूं लागला. रोमन लोकांनीं साम्राज्याची उभारणी सुरूच ठेवली होती. कोणता नवीन प्रदेश घेतां येईल, नवीन वसाहती कोठें वसवितां येतील, इकडे त्यांचें सारखें लक्ष असे. त्यांनीं तांब्याच्या खाणींनीं समृद्ध असा सार्डिनिया आपल्या राज्याला जोडला. त्यांची सुसंघटित लुटारूपणाची आंतरराष्ट्रीय गुंडागिरी सारखी सुरूच होती. रोमनांनीं सार्डिनिया घेतांच कार्थेजियनांनीं दक्षिण स्पेन बळकावून त्याचा वचपा काढला. दक्षिण स्पेनमध्यें चांदीच्या खाणी होत्या. कार्थेजियनांची ही घडाडी व त्यांचें हें साहस पाहून रोमन लोक चकित झाले ! कार्थेजियनांना धडा शिकविला पाहिजे असें त्यांनीं ठरविलें.

पण जर्मन ज्याप्रमाणें १९१४ सालीं शत्रूला तोडीस तोड होते येवढेंच नव्हे पण कांकणभर सरसच होते तद्वत्च कार्थेजियनहि होते. रोमन सैन्य गलबतांत बसून निघणार तोंच हॅनिबॉलच्या नेतृत्वाखालीं कार्थेजियन फौजा आल्प्स पर्वत ओलांडून उत्तर इटालीमधून प्रचंड लोंढ्याप्रमाणें रोमवर चालून येत आहेत अशी बातमी आली. रोमन सीनेटरांनीं ती बातमी शक्य तितकी गुप्त ठेवून हॅनिबॉलशीं मुकाबला करण्यासाठीं फौजा पाठविल्या. हें दुसरें प्यूनिक युद्ध. रोमनांनीं हें युद्ध विजयाच्या आक्रमक इच्छेनें सुरू केलें होतें. त्यांनीं चढाईला सुरुवात केली खरी ; पण चढाई तर दूरच राहिली आणि त्यांच्यावरच उलट मातृभूमीच्या रक्षणार्थ बचावाची पवित्र लढाई करण्याची वेळ आली. ' रोमन रिपब्लिकची सत्ता जगभर पसरवा, रोमन सत्तेचा घोका

नष्ट व्हावा म्हणून प्राणार्पण करण्यास पुढें या,' अशी घोषणा केली गेली रोमन सेना देशभक्तीनें प्रेरित होऊन वेगानें निघाल्या. इटलीच्या उंबरठ्या पाशीं हॅनिबॉलला थांबवावें म्हणून त्यांनीं जोरानें कूच केलें. पण हॅनिबॉलनें त्या सैन्याला ट्रॅसिमेनस सरोवराजवळ कोंडून नष्ट केलें.

रोमन सीनेटर गर्भगळित झाले. सक्तीची सैन्यभरती करून त्यांनीं दुसरें सेना उभारली व कार्थेजियनांचा लोंढा थांबविण्यासाठीं ती पाठविली. रोम पासून थोड्या मैलांवर कॅन्नी येथें उभय सेनांची गांठ पडली व रोमनांच पुरा धुव्वा उडला ! सैन्य व अमलदार मिळून सत्तर हजार रोमन ठार झाले

रोमन लोकांचा इतका मोठा पराभव क्वचितच झाला असेल. रोमव ही प्रचंड आपत्ति होती, हा प्रखर प्रहार होता. हॅनिबॉल आ ना उद्यां रोमवर चालून येणार हें नक्की होतें. विजेच्या गोळ्याप्रमा तो कोणत्याहि क्षणीं कडाडत गडाडत येईल असें पदोपदीं वाटे. पण हॅनिबॉ चाल करून येईना तेव्हां सर्वांस आश्चर्य वाटलें. तो रोम शहराकडे पाठ फिर वून दाक्षिण इटलींत निघून गेला. त्याच्या त्या विचित्र वर्तनाचें कारण त्य वेळीं कोणाच्या ध्यानात आलें नाहीं. पण तें उघड होतें. पराभवामुळें झालेल्य रोमनांच्या नुकसानाइतकेंच विजयी झालेल्या कार्थेजियनांचेंहि नुकसान झाले होतें. त्यांचें पुष्कळसें सैन्य ठार झालें होतें, त्यांची साधनसामग्री संपुष्टा आली होती, शक्ति क्षीण झाली होती. त्यांच्या विजयी आक्रमणाचा वे अविश्रांतपणें सुरू होता. त्यांनीं क्षणभरहि दम घेतला नसल्यामुळें त्यांन विश्रांतीची जरुरी होती. रोमवर हल्ला करण्यासाठीं त्यांना ताजा पुरवठाहि हवा होता. नवीं माणसें, नवीं यंत्रें, नवीं हत्यारें यांची त्यांना गरज होती म्हणून कार्थेजहून नवीन सैन्याचा व नवीन साधनसामग्रीचा पुरवठा येईपर्यंत वाट पाहण्याचें हॅनिबॉलनें ठरविलें. तोंपर्यंत इटलीच्या प्रांतांतून कार्थेजिय नांचा प्रचार करीत तो हिंडणार होता. त्यानें प्रचाराची स्वारी सुरु केली होती.

पण रोमनांनीं नवेच डावपेच सुरू केल्यामुळें हॅनिबॉलच्या अडचणी वाढतच गेल्या. क्विंटस फेबियस मॅक्झिमस हा रोमन सैन्याचा सेनापति होता. त्याला त्याच्या देशबांधवांनीं "वेळ घेणारा—दिरंगाई करणारा" ( कॅक्टेटर—डिलेअर ) अशी पदवी दिली होती. तो कधींहि त्वरित निर्णय

घेत नसे. निर्णय घेण्याचें काम तो नेहमीं पुढें ढकली. ज्या लढाया आज खेळावयाला हव्या त्या उद्यांवर ढकलणेंच अधिक बरें असतें अशी त्याची ठाम समजूत होती. क्विंटस फेबियस हॅनिबॉलशीं लढाई देण्याची सारखी टाळाटाळ करीत होता. त्यामुळें लवकर सोक्षमोक्ष होईना. कार्थेजियन कंटाळूं लागले. दिरंगाई व कालापव्यय यामुळें त्यांचें नीतिधैर्य गळाठलें—खचलें. लढून पराजय होता तरी पत्करता, पण ही न लढण्याची लढाई नको असें त्यांना होऊन गेलें. ते शत्रूचा पाठलाग करूं पाहत होते. पण शत्रु होता कोठें ? ते छायामय शत्रूचा पाठलाग करीत होते. शत्रु सारखा झुकांड्या देत होता. तो जवळ दिसे, पण क्षणांत दूर जाई. जिवंत शत्रूला कसें जिंकावें हें कार्थेजियन जाणत होते. पण पोकळ हवेवर कसा विजय मिळवावा, छायामय शत्रूला कसें पराभूत करावें हें त्यांना समजेना. रोमन शस्त्रास्त्रें जेथें निस्तेज व हतप्रभ ठरलीं, पराभूत झालीं, तेथेंच क्विंटस फेबियसचा हा निःशस्त्र प्रतिकार प्रभावी व विजयी होत होता.

हॅनिबॉल कार्थेजहून येणाऱ्या सैन्याची व वाहतुकीची वाट पाहत होता. आपण लवकरच मदतीस येतों असा त्याचा भाऊ हस्द्रुबॉल याचा निरोप आला. नीट सुसज्ज असें प्रचंड सैन्यच नव्हे तर रोमला वेढा घालण्यासाठीं जरूर तीं यंत्रेंहि घेऊन हस्द्रुबॉल येणार होता.

हस्द्रुबॉल विजयी होत होत उत्तरेकडून आल्प्सच्या मार्गानें येत होता. त्यानें स्पेनमधील रोमन शिबंदीचा फन्ना उडविला होता व तो आतां इटलींत येणार होता. ही विजयवार्ता कानीं पडतांच हॅनिबॉल आनंदला व आपली आणि हस्द्रुबॉलची गांठ कोठें पडावी हें त्यानें ठरविलें. दोघांची गांठ पडल्यावर दोघेहि टायबर नदीच्या तीरावरील रोम शहरावर चालून जाणार होते.

हॅनिबॉल हस्द्रुबॉलची वाट पाहत असतां हस्द्रुबॉलऐवजीं रोमन लोकांनींच त्याला एक अभिनंदनपर भेट पाठविली. हॅनिबॉल ती उघडून पाहूं लागला तों आंत त्याला काय आढळलें ? त्याच्या भावाचें मुंडकें ! रोमन लोकांनीं हस्द्रुबॉलच्या सैन्यावर अचानक हल्ला करून त्याला ठार केलें होतें.

— ५ —

भावाच्या मरणामुळें हॅनिबॉलच्या आशा धुळीस मिळाल्या ; त्याचे मनोरथ ढासळले. इटलींत यापुढें एक क्षणहि राहणें उपयोगी नव्हतें ; नव्हे, तें

मूर्खपणाचेंच ठरलें असतें. हस्द्रुबॉलवर मिळालेल्या विजयामुळें रोमनांनींहि चढाई सुरू करून भूमध्यसमुद्रांतून एक सैन्य खुद्द कार्थेजवर पाठविलें. कार्थेज संकटांत पडलें. हॅनिबॉलला स्वतःच्या नगरीच्या रक्षणार्थ धांवपळ करीत मागें फिरावें लागलें. किती तरी वर्षांनीं तो स्वदेशांत परत आला होता. तो भरतारुण्यांत इटलींत गेला होता; त्या वेळीं त्याच्या नसांनसांत रोमनांचा द्वेष भरला असून त्याला तेव्हां विजयाबाबत खात्री होती. पण आतां त्याच्या डोळ्यांवरची झांपड उडाली होती; तो हताश होऊन वृद्धावस्थेंत कार्थेजला परतला होता. त्याच्या मनांतील द्वेषबीजाचेंच आतां निराशेच्या हलाहलांत रूपान्तर झालें होतें व तें त्याला सारखें जाळीत होतें. त्याच्या देवांनीं त्याची वंचना केली होती. आपला नक्की पराजय होणार हें जाणून तो लढत होता — गमावलेल्या गोष्टीसाठीं लढत होता. तरीहि तो डगमगला नाहीं. सैन्याचे अवशिष्ट जीर्णशीर्ण भाग घेऊन तो उभा राहिला. खि. पू. २०२ मध्यें झामा येथें रोमनांची व त्याच्या सैन्याची गांठ पडली. कार्थेजियनांचा पुरा मोडा झाला. हॅनिबॉलनें तहाचीं बोलणीं सुरू केलीं.

हॅनिबॉल कार्थेजमध्यें कांहीं दिवस सार्वजनिक खात्यांचा मंत्री म्हणून काम करीत होता. पण आपल्या अमर द्वेषाच्या शमनार्थ रोमवर पुन्हां जंगी स्वारी करण्याची तयारी तो गुप्तपणें करीत असल्याची कुणकूण कानीं आल्यामुळें रोमनांनीं साशंक होऊन कार्थेजकडे हॅनिबॉलला आपल्या ताब्यांत देण्याची मागणी केली. आपल्या भावाचा क्रूरपणें करण्यांत आलेला वध डोळ्यांसमोर असल्यामुळें हॅनिबॉल आश्रयार्थ आशियामायनरमध्यें अॅन्टि-ओकसच्या दरबारीं पळून गेला.

पण रोमन तेथेंहि त्याच्या पाठोपाठ आले. तो एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं अशी सारखी धांवपळ करीत होता व शत्रूहि सारखे त्याचा पाठलाग करीत होते. शिकारी कुत्रे पाठीस लागावे त्याप्रमाणें रोमन त्याचा पिच्छा सोडीनात. वन्य पशूंची शिकार करणें हा तर रोमनांचा आवडता खेळ होताच; पण पराभूत व भयभीत शत्रूची शिकार करणें हा त्यांचा त्याहूनहि आवडता खेळ होता. शेवटीं काळ्या समुद्राच्या तीरीं बिथिनिया येथें तो पकडला गेला. निसटून जाणें अशक्य असें वाटलें तेव्हां त्यानें आत्महत्या

केली. ‘ रोमनांची चिंता सरावी, त्यांना हायसें वाटावें म्हणून मी स्वतःच स्वतःला मारून घेतों ’ असें तो उपहासानें म्हणाला.

म्हाताऱ्या व अगतिक हॅनिबॉलचा सूडबुद्धीनें असा सारखा पाठलाग करणें हें खरोखर गुन्हेगारीचें कृत्य होतें. पण पुढें सर्व कार्थेज शहराचा जो जाणूनबुजून खून करण्यांत यावयाचा होता त्या नीचतम व अति भयानक गुन्ह्याची ही केवळ नांदी होती; त्या घोरतम पापाची ही केवळ प्रस्तावना होती.

कार्थेज शहराचा बळी कसा घेण्यांत आला ती कथा पुढील प्रकरणांत सांगूं.

## प्रकरण ४ थें

# जगांतील कपटपटूंचा शिरोमणि कॅटो

— १ —

मार्केस पोर्सियस कॅटो हा रोममध्यें सार्वजनिक नीतीचें नियंत्रण करणारा मंत्री होता. कार्थेजचें वैभव त्याच्या हृदयांत शल्याप्रमाणें सलत असे. तें त्याला पाहवत नसे. जेव्हां जेव्हां कॅटो सीनेटमध्यें भाषण करी तेव्हां तेव्हां विषय कोणताहि असो त्याचा समारोप करतांना तो पुढील शब्द उच्चारल्यावांचून राहत नसे—“सभ्य गृहस्थ हो, म्हणून माझें निक्षून सांगणें आहे कीं, कार्थेजचा विध्वंस केलाच पाहिजे.”

विनवुड रीड यानें कॅटोचें पुढीलप्रमाणें उत्कृष्ट वर्णन केलें आहे: “ कॅटो हा एक अवाढव्य माणूस होता, त्याचे डोळे मांजरासारखे हिरवे-करडे होते, केस कोल्ह्याच्या केसासारखे होते, दांत इतके मोठे होते कीं, ते जणूं हत्तीचे सुळेच वाटत. त्याचा चेहरा अति कुरूप व भीषण होता. त्याचें तोंड पाहावें असें कोणासहि वाटत नसे. त्याच्यावर जनतेनें शेंकडों काव्यचरण रचले होते. त्यांत त्याची भीषण कुरूपता वर्णिलेली असे. एका काव्यचरणांत म्हटलें होतें कीं, यमाची नरकपुरीहि कॅटोला आंत घ्यावयाला धजत नसल्यामुळें त्याला तेथील वैतरणीच्या तीरावरच भटकत फिरत राहावें लागलें.”

दुसऱ्याच्या सुखांत बिब्या घालण्यांत त्याला परम सुख वाटे. कांहीं रोमन लोक कंटाळले होते. जरा विसांवा मिळावा, ग्रीक जीवनांतील सौंदर्योपासनेचा थोडा आस्वाद घ्यावा, असें त्यांना वाटत होतें. पण कॅटो त्याला तयार नव्हता. ग्रीक तत्त्वज्ञान, सौंदर्योपासना व कलापूजा यांचा तो' पक्का द्वेष्टा होता. त्यानें ग्रीक तत्त्वज्ञान्यांना हद्दपार केलें, ग्रीक बुकें आक्षिप्त ठरविलीं व प्रतिष्ठित रोमनांनीं पोरकट ग्रीक पद्धतींचा अवलंब करूं नये असें जाहीर केलें. करमणुकीचीं ग्रीक साधनें क्षुद्र व अश्लील आहेत असें त्यानें प्रतिपादिलें. प्रत्येकाचें—प्रत्येक रोमनाचें—जीवन म्हणजे जणूं मरणयात्रा, त्यात ना आनंद ना करमणूक, ना उत्साह, ना कला, असें त्यानें करून टाकलें. जन्मल्या-पासून मरेपर्यंत कंटाळवाणी व दीर्घ अशी श्मशानयात्रा म्हणजे जीवन असें त्यानें केलें.

सर्व रोमनांना स्पार्टन शिस्त शिकवावी असें त्याचें मत होतें. स्पार्टन क्रूरता व निष्ठुरता रोमनांच्या अंगांत याव्या, रोमन राष्ट्र स्पार्टन राष्ट्राप्रमाणें व्हावें, सर्व रोम म्हणजे जणूं एक लष्करी छावणी असें व्हावें असें त्याला वाटत होतें. स्पार्टन लोकांचे गुण-अवगुण दोन्ही त्याच्या स्वतःच्या ठायीं पराकाष्ठेनें होते. तो पुरा पुरा शिपाईवृत्तीचा होता. त्याच्या नसांनसांत शिपाईगिरी भरलेली होती. त्याला युद्धाविषयीं मनोरम भ्रम नव्हते. युद्ध म्हणजे गंमत नसून मरण-मारण आहे हें तो जाणून होता. युद्धांत धीरोदात्तता वगैरे गुण प्रकट करावे, असलें काव्य त्याच्याजवळ नव्हतें. शत्रूचे लोक व त्यांचीं बायकामुलें यांस जितक्या लवकर व जितक्या अधिक संख्येनें मारतां येईल तितकें चांगलें असें त्याचें मत होतें. कार्थेजियनांविरुद्ध स्पेनमध्यें जी रोमन लढाई झाली तींत आपण रोज एक शहर धुळीस मिळवीत होतों अशी फुशारकी तो मारीत असे.

तो इतक्या साधेपणानें वागे कीं, तो कंजूष आहे असें लोकांस वाटे. आपल्या शेतांतील एका लहान झोंपडींत तो राही व वाकिली करण्यासाठीं रोज घोड्यावर बसून तो जवळच्या शहरांत जाई व तिसरे प्रहरीं घरीं परत येई. नंतर तो कमरेपर्यंत उघडा होऊन घामाघूम होईपर्यंत शेतांतील मजुरां-बरोबर काम करी व त्यांच्यासारखेंच साधें अन्न—कांदाभाकर—खाई व त्यांचेंच

साधें पेय—द्राक्षासव—पिई. रात्रीं तो आपलें अन्न स्वतःच शिजवी. तो ओटच्या पिठाची लापशी करी व त्याची बायको भाकरी भाजून देई.

स्वतः अविश्रांत काम करणारा असल्यामुळें आपल्या गुलामांनींहि मरेपर्यंत काम करावें अशी त्याची अपेक्षा असे. 'गुलाम झोंपलेला नसेल तेव्हां काम करीतच असला पाहिजे' असें त्याचें एक वचन होतें.

घरीं कधीं मेजवानी वगैरे असली व त्या वेळेस त्याच्या गुलामाच्या हातून बारीकशीहि चूक झाली तरी तो स्वतः गांठाळ वादीच्या चाबकानें त्यांस फटके मारी. आपल्या नोकरांना शिस्त कशी लावावी हेंच जणूं तो आलेल्या पाहुण्यांस शिकवी. आपल्या म्हाताऱ्या झालेल्या गुलामांनाहि तो शांततेनें मरूं देत नसे; त्यांना तो कमी किंमतीस विकून टाकी. घाण झालेला वाईट माल काढून टाकावा तसा हा सजीव माल तो विक्रीस काढी. कॅटोचें चरित्र लिहितांना प्ल्युटार्क म्हणतो, "माझी सेवाचाकरी करून म्हातारा झालेला बैलहि माझ्यानें विकवणार नाहीं, वृद्ध गुलामांची गोष्ट तर दूरच राहो!"

कॅटो उत्कृष्ट वक्ता होता. तो संताप्रमाणें बोले पण डुकराप्रमाणें कुकर्में करी. 'वाणी संताची व करणी कसाबाची' असा तो होता. शेजाऱ्याच्या अनीतीवर तो कोरडे उडवी. तरी पण तो स्वतःच्या कालांतला सर्वांत मोठा पापशिरोमणि व शीलभ्रष्ट मनुष्य होता. पिळणूक करूं नये असा उपदेश तो लोकांस करी, पण स्वतः मात्र अत्यंत पिळणूक करी. आपल्या मुलीदेखत पत्नीचें चुंबन घेतल्याबद्दल त्यानें एका सीनेटरवर नीतिउल्लंघनाचा खटला भरला व कठोर भाषण केलें. पण दुसऱ्यांच्या बायकांचे पती जवळ नसताना तो त्यांचे मुके खुशाल घेई! सार्वजनिक भाषणांत तो सदैव म्हणे, "दुबळ्या म्हातारपणाला सद्गुणाच्या काठीचा आधार सदैव हवा." तो एकदां म्हणाला, "वार्धक्य आधींच विकृत व विद्रूप असतें. ती कुरूपता व विकृतता आणखी वाढवूं नका." पण एकदां आपल्या सुनेला भेटावयास गेल्या वेळीं त्यानें तिच्या दासीलाच भ्रष्ट केलें! आणि त्या वेळीं तो ऐशीं वर्षांचा थेरडा होता!

जे दुर्गुण त्याच्या रोमरोमांत भिनलेले होते, ज्या दुर्गुणाचा तो मूर्तिमंत पुतळा होता, त्याच दुर्गुणांसाठीं तो दुसऱ्यांवर माल सारखे कोरडे उडवीत असे! दुसऱ्यांचे दोष पाहण्यांत तो अग्रेसर होता. स्वतःच्या वाईट वासना

तो खुशाल तृप्त करून घेई; परंतु दुसऱ्यांच्या तसल्याच वासना मात्र दाबून ठेवून तो स्वतःच्या पापाचें जणूं परिमार्जनच करी!! दुसऱ्यांच्या वासना दडपून टाकणें हीच जणूं त्याला स्वतःला शिक्षा!!!

स्वतःच्या देशावर त्याचें फार प्रेम असे. पण आपलें आपल्या देशावर जितकें प्रेम आहे त्यापेक्षां अधिक प्रेम आपल्या देशानें आपणावर करावें असें त्याला वाटे. तो देशाला जणूं देवच मानी; पण देशबांधवांनींहि आपणास देव मानावें असें त्याला वाटत असे. 'कॅटो रोमचा जितका ऋणी आहे त्यापेक्षां रोम कॅटोचें अधिक ऋणी आहे' असें तो म्हणे. आपणास इटॅलियन राष्ट्राचा भाग्यविधाता बनविण्यांत परमेश्वरानें फार उत्कृष्ट गोष्ट केली असें त्याला वाटे. 'माझ्या हातांत इटलीचें भवितव्य सोंपविण्यांत परमेश्वरानें फार चांगली गोष्ट केली' असें तो म्हणे. आपण म्हणजे परमेश्वराच्या हातची अपूर्व कृति असें त्याला वाटे.

— २ —

रोमच्या नांवानें स्वतःची महत्त्वाकांक्षा पुढें ढकलावी, आपले स्वार्थ साधावे, अशी त्याची इच्छा होती. नांव रोमचें, स्वार्थ आपला! रोमचें नुकसान झालें तरी हरकत नाहीं, पण आपला स्वार्थ साधलाच पाहिजे असें त्याचें मत होतें. पहिल्या प्रथम आपला स्वार्थ, मग रोमचा! आधीं आपली पूजा, नंतर रोमची! पहिली महत्त्वाकांक्षा स्वतःच्या मोठेपणाची, दुसरी रोमच्या वैभवाची! रोमला बाजूस सारून तो आपला मोठेपणा साधी व जगाची होळी करून रोमला मोठें करूं पाही. आपल्याच देशबांधवांना लुटून, सावकारी करून तो स्वतः संपन्न झाला व 'इतरांना लुटून तुम्ही श्रीमंत व्हा' असें त्याचें आपल्या देशबांधवांना सांगणें असे. 'कार्थेज लुटा, धुळीस मिळवा व गबर व्हा' असें तो बिनदिक्कत उपदेशी व त्यासाठीं वक्तृत्वांतील सर्व प्रकार व साऱ्या हिकमती तो योजी. उपरोध, आरोप, प्रार्थना, अश्रू, गडगडाट—सारे प्रकार, साऱ्या भावना, तो उपयोगांत आणी. रोमन लोकांच्या स्वार्थी भावना जागृत करण्यासाठीं, त्या जागृत होऊन ते पक्के दरोडेखोर बनावे व त्यांच्या गुन्हेगारी वृत्तीहि जागृत व्हाव्या म्हणून तो अपूर्व भाषणें करी. तो पराकाष्ठेचा नाटकी होता. त्याचे हावभाव, त्याचा आवेश, त्याचें सारें कांहीं बेमालूम असे. एकदां आपलें सीनेटमधलें भाषण त्यानें संपविलें न संपविलें तोंच त्याच्या

झग्याच्या टोंकाला बांधलेले अंजीर गांठ सुटून एकदम भराभर खालीं पडले. कांहीं सीनेटरांनीं ते अंजीर उचलले व ' किती सुंदर ! केवढाले तरी मोठे हे ! ' अशी त्यांची प्रशंसा केली. लगेच कॅटो जणूं सहज म्हणाला, " असे अंजीर कार्थेजच्या आसपास होतात. गलबतांतून रोमपासून तेथवर जाण्याला फक्त तीन दिवस लागतात. "

सीनेटमधलीं त्याचीं भाषणें म्हणजे द्वेष-मत्सरांचीं जणूं उपनिषदेंच असत. तीं घटिंगणांसमोर गाईलेलीं जणूं द्वेषाचीं गीतेंच असत. त्याचे शब्द ऐकण्यास श्रोते जणूं उत्सुक असत. त्याचे रानवट बेत हाणून पाडण्यासाठीं मूठभर प्रामाणिक लोक प्रयत्न करीत, पण अशा मूठभरांच्या विरोधाला कोणी भीक घालीत नसत, तिकडे कोणी लक्षहि देत नसत. वृद्ध व पोक्त सीनेटरहि युद्धासाठीं उत्सुक होते. कारण, लढणार व मरणार तरुण व विजयध्वज मिरवून वैभवाचे वारसदार होणार मात्र वृद्ध सीनेटर अशी वांटणी निश्चित होती. पैसेवाले, पेढीवाले हेहि कॅटोच्याच बाजूचे होते. कारण, त्यांना कार्थेजियनांच्या स्पर्धेची दहशत वाटे. कार्थेजची सत्ता, संपत्ति व वैभव हीं वाढलीं तर रोमचें कसें होणार, आपल्या व्यापाराचें काय होणार अशी साधार भीति त्यांना सदैव भेडसावीत असे. कॅटोप्रमाणें त्यांनाहि वाटे कीं, रोमची भरभराट व्हावयास पाहिजे असेल तर कार्थेजचा नाश झालाच पाहिजे.

कार्थेजच्या स्वारीची सर्व सिद्धता झाली. पण स्वारी करण्याला कारण मिळेना, योग्य सबब सांपडेना. पण कॅटोचे बेत अशानें थोडेच अडणार होते ! असल्या क्षुद्र गोष्टी त्याच्या मनोरथांच्या आड येणें शक्यच नव्हतें. निमित्त सांपडत नसेल तर निर्माण केलें पाहिजे असें तो म्हणे. युद्ध करण्यासाठीं एक सबब त्यानें तयार केली. ज्याप्रमाणें त्यानें रोमन जनतेंत युद्धाची इच्छा उत्पन्न केली, त्याचप्रमाणें त्यानें युद्धासाठीं एक कारणहि निर्माण केलें. दुसऱ्या प्यूनिक युद्धाच्या अखेरीस ' रोमशीं मित्रभावानें वागणाऱ्या कोणत्याहि राष्ट्राशीं आम्ही लढाई करणार नाहीं ' असें कार्थेजियनांनीं कबूल केलें होतें. पण त्यांना केलेला करार मोडणेंच भाग पडावें अशी परिस्थिति कॅटोनें उत्पन्न केली. नुमिडियाचा राजा मॅसिनिस्सा याला त्यानें कार्थेजियनांच्या प्रदेशावर स्वारी करण्याचा हुकूम दिला. कार्थेजियनांचीं शेतेंभातें जाळा, गुरेंढोरें पळवा अशी आज्ञा त्यानें केली. मॅसिनिस्सानें

आज्ञेनुसार केलें. शक्य तोंवर कार्थेजियनांनीं कळ सोसली; पण शेवटीं बचावासाठीं म्हणून त्यांनीं परत प्रहार केला—नव्हे, तसें करणें त्यांना भागच पडलें.

योजिलेलें कारस्थान सिद्धीस गेलेलें पाहून रोमन लोकांना मनांतल्या मनांत खूप आनंद झाला. ते म्हणूं लागले, " कार्थेजनें हें काय केलें ? यांनीं असा कसा करार - भंग केला ? आम्ही तर थक्कच झालों या नीच कृत्यामुळें. फसव्ये व अप्रामाणिक आहेत तर एकूण हे ! रिपाब्लिकच्या मित्रावर हल्ला करण्याचें पाप यांनीं कसें केलें ? " सीनेटरांनीं कार्थेजला तत्काळ कळविलें, " तुमची व आमची लढाई सुरू झाली आहे. "

कार्थेजियन जाणत होते कीं, तें युद्ध म्हणजे त्यांना मरणच होतें. त्यांनीं तहासाठीं रोमला वकील पाठविले व कळविलें, " मॅसिनिस्सावर आम्हीं चाल केली खरीच. ही जी दुर्दैवी घटना घडून आली तिजबद्दल कराल ती शिक्षा भोगावयाला आम्ही तयार आहों. मॅसिनिस्सावर हल्ला करणाऱ्यांत जे दोन प्रमुख पुढारी होते, त्यांना त्यांनीं रोमच्या समाधानार्थ व तें तशी मागणी करील हें आधींच ओळखून ठार करून टाकलें. रोमन लोकांची मैत्री परत मिळावी म्हणून कांहींहि करावयास ते तयार होते. ' तुमच्या मैत्रीच्या अटी कृपा करून कळवा ' असें त्यांनीं रोमला परोपरीनें विनविलें.

" ठीक आहे, " सीनेटरांनीं उत्तरीं कळविलें, " ज्याअर्थी तुम्ही नीट वळणावर आलां आहां, त्याअर्थीं तुमचा देश, तुमचे कायदे, तुमचीं कबरस्थानें, तुमची मालमत्ता, तुमची स्वतंत्रता, सारें आम्ही तुम्हांला परत देत आहों. पण तुम्ही आपल्या सीनेटरांचे तीनशें मुलगे आमच्याकडे ओलीस म्हणून पाठवा. तसेंच अतःपर आमच्या वकिलांचें सांगणें सदैव ऐकत जा व ते सांगतील तें तें बिनबोभाट मान्य करीत जा."

ही रानवट व खुनशी मागणीहि कार्थेजियनांनीं कबूल केली. त्यांनीं रोमन वकिलांच्या ताब्यांत तीनशें मुलगे दिले. एका गुलामवाहू जहाजांत गुरांढोरांप्रमाणें कोंबून हे अभागी जीव रोमला पाठविण्यांत आले ! ते तीनशें मुलगे मिळतांच रोमची आणखी नवी मागणी आली : " कार्थेजनें निःशस्त्र झालें पाहिजे, सारीं हत्यारें खालीं ठेवलीं पाहिजेत. "

पुनः एकदा खालीं मान घालून कार्थेजियनांनीं हीहि अट कबूल केली. शस्त्रागारें व दारूचीं कोठारें रिकामीं करण्यांत आलीं. खासगी घरांच्याहि झडत्या झाल्या. बचावाचें प्रत्येक साधन हिरावून घेण्यात आलें. दगड वगैरे फेंकण्याचीं तीन हजार यंत्रें व दोन लाख चिलखतें रोमन लोकांच्या स्वाधीन करण्यांत आलीं. रोमनें जी जी मागणी केली ती ती कार्थेजनें मान्य केली. कार्थेज अगतिक व दुबळें होऊन पडलें होतें. पुनः एकदां कार्थेजचे वकील रोमन वकिलांकडे जाऊन विचारते झाले, "रोमनांना अजून कांहीं पाहिजे आहे का?"

कॉन्सल्सनीं उत्तर दिलें, "आतां आणखी फक्त एकच गोष्ट पाहिजे: कार्थेजचा संपूर्ण नाश!" हे शब्द ऐकून कार्थेजच्या वकिलांना अपार दुःख झालें, सहस्र वेदना झाल्या. पण त्यांनीं सारें दुःख गिळून शांतपणें सांगितलें, "ठीक, आम्हांला शहर सोडून जाण्यास थोडा वेळ द्या. आम्हांला आमच्या घरांदारांतून हांकलून देण्यापूर्वी सामानसुमान बांधावयाला तरी थोडा अवसर द्या कीं!" रोमन कॉन्सल्सनीं औदार्याचा मोठा आव आणून ही विनंति मान्य केली व त्यांना थोडा अवधि दिला.

कांहीं दिवसांनीं कार्थेजच्या दरवाजासमोर रोमन फौजा येऊन दाखल झाल्या. शहरांत शिरून विध्वंसनाचें काम सुरू करावयाला रोमन सैनिक फार अधीर झाले होते. पण त्यांना तेथें जें दिसलें त्यामुळें ते दिङ्मूढ झाले! शहराचे दरवाजे बंद होते व बुरुजाबुरुजाचे ठिकाणीं सशस्त्र थवे उभे होते. कार्थेजियनांनीं आपल्या सर्व गुलामांना मुक्त केलें होतें. शहराच्या रक्षणार्थ सारे स्त्री-पुरुष, सारीं मुलेंबाळें, लहानथोर सर्व जण हत्यारें घडवीत होते. शस्त्रें बनविण्याचें काम रात्रंदिवस अखंड चालू होतें. लोखंड वगैरे धातू मिळाव्या म्हणून मोठमोठ्या इमारती पाडून टाकण्यांत आल्या. संरक्षक यंत्रें बनविण्यासाठीं त्यांचें लांकूड घेण्यांत आलें. त्या यंत्रांना बांधण्यासाठीं दोऱ्या हव्या होत्या म्हणून स्त्रियांनीं आपले लांब केस कापून त्यांच्या दोऱ्या वळून दिल्या! आपल्या शहराचे प्राण ते विकणार होते; पण शत्रूकडून जास्तींत जास्त किंमत वसूल केल्याशिवाय मात्र शहर ताब्यांत द्यावयाचें नाहीं असा निश्चय त्यांनीं केला होता.

शहराचे तट भंगून रोमनांकडे कबजा जावयास तीन वर्षें लागलीं. शहर घेतल्यावर त्यांतील सर्व नागरिकांना ठार करण्याला त्यांना सतरा दिवस लागले. कित्येक लाखांची वस्ती! पण अखेर त्यांतले केवळ मूठभरच शिल्लक राहिले! शेवटीं त्यांनाहि गुलाम करून विकण्यांत आलें. साऱ्या शहरांत एकहि उभी भिंत राहिली नव्हती. शिपायांचें हें विध्वंसनाचें काम संपलें तेव्हां मारलेल्या पांच लाख कार्थेजियनांच्या शरिरांवर सर्वत्र सहा फूट उंचीचा राखेचा ढीग शहरभर पडला होता! रोमच्या लष्करी भव्यतेचें हें केवढें थोर स्मारक!

— ३ —

मिळालेल्या विजयाचा समारंभ करण्यासाठीं रोमन फौजा परत आल्या. पण त्यांचें स्वागत करण्याला समारभाचा तो स्वामी कॅटो तेथें नव्हता. कार्थेजियनांची सबंध जातच्या जात नष्ट करून टाकण्याच्या अत्यंत दुष्ट कुकर्माचा तो मुख्य योजक होता. त्या लाखों अगतिक लोकांच्या करुण किंकाळ्या त्याच्या वृद्ध कानांना मधुर संगीताप्रमाणें वाटल्या असत्या. पण त्याच्या अनंत खटपटींचें ते फळ देवांनीं त्याला पाहूं वा चाखूं दिलें नाहीं. खि. पू. १४९ सालीं तो मरण पावला. कार्थेजचा संपूर्ण निःपात होण्यापूर्वींच तीन वर्षें तो मेला.

### प्रकरण ५ वें

## देव होऊं पाहणारा मनुष्य : सीझर

— १ —

रोमनांनीं कार्थेजची राखरांगोळी करून टाकली! पण असला हा रानवटपणा त्यांच्या हातून चुकून झाला असें समजण्याची मुळींच गरज नाहीं. व्यवस्थित रीतीनें व विचारपूर्वक ठरविलेली अशी ती विध्वंसक योजना होती. आंतरराष्ट्रीय खुनाची व दुसऱ्यांचे देश बळकावण्याची ती उन्मत्त अशी साम्राज्यशाहीची राष्ट्रीय वृत्ति होती. रोमन सेनेचा एक भाग कार्थेजचें भस्म करीत असतां, दुसरा भाग कॉरिंथचा विनाश करण्यांत गुंतला होता, तिसरा पूर्वेकडील देशांत रक्तपात करून साम्राज्यविस्तार करण्यांत दंग होता व उरलेलें सारें सैन्य उत्तरेकडे व पश्चिमेकडे रोमन सत्ता पसरविण्यांत गुंतलें होतें.

अशा रीतीनें चोहों बाजूंस साम्राज्याचा विस्तार होत असतां खुद्द रोम-मध्यें काय चाललें होतें ? राज्यसत्ता बळकावण्यासाठीं तेथें सारखीं भांडणें सुरू होतीं. रोज रोज कटकटी व काटाकाटी, रोज रोज दंगे व बंडें! जवळ-जवळ शंभर वर्षे पराक्रमी पण हडेलहप्प गुंडांनीं रोमवर सत्ता चालविली. मॅरियस, सुल्ला, पाँपे, सीझर, कॅशियस, ॲन्टोनी, ऑगस्टस, अशीं हीं नांवें चकमकतांना आढळतात. प्रत्येक जण जनमतानें श्रेष्ठ स्थानावर चढला. पण केवळ जनमतानें मात्र नव्हे; दंडुके, दगड, खंजीर यांच्या साह्यानें त्यांचीं मतें मिळवून ते सर्वश्रेष्ठ अधिकारी बनले. रोममधील प्रत्येक निवडणूक म्हणजे लढाईच असे. ज्याच्यामागें अधिक गुंड व पुंड, ज्याच्या पाठीमागें अधिक मानकापू व गळेकापू तोच निवडणूक जिंकी. जो तो स्वतःसाठीं, रिपब्लिक-साठीं कोणीहि नाहीं, असेंच त्या दिवशीं दिसे. मॅरियसपासून ऑगस्टसपर्यंत सर्वांच्या वैयक्तिक महत्त्वाकांक्षांमुळें रोम शहर अखंड यादवीनें त्रस्त झालें होतें. सभ्य इतिहासकारांनीं या प्रकारांना यादवी युद्धें हें नांव दिलें असलें तरी खऱ्या अर्थानें ते रानटी खाटिकखान्याचेच प्रकार होते.

अधूनमधून एकादा प्रामाणिक पुरुष जन्माला येई; त्याला स्वतःपेक्षां रोमचें कल्याण अधिक महत्त्वाचें वाटे, स्वतःच्या फायद्यापेक्षां रिपब्लिकची चिंता अधिक असे. पण धंदेवाईक मुत्सद्दी व राजकारणी लोक अशा प्रामाणिक पुरुषाचा केव्हांच चेंदामेंदा करून टाकीत, त्याला केव्हांच उडवून देत! टायबेरियस ग्रॅचसनें जेव्हां गरिबांपासून बळकावलेल्या जमिनींची फेरवांटणी करण्याचा यत्न केला तेव्हां सीनेट-हाउसमध्येंच त्याचा मुडदा पाडला गेला. त्याच्या डोक्यावर सोटे बसले व तो मेला. त्याचा भाऊ गायस ग्रॅचस तसलेच जनहिताचे कायदे करूं लागतांच त्याचीहि तीच गत झाली. प्रामाणिक माणसांना राहण्याला रोम ही सुरक्षित जागा राहिली नव्हती.

दोघांहि ग्रॅची-बंधूंना अशा रीतीनें दूर करण्यांत आलें! त्यानंतर मॅरियस व सुल्ला या दोघांमध्यें रोमच्या नेतृत्वाविषयीं स्पर्धा सुरू झाली. सुल्ला हा मॅरियसच्या सैन्यांत लेफ्टनंट होता; पण आपण आपल्या सेनापतीपेक्षां अधिक पराक्रमी शिपाई व अधिक योग्यतेचे गृहस्थ आहों असें त्याला वाटे. तो बड्या घराण्यांत जन्मलेला पॅट्रिशियन होता; मॅरियस गरीब वर्गातला अर्थात् प्लीबियन होता.

त्यांच्या भांडणाची साद्यंत हकीकत सांगत बसण्यांत फारसा अर्थ नाहीं. त्यांचे परिणाम काय झाले तेवढें पाहिलें म्हणजे झालें. प्रथम मॅरियसच्या हातीं सत्ता असतां त्यानें सुल्लाच्या बऱ्याचें अनुयायांना ठार केलें; पुढें सुल्लाच्या हातीं सत्ता येतांच त्यानें मॅरियसचे पांच हजार मित्र यमसदनास पाठविले. प्रत्येकाला वाटलें, " जितं मया ! " पण रोमला मात्र दोन पराभव सोसावे लागले. त्या दोघांचे आलटून पालटून विजय, पण मधल्यामध्यें रोमचें मात्र मरण ! मॅरियस व सुल्ला यांच्यांतील ही मारामारी पराकोटीला पोंचली असतां रोममध्यें तिच्याकडे लक्ष लावून पाहणारे तिघे तरुण होते. या यादवींत पुढें काय होतें इकडे त्यांचे डोळे सारखे लागलेले होते. रोमच्या नेतृत्वाखालीं लढत असलेले ते दोघे जुने कसलेले वीर पाहून या तिघां तरुणांच्याहि मनांत महत्त्वाकांक्षा जागृत झाली व पुढेंमागें रोम आपल्या हातीं यावें, आपणच रोमचे सर्वसत्ताधीश व्हावें म्हणून ते प्राणांचा जुगार खेळूं लागले.

त्या तीन तरुणांचीं नांवें ऐका : क्रॅशस, पॉंपे, सीझर.

— २ —

सुल्लानें ठार मारलेल्या लोकांच्या लिलांवांत निघालेल्या इस्टेटी विकत घेऊन क्रॅशस अत्यंत श्रीमंत झाला. पॉंपे सुल्लाच्या सैन्यांत दाखल झाला व त्याच्या मरणोत्तर तो त्याच्या सेनेचा अधिपति झाला. त्यानें रोमविरुद्ध पुनः पुनः बंड करून उठणारे स्पेनमधले व आफ्रिकेंतले प्रांत पुनः जिंकून घेतले, तद्वत्च पूर्वेकडीलहि आर्मीनिया, सीरिया, कॅप्पाडोसिया, पॅलेस्टाइन, पॉन्टस, अरेबिया, फोनिशिया, पॅफ्लगोनिया, इत्यादि कितीतरी प्रदेश पादाक्रान्त केले, लुटले, बेचिराख केले ! परत येतांना पॉंपेनें चार कोटी डॉलर संपत्ति लूट म्हणून बरोबर आणली होती.

" पैशाला कधींहि घाण नसते " अशी रोमन लोकांत प्रचलित असलेली एक विशिष्ट म्हण आहे. पैसा कसाहि मिळविला तरी तो पवित्रच ! पैसा कसा मिळविला ही गोष्ट महत्त्वाची नसून किती मिळविला ही गोष्ट महत्त्वाची आहे. रोमन लोक क्रॅशस व पॉंपे यांची पूजा करूं लागले. ' रोमचे सर्वांत थोर दोन सत्पुत्र ' अशी त्यांची ख्याति झाली !

पण त्या काळीं रोम शहरांत दोन मोठ्या माणसांना वाव नसे. क्रॅशस व पॉंपे परस्परांचा द्वेष करीत. शहराची सर्व भक्ति व प्रीति फक्त आपणासच

मिळाव्या यासाठीं ते हातघाईवर आले. त्यांची उघड लढाई होणार असें दिसूं लागलें. पण सीझरनें मध्यस्थी केली व त्यांचें भांडण तात्पुरतें थांबलें. सीझर-च्याहि मनांत स्वार्थी महत्त्वाकांक्षा होत्याच व त्यांच्या पूर्ततेसाठीं क्रॅशसची संपत्ति व पॉंपेचें वजन दोहोंचीहि त्याला जरुरी होती. म्हणून त्या दोघांनीं परस्परांशीं न लढतां एकत्र यावें असें त्यानें सुचविलें. 'जगाला लुटण्यासाठीं आपण तिघे मिळून करार करूं या' असें त्यानें सुचविल्यावरून 'पहिलें त्रिकूट' या नांवानें इतिहासांत प्रसिद्धि पावलेला जगांतील पहिला त्रिमूर्तींचा संघ स्थापन झाला.

या तिघांत सीझर वयानें सर्वांत लहान पण सर्वांत समर्थ व साहसी होता. लहानपणीं त्याला चांचेगिरी करणाऱ्या लुटारूंनीं पळवून नेलें असतां तो मोठमोठ्यानें कविता म्हणून त्या चोरांना त्रास देई व थट्टेनें म्हणे, "कोणी-तरी खंडणी भरून मला सोडवील. पण मुक्त होतांच मी सैन्य घेऊन परत येईन व तुम्हां सर्वांना क्रॉसवर चढवीन." त्यानें हा शब्द पाळला.

तो मागेंपुढें पाहणारा नव्हता, तेजस्वी व साहसी होता. त्याचे देशबांधव त्याच्या कर्तृत्वानें चकित व भयभीत झाले. या वेळीं तो फक्त वीस वर्षांचा होता; पण मुख्य धर्माचार्यांच्या जागेवर त्यानें सक्तीनें स्वतःची निवडणूक करून घेतली, तेव्हां त्याच्या हेतूविषयीं प्रसिद्ध वक्ता सिसरो याला व इतर पुष्कळांना शंका आली. राजसत्ता हातीं घेण्याचा त्याचा विचार असावा असें त्यांना वाटलें. सिसरो लिहितो, "त्याचे केस अत्यंत व्यवस्थित रीतीनें विंचर-लेले असतात. एका बोटानें तो नेहमीं आपले केस नीट करीत असतो. असल्या माणसाच्या डोक्यांत रोमन सरकार उलथवून टाकण्याचा विचार येईल अशी कल्पनाहि मी करूं शकत नसें." पण सीझरच्या मनांतले विचार आपणास नीट वाचतां आले नाहींत असें पुढें सिसरोला आढळून आलें.

सीझर केवळ राजकीय महत्त्वाकांक्षा व राजसत्ता यांचाच नव्हे तर प्रेमा-चाहि आचार्य होता. रोममधील किती तरी तरुणींना त्यानें मोह पाडला होता. आणि ही गोष्ट सर्वांना माहीत होती. त्याला 'प्रत्येक स्त्रीचा नवरा' अशी पदवी मिळाली होती! पण त्यानें स्वतःच्या पत्नीचा मात्र त्याग केला होता. कारण, त्याच्याच एका मित्रानें तिच्याजवळ प्रेमयाचना करण्याचा लाळघोटे-पणा चालविला होता. आपली पत्नी आपल्या मित्राच्या प्रेमयाचनेला बळी

पडली असें समजावयाला त्याला कांहींहि कारण मिळालें नव्हतें, तरीहि त्यानें तिचा त्याग केला. कारण, ' सीझरची पत्नी संशयातीतच असली पाहिजे ' असें तो म्हणे.

कारकीर्दीच्या प्रारंभीं त्याच्याजवळ पैसा नव्हता; पण दुसऱ्यांचे पैसे घेऊन तो खूप उदारपणा दाखवी. एकदां त्याला चाळीसपन्नास लाख रुपये कर्ज झालें. क्रॅशसशीं संधान बांधण्यांत हें कर्ज फेडून टाकण्याला त्यांचे पैसे मिळावे असा सीझरचा हेतु होता.

— ३ —

सीझर, पॉंपे व क्रॅशस यांनीं आपआपल्या वर्चस्वाचीं तीन क्षेत्रें मुक्रर केलीं. एकाद्या खुसखुशीत भाकरीप्रमाणें त्यांनीं जगाचे तीन तुकडे केले व सर्व जग आपसांत विभागून घेतलें. सीझरनें स्पेनचा कबजा घेतला, क्रॅशसला आशियांत पाठविण्यांत आलें, पॉंपे रोममध्येंच राहिला. पुढें लवकरच एका लढाईत क्रॅशस ठार झाला तेव्हां एक ब्याद आपोआपच दूर झाली म्हणून सीझर व पॉंपे यांना आनंद झाला. कारण, आतां रोमवरील प्रभुत्वासाठीं उघडपणें नीट लढतां आलें असतें; तिसरा कोणी मध्यें पडण्याला उरला नव्हता.

पण सीझरसमोर दुसरी एक अधिक मनोवेधक योजना सध्यां होती. अलेक्झांडरप्रमाणें त्यालाहि जग जिंकण्याची महत्त्वाकांक्षा होतीच. आपल्या हयातींत माणसाला जगाचा किती भाग जिंकून घेतां येतो हें पाहण्याचें त्यानें ठरविलें व पॉंपेशीं अधिकच आत्मीयता जोडली. त्यानें आपली जुलिया नामक मुलगी पॉंपेला दिली. आपण दिग्विजयावर असतां पॉंपेनें इकडे कपट-कारस्थानें करून रोमचा कबजा घेऊं नये म्हणून त्यानें ही योजना केली व नवीन अज्ञात प्रदेश जिंकण्यासाठीं तो निघाला. तो स्पेनमधून फ्रान्समध्यें उतरला. फ्रान्सचें तेव्हांचें नांव गॉल होतें. तेथें मोठमोठे विजय व खूप लूट मिळवून तो खाडी ओलांडून ब्रिटनमध्यें गेला. पुष्कळांना ब्रिटन एक काल्पनिक देश वाटत असे. त्याचे शिपाई म्हणाले, " या खाडीपलीकडे देश नसेल; तुम्ही आम्हांला कोठें तरी अंधारांत नेत आहां. तुम्ही आम्हांला पृथ्वीच्या कडेला न्याल व तेथें अथांग खड्डयांत पडून आम्ही गडप होऊं." पण असल्या भ्याड व भोळसट कल्पनांमुळें न गांगरतां त्यांकडे दुर्लक्ष करून तो निघाला व त्याना खराखुरा

देश दिसला. तेथेंहि पुनः नवीन विजय व नवीन लूट मिळेल असें मग सर्वांस वाटलें. पण ब्रिटनवरील ही स्वारी निराशाजनक ठरली. प्ल्युटार्क लिहितो, ' तेथें सीझरनें ज्या अनेक लढाया केल्या त्यांमुळें शत्रूचें जरी पुष्कळ नुकसान झालें तरी सीझरचाहि फारसा फायदा झाला नाहीं. ब्रिटनमधील लोक अत्यंत दरिद्री होते. लुटून नेण्यासारखे त्यांच्याजवळ कांहींहि नव्हतें.

सीझर परत गॉलमध्यें आला. फ्रान्सच त्याच्या लुटारू वृत्तीला व बुद्धीला अधिक योग्य होता. तो दहा वर्षें आसपास लूटमार करीत राहिला. हेल्वेटियन, बेल्जियन, जर्मन, ॲक्विटेनियन वगैरे लोकांना जिंकून त्यानें यथेच्छ लुटलें! तो कुबेर बनला. त्यानें आपलें वैभव व आपली कीर्ति वाढविली. ' सीझरच्या गॅलिक लढाया ' हें पुस्तक बायबलखालोखाल शाळांमध्यें वाचलें जातें ; पण त्यांत सीझरनें केलेल्या लुटालुटींच्या, वाटमाऱ्यांच्या व खुनांच्या रद्दी व रानवट गोष्टींशिवाय दुसरें काय आहे ? असलें भिकार व विषारी वाङ्मय मुलांच्या हातीं पडणें अयोग्य नव्हे काय ? असल्या रानवट प्रचारापासून आपण आपल्या मुलांचें रक्षण केलें पाहिजे. अजूनहि तसें करण्याची वेळ नाहीं का आली ?

प्ल्युटार्कनें एकाच वाक्यांत फ्रान्समधील विजयांचें वर्णन केलें आहे. तो लिहितो, " दहा वर्षांहूनहि कमी काळांत त्यानें आठशें शहरें जिंकलीं व तीनशें लहानलहान राज्यांना शरण यावयास लावलें. या दहा वर्षांत तो ज्या ज्या लोकांशीं लढला त्या सर्वांची संख्या तीस लाख धरली तर त्यांपैकीं दहा लाख त्यानें ठार मारले व आणखी दहा लाख कैद केले ! "

— ४ —

याप्रमाणें इकडे सीझर गॉल लोकांचा धुव्वा उडवीत असतां, त्यांना पायांखालीं चिरडून टाकीत असतां, रोममधील त्याचें महत्त्व कमी व्हावें म्हणून पॉपे खटपट करीत होता. त्यांच्या कृत्रिम मैत्रीतील शेवटचा दुवा तुटला : पॉपेची पत्नी ( सीझरची मुलगी जुलिया ) बाळंतपणांत मरण पावली. त्या दोघांत उघड वैर पेटलें. आपणांला सर्वाधिकारी केलें जावें यासाठीं पॉपे कारस्थानें करूं लागला. सीझरच्या कानीं ही वार्ता पडतांच तो झपाट्यानें

इटलींत आला व स्वतःच्याच रोम शहरावर त्यानें आपल्या सैन्यानिशीं स्वारी केली. रूबिकॉन नदी ओलांडून इटलींत शिरण्यापूर्वींच्या रात्रीं त्याला एक दुष्ट व अपवित्र स्वप्न पडलें होतें. स्वतःच्या आईशींच आपण अनैसर्गिक संबंध ठेवीत असल्याचें त्याला स्वप्नांत दिसलें.

सीझर रोमवर चालून येत आहे असें ऐकतांच पाँपे पळाला, इतर अधिकारी, कॉन्सल्स, सीनेटर्स, सारे पळाले ! 'कर्णधारानें सोडून दिलेल्या नावेच्याप्रमाणें रोमची स्थिति होती.' सीझर दरवाजांतून आला व रोममध्यें अराजक आहे असें जाहीर करून शांतता व सुव्यवस्था टिकविण्यासाठीं त्यानें स्वतःला हुकुमशहा केलें. त्यानंतर त्यानें शहरची तिजोरी फोडली व तींतील सार्वजनिक पैशाचा उपयोग केला. आपल्या देशबांधवांसमोर केलेल्या सुंदर भाषणांत तो म्हणाला, " मी हें सारें तुमच्यासाठीं करीत आहें व जर कोणी मला या लोककल्याणाच्या कार्यांत विरोध करील तर त्याला मी तावडतोब यमसदनास पाठवीन. "

रोममध्यें आपलें आसन स्थिर करून व तेथें कांहीं संरक्षक शिबंदी ठेवून तो पाँपेचा पाठलाग करीत निघाला. आपल्या शत्रूचा निःपात करण्याला तो इतका अधीर झाला होता कीं, तो अत्यंत वेगानें निघाला. त्याचे शिपाईहि या अति धांवपळीला कंटाळून जरा कुरकुरूं लागले. ते आपसांत म्हणत, " हा सीझर आम्हांला थोडासा विसांवा केव्हां व कोठें देणार ? जरा तरी विसांवा हा देईल का ? आम्हां मानवांविषयीं त्याला कांहीं सहानुभूति नसेल वाटत तर न वाटो, पण निदान हीं आमचीं चिलखतें, हे आमचे पट्टे यांवर तरी त्यानें करुणा नको का करायला ? सीझरच्या या अघोरी महत्त्वाकांक्षेसाठीं वर्षानुवर्षे ज्या लढाया अखंड चालल्या आहेत त्या लढतां लढता हीं आमचीं चिलखतें झिजून गेलीं, हीं आमचीं शिरस्त्राणें निस्त्राण झालीं ! "

पण रोमन सैन्याची शिस्त कडवी होती. शिस्तींत वाढलेले असल्यामुळें शिपाई पुनः शांत झाले, तक्रारी मिटल्या व ते सीझरबरोबर ग्रीसच्या उत्तरेकडील थेसिली भागांत गेले. सीझरनें पाँपेच्या जीर्ण-शीर्ण-विदीर्ण सेनेला गांठून पाँपेचा पुरा मोड केला. पाँपे पळाला; गलबतात बसून तो ईजिप्तमध्यें निसटून गेला.

सीझरहि वेळ न गमावतां ईजिप्तकडे निघाला. तेथें पोंचतांच त्याला

दिसलेली पहिली वस्तु म्हणजे भाल्याच्या टोंकावर असलेलें पाँपेचें शिर! ईजिप्तमधील त्याच्या मित्रांनीं त्याचा त्रास वांचविला. जांवयाला ठार मारण्याची त्याची चिंता संपली. जांवयाच्या शिराची भेट ईजिप्तमधील त्याच्या मित्रांनीं त्याला दिली!

— ५ —

पाँपे मेला. पण त्यामुळें यादवी संपली असें मात्र नव्हे. जगाच्या नाना भागांत त्याचे अनेक मित्र नाना प्रकारचीं कृष्ण कृत्यें करीत होते, बंडाची भाषा बोलत होते. पण त्यांची खोड मोडण्यापूर्वी तो ईजिप्तमध्येंच टॉलेमीचें राजघराणें नीट व्यवस्थित करण्यासाठीं थोडा थांबला. टॉलेमी वारला तेव्हां त्याच्यामागें त्याच्याच नांवाचा एक मुलगा होता व आर्सिनो आणि क्लिओ-पाट्रा नांवाच्या दोन मुली होत्या. हीं तिन्ही मुलें सिंहासनासाठीं झगडत होतीं. क्लिओपाट्रा हिनें सीझरची मदत मागितली. त्या वेळीं सीझर चौपन्न वर्षांचा होता. त्याला टक्कल पडलें होतें व मधूनमधून फिट्सहि येत असत. क्लिओपाट्रा तारुण्याच्या ऐन भरांत होती! तिचें वय अवघें एकवीस वर्षांचें होतें. सीझरनें तिची विनंति एकदम मान्य केली व तिला ईजिप्तची निःशत्रु राणी केलें.

सीझर हा रोममधला अत्यंत हुषार व पाताळयंत्री मुत्सद्दी होता. पण तो जगांतील अत्यंत हुषार अशा एका नारीच्या हातांतील बाहुलें बनला! रोमला परतून तेथील आपसांतील यादवी बंद करण्याऐवजीं तो ईजिप्तमध्येंच कित्येक महिने रेंगाळत राहिला. क्लिओपाट्रा हिचें कोमल बंधन तोडणें, तिच्या मंत्रमुग्धतें-तून मुक्त होणें, त्याला जड जात होतें. आयुष्याच्या सायंकाळीं आरंभिलेल्या त्या अनंगरंगांत तो दंग झाला! तिनें त्याला नील नदींत नौकाविहार कर-ण्यास चला म्हणून विनवितांच तो कबूल झाला. राजशाही नौका सिद्ध झाली. ती जणूं तरता राजवाडाच होती! तिच्यावर नारिंगी व शेंदरी पडदे सोडण्यांत आले होते; नौकेचा नाळ सोन्याचा होता, वल्हीं चांदीचीं होतीं, पन्नार वल्हेंवाले डुबुकडुबुक करीत वल्हीं मारीत तेव्हां त्यांचीं चांदीचीं टोंकें कशीं चमकत! पूर्वी कोणत्याहि मर्त्य मनुष्यानें अनुभविलें नसेल अशा साम्राज्याच्या स्वप्नांत तो स्वतःला विसरून गेला! तो मनांत म्हणत होता, "मी आतां इटलींत जाईन, काल्पूर्नियाशीं काडीमोड करीन, क्लिओपाट्रा हिला आणीन व

मग देवाच्या दयेनें आम्ही उभयतां रोम, ईजित व सारी पृथ्वी यांचे स्वामी होऊं. मी पूर्वी धर्माचार्य असता केलेली देवांची सेवा देव थोडेच विसरतील! ते माझें स्वप्न पुरें करतीलच."

सीझर क्लिओपाट्रा हिच्या बाहुपाशांत स्वप्नसृष्टींत रमला होता; ईजिप्त-मधील सुंदरींच्या हातांतल्या बांसऱ्यांवरील गीतवादन तो ऐकत होता. पण तिकडे पाँपेचे मित्र कांहीं स्वस्थ बसले नव्हते. त्यांनीं निरनिराळ्या रोमन प्रांतांत बंडाळ्या उभ्या केल्या. खुद्द रोम शहरहि बंड करून उठलें. सीझर वेळींच न उठल्यास व त्यानें तिकडे लक्ष न दिल्यास त्याचेंहि डोकें पाँपेच्या डोक्याप्रमाणेंच भाल्याच्या टोंकावर नाचविण्यांत येण्याचा संभव दिसूं लागला.

म्हणून त्यानें मोठ्या नाखुषीनें ईजिप्तमधील मेजवान्या, सुखोपभोग व विलास आणि उंची वस्त्रें टाकून देऊन रणवेष (चिलखत व शिरस्त्राण) धारण केला. क्लिओपाट्रा हिच्या पोटात गर्भ वाढत होता. निघतांना त्यानें तिला 'बाळ जन्माला येतांच मी तुला घेऊन जाईन' असें अभिवचन दिलें.

सीझर एकदम रोमला गेला नाहीं. आपण ईजिप्तमधील सुखोपभोगांत रंगलों, दंग झालों याबद्दल त्याला लाज वाटत होती. त्याच्या मित्राची व चाहत्यांची तो ईजिप्तमधील रणांगणावर मोठमोठे विजय मिळवील अशी अपेक्षा होती. पण त्यानें केवळ एकच विजय मिळविला. आणि तोहि कोठें? तर ईजिप्तच्या राणीच्या विलास-मंदिरांत! क्लिओपाट्रा हिच्या सदिच्छांहून अधिक भरीव असें कांहीं तरी रोमला घेऊन जावें अशी त्याची मनीषा होती. म्हणून आशियामायनरमधील एका बंडखोर प्रातावर--पॉन्टसवर—त्यानें स्वारी केली व फारशी तकलीफ न पडतां तेथील बंडाचा मोड केला. नंतर आपण पूर्वीचाच प्रतापी सीझर आहों, हें रोमन जनतेला पटविण्यासाठीं आपल्या विजयाचें वर्णन "मी आलों, मीं पाहिलें आणि मीं विजय मिळविला!" या तीन सुप्रसिद्ध गर्विष्ठ व अहंमन्यतापूर्ण वाक्यांत पाठविलें. जणूं मर्त्यांशीं दोन शब्द बोलण्याची कृपा करणाऱ्या एकाद्या देवदूताचेच ते शब्द होते! तो रोमला यावयांस सिद्ध झाला.

— ६ —

त्याच्या आशियांतील विजयाची वार्ता आधींच पोंचली होती. ती ऐकून रोमन जनता वेडी झाली. तिनें त्याचें भव्य स्वागत केलें. आणखी दहा वर्षें

आपणच हुकुमशहा राहणार असें घोषवून त्यानें क्लिओपाट्रा हिला आणण्या-साठीं लवाजमा व लष्कर पाठवून दिलें. ती आपल्या बाळाला घेऊन आली. तिनें त्याचें नांव 'सीझरियन' म्हणजे 'छोटा सीझर' असें ठेवलें होतें. तिजबरोबर तिची बहीण आर्सिनो हीहि आली होती; पण पाहुणी म्हणून नव्हे, तर कैदी म्हणून. सीझरनें आपल्या विजयी मिरवणुकींत त्या अभागिनीला शृंखला घालून रोमन लोकांसमोर मिरविलें व मग ठार केलें. क्लिओपाट्रा हिच्या मर्जीसाठी म्हणून त्यानें हें नीचतम कृत्य केलें. काल्पूर्नीया हिजशीं काडीमोड करण्याचें धैर्य त्याला झालें नाहीं. क्लिओपाट्रा हिच्यासाठीं त्यानें टायबर नदीच्या पैलतीरीं भव्य प्रासाद बांधला व आपणांस केवळ रोमचीं राजा-राणी म्हणून नव्हे तर देवदेवता मानून जनतेनें भजावें, पूजावें यासाठीं दोघें कारस्थानें करूं लागलीं.

सीझरनें स्वतःचें एक मन्दिर बांधाविलें व त्यांत आपले दोन पुतळे उभे केले. त्यांची पूजाअर्चा करण्यासाठीं व तेथें यज्ञयाग करण्यासाठीं त्यानें पुजारी नेमले व सीझरच्या नांवें घेतलेली शपथ 'जोव्ह' देवाच्या नांवें घेतलेल्या शपथेइतकीच पवित्र असें फर्मान काढलें. खेळांच्या निरनिराळ्या मिरवणुकी निघत त्यांत इतर देवदेवतांच्या चित्रांप्रमाणें आपलेंहि चित्र असलें पाहिजे असें त्यानें आज्ञापिलें.

आणि हे जे आपले अमर मानसन्मान तो करून घेत असे त्यांत क्लिओपाट्रा-हि सहभागी असे. 'अजिंक्य देव, ज्यूपिटर ज्यूलियस', याच्या चित्राशेजारीं किंवा पुतळ्याशेजारीं 'व्हीनस देवतेची दिव्य बहीण क्लिओपाट्रा' हिचेंहि चित्र वा पुतळा असे. सीझर आपणांस 'देव ज्युपीटर' व क्लिओपाट्रा हिला 'प्रेमदेवता व्हीनस हिची बहीण' म्हणून संबोधी.

देवत्वाचा मान स्वतःकडे घेण्याची सीझरची वृत्ति पुष्कळ रोमनांना आवडली नाहीं; त्यांना या गोष्टीचा राग आला, पण सीझरनें देवत्व घेतल्या-बद्दल त्यांना जितका राग आला त्यापेक्षां जास्त राग तो रोमचा राजा होऊं पाहत होता याबद्दलच त्यांना आला. त्यानें आपल्यासाठीं एक सुवर्ण-सिंहासन तयार करण्याची आज्ञा दिली व मुकुट धारण करण्यासाठीं योग्य संधीची तो वाट पाहत बसला.

ही संधि एका रोमन सणाच्या वेळीं आली असें त्याला वाटलें. लोकांची

नाडीपरीक्षा करण्यासाठीं अर्धवट गंमतीनें व अर्धवट गंभीरपणें त्यानें त्या दिवशींच्या उत्सवांत मार्क ॲन्टोनी याला खेळांत राजा करावें असें सुचविलें. तदनुसार ॲन्टोनी राजा झाला; खेळांतलाच राजा. पण आजूबाजूच्या जनतेला राजाचा खेळ आवडला नाहीं. सीझर दुरून सर्व पाहत होता; त्यानें जाणलें कीं, मुकुट धारण करण्याची वेळ अजून आली नाहीं. म्हणून त्यानें तो बेत पुढें ढकलला व रोमन रिपब्लिकचें अनियंत्रित राजशाही रोमन साम्राज्यांत परिवर्तन करण्याला परिपक्व वेळ अजून आली नाहीं, हें ओळखून वाट पाहण्याचें ठरविलें.

दरम्यान स्पेनमध्यें पॉंपेच्या ङ्नायस व सेक्स्टस नामक दोघां मुलांनीं रोम-विरुद्ध म्हणजेच सीझरविरुद्ध बंड केलें व तें दिवसेदिवस वाढणार असें दिसूं लागलें. उपेक्षा करून चालण्यासारखें नव्हतें म्हणून सीझरला पुनः एकदां सैन्याचें आधिपत्य घेणें भाग पडलें. त्यानें स्पेनमधील पुंडावा मोडला व पॉंपेच्या दोन्ही मुलांना ठार केलें. सीझरनें रोमला परत येतांच आमरण हुकुमशाही जाहीर केली.

त्यानें या प्रसंगीं अत्यंत भयंकर चूक केली. पॉंपेच्या मुलांवर मिळविलेल्या विजयाप्रीत्यर्थ होणाऱ्या सार्वजनिक उत्सवांत तो स्वतःचा सत्कार करून घेणार होता. त्याचा हा अहंकार अक्षम्य होता. क्षुद्रतेचें तें प्रदर्शन असह्य होतें. रोमन लोकांनीं आतांपर्यंत खूप सहन केलें. पण आपसांतील यादवी-मुळें झालेल्या रोमनांच्याच कत्तलीप्रीत्यर्थ होणारा सत्कार–समारंभ त्यांना असह्य वाटला. आपल्याच बांधवांचें रक्त सांडल्याबद्दल व शिरकाण केल्या-बद्दल ऐट मारणें हें त्यांच्या मतें माणुसकीला काळिमा फांसणारें होतें.

देव कधीं चुकत नाहीं या विश्वासानें सीझर सत्कार–समारम्भाची योजना पुरी करण्याच्या खटाटोपास लागला. खि. पू. ४४ सालच्या मार्चच्या पंधराव्या तारखेस तो सीनेट–हाउसमध्यें आला तेव्हां तो अत्यंत आनंदी दिसत होता. कारण, रोमबाहेरील सर्व रोमन प्रांतांचा रोमन सम्राट् म्हणून त्याची नेमणूक त्या दिवशीं सीनेटरांकडून होणार होती. त्यानंतर खुद्द रोमचा सम्राट् म्हणून त्याच्या नांवानें द्वाही फिरण्यास कितीसा अवकाश होता ! पण... !

हातांत मुकुट घेऊन सीनेटर आपल्या स्वागतार्थ पुढें येतील अशा आशेनें

सीनेट–हाउसमध्यें पाऊल टाकणाऱ्या सीझरला मुकुट–प्रदानाऐवजीं खंजिरां-च्या तेवीस प्रहारांची सलामी मिळाली!

सीझरवर प्राणान्तिक प्रहार करणाऱ्यांत त्याचे पुष्कळ जिव्हाळ्याचे स्नेहीहि होते. त्यांतील एक प्रमुख कटवाला ब्रूटस हा आपलाच अनौरस पुत्र आहे असें सीझरला वाटण्यास भरपूर पुरावा होता.

— ७ —

इतिहासाच्या ग्रंथांमध्यें सीझरचें वर्णन 'एक थोर व मोठा मुत्सद्दी' असें करण्यात येत असतें. पण इतिहासकारांनीं वाहिलेल्या स्तुतिसुमनांजली दूर करून सीझरचें खरें स्वरूप पाहिल्यास काय दिसेल? तो पक्का गुंड व खुनी, बुद्धिमान् खुनी होता. तो प्रचंड प्रमाणावर कत्तली करण्याच्या योजना आंखणारा कर्दनकाळ होता. तो वेडा पीर होता. त्याच्या वैयक्तिक महत्त्वा-कांक्षेसाठीं एकट्या रोम शहराला एक लक्ष साठ हजार लोकांना मुकावें लागलें!

त्याचें जीवन म्हणजे रोमन लोकांना खरोखर शापच होता. पण तो मेला तरीहि रोमन लोकांना हायसें वाटलें नाहीं. सीझरचा खून होतांच त्याची जागा बळकावण्यासाठीं अनेक गुंड पुढें आले. रोमची मालकी मिळविण्या-साठीं आपल्याच बांधवांच्या कत्तली करीत राहणें हा पुष्कळ प्रमुख रोमन पुढाऱ्यांचा अनेक वर्षेपर्यंत एकच धंदा होता.

## प्रकरण ६ वें

# नाझारेथचा बहिष्कृत ज्यू येशू

— १ —

क्षणभर रोमन लोकांची खुनाखुनी बाजूस ठेवून आपण जरा दूर जाऊं या. रोमन लोकांचीं तीं भांडणें, ते कोलाहल, ते गदारोळ तसेच सोडून आपण पूर्वेकडच्या अधिक शांतताप्रिय राष्ट्रांकडे जरा जाऊं या. इकडे अलेक्झांडर, हॅनिबॉल, सीझर जगाला आपल्या महत्त्वाकांक्षांनीं व खाटिकखान्यांनीं हैराण करीत असतां पूर्वेकडील हिंदु, चिनी व ज्यू राष्ट्रें शांतीचे महात्मे जगाला देत होतीं.

हिंदुस्थानात थोर सम्राट् अशोक होऊन गेला. खि. पू. २६४ ते खि. पू. २२७ पर्यंत त्यानें राज्य केलें. एका मोठ्या युद्धांत त्याला विजय मिळाला होता. पण युद्धांतील क्रूरता व भीषणता प्रत्यक्ष पाहून त्याला युद्धाचा वीट आला व पुनः म्हणून युद्ध करावयाचें नाहीं असें त्यानें ठरविलें व युद्धाऐवजीं सदिच्छेचा, बंधुभावाचा व प्रेमाचा संदेश जगभर पसरविणें हेंच आपलें जीवनकार्य केलें.

चीनमध्यें कन्फ्यूशियसचे अनुयायीहि शांतिप्रसार करीतच होते. कुआंगत्से, मेन्सियस, मोटि, इत्यादि चिनी शांतिदूतांनीं आपल्याच बांधवाचीं प्रेतें तुडवीत जाण्यापेक्षा निराळ्याच मार्गानें जीवन कसें कंठावें हें शिकविलें. त्यांनीं शांतीचा मार्ग शोधला. कधीं कधीं मेन्सियसची वाणी प्रेषितांच्या वाणीप्रमाणें भासे. तो म्हणतो, " श्रीमंतांच्या घरांत चरबी आहे, मांस आहे, तर गरिबांच्या पोटाच्या दामट्या वळल्या आहेत! श्रीमंतांच्या तबेल्यांत घट्टपुष्ट घोडे आहेत, तर दरिद्री लोक भुकेनें मरत आहेत! जिकडे तिकडे उपाशीं मेलेल्या लोकांचे मुडदे पडलेले आहेत!...श्वापदे माणसांना व माणसें एकमेकाना खातील." एपिक्युरसनें स्वार्थाचाच उपदेश केला; पण अविरोधी, शहाण्या स्वार्थाचा. मेन्सियसनें तेंच ध्येय चिनी जनतेपुढें ठेविलें. तो उपदेशितो, " सुख खुशाल भोगा, स्वतःच्या सुखासाठीं जरूर खटपट करा; पण दुसऱ्यांच्या सुखाआड येऊं नका म्हणजे झालें." एपिक्युरस-प्रमाणें व येशूप्रमाणें मेन्सियसलाहि लहान मुलें फार आवडत. तो लिहितो, " ज्याचें हृदय लहान मुलाच्या हृदयासारखें असतें तोच खरा मोठा."

मेन्सियसच्या शब्दांपेक्षांहि मोटीची उपदेशवाणी अधिक सुंदर आहे. उदाहरणार्थ, पुढील उतारा पाहा:— " एका राज्यानें दुसऱ्या राज्यावर हल्ले चढविणें, एका कुटुंबानें दुसऱ्यास लुबाडूं पाहणें, माणसांनीं एकमेकांस लुटणें, राजांनीं निर्दय असणें, प्रधानांनीं अप्रामाणिक असणें, पिता–पुत्रांत वात्सल्याचा व पितृभक्तीचा अभाव असणें, इत्यादि गोष्टी साम्राज्याला अपाय-कारक असतात. परस्पर–सहानुभूति व प्रेम दर्शविण्याचा सद्गुण सर्वांच्या जीवनांत येईल तर केवढी मौज होईल! राजे एकमेकांवर प्रेम करूं लागतील तर रणांगणाची जरूरीच भासणार नाहीं. सर्वत्र प्रेम असेल तर कुटुंबांतील कोणीहि एकमेकांस लुबाडणार नाहींत. सर्वत्र प्रेम असेल तर माणसें चोऱ्या

करणार नाहींत, राजे व त्यांचे प्रधान उदार होतील, आई-बाप व मुलें यांचे संबंध प्रेमळ होतील, भावांभावात मेळ व प्रेम राहतील, ते भांडणें पट्कन विसरतील. माणसें परस्परांवर प्रेम करतील तर बलवान् दुर्बळास चिरडणार नाहींत वा खाणार नाहींत, बहुसंख्य लोक अल्पसंख्यांना लुटणार नाहींत, श्रीमंत गरिबांचा अपमान करणार नाहींत, सरदारवर्ग गरीब घराण्यांत जन्मलेल्या श्रमजीवी वर्गाचा उपमर्द करणार नाहीं, त्याच्याशीं अरेरावीनें वा अहंकारानें वागणार नाहीं, कपटी लोक साध्या, सरळ लोकांना फसविणार नाहींत वा त्यांच्या डोक्यावर बसणार नाहींत."

चिनी ऋषीची ही वाणी हिब्रू भाषेंत भाषांतरिली तर हेच शब्द प्रेषित इसैया, ॲमॉस किंवा हिल्लेल यांचेहि आहेत असें आढळेल. ही चिनी वाणी अरॅमिक भाषेंत भाषांतरिल्यास ती गॅलिलींतील निळया नभाखालच्या पर्वतांच्या व्यासपीठावरून उपदेश करणाऱ्या तदनंतरच्या ज्यू धर्मसंस्थापकांचीच वाणी वाटेल.

— २ —

गॅलिलीचा तो सौम्य पुरुष! तो फकिराप्रमाणें हिंडणारा महात्मा! त्याला कोणीं देव तर कोणीं पागल बनविलें आहे! कोणी त्याला जादूटोणा करणारा समजत, तर कोणी त्याला ढोंगी बुवा म्हणत! कोणी तर त्याला 'अमेरिकन पद्धतीचा प्रचारक' मानतात. पण तो यांपैकीं कोणीहि नव्हता. प्रेमानें द्वेष शमवावा, क्षमेनें सूड जिंकावा, नम्रतेनें अहंकार जिंकावा, शांतीनें रक्तपात जिंकावा, असें शिकविणारे जे अनेक महात्मे पूर्वेकडे झाले, त्यांच्याच परंपरेंतील व त्याच मालिकेंतील तोहि एक होता. त्याचें खरें चित्र आजपर्यंत काढलें गेलेलें नाहीं व पुढेंहि कधीं काढलें जाईलसें वाटत नाहीं. कारण, त्याच्या प्रत्येक चरित्रकारानें जणूं स्वतःचेंच चित्र काढून त्याला ख्रिस्ताचें नांव दिलें आहे, स्वतःला ख्रिस्तावर लादलें आहे! बायबलांत जसा येशू चमत्कार करणारा दिसतो, त्याच्याभोंवतीं जसें तेजोवलय शोभतें, तद्वतच रेनन, पापिनी, ब्रूस बार्टन वगैरेंनीं लिहिलेल्या चरित्रांतहि येशूच्या बाबतींत प्रकार आढळतात. ख्रिस्ताच्या आपणांसमोर असलेल्या चित्रांत खूप विरोधाभास आहेत! एका गालावर मारलें असतां दुसरा गाल पुढें करण्यास सांगणारा येशू मंदिरांत जमलेल्यांस फटके मारून बाहेर हाकलीत आहे असें दिसतें! एका क्षणांत तो पृथ्वीवर शांतता आणणारा आढळतो, तर

दुसऱ्या क्षणीं तो तरवार परजीत आहेसें दिसतें! सुखाचें व शांतीचें उपनिषद् सांगणारा तो सुखी लोकांची टिंगल उडवितो! (जे तुम्ही आज हंसत आहां, तेच उद्यां रडाल, आक्रोश कराल, समजलें?) तो शत्रूंना क्षमा करतो पण शत्रूंना प्रभूनें ठार करावें म्हणून प्रभूला आळवितोहि! स्वर्गाच्या राज्याची घोषणा करणाराच तो अनेक जातींच्या जाती नरकांत लोटतो! आपला उपहास करणारांनाहि आशीर्वाद देणाराच तो अंजिराचें झाड अंजीर देत नाहीं (अंजिरांचा मोसमच नसता कोणता शहाणा मनुष्य अंजिराच्या झाडापासून अंजीर अपेक्षील?) म्हणून त्याला शिव्याशाप देण्यासहि मार्गेपुढें पाहत नाहीं! असे हे परस्परविरोधी तुकडे एकत्र करून त्यांवरून जिवंत माणसाचें खरेंखुरें चित्र तयार करतां येईल का?

हो. तें तयार करणें शक्य आहे असें मला वाटतें. सजीव येशूचें चित्र हवें असेल तर एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, कितीहि झालें तरी येशू मानव, मर्त्य होता. त्याचा स्वभाव हळूहळू विकसत गेला. त्याच्या जीवनांत हळूहळू उत्क्रांति, वाढ होत गेली. इतर मानवांप्रमाणेंच त्याचेंहि चारित्र्य हळूहळू फुलत गेलें. नव्या करारांतील कालगणना आपण दूर फेंकून देऊं या. त्याच्या चरित्रांतल्या ज्या अनेक कथा चार पुस्तकांत आल्या आहेत त्यांनाहि फारसें महत्त्व नाहीं. त्या तोंडोतोंडीं आलेल्या लोककथा आहेत. मानसशास्त्राचें किंवा इतिहासाचें ज्ञान नसणाऱ्यांनीं त्या गोष्टी गोळा करून लिहून काढल्या आहेत. एकाद्या चिनी कोड्याप्रमाणें हे तुकडे बायबलांत इकडे, तिकडे, चोहोंकडे, सर्वत्र पसरलेले, विखुरलेले आहेत. ते गोळा करून त्यांची नीट जुळणी करून पुनर्रचना करतां आली तर ज्याचें आकलन करतां येईल, ज्याच्यावर प्रेम करतां येईल, ज्याचें पूजन करतां येईल असा पुरुष आपणांस खास खास निर्मितां येईल, एका मर्त्य व्यक्तीचें सुंदर व सहृदय चित्र खचित उभें करतां येईल.

हा पुरुष कशा प्रकारचा होता? प्रारंभीं तो बंडखोर व तापट डोक्याचा होता; तो प्रतिष्ठितांच्या समाजाचा द्वेष करी; आपल्यासारखे जे परित्यक्त वा दरिद्री होते त्यांच्यांत तो मिसळे. भोंवतालचें जीवन पाहून तो असंतुष्ट झाला होता. अधिक चांगलें जीवन सर्वांना लाभावें म्हणून झगडावयाला, लढा करावयाला तो तयार होता. त्याचा स्वभाव जहाल व जलाल होता. तो

मारण्यासाठीं हात उगारी, शाप देण्यासाठीं जीभ उचली. जग सापांनीं व सैतानांनीं भरलेलें आहे असें त्याला वाटे. जग म्हणजे चोरांचें व लुटारूंचें माहेरघर व दरोडेखोरांची गुहा आहे असें त्याला वाटे. या सर्वांना शुद्ध करणें किंवा हांकलून देणें हें आपलें कर्तव्य आहे, अशी त्याची समजूत होती. थोडक्यांत म्हणजे अत्युत्कट क्रान्तिकारक जॉन दि बॅप्टिस्ट याचा तो श्रद्धाळू शिष्य होता.

पण तो मानवांवर अपरंपार प्रेम करी म्हणूनच त्यांच्यावर दांतओठहि खाई, त्यांचा द्वेषहि करी. ज्यू प्रेषितांचा क्रोध व त्यांची करुणा दोन्ही त्याच्या ठायीं होतीं. प्रथम कांहीं असंतुष्ट भिकारडे लोकच त्याच्याभोंवतीं गोळा झाले. पण जसजसे त्याचे अनुयायी वाढूं लागले, त्याचे शिष्य त्याची पूजा करूं लागले, तसतसा त्याच्या स्वभावांतील मधुरतेचा स्तुत्य व उदात्त भाग अधिकाधिक प्रकट होऊं लागला. तो संयम ठेवूं लागला, क्रोध आवरूं लागला. त्यानें आपल्या प्रक्षोभशील स्वभावाला माणसाळविलें. त्याचा मर्त्य स्वभाव हळूहळू दैवी बनूं लागला, मातीचें सोनें होऊं लागलें. तो असंतुष्ट जनतेचा देव बनला. आणि नंतर त्याचें मरण! पण आपण त्याचें चरित्र अधिक जवळ जाऊन पाहूं या व त्याचा स्वभाव निरीक्षूं या.

— ३ —

लहानपणीं तो नेहमीं भटके, कधींहि स्वस्थ बसत नसे. त्याचा स्वभाव बंडखोर होता. त्याला आईबापांनीं जेरुसलेम येथें आणलें तेव्हां तो त्यांना सोडून निघून गेला व ज्यूंच्या धर्ममन्दिरांत जाऊन तेथील धर्मगुरूंशीं वाद करीत बसला. इकडे आईबाप त्याला शोधीत होते. शेवटीं तो जेव्हां सांपडला तेव्हां त्यानीं त्याची चांगलीच कानउघाडणी केली. त्यांनीं त्याला नाना प्रश्न विचारले. त्यांचीं त्यानें जरा रागानेंच उत्तरें दिलीं. वडील मंडळींच्या म्हणण्याकडे तो दुर्लक्ष करूं लागला. वडील मंडळींचें न ऐकण्याची प्रवृत्ति त्याच्या ठायीं दिसून येऊं लागली. तो आपल्या सदसद्विवेकबुद्धीच्या सांगी-प्रमाणें वागूं लागला.

पुढील अठरा वर्षांत त्यानें काय काय केलें तें समजत नाहीं. वयाच्या तिसाव्या वर्षी तो पुनः आईबापांना सोडून गेला व जॉर्डन नदीच्या तीरावर भटकत राहिला. तेथेंच तो जॉन दि बॅप्टिस्ट याच्या क्रान्तिकारक पक्षास

दुसऱ्या क्षणीं तो तरवार परजीत आहेसें दिसतें! सुखाचें व शांतीचें उपनिषद् सांगणारा तो सुखी लोकांची टिंगल उडवितो! (जे तुम्ही आज हंसत आहां, तेच उद्यां रडाल, आक्रोश कराल, समजलें?) तो शत्रूंना क्षमा करतो पण शत्रूंना प्रभूनें ठार करावें म्हणून प्रभूला आळवितोहि! स्वर्गाच्या राज्याची घोषणा करणाराच तो अनेक जातींच्या जाती नरकांत लोटतो! आपला उपहास करणारांनाहि आशीर्वाद देणाराच तो अंजिराचें झाड अंजीर देत नाहीं (अंजिरांचा मोसमच नसता कोणता शहाणा मनुष्य अंजिराच्या झाडापासून अंजीर अपेक्षील?) म्हणून त्याला शिव्याशाप देण्यासहि मागेंपुढें पाहत नाहीं! असे हे परस्परविरोधी तुकडे एकत्र करून त्यांवरून जिवंत माणसाचें खरेंखुरें चित्र तयार करतां येईल का?

हो. तें तयार करणें शक्य आहे असें मला वाटतें. सजीव येशूचें चित्र हवें असेल तर एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, कितीहि झालें तरी येशू मानव, मर्त्य होता. त्याचा स्वभाव हळूहळू विकसत गेला. त्याच्या जीवनांत हळूहळू उत्क्रांति, वाढ होत गेली. इतर मानवांप्रमाणेंच त्याचेंहि चारित्र्य हळूहळू फुलत गेलें. नव्या करारांतील कालगणना आपण दूर फेंकून देऊं या. त्याच्या चरित्रांतल्या ज्या अनेक कथा चार पुस्तकांत आल्या आहेत त्यांनाहि फारसें महत्त्व नाहीं. त्या तोंडोतोंडीं आलेल्या लोककथा आहेत. मानसशास्त्राचें किंवा इतिहासाचें ज्ञान नसणाऱ्यांनीं त्या गोष्टी गोळा करून लिहून काढल्या आहेत. एकाद्या चिनी कोड्याप्रमाणें हे तुकडे बायबलांत इकडे, तिकडे, चोहोंकडे, सर्वत्र पसरलेले, विखुरलेले आहेत. ते गोळा करून त्यांची नीट जुळणी करून पुनर्रचना करतां आली तर ज्याचें आकलन करतां येईल, ज्याच्यावर प्रेम करतां येईल, ज्याचें पूजन करतां येईल असा पुरुष आपणांस खास खास निर्मितां येईल, एका मर्त्य व्यक्तीचें सुंदर व सहृदय चित्र खचित उभें करतां येईल.

हा पुरुष कशा प्रकारचा होता? प्रारंभीं तो बंडखोर व तापट डोक्याचा होता; तो प्रतिष्ठितांच्या समाजाचा द्वेष करी; आपल्यासारखे जे परित्यक्त वा दरिद्री होते त्यांच्यांत तो मिसळे. भोंवतालचें जीवन पाहून तो असंतुष्ट झाला होता. अधिक चांगलें जीवन सर्वांना लाभावें म्हणून झगडावयाला, लढा करावयाला तो तयार होता. त्याचा स्वभाव जहाल व जलाल होता. तो

मारण्यासाठीं हात उगारी, शाप देण्यासाठीं जीभ उचली. जग सापांनीं व सैतानांनीं भरलेलें आहे असें त्याला वाटे. जग म्हणजे चोरांचें व लुटारूंचें माहेरघर व दरोडेखोरांची गुहा आहे असें त्याला वाटे. या सर्वांना शुद्ध करणें किंवा हांकलून देणें हें आपलें कर्तव्य आहे, अशी त्याची समजूत होती. थोडक्यांत म्हणजे अत्युत्कट क्रान्तिकारक जॉन दि बॅप्टिस्ट याचा तो श्रद्धाळू शिष्य होता.

पण तो मानवांवर अपरंपार प्रेम करी म्हणूनच त्यांच्यावर दांतओठहि खाई, त्यांचा द्वेषहि करी. ज्यू प्रेषितांचा क्रोध व त्यांची करुणा दोन्ही त्याच्या ठायीं होतीं. प्रथम कांहीं असंतुष्ट भिकारडे लोकच त्याच्याभोंवतीं गोळा झाले. पण जसजसे त्याचे अनुयायी वाढूं लागले, त्याचे शिष्य त्याची पूजा करूं लागले, तसतसा त्याच्या स्वभावांतील मधुरतेचा स्तुत्य व उदात्त भाग अधिकाधिक प्रकट होऊं लागला. तो संयम ठेवूं लागला, क्रोध आवरूं लागला. त्यानें आपल्या प्रक्षोभशील स्वभावाला माणसाळविलें. त्याचा मर्त्य स्वभाव हळूहळू दैवी बनूं लागला, मातीचें सोनें होऊं लागलें. तो असंतुष्ट जनतेचा देव बनला. आणि नंतर त्याचें मरण! पण आपण त्याचें चरित्र अधिक जवळ जाऊन पाहूं या व त्याचा स्वभाव निरीक्षूं या.

— ३ —

लहानपणीं तो नेहमीं भटके, कधींहि स्वस्थ बसत नसे. त्याचा स्वभाव बंडखोर होता. त्याला आईबापांनीं जेरुसलेम येथें आणलें तेव्हा तो त्यांना सोडून निघून गेला व ज्यूंच्या धर्ममन्दिरांत जाऊन तेथील धर्मगुरूंशीं वाद करीत बसला. इकडे आईबाप त्याला शोधीत होते. शेवटीं तो जेव्हां सांपडला तेव्हां त्यांनीं त्याची चांगलीच कानउघाडणी केली. त्यांनीं त्याला नाना प्रश्न विचारले. त्यांचीं त्यानें जरा रागानेंच उत्तरें दिलीं. वडील मंडळींच्या म्हणण्याकडे तो दुर्लक्ष करूं लागला. वडील मंडळींचें न ऐकण्याची प्रवृत्ति त्याच्या ठायीं दिसून येऊं लागली. तो आपल्या सदसद्विवेकबुद्धीच्या सांगी-प्रमाणें वागूं लागला.

पुढील अठरा वर्षांत त्यानें काय काय केलें तें समजत नाहीं. वयाच्या तिसाव्या वर्षीं तो पुनः आईबापांना सोडून गेला व जॉर्डन नदीच्या तीरावर भटकत राहिला. तेथेंच तो जॉन दि बॅप्टिस्ट याच्या क्रान्तिकारक पक्षास

मिळाला. जॉन हा एक संन्यासी होता. तो वृत्तीनें आडदांड व क्रान्तिकारक होता. तो द्वेषाचें उपनिषदच शिकवी. अनुतप्तांना वांचविण्यांत त्याला विशेष आनंद वाटत नसे, तर अननुतप्तांना शिव्याशाप देण्यांत व त्यांना शासन करण्यांत त्याला खरा आनंद वाटे. सुखोपभोग म्हणजे त्याच्या मतें पाप व धनदौलत, इस्टेट असणें लाजिरवाणें. या जीवनांत सुख मिळवूं पाहणें म्हणजे पुढें कायम नरकाचा धनी होणें होय असें तो सांगे. स्वतःचा उद्धार व्हावा असें वाटत असेल त्यानें दारिद्र्याचें व्रत घ्यावें, अंगावर चिंध्या घालाव्या, केस कसे तरी वाढवावे, स्वतःला असुखी करावें, ईश्वराच्या आज्ञा पाळाव्या व आपल्या (जॉनच्या) म्हणण्याप्रमाणें वागावें, असें जॉन दि बॅप्टिस्ट प्रतिपादीत असे.

ही मतप्रणाली जरी प्रखर वैराग्याची व जरा असंस्कृत असली, तितकीशी सुंदर नसली, तरी येशू तिच्याकडे ओढला गेला. जॉनप्रमाणेंच तोहि बंडखोर होता, रूढींचा द्वेष्टा होता. त्याला आजूबाजूच्या लोकांच्या दंभाची मनस्वी चीड येई. जॉर्डन नदीच्या पाण्यानें येशूला शुद्ध करून घेऊन नवदीक्षा देण्यांत आली. तो जॉनचा मुख्य शिष्य, पट्टशिष्य झाला.

पुढें जॉनला अटक झाली व येशू एकटाच राहिला. तो रानावनांत भटकत राहिला. मूसा, बुद्ध वगैरेंच्याप्रमाणेंच त्यानेंहि केलें. अनंत आकाश व निर्जन वन यांच्या सांनिध्यांत राहून तो विचार करूं लागला. त्या गंभीर शांततेंत त्याची विचारवेल फुलली व बहरली. तो आपल्या जन्मग्रामीं परत आला. आपल्या लोकांना नवीन संदेश द्यावयास तो अधीर झाला होता.

पण त्याला धोंडे मारून त्याची हुर्रेवडी उडविण्यांत आली! त्याच्या कुटुंबीयांनीं त्याला हांकलून दिलें व 'त्याचा आमचा कांहींहि संबंध नाहीं, तो एक भटक्या व निकामी माणूस आहे' असें म्हटलें. नाझारेथच्या प्रमुख नागरिकांनीं 'जर येथील शांततेंत तूं व्यत्यय आणशील, बिघाड करशील तर तुला कड्यावरून खालीं लोटून देऊं' अशी धमकी दिली. भटकून भटकून बाळ परत घरीं आला तों सारे दरवाजे आपणास बंद आहेत असें त्याला आढळून आलें. रानांतील पशूंनाहि गुहा असते, पक्ष्यांनाहि घरटीं असतात, पण नाझारेथच्या या परित्यक्ताला मात्र डोकें टेंकावयाला कोठेंहि जागा नव्हती.

येशू जूडाच्या डोंगरांत भटकत राहिला. मानवजातीनें त्याला उडाणटप्पू ठरविलें होतें. जॉन दि बॅप्टिस्ट याच्याप्रमाणें त्यालाहि आढळून आलें कीं, माणसें पशूंच्याच प्रतिकृती आहेत. निराशेच्या गर्तेत पडलेले लोक त्याच्या-भोंवतीं गोळा झाले. कोळी, कामगार वगैरे दरिद्री लोक त्याचे अनुयायी झाले. त्यानें त्यांना भावी सुखाची—स्वर्गांतील राज्याची—आशा दाखविली, अंधारमग्नांना आशेचा किरण दाखविला. "सोडा आपलें घरदार" तो म्हणाला, "व चला माझ्या पाठोपाठ. प्रभूच्या नव्या राज्यांत आपण शहरें, पुरें, पट्टणें हिंडत जाऊं, या गांवाहून त्या गांवीं जाऊं, पृथ्वीवर सर्वत्र प्रभूचें राज्य स्थापूं, ईश्वराचा झेंडा चोहोंकडे नेऊं."

त्याच्याभोंवतीं जमा झालेले भिकारी म्हणजे बेजबाबदार व मजा करूं पाहणाऱ्या लोकांचा जथा! त्याना खाणेंपिणें व भांडणें या गोष्टी आवडत. एकदां एका गांवीं त्यांचें स्वागत कोणींच केलें नाहीं म्हणून त्या गांवाला काडी लावावयाला ते निघाले; पण ख्रिस्तानें त्यांचें मन वळविलें व त्यांना तसें करूं दिलें नाहीं. जगांतल्या रूढींकडे पाहून तोंड वेंगाडण्यांत त्याना परमानंद वाटे. रविवारीं म्हणजे प्रार्थनेच्या पवित्र दिवशीं कांहीं वेडेंवांकडें, अपवित्र काम करतांना ते कोणास आढळले तर ते असा युक्तिवाद करीत कीं, "लोकांसाठीं रविवार आहे, रविवारसाठीं लोक नाहींत." जे त्यांचे ऐकत नसत, ऐकावयाला तयार नसत, त्यांना ते शिव्याशाप देत व त्यांची निंदा करीत. "तुम्ही जणूं मृतवत्, मुडदे आहां!" असें ते त्यांना हिणवीत. ईश्वरानें त्यांचा नाश करावा म्हणून ते प्रार्थना करीत. सोडोम व गोमारा येथील लोकांचा जसा पूर्वी प्रभूनें नायनाट केला तसाच याहि लोकांचा त्यानें नायनाट करावा म्हणून ते प्रभूला प्रार्थीत. ते जणूं गॅलिलींतले समाजवादीच होते! अनुयायी फार अतिरेक करूं लागले तर त्यांचा मुख्य नेता ख्रिस्त त्यांस आवरी; पण खुद्द येशूहि कधीं कधीं अत्यंत संतापे, प्रक्षुब्ध होई. ख्रिस्ताची वाणी वा त्याचीं कृत्यें अद्यापि पुरेशीं सुसंस्कृत झालीं नव्हतीं. आपला संदेश न ऐकणाऱ्यांवर तो संतापे, त्याला धीर धरवत नसे. तो उतावळा व अधीर होता. निराशेच्या भरांत एकदां तो म्हणाला, "जो माझ्या शब्दावर विश्वास ठेवणार नाहीं तो नरकांत जाईल." आयुष्याच्या या काळांत त्याच्या ठायीं सहनशीलता नव्हती, सौम्यता नव्हती. तो एकदम

रागावे, संतापे, प्रक्षुब्ध होई. कधीं कधीं क्रोध आवरणें त्याला अशक्य होई. जोरदार व तेजस्वी शब्दांनीं ऐकणाऱ्यांचा हृदयपालट झाला नाहीं कीं तो हात उगारावयासहि मागेंपुढें पाहत नसे. हातांत चाबूक घेऊन तो अन्यायाचें शासन करण्यास उभा राही ; हातीं तरवार घेऊन तो पृथ्वीवर स्वर्गाचें राज्य आणूं पाही.

पण त्याच्या ठायीं दैवी विनोदहि होता व मुलांवर तर तो अपार प्रेम करी. तो जेथें जेथें जाई, तेथें तेथें त्याच्याभोंवतीं मुलें गोळा होत व त्याला म्हणत, "या, आमच्याबरोबर खेळायला या." तो त्यांच्याबरोबर हंसे, खेळे. एक मुलगा खांद्यावर आहे, एक हाताला ओळंबा घेत आहे, पुष्कळ जण त्याच्या पाठीमागून येत आहेत, अशा थाटांत त्याची ती ऊन लागून तांबूस पिंगट झालेली धिप्पाड मूर्ति रस्त्यांवरून जातांना नेहमीं दिसे. तीं मुलें पॅलेस्टाइन-मधलीं लोकगीतें मोठमोठ्यानें गात व हावभाव करीत त्याच्याबरोबर हिंडत. ख्रिस्ताचें एकाद्या गांवीं आगमन म्हणजे तेथल्या मुलांना जणूं सुटीचा दिवस ! तो नाझारेथचा गोड मुरलीवाला मुलांना इतकें मोहून टाकी कीं, पृथ्वीच्या टोंकापर्यंत कोठेंहि त्याच्याबरोबर जावयास तीं आनंदानें तयार असत.

येशूची सारी आशा त्या बाळगोपाळांवर होती. "हे माझे बाळसंवगडी म्हणजेच जगाची, प्रभूची व माझी आशा !" तो म्हणे, "ईश्वराचें राज्य अशा सरळ, निष्पाप, निर्मळ व प्रेमळ मुलांसाठींच असतें. मुलांना त्याचें म्हणणें पट्कन् समजे. नवीन राज्याच्या ज्या अद्भुत कथा तो सांगे त्या त्या मुलांना खऱ्या वाटत. त्यांत त्या निष्पाप बालकांना असंभाव्य वा अशक्य कांहींच वाटत नसे. तो स्वतः त्या मुलांना घेऊन त्या रम्य आनंदभुवनांत जाणार होता. "त्या नवीन मंगल भूमींत द्वेष–मत्सर असणार नाहींत, दुःख असणार नाहीं, रोग असणार नाहींत, मरण येणार नाहीं !" असें तो सांगे. मुलें त्याच्याजवळ बसून तल्लीनतेनें ऐकत, आश्चर्यानें त्यांचे डोळे विस्फारित होत. येशू त्यांच्या डोळ्यांसमोर जीं कल्पनारम्य चित्रें उभीं करी, त्यांमुळें त्यांचीं तोंडें आशेनें व श्रद्धेनें चमकूं लागत. "या पृथ्वीवर हीं मुलेंच नवीन स्वर्ग उभारतील, तो निर्माण करण्यास मदत करतील, मोठ्या माणसांच्या हातून हें काम होणार नाहीं," असें त्याला वाटे. जे वयानें वाढलेले असतात ते बिघडलेले असतात. साहसी वृत्ति, आत्मविश्वास, त्याग, श्रद्धा, इत्यादि गुण

त्यांच्या ठायीं नसतात. प्रत्यक्ष वस्तुस्थितींतील वैगुण्यें, जगांतील दुःखें व निराशा त्यांच्या हृदयांत खोल रुतून बसलेलीं असतात. ते केवळ संसारी असतात, व्यवहारापुरतें पाहतात. या रानटी जगांतील व्यावहारिक शहाण-पणामुळें त्यांना सौम्य व शांत अशा एका नव्या जगांतील सौंदर्य दिसत नाहीं. ख्रिस्त वयानें मोठ्या असलेल्या प्रौढांजवळ स्वर्गीय राज्याविषयीं बोले तेव्हां त्यांना त्याचा अर्थहि समजत नसे. ते गैरसमज करून घेत व त्या राज्यांत कोणाला कोणते अधिकार मिळणार याबाबत त्याच्याशीं भांडूं लागत ! ते त्याला विचारीत, "तें स्वर्गाचें राज्य आल्यावर तुमच्या उजव्या बाजूला कोण बसणार, डाव्या बाजूला कोण बसणार, मंत्री कोण होणार, सेनापति कोण होणार ?" ते लोक वयानें वाढलेले असले तरी एका दृष्टीनें अडाणी मुलेंच आहेत असें त्याला आढळून येई. दरिद्री, करुणास्पद पण वंदनीय मुलें. वाईट करण्याची त्यांची शक्ति तेवढी वाढलेली होती; इतर बाबतींत ते मुलेंच होते, अपरिपक्वच होते. आणि भोंवतालच्या असल्या लोकांत वावरतां वावरतां, त्यांचे अडाणी प्रश्न ऐकतां ऐकतां, ख्रिस्ताला हळू-हळू कळून चुकलें कीं, तो मुलांमध्येंच वावरत होता. कांहीं मोठीं मुलें, कांहीं छोटीं मुलें, पण सारीं मुलेंच ! त्या मुलांच्या जगांत एकटा तोच काय तो मनानें व बुद्धीनें वाढत होता, प्रौढ व परिपक्व होत होता. बौद्धिक व नैतिक-दृष्ट्या तोच तेवढा वाढत होता. आणि हें कळून आल्यावर तो रागावेनासा झाला. तो त्यांची कींव करूं लागला. त्याला त्यांच्याबद्दल करुणा वाटूं लागली.

तो त्याच्या आयुष्यांतला संक्रमणाचा क्षण होता. सहानुभूतीची व प्रेमाची वेगळीच दृष्टि त्याला फुटली : मुलांचा द्वेष वा मत्सर करण्यांत, त्यांच्यावर रागावण्यांत, त्यांच्याशीं आदळआपट करण्यांत काय अर्थ ? त्यांना शिव्याशाप देण्याचा, त्यांना शिक्षा करण्याचा काय उपयोग ? ज्यांना विचार नाहीं, ज्ञान नाहीं, त्यांच्यावर तरवार उगारण्याचा काय उपयोग ? कां आपण फुकट दांत-ओठ खावे ? प्रेमळ शब्दांनींच त्यांची कानउघाडणी करणें बरें नव्हे का ? करुणेच्या, क्षमेच्या शस्त्रानेंच त्यांना शिक्षा करणें अधिक शहाणपणाचें नाहीं का होणार ?

म्हणून त्यानें आपला पवित्रा बदलला, आपलें धोरण बदललें. जगांत

झगडे उत्पन्न करण्याची इच्छा आतां त्याच्या ठायीं राहिली नाहीं. त्यानें आपला तापट स्वभाव सोडला. तो शांत व संयमी झाला. अत्याचारानें वा हिंसेनें अन्यायाविरुद्ध लढणें त्यानें सोडून दिलें. सदैव युद्धाची भाषा वापरून पापाला डवचण्याचें वा चिडविण्याचें त्यानें बंद केलें. इतकेंच नव्हे तर तो शांततेच्या सनातन युद्धातला शांततेनें लढणारा कर्मवीर बनला. तो चाबूक व तरवार टाकून देऊन क्षमा, दया व प्रेम या अधिक प्रभावी व प्रबळ शस्त्रास्त्रांनीं संनद्ध झाला. तो मानवांमध्यें सदिच्छेचा संदेश पसरवीत फिरणारा परिव्राजक बनला. " शत्रूला ठार मार " अशी प्रार्थना देवाला करणारा पूर्वीचा येशू आतां राहिला नाहीं. तो आतां पर्वतोपनिषद् देणारा, परिणतप्रज्ञ असा सर्वस्वीं निराळा महात्मा झाला. आतां त्याचा संदेशहि बदलला : शत्रूवर प्रेम करा, त्याच्या अज्ञानाची कींव करा, अडाण्यांना कळावें—समजावें म्हणून त्यांना शिकवा, तुम्हांला शिव्याशाप देतील त्यानाहि आशीर्वाद द्या, छळणाऱ्यांच्याहि आत्म्यांसाठीं प्रार्थना करा, दुष्ट हृदयाच्या लोकांना रोगी समजून त्यांची शुश्रूषा करा, त्यांचें हृदय शुद्ध व निरोगी होण्यासाठीं दयाळू वैद्याप्रमाणें त्याच्यावर प्रेम करा, आजारी माणूस सेवा करणाऱ्यासच वाताच्या भरांत मारतो, तद्वत् हे रोगी हृदयाचे मानव त्रास देऊं लागले, मारूं लागले, तरीहि त्यांची सेवाच करीत जा.

शेवटीं ख्रिस्ताला अटक झाली. त्याचे सारे शिष्य आपणहि गिरफदार होऊं या भीतीनें पळून गेले ! त्याचे शत्रू त्याच्या रक्तासाठीं तहानले होते; पण सॉक्रेटिसाप्रमाणेंच ख्रिस्तानेंहि आपल्या बचावाची कांहींहि तयारी केली नाहीं. हातांत तरवार घेऊन पीटर त्याला वांचवूं पाहत होता; पण येशूनें मंद स्मित केलें. भाले, तरवारी वगैरे नेहमींचीं जुनाट हत्यारें घेऊन मारण—मरणाचा खेळ खेळण्याच्या स्थितीच्या पलीकडे तो गेला होता. तो या झगड्याच्या पलीकडे गेला होता. तीं पोरकट भांडणें त्यानें केव्हांच मागें टाकलीं होतीं ! तरवारीनें मिळविलेल्या विजयातून पुनः नवीन युद्धेंच निर्माण होतात ही गोष्ट त्यानें नीट ओळखली होती. आश्चर्यचकित झालेल्या पीटरला तो म्हणाला, " म्यानांत घाल ती तरवार ! जे तरवार हातीं घेतील ते तरवारीनेंच मरतील ! "

रोमन सैनिकांसमक्ष उच्चारलेले ते शब्द म्हणजे जणूं भविष्यवाणीच होती !

पण रोमनांनीं त्या शब्दांकडे लक्ष दिलें नाहीं. पायलेटनें त्याला मरणाची शिक्षा फर्मावली! रोमन रिवाजाप्रमाणें क्रॉसवर खिळे ठोकून त्याला ठार मारण्यांत आलें! ख्रिस्ताबरोबर दोन चोरहि त्याच्या दोन्ही बाजूंस क्रॉसवर चढविले गेले. त्यांनीं अपार वेदना होऊं लागल्यामुळें शिव्याशाप दिले ; पण ख्रिस्तानें क्षमा केली. क्रॉसवरून लोंबकळणाऱ्या त्या तिघांच्याहि मरण-काळच्या किंकाळ्या मात्र एकमेकींत मिसळून गेल्या. अव्यवस्थित अशा या जगांत कोठेंच नीट न बसूं शकणारे असे ते तिघे दुर्दैवी, करुणास्पद जीव होते!

— ४ —

मानवी ख्रिस्ताचें माझ्या मतें हें असें चित्र आहे. घरच्यांनीं नाकारलेला, नागरिकांनीं धमकावलेला, मित्रांनीं सोडलेला, शत्रूंनीं क्रॉसवर चढविलेला, अनुयायांकडून आतांपर्यंत विपरीत अर्थ केला गेलेला असा हा येशू ख्रिस्त कांहीं जादूगार नव्हता. त्यानें चमत्कार केले नाहींत. पण द्वेषानें पेटलेल्या या जगांत त्यानें दाखविलेलें प्रेम हाच खरोखर थोर व अपूर्व चमत्कार नव्हे काय? त्यानें केलेल्या चमत्कारांच्या म्हणून ज्या कथा गॉस्पेलसमध्यें वर्णिल्या आहेत, त्यांहून त्यानें शत्रूंबद्दल दाखविलेलें प्रेम हा कितीतरी पटींनीं मोठा चमत्कार नव्हे काय? अर्वाचीन रूढ अर्थानें तो चर्चवाला नव्हता. त्याला विधिविधानांचा तिटकारा होता. कोंडलेलीं व गजबजलेलीं प्रार्थना-मंदिरें त्याला आवडत नसत. त्याचें चर्च मोकळ्या जागेंत होतें. रस्त्याच्या कडेचा एकादा दगड हेंच त्याचें व्यासपीठ, तद्वतच जाडाभरडा व प्रवासामुळें जीर्ण-शीर्ण झालेला एकादा झगा हाच त्याचा पोषाख असे आणि आपल्या मातृ-भूमीचीं गाणीं गाणारे ज्यू मजूर त्याचे साथीदार असत. ख्रिस्त आज जिवंत असता तर आपल्या नांवानें चालणारीं युद्धें, तद्वतच करण्यांत येणारे द्वेष-मत्सर, छळ व अपराध पाहून तो विस्मितच झाला असता. ज्या ज्यू राष्ट्रानें ख्रिश्चनांना देव दिला त्याच ज्यूंची निंदा चर्चवाले करीत आहेत असें त्याला दिसलें असतें. एका ज्यू धर्ममार्तंडानें त्याला मरणाची शिक्षा फर्मावली येवढ्याचसाठीं आपली सारी ज्यू जात धिक्कारिली जात असलेली त्याला दिसली असती व त्यानें ख्रिश्चन चर्चला सौम्यपणें सांगितलें असतें कीं,

आपणास जन्म देणारी माताहि एक ज्यू बाईच होती. ख्रिस्त जर आज जर्मनींत येईल तर तेथले ख्रिश्चन विद्यार्थी त्याला ज्यू समजून त्याच्या पाठीस लागतील. तो रुमानियांत जाईल तर त्याला तेथले लोक धांवत्या आगगाडीच्या डब्याच्या खिडकींतून बाहेर फेंकून देतील. तो पॅलेस्टाइनमध्यें जाईल तर अरब लोक त्याला ठार करतील व जवळच उभें असणारें ख्रिस्ती धर्मी इंग्रज सैन्य ती गंमत पाहत राहील. अमेरिकेंतहि पुष्कळशा कॉलेजांत ख्रिस्ताला प्रवेश मिळणार नाहीं. थोडक्यांत म्हणजे आज जर ख्रिस्त जिवंत होऊन येईल तर त्यालाहि ख्रिश्चन राष्ट्रांना स्वतःच्या धर्माकडे घेऊन जाणें अशक्यप्राय होईल व मान हालवून म्हणावें लागेल, "हे प्रभो, हे तात, यांना क्षमा कर. आपण काय करीत आहों हें यांना कळत नाहीं." तर मग ख्रिस्ताचें जीवन काय फुकटच गेलें? तो काय उगीचच जगला? बिलकुल नाहीं. बर्नार्ड शॉ सर्वांना बजावून सांगत आहे कीं, "ख्रिस्ताचें जीवन विफल झालें असें अद्यापि म्हणतां येणार नाहीं. कारण, त्याच्या पद्धतीनें प्रयोग करून पाहण्याचें शहाणपण अद्यापि कोणींहि दाखविलेलें नाहीं."

पण शॉच्या या म्हणण्यांत नेहमींप्रमाणें अतिशयोक्ति आहे. कारण दोन माणसांनीं ख्रिस्ताच्या पद्धतीचा अवलंब केलेला आहे: एक म्हणजे ज्यू तत्त्वज्ञानी स्पायनोझा व दुसरे म्हणजे हिंदु धर्मी गांधी. ख्रिश्चन जनतेला पुनः ख्रिस्ताकडे घेऊन जाण्यांत ज्यू व हिंदु यांना अद्यापिहि यश येण्याचा संभव आहे.

## प्रकरण ७ वें

# मातृहत्यारा सम्राट् नीरो

## — १ —

पूर्वेकडे आपण जरा फिरून आलों. चला पुनः रोम शहरीं. सीझर मेल्यावर त्याचा एक चुलत नातू गादीवर बसला. त्याचें नांव ऑक्टेव्हियस. त्यानें दुसरें त्रिकूट बनविलें. ॲन्टोनी, लॅपिडस व ऑक्टेव्हियस या त्रिकूटानें सीझर, पॉंपे व क्रॅशस यांच्याप्रमाणेंच सारी पृथ्वी आपसांत वांटून घेतली. तिघांनाहि लूट करण्यास नीट वाव मिळावा म्हणून ही विभागणी करण्यात

आली. आपलें काम नीट, निर्वेध व सुरळीतपणें चालावें यासाठीं कांहीं लोकांना आपल्या मार्गांतून दूर करणें त्यांना भाग होतें! त्यांच्या अवकृपेला बळी पडलेल्यांत सुप्रसिद्ध वक्ता सिसरोहि होता. सिसरो मारला जावा असें अॅन्टोनी व लॅपिडस यांना वाटत होतें. ऑक्टेव्हियस प्रथम प्रथम त्याला वांचवूं इच्छीत होता. पण थोड्याशा विचारविनिमयानंतर सिसरोला ठार मारण्याच्या बाबतींत तिघांचेंहि एकमत झालें. प्ल्युटार्क लिहितो, "त्या तिघांत झालेल्या कराराच्या अटी पुढीलप्रमाणें होत्या :—सीझर (ऑक्टेव्हियस) यानें सिसरोची बाजू सोडावी, लॅपिडसनें आपला भाऊ पॉलस याचा त्याग करावा व अॅन्टोनीनें आपला मामा ल्यूसियस सीझर याला सोडावें." अशा रीतीनें त्यांच्या मनांतल्या क्रोधद्वेषांनीं त्यांची माणुसकी नष्ट केली. कोणताहि हिंस्र वन्य पशु सुद्धां माणसाहून अधिक क्रूर व रानटी नसतो हें त्यांनीं जगाच्या निदर्शनास आणून दिलें. क्रोधांध माणसाच्या हातीं सत्ता आल्यास तो पशूहूनहि पशु होतो.

त्या तिघांनीं आपआपले कांटे काढून टाकून शिवाय आणखी शेंकडों जणांची कत्तल केली. पण नंतर ते तिघे पुनः नेहमींप्रमाणें आपसांत भांडूं लागले. त्या तिघांच्या तंट्यांत लॅपिडस केव्हांच मागें पडला व शेवटीं मुख्य प्रतिस्पर्धी दोनच उरले. अॅन्टोनी ईजिप्तमध्यें गेला व सीझरप्रमाणें क्लिओपाट्रा हिच्या प्रेमपाशांत सांपडला. ऑक्टेव्हियसला जिंकण्याचा एक दुबळा प्रयत्न त्यानें केला; पण खि. पू. ३१ या वर्षीं अॅक्टियमच्या आरमारी लढाईत त्याचा मोड झाला व ऑक्टेव्हियस रोमचा प्रतिस्पर्धीहीन स्वामी झाला. त्यानें 'ऑगस्टस' म्हणजे 'मोठा' ही अहंकारी पदवी धारण केली व रिपब्लिकची परंपरा राखण्याच्या ढोंगाआड सर्व सत्ता हळूहळू आपल्या हातीं घेतली. तो पहिला रोमन सम्राट् झाला. त्यानें एकेचाळीस वर्षें राज्य केलें (खि. पू. २७ ते इ. स. १४). आपण रोमनांचा सम्राट्, नेता व देव आहों, अशी घोषणा त्यानें केली. त्याचें शरीर म्हणजे जणूं देवाचें, त्याचा राहता राजवाडा म्हणजे जणूं पवित्र देव–मन्दिर अशी त्याची समजूत होती. त्याच्या ठायीं उतावीळपणा नव्हता. तो धाडशी व कारस्थानी होता. कोणतेंहि कपट करावयाला तो मागेंपुढें पाहत नसे. थॉमस डी क्विन्सी आपल्या 'सीझर्स' नामक पुस्तकांत लिहितो, "इतिहासांत नमूद असलेल्या कोणत्याहि कमालीच्या दुष्टपणाच्या

कृत्यांशीं तुलनेंत कमी पडणार नाहींत, अशीं ऑगस्टसचीं दुष्कृत्यें होतीं. देवांना खुष करण्यासाठीं त्यानें एकदां स्वतःच्या हातानें यज्ञवेदीवर अनेक कैद्यांचा बळी दिला. एकदां एका युद्धानंतर आपल्या सैन्यास पुरेसा पगार देतां येत नाहीं असें पाहून त्यानें कांहीं श्रीमंतांस ठार केलें व त्यांच्या इस्टेटी सरकारजमा करून सैन्याचा पगार भागविला! मृत्युशय्येवर असतां आपण आतां जगांतून जाणार म्हणून आपलीं शेवटचीं स्तुति-स्तोत्रें गावयास त्यानें नोकरांना सांगितलें. आपण फारच दिव्य व भव्य जीवन जगलों असें त्याला वाटे. इतकी उदात्त भूमिका केल्यावर पडद्याआड जाण्यास तो तयार होता, पण जातां जातां स्वतःचे पोवाडे ऐकूं इच्छीत होता."

ऑगस्टसमागून टायबेरियस गादीवर आला. त्यानें इ. स. १४ ते ३७ पर्यंत राज्य केलें. रोमनांच्या मानानें तो कांहीं फार वाईट नव्हता. त्याला 'दारुडा टायबेरियस' म्हणत. जरा अधिक कठोरपणें लिहिणारे इतिहासकार त्याच्या बाबतींत म्हणतात, 'तो दारू व रक्त पिऊन मस्त असे.' त्यानें कांहीं रक्त सांडलें हें खरें. 'पण त्या काळाच्या मानानें त्यानें सांडलेलें रक्त फार होतें असें मात्र म्हणतां येणार नाहीं.' इतर सम्राटांप्रमाणें त्यानेंहि अनेकांना फांशीं दिलें. दुसऱ्यांना मारण्यांत त्याला आनंद वाटे. पण तुलना केली असतां त्यानें कमी बळी घेतले, असेंच म्हणावें लागेल. आयुष्याचा बराचसा भाग त्यानें कॅप्रि बेटावर घालविला. हें बेट समुद्रसपाटीपासून एक हजार फूट उंच होतें. ज्यांच्यावर त्याची खप्पा मर्जी होई त्यांना तो तेथील टेकड्यांवरून समुद्रात लोटी व तें दृश्य मजेनें पाही. आपला मुख्य प्रधान सेजानस याच्या लहान मुलीला त्यानें ठार केलें. हीच त्यानें केलेल्यांपैकीं सर्वांत जास्त दुष्टपणाची व नीचपणाची गोष्ट होय. तो प्रधानहि त्या वेळीं मारला गेला. त्या लहान मुलीनें विचारलें, 'येवढ्याशा लहान वयांत मीं असें काय पाप केलें आहे कीं, त्यासाठीं तुम्हीं मला ठार मारावें?' पण सम्राटाचा शब्द म्हणजे कायदा होता. अर्थात्‌च तिला उत्तर कोण देणार? तिला तुरुंगात नेऊन गळा दाबून ठार मारण्यांत आलें!

तरीहि टायबेरियस हा प्राचीन सम्राटांतला कमींत कमी दुष्ट सम्राट् होता. तो मेल्यावर कॅलिगुला सम्राट् झाला. त्यानें इ. स. ३७ ते इ. स. ४१पर्यंत म्हणजे फक्त चार वर्षें राज्य केलें; पण या चारच वर्षांत त्यानें अनंत क्रूर कर्में

केली. त्यानें स्वतःच्या तीन बहिणींवर बलात्कार केला! करमणूक म्हणून तो माणसें ठार करी! एकदां सर्कशीच्या रंगणांतील हिंस्र पशूंना पुरेसें अन्न नव्हतें म्हणून त्यानें त्यांच्यासमोर कैद्यांची रांगच्या रांग उभी करून त्यांना पोटभर जेवण दिलें! कधीं कधीं मेजवानीच्या वेळीं मेजवानीचाच एक गंमतीचा भाग म्हणून तो आपल्या समोर लोकांना फाशीं देववी! तरवारीच्या एकाच घावासरशीं डोकें उडविलेलें पाहण्यांत त्याला विशेष आनंद होत असे. त्यानें एकदां दोघां कॉन्सल्सना घरीं जेवणास बोलाविलें होतें. तो एकदम खो खो करून हंसूं लागला तेव्हां त्या कॉन्सल्सनीं नम्रतेनें विचारलें, ‘ हंसण्याचें कारण काय?’ त्यावर त्यानें उत्तर दिलें, ‘ डोक्यांशिवाय तुम्हां दोघांचीं धडें कशीं दिसतील असा विचार मनांत आल्यामुळें मला एकदम हंसू आलें.’

त्यानें खुनाच्या कलेंत पारंगत व्हावयाचें ठरविलें व तें शिक्षण पुरें घेतलें. लॅटिन इतिहासकार सुएटोनियस लिहितो, “ बलिदानार्थ काढलेल्यांच्या वेदना कशा वाढतील, त्या बराच वेळ कशा टिकतील, हें तो नेहमीं पाहत असे. तो सागत असे, ‘ असे घाव घाला कीं, आपण मरत असल्याची जाणीव त्या मरणाच्या मुखीं पडणाऱ्यास नीट व्हावी; एक घाव नि दोन तुकडे असें करूं नका.’ ”

ज्युपीटर देव आपणाशीं नेहमीं बोलत असतो असें तो म्हणे. रस्त्यांतून तो आपला एक कान जरा उंच करून चाले व पुटपुटत चाले. जणूं काय देवाशींच आपलें संभाषण चाललें आहे असें तो भासवी. चंद्राला तो आपली बायको म्हणे. त्यानें आपल्या एका घोड्याला चंद्राचा उपाध्याय म्हणून नेमलें होतें. थोडक्यांत सांगावयाचें तर तो वेडा होता. त्याच्यांत राम नव्हता. त्याच्या या दुष्ट लहरी नष्ट होतील अशी आशा नव्हती. ज्यूलियसपासून नीरो-पर्यंत सारेच सीझर वेडे होते. त्यांची वेडेपणाची लहर जणूं आनुवंशिक होती! रोमनांनीं कॅलिगुलाचे हे वेडेचार चार वर्षें सहन केले. नंतर मात्र त्यांनीं त्याला ठार केलें! पुढचा सम्राट् कॅलिगुलाचा चुलता क्लॉडियस यानें इ. स. ४१ ते इ. स. ५४ पर्यंत राज्य केलें. तो रोगट, नेभळट, असंस्कृत व किळस-वाणा माणूस होता. हंसतांना तो तोंडानें एक विशिष्ट आवाज करी, बोलतांना अडखळे, रागावला कीं एखाद्या मूर्खाप्रमाणें वाटेल तसे हातवारे करी. स्वतःच्या मूर्खपणाच्या करमणुकीसाठीं त्यानें साऱ्या रोमचें जणूं सर्कशींत परिवर्तन केलें!

रोमन लोक त्याच्याकडे सर्कशींतला एक विदूषक या नात्यानेच पाहत. त्याला प्रजेविषयीं प्रेम नव्हतें व प्रजेलाहि त्याच्याबद्दल आदर नव्हता.

पूर्वजांप्रमाणें त्यानेंहि लोकांस छळण्याचे नाना प्रकार शोधून काढले. जुन्या ग्लॅडिएटर लढाया त्याला फिक्कट वाटत. सम्राटाचें समाधान होण्याइतकें मारण–मरण त्यांत नसे म्हणून त्या खेळांत त्यानें अंगावर कांटा आणण्या-सारख्या आणखी कांहीं प्रकारांची भर घातली. खरोखरच कैद्यांनीं भरलेलीं गलबतें टायबर नदींत उभीं करण्यांत आलीं व एकोणीस हजार कैदी एक-मेकांवर तुटून पडले! ते आपापले प्राण एकमेकांपासून वांचवूं लागले. किती तरी कैदी ठार झाल्यावर ती करमणुकीची लढाई संपली.

तो स्वतःला मोठा खेळाडू समजे. एकदा दोघां ग्लॅडिएटरांनीं परस्परांस भोंसकून ठार केलें तेव्हां त्यानें त्यांच्या दोन्ही तरवारींचे नक्षीदार कांटे केले; त्या कांट्यांनीं तो जेवे. जेवतांना जणूं त्या दोन मृतात्म्यांची तो स्मृतीच करी! पूर्वीच्या सम्राटांनीं आपणांविरुद्ध कट करणाऱ्यांस ठार मारलें होतें. क्लॉडियस त्यांच्याहि पुढें गेला. त्याच्या मित्रांना पडलेल्या स्वप्नांत जे लोक त्याच्याविरुद्ध कट करीत आहेत असें त्यांना दिसे, त्यांनाहि तो ठार करी. एकाद्यानें, जर "माझ्या स्वप्नांत अमुक माणूस आला व तो तुमच्याविरुद्ध कट करींत आहे असें मला दिसलें" असें सांगितलें, तर त्या स्वप्नांत दिसलेल्या खऱ्या माणसास लगेच ठार मारण्यांत येई. क्लॉडियसच्या मित्रांना आपणांस नको असलेले लोक जगांतून नाहींसे करण्याला हा फारच सोपा उपाय सांपडला होता.

— २ —

मागील कांहीं पृष्ठांत रोमच्या कांहीं प्राचीन सम्राटांनीं केलेल्या अत्याचारां-पैकीं पाशवी क्रूरतेचे कांहीं प्रकार नमुन्यादाखल दिले आहेत. ते सारे लज्जा-स्पद आहेतच, पण पुढें नीरोनें केलेल्या अनन्वित प्रकारांचा ते प्रकार म्हणजे नुसता प्रारंभच होता. नीरो हा या सर्व तिरस्करणीय पिशुनांचा अनुकंपनीय मुकुटमणि होता.

नीरो हा क्लॉडियसच्या आग्रिप्पिना राणीला तिच्या पहिल्या नवऱ्यापासून झालेला मुलगा. इ. स. ३७ मध्यें म्हणजे ख्रिस्ताला क्रॉसवर चढविल्यानंतर चार वर्षांनीं तो जन्मला. पुढें त्याच्या आईनें क्लॉडियसशीं लग्न केलें व ती रोमची राणी झाली. नीरो तेव्हां अकरा वर्षांचा होता.

आग्रिप्पिना ही क्लॉडियसची चौथी पत्नी. त्यानें पहिल्या दोघींना सोड-चिठ्ठी दिली होती व तिसरीला ठार केलें होतें. आपलीहि तीच गत होऊं नये म्हणून नीरोच्या आईनें या नव्या नवऱ्यालाच विष देऊन ठार केलें! क्लॉडियस विषप्रयोगानें मेला तेव्हां नीरो सतरा वर्षांचा होता. तो कायदेशीर-रीत्या गादीचा मालक नव्हता. कारण, क्लॉडियसला ब्रिटॅन्निकस नामक औरस मुलगा होता. पण बादशहा कोणास करावयाचें हें बादशाही गार्डांच्या हातीं असे. ते वाटेल त्याची निवड करीत व सीनेटरांना त्याला मान्यता द्यावी लागे. न दिली तर गार्डांच्या तरवारी तयारच असत! राजा मरतांच आग्रिप्पिना आपल्या पुत्राला--नीरोला--घेऊन बादशाही गार्डांच्या मुख्याकडे--बुऱ्हसकडे—गेली. ती सुंदर व मोहक होती. तिला पावित्र्याची मुळींच चाड नव्हती—बुऱ्हसला चुंबनें देऊन व त्याचीं चुंबनें घेऊन तिनें प्रार्थना केली व चुंबनांच्या भरीला प्रत्यक्ष भरपूर लांचहि दिली. तिनें बुऱ्हसला या दोन प्रकारांनीं पटवून दिलें कीं, गादीवर ब्रिटॅन्निकसपेक्षां नीरोचाच हक्क अधिक आहे.

शेवटीं मोठ्या समारंभानें सम्राट् म्हणून नीरोच्या नांवें द्वाही फिरविण्यांत आली. ईश्वरानें नेमलेला रोमचा सम्राट् म्हणून तो गादीवर बसला. ईश्वराची ही इच्छा रोमनांच्या अनुभवास पूर्णपणें यावी म्हणून त्यानें ब्रिटॅन्निकसला विष देऊन ठार केलें! आग्रिप्पिनानें क्लॉडियसला नव्हतें का ठार केलें? सुपात्र मातेचा तो सत्पात्र पुत्र होता.

— ३ —

पांच वर्षेंपर्यंत राज्यकारभाराचीं सूत्रें हातीं घेण्याची इच्छा त्यानें दाखविली नाहीं; आई, बुऱ्हस व शिक्षक सिनेका यांना राज्यकारभार चालविण्याची त्यानें मुभा दिली. तो आपल्या मित्रांसह भरपूर दारू पीत राही, सर्व सुखांचा पेला ओंठांना लावून बसे. जवळच्या शेतकऱ्यांच्या डोक्यांवरील टोप्यांसारख्या टोप्या घालून व वेष बदलून तो व त्याचे मित्र सर्वत्र भटकत, लोकांना ठोकीत, बदडीत, यथेच्छ दारू पीत व रस्त्यांतून जाणाऱ्यायेणाऱ्यांस धरून गटारांत फेंकीत. असल्या बेताल गुंडगिरीच्या एका संचारसमयीं नीरोनें एका सीनेटराच्या पत्नीवर हल्ला केला तेव्हां त्यानें नीरोला मरे मरेतों मारलें.

तो एकाद्या सामान्य ठगाप्रमाणें खासगी रीतीनें व चोरून असा वागत होता, तोंपर्यंत रोम जरा सुरक्षित होतें. पण त्याच्या आईला त्याचें हें वर्तन

पसंत नसे. राज्याचा कारभार आपल्या मुलानें स्वतः सिंहासनावर बसून हांकावा असें तिला वाटत असे. पण नीरो सुखासक्त असल्यामुळें तिच्या म्हणण्याकडे लक्ष देत नसे. क्लॉडियसच्या मृत्यूपूर्वी त्याची मुलगी ऑक्टेव्हिया हिच्याशीं नीरोचें लग्न झालें होतें. तो रोम शहराची उपेक्षा करी, तद्वतच पत्नीकडेहि लक्ष देत नसे. ॲक्टे नामक ग्रीक दासकन्येसह तो उघडपणें राहूं लागला. आग्रिप्पिना पूर्णपणें निराश झाली. तिनें मुलाला परोपरीनें विनवून पाहिलें, ॲक्टे हिचा नाद सोडून देण्याबद्दल प्रार्थून सांगितलें, धमक्याहि दिल्या; पण कशाचाहि उपयोग झाला नाहीं. राजवाडा कौटुंबिक कलहाची युद्धभूमि बनला. नीरोच्या मित्रांनीं व खुशामत्यांनीं त्याची बाजू घेतली. ते त्याला म्हणत, "तुझी आई म्हातारी आहे; तिचें काय ऐकतोस? तिच्या हातचें बाहुलें नको बनूं. असा मागें मागें कां राहतोस? स्वतःच्या हातीं सत्ता घे. आईचें काहींहि चालूं देऊं नको." तो मित्रांच्या सल्ल्यानुसार वागूं लागला, त्यामुळें मायलेकरांना एकत्र राहणें अशक्य झालें. आग्रिप्पिना राजवाडा सोडून दुसरीकडे राहावयास गेली.

परिस्थिति दिवसेंदिवस अधिकाधिक बिघडतच चालली. ऑथो नामक एका प्रिय मित्राच्या पॉप्पिआ नामक पत्नीच्या प्रेमपाशांत नीरो सांपडला. ती सुंदर होती; पण सुंदर होती तितकीच अनिर्बंध होती. नीतीचा व तिचा मुळींच संबंध नव्हता. प्रख्यात इतिहासकार टॅसिटस लिहतो, "या सुंदरीजवळ प्रामाणिक मनाशिवाय बाकी सर्व कांहीं होतें." नीरो दृष्टीस पडल्या वेळींच तिनें रोमची सम्राज्ञी होण्याचें ठरविलें होतें; पण तिच्या महत्त्वाकांक्षेच्या आड तिचा पति, नीरोची पत्नी व नीरोची माता अशा तीन व्यक्ती येत होत्या. आपला पति व नीरोची पत्नी यांची अडचण, रोममध्यें त्या काळीं घटस्फोट ही अगदींच मामुली बाब असल्यामुळें, सहज दूर होण्यासारखी होती. पण आग्रिप्पिना हिची बाब मात्र जरा कठिणच होती. तिला कसें दूर करावें याचा विचार पॉप्पिआ करीत होती. शेवटीं ती या निर्णयावर आली कीं, नीरोच्या आईला ठारच मारलें पाहिजे.

एकदां ती नीरोजवळ अशा अर्थाचे थोडेसे सूचक शब्द सहज बोलली. नीरोच्या मनांतील मातृमत्सर, अहंकार, विषयासक्ति, मूर्खपणा, इत्यादि मनोविकार आपल्या कोमल व कपटी भाषणांनीं आणि हावभावांनीं प्रज्वलित

करून तिनें त्याला आपल्या कटांत ओढून घेतलें व असें भासविलें कीं, त्याची आई मेल्यावांचून त्याचा स्वतःचाहि बचाव होणार नाहीं, स्वतःच्या प्राणांसाठीं तरी त्याला आईचा प्राण घेणें अपरिहार्य होतें.

शेवटीं तो पॉप्पिआच्या योजनेंत सामील झाला. आईबरोबरचें भांडण मिटलें असें त्यानें जाहीर केलें व आईला एक हृदयस्पर्शी पत्र लिहिलें व बायी या ठिकाणीं आपल्या भेटीसाठीं बोलाविलें. तेथें उन्हाळयांत राहण्यासाठीं त्यानें ग्रीष्म–प्रासाद बांधला होता. आग्रिप्पिनाच्या मनातले सारे संशय नाहींसे झाले व ती बायी येथें गेली. नीरो तिला भेटला. त्याच्या डोळयातून अश्रुधारा वाहत होत्या. मायलेंकरें भेटलीं, आईनें मुलाला पोटाशीं धरलें, मुलानें आईला मिठी मारली. नीरोनें आईच्या सन्मानार्थ मोठी मेजवानी दिली व अत्यंत शृंगारलेल्या गलबतांतून तिला पाठविण्याची सिद्धता केली. त्यानें तें गलबत मुद्दाम तिच्यासाठीं तयार केल्याचें सांगितलें व त्यांतल्या सर्व सुखसोयी तिला दाखविल्या. पण एक गोष्ट मात्र त्यानें तिला दाखविली नाहीं. रोमन आरमाराचा ॲडमिरल ॲनिसेट्स हा त्या गलबताचा कप्तान होता. त्याला गलबताच्या तळाशीं कळीचा एक गुप्त दरवाजा करण्यास सांगितलें होतें. तो योग्य वेळीं कळ दाबतांच उघडून पाणी आत शिरून गलबत बुडावें अशी योजना करण्यांत आली होती. सूचनेप्रमाणें कळीचा दरवाजा उघडून पाणी आंत सोडण्यांत आलें; पण आग्रिप्पिना पट्टीची पोहणारी होती. तिचे दोन नोकर बुडून मेले. तिला एका कोळयानें वाचविलें.

आपल्या आईच्या मृत्युवार्तेची दुसरे दिवशीं सकाळीं नीरो वाट पाहत होता; पण 'मी सुरक्षित आहें, सुखरूप आहें,' असा तिचा निरोप आला. 'कोळयाच्या मदतीमुळें मी वांचल्यें, त्याला धन्यवाद! ईश्वराची दया.' असें तिनें म्हटलें होतें. ती आपल्या प्रासादांत आराम करीत होती.

आई जिवंत असल्याचें कळताच घाबरून पुढें काय करावें हें नीरोनें आपल्या दोघां सल्लागारांस विचारलें. सेनेका व बुर्‍हस व त्याचे सर्वांत शहाणे सल्लागार दुःखानें म्हणाले, 'एकदां हें काम हातीं घेतलेंच आहे तेव्हां तें पुरें केलें तरच बचाव आहे.' तेव्हां त्यानें आपली आई आपल्या जिवावर उठली असून तिनें आपणास ठार मारण्याचा कट केला आहे असें जाहीर केलें. पुष्कळसे गुंड बरोबर देऊन त्यानें ॲनिसेट्स याला पाठविलें. तो

आग्रिप्पिनाच्या राजवाडयावर चालून गेला. तिला कोंडून व लाथ्या मारून ठार करण्यात आलें.

— ४ —

अशा रीतीनें नीरोच्या आईचा प्रश्न सुटतांच पॉप्पिआ राणी ऑक्टेव्हिया हिच्याकडे वळली. तिनें नीरोमार्गे तिच्याशीं घटस्फोट करण्याबद्दल लकडा लावला. नीरोनें घटस्फोट केला. पण नुसती काडीमोड होऊन पॉप्पिआ हिला सुरक्षितता वाटेना. ऑक्टेव्हिया जिवंत असेपर्यंत भय कायम आहे अशी तिची समजूत असल्यामुळें तिनें ऑक्टेव्हियाविरुद्ध राजद्रोहाचा खटला उभा केला. तिला देहान्त शिक्षा झाली. ऑक्टेव्हिया स्नानगृहांत होती तेथेंच खुनी मारेकऱ्यांनीं तिला गुदमरवून मारलें व मग तिचें शिर कापून तें पॉप्पिआ-कडे भेट म्हणून पाठविलें.

नीरो व पॉप्पिआ यांचें लग्न झालें; पण तें अमंगल लग्न मंगलावह व सुखप्रद थोडेंच होणार होतें ? पॉप्पिआ लवकरच माता होणार होती. ती आसन्नप्रसवा होती. तिचे दिवस भरत आले होते. अशा स्थितींत एके दिवशीं नीरोनें तिला संतापाच्या भरांत लाथ मारली व ती लवकरच मरण पावली.

नीरोनें या खुनाखुनीपासून थोडी विश्रांति घेतली व नवीनच एक माथे-फिरूपणाचा प्रकार सुरू केला. आपण मोठे कलावान् आहों असें त्याच्या डोक्यानें घेतलें. तो गाऊं लागला, काव्य करूं लागला, बांसरी वाजवूं लागला, सतार वाजवूं लागला. त्यानें एकदां एका नाटकगृहांत आपल्या गायन–वादनाचा एक भव्य प्रयोग केला. त्यासाठीं त्यानें टाळ्या वाजविणारे पांच हजार लोक भाड्यानें आणले होते ! ल्यूसियन लिहितो, " एकदां तो मंद्रसप्तकांत गात असतां त्याला गाणें नीट जमेना तेव्हां लोक मधमाश्यांप्रमाणें गोंगाट करूं लागले; पण तो तार सप्तकांत गाऊं लागला तेव्हां तर लोकांस हंसूं आवरेना ; राजा रागावेल ही भीति मनांत असूनहि ते खो खो हंसूं लागले. तार सप्तकांत नीट गातां यावें म्हणून तो साऱ्या शिरा ताणीत होता व तोंड वेडेंवांकडें करीत होता. चाकावर घातलेला एकादा गुन्हेगार जशीं तोंडें करतो तशीं त्याचीं तोंडें होत होतीं. त्याचा नैसर्गिकपणें लालसर असलेला चेहरा जवळजवळ तांब्यासारखा दिसूं लागला.

नीरोला वाटलें कीं, संगीताचा व प्रकाशाचा देव अ‍ॅपॉलो याच्याहिपेक्षां आपण उत्कृष्ट गाणारे आहों. तो श्रोत्यांना आपलें कंटाळवाणें गाणें ऐकावयाला सक्तीनें तासन् तास बसावयास लावी. शेवटीं तर विटून व कंटाळून त्यांना घेऱ्या येत. नीरोनें नृत्यकलेंतहि पारंगत होण्याचें ठरविलें. पण नृत्यकलेच्या शिक्षकांइतके आपणास पाय उंच करतां येत नाहींत, त्यांच्याइतक्या सुलभतेनें व चपळाईनें पाय नाचवितां येत नाहींत असें पाहून त्यानें त्या शिक्षकांनाच ठार मारलें व नृत्याचा नाद सोडून दिला. एकदां तर नाटकगृहांतल्या एका प्रयोगाच्या वेळीं आपण दिगंबर स्वरूपांतच रंगभूमीवर जावें असें त्याच्य मनानें घेतलें. आपलें शरीर हरक्युलिसच्या शरीराप्रमाणें अत्यंत प्रमाणबद्ध आहे हें तो प्रजेला पटवूं पाहत होता. वास्तविक त्याचें शरीर विद्रूप होतें, मान आंखूड व फार जाड होती, छाती अरुंद होती व पायाच्या काड्या झाल्या होत्या ; वरचें नगाऱ्यासारखें अगडबंब पोट त्या काड्यांना झेंपत नसल्या-मुळें पाय वांकत. "तुम्ही आपलें हें शरीर कृपा करून उघडें नका दाखवूं" अशी विनंति त्याच्या मित्रांनीं केली. शेवटीं त्यानें ऐकलें.

त्यानें रोमचा इतिहास काव्यांत लिहिण्याचें ठरविलें. या संकल्पित महा-काव्याचीं चारशें पुस्तकें होणार होतीं. आपण दैवी शक्तीचा अतिमानुष कलावन्त आहों, सर्वांगीण व सर्वकलाप्रवीण असा कलावन्त-सम्राट् आहों हें दाखविण्यास तो अधीर झाला होता. इतर सम्राटांनीं आपण देवाच्या बरोबरीचे आहों असें दाखविण्याचा अट्टाहास केला ; पण नीरोला आपण सर्व देवांहूनहि मोठे, देवाधिदेव आहों असें वाटे.

त्याची भव्यतेप्रत पोंचण्याची धडपड होती. पण तो हास्यास्पद मात्र झाला. मर्त्य मानवांप्रमाणें साध्या गोष्टी करण्याचा त्याला कंटाळा आला. नीरोला शोभेसें कांहीं तरी अतिमानुष, भव्य, दिव्य, आपल्या हातून व्हावें असें त्याला वाटूं लागलें. रोममध्यें एकदम प्रचंड आग लागली : सहा दिवस व सात रात्री ती पेटत होती ! शहराचे तीन भाग भस्मसात् झाले. ती आग नीरोनेंच मुद्दाम लावली होती कीं काय, हें नक्की कळत नाहीं ; निदान तसा पुरावा नाहीं. पण ती आग पाहून तो नाचूं लागला ! केवढी मौज, किती गंमत, असें त्याला वाटलें. असें भव्य ज्वाला-दर्शन घडल्या-बद्दल त्यानें प्रभूचे आभार मानले. ही होळी दुरून, उंचावरून फार छान

दिसेल असें वाटून राजवाड्याच्या अत्यंत उंच भागीं त्यानें एक शामियाना तयार केला. त्यानें अत्यंत सुंदर पोषाख घातला, तो सोन्यामोत्यांनीं सजला, त्यानें हातांत सारंगी घेतली, ती होळी पाहून त्याचें हृदय उचंबळून आलें व तो त्या उंच स्थळीं गात राहिला. समोर ज्वालांचा सागर नाचत होता! त्यानें सर्व देवांना शहर जाळणाऱ्या पार्श्वभूमीवरचें आपलें संगीत ऐकण्यास आवाहन केलें. ट्रॉयला आग लागल्या वेळीं त्या प्रसंगावर होमरनें लिहिलेलें काव्य नीरो आपल्या सारंगीच्या साथीवर गात होता.

नीरोच्या नव्या लीलाचा हा नुसता प्रारंभ होता. या अग्नि-दिव्य-संगीताच्या नाटकाचा त्यानें सुरू केलेला दुसरा अंक त्याच्यावाचून दुसऱ्या कोणासहि करतां आला नसता. नव्या ख्रिश्चन धर्मीयानीं रोमला ही आग लावली असा आरोप त्यानें त्यांच्यावर केला व त्यांना भव्य-दिव्य शिक्षा देण्याचें ठरविलें. रोम शहरांतहि शिक्षेचा असा अतिमानुष प्रकार पूर्वी कधीं झाला नव्हता. रोमच्या त्या भव्य क्रीडांगणांत त्या दिवशीं मशालींची मोठी आरास करण्यांत आली होती व ती पाहण्यासाठीं साऱ्या शहरवासीयांना बोलावण्यांत आलें होतें. तो विचित्र दीपोत्सव होता!—तेथें जिवंत मशाली जळत होत्या!—अणकुचिदार खांबांना ख्रिश्चन स्त्रीपुरुषांना बांधून त्यांच्या सर्वांगास मेण वगैरे ज्वालाग्राही पदार्थ चोपडण्यांत आले होते व एका ठराविक क्षणीं खूण होताच त्यांना पेटविण्यांत आलें! हस्तिदंती व सोन्याच्या रथांत बसून नीरो त्या रंगणांत आला; त्याच्या पाठोपाठ सुंदर स्त्रिया व पऱ्या होत्या. संगीत चाललें होतें, वाद्यें वाजत होतीं; लाखों रोमन हर्षानें टाळ्या पिटूं लागले! ते जणूं बेहोषच झाले होते! जसा राजा तशी प्रजा. नीरो लोकांची सलामी घेत होता. उजवीकडे, डावीकडे, विनयानें मान लववून तो प्रजेच्या अभिवादनांचा सादर स्वीकार करीत होता. त्याचा रथ जळणाऱ्या ख्रिश्चनांच्या प्रकाशांत चमकणाऱ्या टायबर नदीच्या सोनेरी तीरावरून धडधडत गेला. आपण केवढी उत्कृष्ट कामगिरी केली, किती अतर्क्य व अतुलनीय आपली लीला असे विचार मनांत येऊन आनंदानें व धन्यतेनें त्याला कृतार्थता वाटत होती! त्याचें हृदय फुलून गेलें होतें! रात्रीच्या अंधारांतून त्यानें जिवंत ज्वालांचें महाकाव्य निर्मिलें! धन्य त्याची! पृथ्वीवर वा स्वर्गांत कोठेंहि अशी कलात्मक निर्मिति कोणींहि कधीं केली नसेल.

कोणाच्याहि प्रतिभेला असली निर्मिति सुचली नसेल. नीरो हा सुर–नरांमधील ‘ कवीनां कविः ’ होता !

— ५ —

ख्रिश्चनांची होळी केल्यावर नीरो रोमनांची पूजा करण्यास निघाला. त्याला शहरांत शेंकडों शत्रू होते, त्यांचा निःपात करण्याचें त्यानें ठरविलें. रोज सकाळीं रोममधल्या प्रमुख नागरिकांना पत्रें लिहून तो “ नीरोसाठीं व राज्याच्या हितासाठीं तुम्ही स्वतःची हत्या करा ” अशी आज्ञा करी. त्याच्याविरुद्ध कारस्थानें केलेल्या लोकाचाच तेवढा तो त्या यादींत समावेश करीत असे असें नव्हे, तर ज्यांच्या ज्यांच्यावर तो या ना त्या कारणानें नाराज होता त्या सर्वांचा समावेश करी; ज्यांची ज्यांची मालमत्ता त्याला हवी होती, वा ज्यांच्या ज्यांच्या मरणानें त्याच्या पित्त्यांना आनंद झाला असता, त्यांचीहि भरती त्यानें त्या हत्याकांडांत केली व नंतर कांहीं दिवसांनीं त्या पित्त्यांसाहि यमसदनास पाठविलें. त्या पिसाटाच्या माथेफिरू लहरीपासून कोणीहि सुरक्षित नव्हता. त्यानें सक्तीनें आत्महत्या करण्यास ज्यांस भाग पाडलें त्यांत नीरोचा गुरु प्रसिद्ध पंडित आचार्य सिनेका हाहि होता. तो वृद्ध झाला होता तरी त्यालाहि त्यानें ‘ मरा ’ म्हणून फर्मांविलें. पेट्रोनियस नामक बाळपणींच्या एका प्रियतम मित्रालाहि त्यानें आत्महत्या करावयाला आज्ञापिलें.

आपल्या अतुल कलात्मक प्रतिभेनें जगाला थक्क करून सोडावें अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती. रोममध्यें तर त्यानें आपल्यामधल्या दिव्य कलेचें भरपूर प्रदर्शन केलेंच होतें; आता सौंदर्योपासक ग्रीस देशांत जाऊन ग्रीक जनतेलाहि स्वतःची आश्चर्यकारक कलात्मक प्रतिभा दाखवावी असें त्याच्या मनानें घेतलें.

तो गलबतात बसून ग्रीसला जावयास निघाला. त्यानें टाळ्या पिटणारे पांच हजार भाडोत्री लोक बरोबर घेतले, तद्वतच ज्या शेंकडों लोकांना त्यानें नुकतीच मृत्यूची शिक्षा फर्मांविली होती त्या अभाग्यांनाहि बरोबर नेलें. ग्रीसमध्यें कलेची पूजा करतां करता जो थोडा वेळ विरंगुळा म्हणून मिळत जाईल त्या वेळीं त्यांच्या मरणाची गंमत पाहण्यास मिळून थोडीफार करमणूक होईल हा त्यांना बरोबर नेण्यांतला त्याचा हेतु होता.

ांना जणूं आईच्या दुधाबरोबरच मिळे. 'प्रत्येक जण स्वतःसाठीं, जो मागें गाळेल त्याला सैतान धरील' ही म्हणच जणूं त्यांच्या धर्माची शिकवण ोती! रोमन राजसत्ता तद्वतच प्रत्येक रोमन व्यक्तीहि आपल्या बंधूंना ्ळ चारून, त्यांच्या आशा, त्यांचे मनोरथ किंबहुना त्यांचे देहहि धुळीस मळवून स्वतः पुढें येण्याची खटपट करीत असे. रोम इतर देशाना त्या-माणेंच रोमन माणूस इतरांना—स्वकीयांनाहि—लुटूनच पुढें आला पाहिजे, ासा जणूं नियमच होता! प्रत्येक जण पुढारी होण्याची खटपट करी. अशा ेषारी व मारक वातावरणांत वाढणारे सम्राट् पुढें भलेंबुरें करण्याची सर्व ात्ता हातीं येताच साधी माणुसकीहि गमावून बसत यांत काय आश्चर्य! रानटी पशूंप्रमाणें वा दैत्यांप्रमाणें वागत यांत काय नवल!

फारच थोड्या सम्राटांनीं शांततेचें व विवेकाचें जीवन जगण्याचा यत्न ेला. पण आक्रमक पिसाटांच्या दुनियेंत त्याचेंहि कांहीं चालत नसे. अशा ेवेकी सम्राटांविरुद्ध महत्त्वाकांक्षेनें वेडे झालेले सारे माथेफिरू उभे राहत व ्खपणाचें राष्ट्रीय धोरण चालविल्यामुळें भोगावीं लागणारीं फळें मग अशा ांगल्या राजांच्याहि वांट्यास येत. गादीवर येतांच त्यांना सर्वत्र कटाचें व ारस्थानांचें दूषित वातावरणच दिसे. सर्वत्र संशय व धोका! आपल्या ्वींच्या सम्राटांनीं सुरू केलेल्या पण त्यांच्या हयातींत न संपलेल्या ्द्धांना या विवेकी सम्राटांनाहि तोंड द्यावें लागे. पूर्वीच्या सम्राटांनीं ्त्पन्न केलेलीं भांडणें व युद्धें यांतून शांति व सलोखा निर्माण ्रण्याची जबाबदारी त्याच्यावर येऊन पडे, तीं युद्धें यशस्वी करावीं लागत, ीं भांडणें निभावून न्यावीं लागत. सम्राट् म्हणून त्याच्या नांवानें नवी द्वाही ्फिरताच पूर्वजांच्या मूर्खपणाशीं व अपराधांशींहि ते बांधले जात. त्या अपराधी सदोष धोरणाच्या शृंखला त्यांनाहि जखडून टाकीत. 'सुखी' म्हणून ंबोधिले जाणारे रोमचे सम्राट् रोमन गुलामांपेक्षांहि अधिक दुःखी असत. ाशा या रोमन सम्राटांपैकींच शहाणा पण अति दुःखी सम्राट् म्हणजे मार्कस ऑरेलियस.

— २ —

मार्कस ऑरेलियस हा सम्राट् ॲन्टोनिनसचा मानलेला दत्तक मुलगा. तो याच्या अकराव्या वर्षांपासूनच स्टोइक पंथाच्या सहनशील तत्त्वज्ञानाकडे

ओढला गेला. स्टोइक यतिधर्मी होते. ते दुःख दैवी मानून त्याची पूजा करीत. दुःख भोगावें लागलें तरच ते स्वतःला सुखी व भाग्यवान् समजत. आत्मा बलवान् व्हावा, मन खंबीर व्हावें म्हणून ते कठिण फळयांवर झोंपत, खालीं कांहीं अंथरीतहि नसत. ते एक जाडेंभरडें वस्त्र अंगावर घेत, तें अंगाला खुपे. तरुण मार्कस ऑरेलियसहि अशा हटयोगाचें आचरण करूं लागला. पुढें जेव्हां मन व बुद्धि हीं परिपक्व झालीं तेव्हां त्यानें या मूर्खपणाच्या बाह्य गोष्टींचा व देखाव्यांचा त्याग केला. पण त्या पंथाच्या तत्त्वज्ञानांतील मुख्य गाभा मात्र त्यानें कधींहि सोडला नाहीं.

सम्राट् ॲन्टोनिनस व मार्कसची आई या दोघांनींहि त्याला तत्त्वज्ञानाच्या अभ्यासासाठीं उत्तेजन दिलें व त्या काळांतले अत्यंत नामांकित आचार्य त्याला शिकविण्यासाठीं ठेवले. त्यांच्या योग्य देखरेखीखालीं व मार्गदर्शनाखालीं त्यानें केवळ तत्त्वज्ञानांतच प्रगति केली असें नव्हे तर काव्य, इतिहास व ललितकला यांचाहि चांगला अभ्यास केला.

तो स्वभावतःच विद्याप्रिय होता. मनाचा विकास होत असता तो अत्यंत सुखी होता. पुढारीपणा त्याच्या ठायीं नव्हता. एक अज्ञात तत्त्वज्ञानी म्हणून राहावें अशीच त्याची इच्छा होती. पण दैवाची इच्छा त्यानें सम्राट्, वैभवशाली राजाधिराज व्हावें अशी होती.

तो आपल्या वयाच्या तिसाव्या वर्षी (इ. स. १६१ मध्यें) सम्राट् झाला. प्लेटो ज्याची वाट पाहत होता, तो राजर्षि शेवटीं सिंहासनावर आला. पण प्लेटोचें स्वप्न प्रत्यक्षांत येणें अद्यापि फार दूर होतें. प्लेटोच्या रिपब्लिकमधील तत्त्वज्ञानी राजाला सज्जन व सुसंस्कृत लोकांच्या राष्ट्रावर राज्य करावयाचें असे; पण मार्कस ऑरेलियसला मूर्ख व गुंड बहुजनसमाज असलेल्या राष्ट्रावर राज्य करावयाचें होतें.

इतिहासाच्या चलच्चित्रपटांत मार्कस आपल्या डोळ्यांपुढून जातो तेव्हा त्याच्या ठिकाणीं आपणांस दोन व्यक्ती दिसतात. तो म्हणजे प्राचीन काळचा डॉ० जेकिल वा मि० हाइड होय. रात्रीच्या प्रशांत वेळीं तो स्वतःचें हृदय–संशोधन करणारा भावनाप्रधान कवि व ज्ञानोपासक दिसतो. हें जग अधिक चांगलें कसें होईल, येथें सुखी लोक कसे नांदूं लागतील याविषयींचे आपले विचार तो मांडी व त्यांतून योजना निर्मी; पण दिवसां मात्र तो

शस्त्रास्त्रांच्या खणखणाटांत रोमन विजयासाठीं बाहेर पडे. शरण जावयाचें नाहीं व दया दाखवावयाची नाहीं या रोमन तत्त्वांप्रमाणें विजयी सेनानी म्हणून धांवपळ करतांना व दौडा मारतांना तो दिसतो. मार्कस ऑरेलियस याच्या या द्विविध स्वरूपाचें—त्याच्यांतील सौम्य कवि व कठोर योद्धा या दोघांचेंहि—थोडें दर्शन आपण घेऊं या.

— ३ —

मार्कस ऑरेलियस हा भला माणूस होता. पण त्याला संगत मात्र भली मिळाली नाहीं. तो दुष्ट संगतींत सांपडलेला सुष्ट होता. त्यानें आपली डायरी लिहिली आहे. ती त्याची चिंतनिका होती. प्राचीन काळांतील तें एक उत्कृष्ट पुस्तक आहे. आपण कसें व्हावें, कोणतीं तत्त्वें आचरणांत आणावीं या बाबतचे आपले सर्व विचार त्यानें या चिंतनिकेंत लिहिले आहेत. पण काय करावें हें कळलें तरी तसें करणें मात्र तितकेंसें सोपें नसतें. प्रत्यक्ष प्रसंग येतांच त्याला तत्त्वांचा विसर पडतो, तत्त्वांप्रमाणें वागण्याची हिंमत होत नाहीं. त्याला पुरेसें नीतिधैर्यच नसतें. "मार्कस ऑरेलियस या नात्यानें रोमच माझें शहर व माझा देश असलें तरी मानव या दृष्टीनें सारें जगच माझा देश आहे" असें त्यानें चिंतनिकेंत लिहिलें असलें तरी प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र आपण जगाचे नागरिक आहों याचें स्मरण त्याला राहत नाहीं, आपल्या रोमनपणाचीच जाणीव त्याच्या ठायीं बलवत्तर होते. वास्तविक तो युद्धाचा द्वेष्टा आहे. तो लिहितो, "माशी पकडतां आली कीं कोळी नाचूं लागतो, ससा सांपडला कीं माणसाला आनंद होतो, थोडे मासे जाळ्यांत अडकले कीं कोळ्याला हर्ष होतो, डुक्कर किंवा अस्वल मारतां आलें कीं शिकाऱ्याला आनंद होतो, तर युद्धांत कैदी पकडले कीं लढवय्यास आनंद होतो (Sarmatian Prisoners). पण या साऱ्यांच्या मनांतलें तत्त्वज्ञान पाहिलें तर सारे एकजात डाकूच नाहींत का ठरत ?" पण असें लिहिणाऱ्या मार्कसच्याच कारकीर्दीचा बराचसा भाग मात्र युद्धें लढण्यांतच गेला, शत्रूंना पकडण्यांत व ठार मारण्यांतच खर्ची पडला ! न्यायापेक्षां रणकीर्तीचीच चाड आपणास अधिक असल्याबद्दल वाईट वाटून तो आपल्या चिंतनिकेंत आपल्या दुबळेपणाबद्दल स्वतःवर कोरडे उडवितो : "सम्राट् म्हणून जर जीवनांतील

उदात्तता तुला दाखवितां येत नसेल तर जा, कोंपऱ्यांत जाऊन बस व तेथें निर्दोष व निर्मळ जीवन जग व तेथेंहि जीवनाची उदारता वा उदात्तता तुला दाखवितां येत नसेल तर या जगांतून चालता हो. ... असें निघून जाणें देखील तुझ्या हातून घडलें तर तें एक अत्यंत स्तुत्य असें सत्कृत्यच होईल." त्यानें असें लिहिण्याचें धैर्य दाखविलें तरी, सम्राट् झाल्यामुळें उदात्तता दाखवितां येत नव्हती तरी त्याला सत्ता–त्याग वा प्राण–त्याग करण्याचें धैर्य मात्र दाखवितां आलें नाहीं.

मार्कसवर आपणांला दुबळेपणाचा आरोप करतां येईल; पण जाणूनबुजून केलेल्या दुष्टतेचा आरोप मात्र मुळींच करतां येणार नाहीं. रॅम्से मॅक्डोनल्डप्रमाणेंच तो शांततेच्या काळांत व शांत वृत्तीच्या माणसात वावरण्यास योग्य होता. आजच्या ब्रिटिश साम्राज्याप्रमाणें त्या काळचें रोमन साम्राज्यहि संकटांत होतें. पुष्कळशा वसाहतींत बंडें माजलीं होतीं. मार्कसची इच्छा नसूनहि सम्राट्-पदावर असल्यामुळें त्याला बंडखोरांविरुद्ध चालून जावें लागलें, त्यांचीं बंडें मोडावीं लागलीं, आपल्या ध्येयाशीं विसंगत धोरण पत्करावें लागलें. मानव-जातीच्या स्वातंत्र्यापेक्षां 'रोम जगाची अधिराज्ञी आहे' यावर त्याची अधिक श्रद्धा होती व सिंहासनावर आपण राहावें याची त्याला अधिक तळमळ लागली होती. मार्कसच्या बाबतींत अखेरचा निकाल देण्यापूर्वी आपण स्वतः त्याच्या स्थितींत जाऊन पाहिलें पाहिजे. आज आपण ब्रिटिश सत्तेचे प्रमुख चालक असतों तर आपणांपैकीं कितीकांना हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्याचें धैर्य दाखवितां आलें असतें? मार्कसचीहि नेमकी अशीच स्थिति होती. अर्थातच मार्कस जर बुद्ध असता तर तो वेगळ्या रीतीनें वागला असता. पण तो बुद्ध नव्हता. जगाचें भलें करावें म्हणून बुद्धानें राज्यत्याग केला. मार्कसनें राज्य-पदासाठीं भलें करण्याचें सोडून दिलें. हिंदुस्थाननें जगाला 'शांति देणारे महापुरुष' दिले. रोम 'जास्तींत जास्त तत्त्वज्ञानी योद्धा' निर्माण करूं शकलें.

मार्कस प्रथम रोमन सम्राट् होता व नंतर मानव जातीवर प्रेम करणारा होता हें नीट ध्यानांत धरलें तर मग आपणांस त्यानें ख्रिश्चनांचा छळ का केला हें समजूं शकेल. थोडीं कमीजास्त माणसें मारलीं गेलीं म्हणून वैतागण्या-इतका वा विरक्त होण्याइतका कच्चा शिपाई तो नव्हता. शिपाईगिरी त्याच्या रक्तांत अधिक भिनलेली होती. ख्रिश्चन लोक रोमन देव–देवतांविरुद्ध

बोलत, नवीन राज्य येणार वगैरे भविष्यकथा सांगत. साहजिकच रोमन राज्याला यांत धोका आहे असें वाटे. ख्रिश्चनांचे प्रमुख पुढारी ठार मारून त्यांना दडपून ठेवणें हें राज्याचे पालनकर्ते या नात्यानें आपलें कर्तव्य आहे, असें मार्कसला वाटे. बंड मोडून तो पुनः आपल्या हस्तिदंती तत्त्वज्ञान-मंदिरांत येई तेव्हां तो लिही, " मी दुसऱ्यांना हेतुपुरःसर वा उगीचच दुःख दिलेलें नाहीं." त्याच्या या लिहिण्यांत दंभ नसून सत्यता असावी असें वाटतें.

दैवदुर्विलास हा कीं, मार्कस हा सत्याची तळमळ असणारा माणूस होता. कृत्रिमता वा दंभ त्याच्या ठायीं मुळींच नव्हता. स्वतःच्या राष्ट्राची सुरक्षितता किंवा प्रतिष्ठा धोक्यांत असतां तो सीझरच्या अहंमन्यतेनें शासन करी; पण स्वतःचा जीव धोक्यांत असतां मात्र तो एकाद्या संताच्या उदारतेनें क्षमा करी! त्याचा ॲव्हिडिअस कॅशियस नामक एक सेनापति होता. त्यानें त्याला मारण्याचा कट केल्याचें त्याला कळलें तेव्हां कॅशियसविरुद्ध कांहींहि करण्याचें नाकारून तो म्हणाला, " तो दोषी व अपराधी असेल तर आपल्या कृतकर्मांचें फळ तो भोगील." कट फसला व कॅशियसचाच कोणीं तरी खून केला. मित्रांनींच नव्हे तर राणी फॉस्टिना हिनेंहि कॅशियसच्या घराण्यांतल्या सर्वांना ठार करावें असें परोपरीनें विनविलें, निदान स्वतःच्या रक्षणासाठीं तरी ही गोष्ट करण्याबद्दल विनविलें; पण मार्कसनें त्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. तो म्हणाला, ' पित्याच्या पापासाठीं मुलांबाळांनीं शासन कां बरें भोगावें? त्यांचा काय अपराध? कटांत सामील होण्याबद्दल कॅशियसनें अनेक प्रमुख रोमन नागरिकांना लिहिलेल्या पत्रांचें भेंडोळें त्याच्यापुढें टाकण्यांत आलें. तो गठ्ठा पाहून त्यानें काय केलें असेल? एक शब्दहि न बोलतां त्यानें तीं सारीं पत्रें ' अग्नये स्वाहा ' केलीं व नंतर पुनः चिलखत चढवून तो दुसऱ्या एका युद्धा-वर जाण्यासाठीं, रक्तपातासाठीं तयार झाला.

एकाच वेळीं सम्राट् व सामान्य मानव म्हणून तो जगूं इच्छीत होता. त्यासाठीं त्याची धडपड चालू होती. पण त्याचे प्रयत्न यशस्वी झाले नाहींत. त्यामुळें त्याच्या जीवनांतील आनंद गेला व त्याच्या जागीं निराशा आली. तो जगाविषयीं व एकंदर जीवनाच्या मूल्याविषयीं तिरस्कारानें बोलूं लागला, कशांतच कांहीं अर्थ नाहीं असें म्हणूं लागला. उमर खय्याम किंवा कोहेलेथ याप्रमाणेंच कित्येक शतकांपूर्वीं बोलतांना तोहि आपणांस दिसतो. तो लिहितो—

"ही दुनिया म्हणजे केवळ वाफ आहे. हा संसार निःसार आहे. येथें सदैव झगडे व मारामाऱ्याच आढळणार. आपण या जगांत क्षणाचे पाहुणे आहों. मरणोत्तर कीर्ति! पण तिचें आपणांस काय होय? क्षणभर कीर्ति मिळते; पुनः सारे विसरूनहि जातात. या मानवी जीवनांत हा काळ म्हणजे एक क्षण, एक बिंदु. सारें क्षणिक आहे, चंचल आहे, बदलतें आहे. आपली प्रज्ञाहि दुबळी आहे. अंतर्दृष्टि फार मंद असते. वस्तूंचें अन्तरंग कळत नाहीं. हें शरीर तर सडणारें आहे. आत्मा म्हणजे वायूची एक क्षणिक झुळूक! दैवांत काय असतें हें कळत नाहीं, कीर्ति मिळते तींतहि कांहीं अर्थ नसतो. लोक विचार न करतांच टाळया वाजवितात, स्तुति करतात. आणि आपण मेल्यावर स्मरण कशाचें करावयाचें? पोकळ, शून्य वस्तु, तिचें?"

हें सारें जीवन बाह्य अवडंबर आहे. हे सारेच क्षणिक देखावे, बुडबुडे आहेत. मार्कस ऑरेलियस, त्याचें वैभव, त्याच्या महत्त्वाकांक्षा, त्याचीं युद्धें, त्याचे विजय, त्याचें यश, सारें सारें पोकळ व निःसार आहे. अनंत बुड-बुड्यांतले हेहि बुडबुडे!

पण त्याचें स्टोइक वळण त्याला धीर देई. आपल्या नशिबीं आलेलें पोकळ राजवैभव तो सहन करी. "जें वांट्यास आलेलें आहे, तें दैवानें दिलेलें आहे. तें अपरिहार्य आहे. तें सहन करा." असें स्टोइक तत्त्वज्ञान सांगतें. आपण देवाच्या हातांतलीं बाहुलीं आहों, आपलें जीवन त्याच्या इच्छेसाठीं आहे, आपल्या मनःपूर्तीसाठीं नाहीं. तो लिहितो, "माझें काय व्हावें, माझ्या नशिबीं काय यावें याचा विचार देवांनीं केलाच असेल व तोच योग्य असणार. त्यांनीं खास माझ्या बाबतींत जरी विचार केला नसेल तरी या विश्वाच्या सर्वसाधारण कल्याणाची चिंता त्यांनीं केलीच असेल. यासाठीं या विश्वसंसारांत जें माझ्या नशिबीं येईल तें विश्वयोजनेनुसार आहे असें समजून मीं आनंदानें सहन केलेंच पाहिजे, त्यातच समाधान मानलें पाहिजे. माझ्या बाबतींत जें जें घडत आहे तें तें अनंत काळापासून तसें योजिलेलेंच आहे." आपल्या आत्म्याच्या खिन्न आदर्शांत बघून मार्कस स्वतःची पुढीलप्रमाणें कानउघाडणी करतो: "घाबरूं नको. नशिबानें जें ताट वाढून ठेविलें आहे तें गोड करून घे. जें दैवानें दिलें आहे त्याच्याशीं जमवून घे. देवाला तुझ्या जीवनाचें वस्त्र जसें विणावयाचें असेल तसें विणूं

दे. तेंच तूं अंगावर घे. देवांना चांगलें कळतें, अधिक कळतें, सर्वांत जास्त समजतें."

पण त्याच्या तत्त्वज्ञानानें त्याचें समाधान झालें नाहीं. त्याच्या जीवनांत खोल निराशा होती. त्याची महत्त्वाकांक्षा शेवटपर्यंत अपुरीच राहिली. त्याला हवें होतें शांति-समाधान, पण मिळाला पोकळ मोठेपणा! त्याला वैभव लाभलें, शांति-लाभ झाला नाहीं. आपल्या अप्राप्य ध्येयाकडे तो एकाद्या भणंग भिकाऱ्याप्रमाणें पाहत राही व अर्धवट धार्मिक अशा शब्दजंजाळांत—शाब्दिक धुक्यांत—तो आपलें ध्येय अदृश्य करून टाकी. त्या अर्धवट धार्मिक शब्दांवर तरी त्याचा पूर्ण भरंवसा कोठें होता?

— ४ —

इ. स. १८० चा हिंवाळा आला. मार्कस एकुणसाठ वर्षांचा झाला होता उत्तरेस जर्मनांशीं लढतांना त्या कडक थंडींत त्याची प्रकृति बिघडली, त्याचें सारें शरीर जणूं गोठलें, गारठून गेलें! घरीं रोमकडे परतण्यापूर्वीच तो मेला.

त्याची कारकीर्द अयशस्वी झाली. त्याचें जीवन अपेशी होतें; तें पाहून फार वाईट वाटतें. त्याच्या मनांत असलेल्या उदात्ततेनुसार तो वागता तर तो महापुरुष झाला असता. पण अखेर तो कोण झाला? धंदेवाईक सैनिकांच्या शहरांतला एक विजयी सेनापति, इतक्याच नात्यानें तो शिल्लक राहिला. त्यानें मिळविलेल्या विजयांतूनच पुढच्या युद्धाचें बीजारोपण झालें व त्यांतच शेवटीं रोमचा नाश झाला.

## प्रकरण ९ वें

# कॉन्स्टंटाइन : जुन्या धर्मवृत्तीचा आत्मा असलेला ख्रिश्चन

— १ —

मार्कस ऑरेलियसचा मुलगा कॉम्मोडस हा नीरो वगळल्यास इतर सर्व सम्राटांत अत्यंत दुष्ट व रानटी सम्राट् होऊन गेला. पुढील तीनशें वर्षांतल्या सम्राटांचा इतिहास थोडक्यांत सांगावयाचा तर असें म्हणतां येईल कीं, त्यांनीं खून केले, कत्तली केल्या, जुलूम केले व शेवटीं त्यांचेहि खून झाले! त्यांच्या दुष्कृत्यांचा इतिहास सांगत बसण्यांत फारसा अर्थ नाहीं. तो म्हणजे

कंटाळवाणी व वीट आणणारी मूर्खपणाची कथाच आहे. नांवें व तारखा बदलल्या कीं सर्व प्रकार तेच! मार्कस ऑरेलियसमागून झालेल्या अनेक सम्राटांपैकीं कॉन्स्टंटाइन तेवढाच इतरांहून वेगळा आढळतो ; पण तो इतरापेक्षां अधिक चांगला म्हणून नव्हे तर त्यानें खिश्चन धर्म हा राज्याचा—राष्ट्राचा—धर्म केला म्हणून. तथापि कॉन्स्टंटाइनचा खिश्चन धर्म खिस्ताच्या धर्माहून वेगळा होता.

— २ —

कॉन्स्टंटाइन इ. स. ३१३ या वर्षी गादीवर आला. इतर साऱ्या उमेदवारांस ठार करूनच नेहमींच्या पद्धतीप्रमाणें तो गादीवर आला. त्याचा बाप कॉन्स्टंटियस हा डायोक्लेशियन सम्राटांच्या कारकीर्दींत गव्हर्नर होता. त्याची आई हेलेना ही एका खानावळवाल्याची खिश्चन कन्या. पित्याची महत्त्वाकांक्षा त्याच्या रक्तांत उतरली होती व ती पुरी करण्यासाठीं त्यानें तिचा धर्म पत्करला. गादीसाठीं असलेल्या प्रतिस्पर्ध्यांतल्या मॅक्झेन्टियसशीं लढतांना त्याला यश येईना. त्यानें साऱ्या जुन्या देवदेवतांना प्रार्थिलें, पण सर्वच दुसऱ्या कोठल्या तरी भानगडींत गुंतलेल्या असल्यामुळें कोणीच मदतीस येईना ; त्याचा पराभव होऊं लागला ; शेवटीं हताश होऊन त्यानें आपल्या आईच्या ' येशू '—देवाची प्रार्थना केली ; त्याला विजय मिळाला. तो नव्या देवाला केलेल्या प्रार्थनेमुळें मिळाला, असें त्याला वाटल्यामुळें त्यानें शांततेचा धर्म देणाऱ्या येशूला रोमन साम्राज्याची ' युद्ध—देवता ' बनविलें.

भोळसट रोमनांना युद्धांत खरोखर खिस्तानेंच मदत केली हें पटवून देण्यासाठीं त्यानें एक चमत्कार—कथा रचिली : " मॅक्झेन्टियसवर चाल करून जातांना मला ' या चिन्हाच्या योगेंच तुझा जय होईल ' असे शब्द वर असलेला एक जळजळीत क्रॉस दिसला."

या नवीन खिश्चन युद्धदेवतेमुळें कॉन्स्टंटाइनला इतका आनंद झाला कीं, त्यानें खिश्चन धर्म रोमचा राष्ट्रधर्म केला. तोंपर्यंत खिश्चन धर्म शांतिप्रियांचा होता, प्रतिकार न करणाऱ्यांचा होता. पण आतां तो अहंमन्यतेनें व गर्वानें लढणाऱ्या लोकांचा चढाऊ धर्म झाला. " रोमन सैनिकांनो, पुढें चला " या युद्धघोषणेऐवजीं " खिश्चन सैनिकांनो, पुढें चला " अशी रोमची नवी युद्ध-

घोषणा बनविण्यात आली व त्या सैन्याच्या पुढें, पाठीवर जड क्रॉस असलेला गॅलिलीचा तो थकलेला ज्यू मिरविण्यांत येऊं लागला.

— ३ —

ख्रिश्चन धर्म अंगीकारून अगर त्याला चुकीनें जो ख्रिश्चन धर्म वाटला तो घेऊन व रोमचा तो राष्ट्रधर्म करून कॉन्स्टंटाइननें आपल्या पत्नीचा, वडील मुलाचा व एका पुतण्याचा खून केला व रोमवर अनियंत्रित राजसत्ता गाजविण्यास सुरुवात केली. त्याच्या पूर्वी डायोक्लिशन अंगावर रेशमी कपडे घाली, हातीं राजदंड व डोक्यावर पर्शियन सम्राटांचा मुकुट धारण करी. पण कॉन्स्टंटाइन त्याच्याहि पुढें जाऊन आपल्या राष्ट्राच्या भवितव्याचा एकमेव विधाता बनला. त्यानें सीनेटची सर्व सत्ता संपुष्टांत आणली, पर्शियन सम्राटांप्रमाणें निरनिराळे मंत्री व अधिकारी निर्माण केले, चॅन्सेलर, खजीनदार शरीररक्षक दलांचे सेनापती, वगैरे पदाधिकारी नेमले. नाना रंगांचे व सोनेरी पदरांचे झगे तो अंगावर घाली. त्याच्या भेटीस येणाऱ्यांना त्याला साष्टांग प्रणाम करावा लागे. बॉस्फरसच्या सामुद्रधुनीवर बायझंटियम शहर पुनः बांधून त्यानें त्याला कॉन्स्टँटिनोपल ( म्हणजे कॉन्स्टंटाइनचें शहर ) असें नांव दिलें. आशियांतील राजांमहाराजांप्रमाणें भव्य–दिव्य वैभवांत राहूं पाहणाऱ्या रोमन सम्राटांच्या निवासासाठीं हें शहर बांधण्यांत आलें. त्यानें सुरू केलेल्या या नव्या अनियंत्रित सुलतानशाहीचा थाटमाट टिकविण्यासाठीं त्यानें आधींच जबर असलेले कर वाढविले. पुष्कळशा रोमन नागरिकांस त्यानें केवळ गुलाम केलें.

रोमन सुलतानामध्यें तो सर्वांत निरंकुश होता. अर्वाचीन काळांतील सारे झार व केसर यांची अवलाद त्याच्याचपासून सुरू झाली. ‘ रोमन इतिहासाची रूपरेषा ’ या आपल्या पुस्तकांत प्रो० मोरे लिहितो, “ अर्वाचीन युरोपांतील साम्राज्यांत ऑगस्टसचा तो पहिला साम्राज्यवाद नसून नंतरचा कॉन्स्टंटाइनचा साम्राज्यवाद आहे. तो पुनः प्रकट झाला आहे. ”

निकाई येथें ख्रिश्चन धर्मोपदेशकांचें संमेलन भरविल्याबद्दल कॉन्स्टंटाइन विशेष प्रसिद्ध आहे. इ. स. ३२५ मध्यें हें संमेलन भरलें होतें. ख्रिस्ताच्या दैवी विभूतिमत्त्वाबाबतच्या नाना मतांच्या चर्चेसाठीं कॉन्स्टँटिनोपल-नजीकच्या नाइस शहरीं ही धर्म–परिषद् भरली होती. आजच्याप्रमाणेंच

कॉन्स्टंटाइनच्याहि काळांत मॉडर्निस्ट, फंडामेंटॅलिस्ट, पुराणमतवादी, नवमतवादी असे नाना विरोधी संप्रदाय होते व ते परस्परांचे गळे कापण्यास सदैव सज्ज असत.

नाइस येथें भरलेल्या धर्मपरिषदेकडे आपण आतां जरा नजर फेंकूं या.

— ४ —

नाइस येथें भरलेल्या परिषदेंतील नवमतवाद्यांना एरियन म्हणत; कारण ते ॲरियसचे अनुयायी होते. आजच्या युनिटेरियन मताशीं या एरियन पंथाचें सादृश्य होतें. ॲरियस म्हणे, “ खिस्त ही पवित्रांहून पवित्र व थोरांहून थोर विभूति होय. पण तो कितीहि थोर असला तरी कांहीं देव नव्हे. ” या उलट फंडामेंटॅलिस्ट, पुराणमतवादी किंवा सनातनी होते. ते म्हणत, “ खिस्तामध्यें ईश्वर, त्याचा पुत्र व पवित्र आत्मा असे तीन अंश आहेत. पिता + पुत्र + पवित्र आत्मा अशा त्रिविध स्वरूपांची एक मूर्ति म्हणजे खिस्त.” हे मतभेद मिटविण्यासाठीं भरविलेल्या त्या संमेलनाला सुमारें अडीच हजार धर्मभिक्षु व तीनशें अठरा बिशप हजर होते. त्यांना कॉन्स्टंटाइननें आपापलें म्हणणें आपल्या समक्ष मांडण्यास सांगितलें. ही चर्चा ग्रीक भाषेंतून चाले. कॉन्स्टंटाइनला ग्रीक बोलतां येत नसे व समजतहि नसे. पण या चर्चेंतला एक विशिष्ट भाग मात्र त्याला सहज समजला; तो म्हणजे सनातन्यापैकीं एकानें वादाच्या भरांत ॲरियसला केलेला प्रहार. हा मुद्दा त्याला अगदीं स्पष्टपणें कळला. त्याला त्यांतील तर्कशुद्धता, तद्वतच सरळपणा नीट पटला !

चर्चा दोन महिने चालली. सनातन्यांचा आवेश, त्यांची मारामारी वगैरे पाहून त्यांचें म्हणणें बरोबर असा कॉन्स्टंटाइननें निकाल दिला. त्रिविध तत्त्वांवर विश्वास न ठेवणाऱ्यांना त्यानें हद्दपार केलें व ॲरियसचीं पुस्तकें होळींत टाकलीं. ॲरियसचें पुस्तक कोणाजवळ आढळलें तर त्याला ठार मारण्यांत येईल असें फर्मान त्यानें काढलें.

नंतर रोमन साम्राज्याच्या धर्तीवर चर्चची संघटना करण्यासाठीं त्यानें मदत केली. बिशप चर्चचे गव्हर्नर झाले. बिशप निवडून येण्यासाठीं रोमन निवडणुकींतल्याप्रमाणें अन्–खिश्चन प्रचार होऊं लागले. गिबन म्हणतो, “ बिशप–पदासाठीं उभें राहणाऱ्या एकानें आपण उच्च कुळांतले असल्याची प्रौढी मारली, तर दुसऱ्या एकानें भरपूर खाना देऊन आपणासच निवडण्यांत

यावें यासाठीं खटपट केली. तिसऱ्या एकानें तर याहिपुढें जाऊन चर्चमध्यें होणारी प्राप्ति देण्याचें, तींत वांटेकरी करण्याचें निवडून देणारांस आश्वासन दिलें." आतांपर्यंत बिशपची जागा सेवेची होती. नम्र व अधिक सेवा करणारा बिशप बने. पण आतां ती अपवित्र डामडौल, अहंकार, जुलूम व स्वार्थ यांची जागा झाली. धर्मपदावर आतां नवीनच नमुन्याचे लोक येऊं लागले. या धर्मवीरांना कोर्टांत बोलावणें येई, ते राजदरबारांतील खान्यास जात, सम्राटाबरोबर युद्धांतहि जात. थोडक्यांत सांगावयाचें तर ख्रिश्चन धर्मांतील नम्रता गेली. ख्रिश्चन धर्म सत्तारूढ व संपन्न झाला, प्रतिष्ठित झाला, दूषित व अधःपतित झाला. पोप हा चर्चचा पिता. पोप या शब्दाचाच अर्थ पिता. रोमन साम्राज्यांतील जनतेच्या मनोबुद्धीवर पोप निरंकुश सत्ता चालवी. ख्रिस्ताच्या नव्या राज्याचे तीन भाग झाले : स्वर्गाचें राज्य, रोमचें राज्य व चर्चचें राज्य. नाझरेथ येथील तिरस्कृत परिव्राजकाच्या—येशूच्या—साध्या, सुंदर व मधुर धर्माच्या, लोकशाहीपुरस्कर्त्या व समतेच्या शिकवणीपासून नवीन प्रतिष्ठित ख्रिश्चन धर्म कितीतरी लांब गेला!

कॉस्टंटाइननें ख्रिश्चन धर्म स्वीकारला व तो राष्ट्राचा धर्म केला तेव्हां रोमन साम्राज्यांत जवळजवळ साठ लक्ष ख्रिश्चन होते. पण ख्रिश्चन धर्म राष्ट्रधर्म झाल्यावर त्याच्या अनुयायांची संख्या तरवारीच्या योगानें वाढूं लागली. जगाचा बराचसा भाग ख्रिश्चन झाला, रक्ताचा बाप्तिस्मा दिला गेला, पश्चिमेचा प्रभावी धर्म म्हणून ख्रिश्चन धर्म सर्वत्र ओळखला जाऊं लागला. पण तो प्रभावी झाला तरी ख्रिस्ताचा मूळचा सुंदर शिवधर्म मात्र राहिला नाहीं.

मृत्युशय्येवर असतां कॉस्टंस्टाइनला बाप्तिस्मा दिला गेला. चर्चच्या प्रेमळ बाहूंत असतां मरण आलें तर केलेल्या सर्व पापांपासून मुक्ति मिळेल असें त्याला वाटलें. तो मरतांना चौसष्ट वर्षांचा होता. त्यानें चोवीस वर्षें राज्य केलें. इ. स. ३३७ मध्यें तो मरण पावला.

— ५ —

सर्व रोमन सम्राटांपेक्षां कॉन्स्टंटाइन अधिक अवडंबर माजविणारा होता. त्याचा थाटमाट अपूर्व असे. त्याची कारकीर्द रानवट वैभवानें भरलेली आहे. पण ती मृत्यूच्या वादळाची भव्यता होती. रोमची शक्ति क्षय पावूं लागली होती. कृष्ण पक्ष सुरू झाला होता. ओहोटी लागली होती. उत्तमोत्तम तरुण

मारले गेले होते. प्लेगांच्या साथींमुळेंहि लोकसंख्या खूप घटली. युद्धामुळेंच प्लेग सर्वत्र साम्राज्यभर पसरले. रोमनांनीं सर्वत्र पेरलेल्या रक्तपाताच्या बीजांचीं फळें भोगणें त्यांना प्राप्त होतें. रोमन सत्तेच्या ऱ्हासाची मीमांसा करणारे लठ्ठ-लठ्ठ ग्रंथ लिहिण्यांत आले आहेत. गिबनपासून आतांपर्यंतच्या साऱ्या इतिहासकारांनीं रोमन सत्तेचा ऱ्हास नक्की कोणत्या तारखेस सुरू झाला हें ठरविण्याची खूप खटपट केली आहे. पण हा प्रश्न अगदीं सोपा आहे. त्याचें उत्तर दोनचार वाक्यांत सांगतां येण्यासारखें आहे. ज्या क्षणीं रोम जग जिंकण्यास निघालें, त्याच क्षणीं त्याला कीड लागली. त्याच क्षणापासून त्याचा ऱ्हास सुरू झाला. तरवारीवर विसंबल्यामुळें तें तरवारीनेंच मेलें—तरवारीलाच बळी पडलें! कसें मारावें हे रोमनें रानटी लोकांस शिकविलें व मग त्याच रानटी लोकांनीं उलटून रोमला ठार केलें.

कॉन्स्टंटाइनच्या मरणानंतर बरोबर एकशें एकुणचाळीस वर्षांनीं म्हणजे इ. स. ४७६ मध्यें रोमचें लष्करी यंत्र हूण, व्हँडॉल व गॉथ यांच्या हल्ल्यांसमोर कोलमडून पडलें! असीरियन साम्राज्याप्रमाणें रोमन साम्राज्यहि स्मृतिशेष झालें! जगावर सत्ता गाजवूं पाहणारीं सारीं राष्ट्रें अखेर ज्या गतीला गेलीं तीच गति रोमन साम्राज्याचीहि झाली. आपल्या महत्त्वाकांक्षेलाच तें बळी पडलें. महत्त्वाकांक्षेमुळेंच त्याला मरण आलें.



## प्रकरण १ लें

# शार्लमन : पोपला वांचवून स्वतः सम्राट् होणारा

— १ —

महंमदाच्या मरणानंतर पुष्कळशा शतकांनंतर हें जग मुसलमान व ख्रिश्चन यांच्यामधील युद्धभूमि झालें. मशीद व चर्च यांमध्यें लाजिरवाणी स्पर्धा सुरू झाली होती. शरिरें मारून मानवी मनाचा ताबा कोणीं घ्यावयाचा याबाबत या दोघामध्यें शर्यत लागली होती. वास्तविक पाहतां खरा मुसलमान ईश्वरशरण असतो, खरा ख्रिश्चन शांतीचें उपनिषद् मानतो. पण अनुयायी मिळविण्याच्या स्पर्धेत दोघांनाहि आपापल्या सत्यधर्मांचा विसर पडला. या दोन्ही धर्मांस उगाच नांवें ठेवावयाचीं अशांतला भाग नाहीं. नेहमींच तरवारीनें धर्म लादला गेला असें नाहीं. किती तरी मुसलमान व ख्रिश्चन असे होते कीं, त्यांनीं आपल्या उदार व उदात्त वर्तनानें परधर्मीयांमध्यें ईश्वरशरणागतीचा सुंदर मुस्लिम धर्म व प्रेमाचा ख्रिश्चन धर्म यांचा प्रसार केला. पण त्या त्या धर्मानुयायांचे पुढारी महत्वाकांक्षी असत, त्यांना कशाचीहि दिक्कत नसे. धर्माच्या मिषानें, धर्माच्या बुरख्याखालीं व ईश्वराच्या नांवानें ते स्वार्थ साधूं पाहत. महंमदानंतर जे मुस्लिमांचे खलिफा झाले त्यांनीं मुस्लिम धर्म व मुस्लिम सत्ता रक्तानें सर्वत्र चालू करण्याचें व्रत उचललें. आफ्रिकेचा उत्तर भाग व युरोपांतील स्पेन देश वगैरेंकडे हातीं तरवार घेऊन ते दयाळू अल्लाचें भीषण वैभव पसरवीत चालले. ख्रिश्चन धर्मीय राजांनींहि प्रेमसिंधु येशूचा धर्म पश्चिम युरोपभर रक्तानें शिकविला. मुसलमान आपला धर्म वर उत्तर फ्रान्समध्यें नेऊं लागतांच खालीं स्पेनमध्यें येणाऱ्या ख्रिश्चनांशीं त्यांची झटापट झाली. महंमदाच्या मरणानंतर बरोबर शंभर वर्षांनीं टूर्स येथें झालेल्या मोठ्या लढाईंत शार्लमनचा आजा चार्लस मार्टेल ( मार्टेल = घाव घालणारा ) याच्या सेनापतित्वाखालीं लढणाऱ्या ख्रिश्चनांचा विजय झाला.

— २ —

चार्लस मार्टेल हा फ्रान्सच्या राजाचा मुख्य प्रधान होता. त्या वेळचे फ्रेंच लोक आजच्या फ्रान्समध्यें व जर्मनीमध्यें राहत होते; फ्रान्सांत राहणारे ज्या भाषेंतून पुढें आजची फ्रेंच भाषा बनली ती भाषा बोलत व जर्मनींत राहणारे

फ्रेंच ज्या भाषेंतून पुढें आजची जर्मन भाषा बनली ती टिओटिक म्हणजे जनतेची भाषा बोलत. अशा रीतीनें भाषात फरक होते तरी प्रारंभीं फ्रेंच व जर्मन एकच होते; दोघांचा राजाहि एकच होता. चार्लस मार्टेलच्या वेळीं राजा केवळ नामधारी होता. मुख्य प्रधानच सर्वसत्ताधीश अनभिषिक्त हुकुमशहा होता.

टूर्स येथें फ्रँकांनीं मुसलमानांचा पराजय केला त्याचें श्रेय राजाकडे न जातां चार्लस मार्टेल यालाच मिळालें. 'ख्रिश्चन धर्माचा त्राता', 'ख्रिस्ताचें नांव राखणारा', म्हणून त्याचा गौरव करण्यांत आला. इटलींतील लंबार्डियन लोक ख्रिश्चन शिकवण मानीत नव्हते, म्हणून त्यांच्यावर स्वारी करण्यासाठीं पोपनें मार्टेलला गौरवपूर्वक बोलावलें; पण पोपला साह्य करण्यापूर्वींच मार्टेल मरण पावल्यामुळें तें काम 'ठेंगणा पेपिन' नावाच्या त्याच्या मुलावर पडलें. तो फ्रँकाच्या राजाचा मुख्य मंत्री होता; पण मुख्य प्रधानकीवर त्याला समाधान नव्हतें; राजा होण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. इटलींत जाण्यापूर्वीं "ज्याच्या हातीं खरोखर खरी राजसत्ता आहे, त्यानेंच राजा कां होऊं नये?" असा मोठा मुत्सद्देगिरीचा व सूचक प्रश्न त्यानें पोपला केला. पोपनें होकारार्थी उत्तर पाठवून फ्रँकाचा राजा "चाइल्डेरिक" याला भिक्षु होण्यास सांगितलें व पेपिनला "ईश्वराच्या कृपेनें झालेला फ्रँकांचा राजा" म्हणून गादीवर बसविलें. पोपच्या या उपकाराची परतफेड म्हणून पेपिननें इटलीवर स्वारी केली व लंबार्डीतील लोकांना जिंकून त्यांचीं अनेक शहरें पोपला भेट म्हणून दिलीं.

'पेपिनची देणगी' या नांवानें ही भेट प्रसिद्ध असून हिच्या योगानेंच चर्चच्या ऐहिक वैभवाचा, पृथ्वीवरील सत्तेचा प्रारंभ झाला. यापूर्वी पोप केवळ काल्पनिक अशा स्वर्गांतील राज्यांतच दंग असत; पण यानंतर ते पृथ्वीवरच्या खऱ्याखुऱ्या धनदौलतींत रस घेऊं लागले. चर्चचें व स्टेटचें लग्न लागलें. पेपिनच्या देणगीपासून सुमारें हजार वर्षें चर्चनें जगावर प्रभावी वर्चस्व गाजविलें व तें बहुंशीं शापप्रद व दुःखदायकच होतें.

— ३ —

ठेंगू पेपिन इ. स. ७६८ मध्यें मरण पावला व त्याचा मुलगा शार्लमन हा न्यूस्ट्रिया व आस्ट्रेशिया म्हणजे आजचे फ्रान्स व जर्मनी यांचा राजा झाला.

शार्लेमन या शब्दाचा अर्थ मोठा चार्लस. शार्लेमन पित्याप्रमाणेंच महत्त्वाकांक्षी वीर होता, चर्चचा कडवा रखवालदार होता. उत्तर स्पेनमध्यें त्यानें सारासीन मुसलमानांचा पराजय केला. सारासीनांना युरोपांतून संपूर्णपणें हांकलून देण्याचा प्रयत्न त्यानें केला; पण त्याला त्यांत यश आलें नाहीं. हीं जीं पवित्र युद्धें चाललीं होतीं त्यांचा परिणाम म्हणून शेवटीं मुसलमान व ख्रिश्चन यांच्या दरम्यान पिरनीज पर्वत ही हद्द ठरली. दक्षिण स्पेनची सत्ता मुसलमानांनीं आपल्या हातीं ठेवली. ख्रिश्चन लोक शार्लेमनच्या पवित्र मुठीच्या संरक्षणाखालीं उत्तरेकडे, तद्वतच पूर्व युरोपभर पसरले. न्यूस्ट्रिया, आस्ट्रेशिया, फ्रिशिया, अक्विटेनिया, बर्गंडी, बव्हेरिया, लंबार्डी, सॅक्सनी, इत्यादि सर्व प्रदेशांवर शार्लेमनची सत्ता प्रस्थापित झाली. शार्लेमनला सॅक्सनी-बरोबर बरीच लढत द्यावी लागली. तेथले लोक बरेच हट्टी होते. ते एकदम नवीन धर्म पत्करीनात. पण शार्लेमननें एका दिवसांत साडेचार हजार लोकांची कत्तल करून शेवटीं त्यांच्या गळीं ख्रिश्चन धर्म उतरविलाच. जे जिवंत राहिले त्यांनीं ख्रिस्त हा दयाळू आहे हें मुकाट्यानें कबूल करून बॅप्टिस्मा घेतला व ख्रिश्चनांचा धर्म स्वीकारला.

इ. स. ७९९ मध्यें शार्लेमनला जरा नाजूक कामगिरी करावयाची होती. पोप तिसरा लिओ याच्यावर व्यभिचाराचा आरोप करून स्थानिक संस्कृति-संरक्षकांनीं त्याला मरेमरेतों ठोकलें. शेवटीं तो आश्रयार्थ एका मठांत गेला. त्यानें शार्लेमनची मदत मागितली. शार्लेमन हा धर्माचा परित्राता होता, संघटित चर्चचा संरक्षक होता. शार्लेमननें गुन्ह्याची चौकशी करून पोप निर्दोषी आहे असें जाहीर केलें. पोप खरोखर गुन्हेगार होता कीं नाहीं, हा भाग वेगळा; पण न्यायाधीश म्हणून बसण्याला मात्र शार्लेमन लायक नव्हता; कारण तो निष्ठावंत ख्रिश्चन असला तरी त्याच्या आवडीनिवडी मुसलमानी होत्या. त्याच्या चार बायका होत्या, पांच रखेल्या होत्या; त्याला सतरा मुलें होतीं, त्यांपैकीं बरींच अनौरस होतीं. पण त्यानें पोपला निर्दोष ठरविल्या-मुळें पोपचें कल्याण झालें, त्याचप्रमाणें त्याचा स्वतःचाहि फायदा झाला. इ. स. ८०० च्या नाताळच्या दिवशीं तो सेंट पीटरच्या चर्चमध्यें प्रार्थना करीत असतां एकदम पोप लिओ जणूं काय दैवी प्रेरणा झाल्याप्रमाणें तेथें आला व त्यानें शार्लेमनच्या मस्तकावर सुवर्णमुकुट ठेवला. शार्लेमन चकित झाला;

निदान वरपांगी तरी त्यानें आश्चर्यचकित झाल्यासारखें दाखविलें. वास्तविक त्या क्षणाची तो वाटच पाहत होता. तो मुकुट तयार झाल्याचें, तद्वतच पोप तो त्या दिवशीं त्याच्या डोक्यावर ठेवणार असल्याचें, त्याला माहीत होतें. तो जणूं प्रार्थनेंतच तन्मय झाला होता, प्रभुचिंतनांत एकरूप झाला होता! त्याच्या डोक्यावर मुकुट ठेवला जातांच त्यानें चकित होऊन डोळे उघडले.

नाटक बेमालूम वठलें. प्रभूनेंच जणूं शार्लेमनला सम्राट् बनविलें. प्रभूनेंच पोपला ऐन वेळीं स्फूर्ति दिली असें सर्वत्र बोललें जाऊं लागलें. शार्लेमन अति पवित्र व देवाचा लाडका म्हणून मानला जाऊं लागला. जुन्या रोमन साम्राज्याची पुनःस्थापना करून विजयी ख्रिस्ताच्या नांवें नवें राज्य स्थापण्यासाठीं शार्लेमनची ईश्वरानेंच निवड केली असें सर्व जण म्हणूं लागले.

शार्लेमनला बाहत्तर वर्षांचें आयुष्य लाभलें. त्यानें मठ बांधले, लॅटिन भाषेच्या व्याकरणांत ढवळाढवळ केली व त्याला नीट लिहितांवाचतां येत नव्हतें तरी ज्योतिष व तत्त्वज्ञान या विषयांतहि त्याची लुडबूड चालूच होती! न ऐकणाऱ्यांच्याहि डोक्यांत सोटें मारून तो बायबल कोंबूं पाहत होता. तो दारू पीत होता, मांसाच्या मिटक्या मारीत होता, परधर्मीयांना स्वधर्मांत आणीत होता, त्यांच्या बायकांस आपल्या विलासस्थानीं नेत होता, ईश्वराची पूजा करीत होता व बेकायदा मुलेंहि पैदा करीत होता. अशा लीला करीत इ. स. ८१४ मध्यें या स्वारीनें देह ठेवला.

पुढें तीनशें वर्षांनीं ख्रिश्चन चर्चनें त्याच्या कामगिरीचा गौरव करून त्याला संत केलें. पण ख्रिस्तानें अशांचा अन्तर्भाव आपल्या मित्रांत खचित केला नसता. ख्रिश्चन धर्म वाढविण्याची त्याला इतकी तहान लागली होती कीं, त्या भरांत ख्रिस्ताच्या शिकवणीचा आत्माहि तो विसरून गेला. ईश्वराच्या नांवाआड स्वतःचीं पापकृत्यें लपविणाऱ्या दांभिक गुंडांमधला तो मुकुटमणि होता!

### प्रकरण २ रें

## संन्यासी पीटर : अमीन्सचा माथेफिरू भिक्षु

### – १ –

रोमन चर्चची संघटना मानवजातीला आशीर्वादरूप व्हावी म्हणून करण्यांत आलेली होती. शांतीच्या निशाणाखालीं साऱ्या जगाचें एकीकरण करण्याचा तो ऐतिहासिक कालांतील पहिला प्रयत्न होता. चर्चचे पहिले पहिले कांहीं पाद्री व धर्मोपदेशक खरोखरच देवाचे लोक होते. नम्रता, सहिष्णुता, निःस्वार्थ जनसेवा या गोष्टी त्यांच्या जीवनांत भरलेल्या दिसत. ते गॅलिलीच्या थोर दैवी धर्म–संस्थापकाचे सच्चे अनुयायी भासत. या अनेक शतकांच्या इतिहासांत कॅथॉलिक चर्चनें कित्येकदां तरी अन्यायाविरुद्ध न्यायाची बाजू घेतलेली आहे, द्वेष सोडून शांतीची घोषणा केली आहे व युद्धांतील विनाशाऐवजीं सौंदर्यनिर्मितीवर भर दिला आहे.

पण चर्चचे वरचे पदाधिकारी मात्र नेहमींच हृदयांतील देवाचा आवाज ऐकत नसत. त्यांचे दुसरे धंदे असत. बिशप व पोप पुष्कळदां क्षुद्र राजकारणांत रंगून जात. पृथ्वीवर न्यायाचें राज्य करण्याऐवजीं आपले खिसे सोन्यानें कसे भरतील येवढेंच ते पाहत. त्यांच्या हातीं चर्च हें दुसऱ्यांना अमानुषपणें छळण्याचें, मारण्याचें व त्यांच्यावर जुलूम करण्याचें साधन मात्र झालें. शार्लमननंतरच्या पांचशें वर्षांचा इतिहास हा मानवजातीच्या इतिहासांतला अत्यंत किळसवाणा व लज्जास्पद भाग होय. या काळांत चर्चमध्यें सतत स्पर्धा व मत्सरच दिसतात, धर्मवेडेपणास ऊत आलेला दिसतो आणि कत्तली, लुटालुटी व ख्रिश्चन आणि मुसलमान यांमधील धर्मयुद्धें यांचा सुळसुळाट झालेला दिसतो. या पांच शतकांचा इतिहास निरनिराळ्या इतिहासकारांनीं निरनिराळ्या दृष्टींनीं लिहिलेला आहे. अनेकांनीं त्याची ओढाताण केली आहे. या विद्रूप व भेसूर काळाच्या इतिहासावरील रक्ताचे डाग, त्याच्याभोंवतीं दिव्य तेजोवलयें निर्मून लपविण्याचे प्रयत्न कित्येकांनीं केले आहेत. वेल्स सुद्धां आपल्या ‘जगाच्या इतिहासाची रूपरेषा’ या ग्रंथात मध्ययुगासमोर जणूं भक्तिभावानें गुडघे टेंकतांना आढळतो. तो म्हणतो, “ख्रिश्चन चर्चनें पवित्र युद्धांच्या नांवानें

लोकांतील उत्कट भावनांचें संघटित एकीकरण केलें, ही फारच मोठी गोष्ट होती. हें काम महत्त्वाचें व फारच चांगलें होतें. ही 'पवित्र युद्धां' ची चळवळ पेटविणारा पीटर नामक खिश्चन यति होता. तो रक्तपिपासु कोल्हा असूनहि वेल्सला जणूं हिब्यू प्रेषितच वाटतो! तीं धर्मयुद्धें वाचून, त्या हकीकती ऐकून वेल्स नाचूं लागतो, उत्साहानें वेडावून जातो व लिहितो, ' या काळाचा इतिहास मोठा आकर्षक आहे. लेखणीवर बसून या इतिहास-क्षेत्रांत खूप रमावेंसें वाटतें. युरोपजवळ कांहीं ध्येय आहे असें या काळांतच आपणांस प्रथम आढळतें. युरोपला आत्मा आहे, ही गोष्ट या काळांतच प्रथम दिसून येते."

वेल्सला जें 'ध्येय' व जो 'आत्मा' या काळांत दिसल्याचा भास झाला त्याची वास्तविक किंमत काय आहे हें पाहूं या. या काळाचें बिनचूक चित्र मी थोडक्यांत देतों. या मारामाऱ्यांचें सविस्तर वर्णन कंटाळवाणें होईल. मी तर या गोष्टींकडे गंभीरपणें पाहूंच शकत नाहीं. पण जरा फेरफटका मारून येऊं या.

— २ —

या धर्मयुद्धांतील पहिलें युद्ध उद्भवण्याचें कारण प्रथम पाहूं या. शार्लेमननें चाबूक मारून मारून नाखुष व हट्टी युरोपला नवधर्माची दीक्षा दिली होती, जुना धर्म लोपला होता व चर्चचे बडे बडे अधिकारी दिवसेंदिवस व्यभिचारी व अधःपतित होत होते. कांहीं उदारात्मे त्या काळींहि होतेच. खऱ्या भक्तिप्रेमानें रंगलेले, खिस्ताला शोभेसे कांहीं सौम्य व शांत लोक या काळांतहि आढळतातच. पण अशा लोकाना चर्चमध्यें महत्त्वाचें स्थान नसे. क्षुद्र प्रवृत्तींचीच माणसें बहुधा अधिकाराच्या जागांकडे ओढलीं जात असतात. धकाधकी करणारे, पुढें घुसणारे, अहंमन्य, स्वार्थपरायण लोकच सत्तेसाठीं हपापलेले असतात. त्यांना झगडे करण्यांत कसलीहि दिक्कत वाटत नाहीं. वाटेल तें करावयाला ते तयार असतात, बिलकुल मागेंपुढें पाहत नाहींत. असे लोकच पुष्कळदां चर्चमधल्या बड्या बड्या जागांवर निवडून येत. बहुतेक सर्व पोप मूर्तिमंत पापात्मेच असत. प्राचीन रोमन सम्राटांप्रमाणें पोपहि भराभर धर्माच्या गादीवर येत व पुष्कळांचे खून होत. कोणांकोणांवर विषप्रयोगहि होत.

पोप सहावा स्टीफन, पोप बारावा जॉन, पोप सहावा अलेक्झांडर वगैरे दाखवून देतात कीं, सत्य हें कादंबरीहूनहि विचित्र व कुरूप असूं शकतें. जरा गंभीर वृत्तीच्या इतिहासकारांनीं अनुल्लेखानें या पापात्म्यांच्या दुष्कृत्यांची जगाला विस्मृति पाडली आहे किंवा रोमन उतारे टाळून 'त्यांचीं कृत्यें जग-जाहीर होणार नाहींत' याबद्दल काळजी घेतली आहे. या पोपांचीं ख्रिश्चन धर्माला न शोभणारीं दुष्कृत्यें पुनः जिवंत करून सांगणें ठीक होणार नाहीं व त्याचा तादृश उपयोगहि नाहीं; यांचें खासगी जीवन कादंबरीकारांस करमणुकीचें वाटेल, पण इतिहासकाराला त्याचा काडीचाहि उपयोग नाहीं. एक गोष्ट आपण ध्यानांत घेऊं या कीं, असल्या लोकांच्या द्वेषमत्सरांतूनच रोमन कॅथॉलिक चर्च व ग्रीक चर्च यांच्यामध्यें भीषण मतभेद माजले! मुळांत ख्रिश्चन धर्मातील कांहीं मतभेदांवरच हे दोन्ही संप्रदाय उभे होते; पण पुढें दोन्ही बाजूंस वैयक्तिक महत्त्वाकांक्षा उभ्या राहिल्या. इ. स. १०५४ मध्यें रोमन चर्चच्या पदाधिकाऱ्यांनीं ग्रीक चर्चच्या पदाधिकाऱ्यांना कह्यांत ठेवतां येत नाहीं असें पाहून ग्रीक चर्च धर्मबाह्य ठरविलें व 'ग्रीक चर्चचे सारे पाद्री कायमचे नरकांत पडतील" असें उद्घोषिलें. ग्रीक चर्चहि स्वस्थ बसलें नाहींच. त्यानेंहि त्याच प्रकारें उत्तर दिलें. क्रूसेड्स् या नांवानें जो विनाशाचा भीषण भोंवरा पुढें सारखा फिरूं लागला त्यांत मिसळलेल्या अनेक प्रवाहांपैकीं ग्रीक चर्च व रोमन चर्च यांतील भांडण हा मुख्य प्रवाह होता. क्रूसेड्स्मधील पहिलें युद्ध म्हणजे केवळ ख्रिश्चनांचा मुसलमानांवरील हल्ला नसून त्यांत ग्रीक चर्चला शरण आणण्याचाहि डाव होता.

क्रूसेड्स्चें दुसरें एक कारण म्हणजे नॉर्मन लोकांनीं केलेल्या स्वाऱ्यांमुळें सर्वत्र उत्पन्न झालेली अशांतता तद्वतच बेदिली. हे नॉर्मन लोक युरोपच्या पूर्वेस व पश्चिमेस सर्वत्र लोंढ्याप्रमाणें पसरले. युरोपांतील आधींच लोकसंख्या खूप वाढलेल्या देशांत नॉर्मनांची आणखी गर्दी झाली. त्यांनीं हजारों घरेंदारें बळकावलीं. त्यामुळें घरांदारांला मुकलेले लोक युरोपभर भटकत होते. ते अशियावर स्वारी करून परधर्मीयांना त्यांच्या घरांतून हुसकून द्यावयाला अधीर झाले होते. ते या कामासाठीं तयारच होते.

तिसरें कारण युरोप व आशिया यांमधील व्यापारी स्पर्धा. क्रूसेड्स्च्या नेत्यांना जेरुसलेम क्षेत्र ख्रिश्चनांस सुरक्षित करावें असें तर वाटत होतेंच, पण

त्याहिपेक्षा युरोपच्या व्यापारासाठीं जग बिनधोक करावें असें अधिक तीव्रतेनें वाटत होतें. क्रूसेड्स् करणारांना हाच हेतु अधिक उदात्त वाटत होता.

चौथें कारण म्हणजे पोप दुसरा अर्बन याची वैयक्तिक महत्त्वाकांक्षा. आपलें जरा डळमळीत झालेलें आसन भक्कम करावें असें त्याच्या मनानें घेतलें. त्यासाठीं त्यानें आपल्याभोंवतीं गुंड व पुंड जमवून त्या बाजारबुणग्या लुटारूंना 'धर्मयुद्ध' दिलें. तो त्यांना म्हणाला, "तुम्ही तिकडे पूर्वेकडील ज्यू वगैरे विधर्मीयांना ठार कराल तर प्रभु तुम्हांस सर्व पापांपासून मुक्त करील." अशा रीतीनें पोप म्हणजे जणूं ईश्वराचा शापच झाला! पोप ही चर्चच्या इतिहासांतली एक अत्यंत शक्तिसंपन्न व्यक्ति झाली.

शेवटचें कारण यति पीटर याचा असहिष्णु स्वभाव. अमीन्सचा भिक्षु पीटर हा पहिल्या क्रूसेडचा आत्मा. तो बुटका व अर्धवट होता. त्यानें पहिल्या क्रूसेडमध्यें प्राण ओतला. त्यानेंच धर्मयुद्धाचें ध्येय दिलें.

— ३ —

भिक्षु पीटर हा अकराव्या शतकांतला कॅटो होता. कॅटोनें कार्थेज धुळीला मिळविण्यासाठीं रोमनांना चिथावलें, उठविलें; पीटरनें 'जेरुसलेम ताब्यांत घ्या' अशी ख्रिश्चनांस चिथावणी दिली. दोघेहि अतिशयोक्तीनें बोलणारे व शापवाणी उच्चारण्यांत प्रवीण होते. पीटर पोप दुसरा अर्बन याजकडे गेला व त्यानें त्याला 'जेरुसलेममधले तुर्की मुसलमान ख्रिश्चन यात्रेकरूंचा अपरंपार छळ करतात' असें सांगितलें. तें अगदींच खोटें होतें असें नव्हे. अकरावें शतक म्हणजे धार्मिक छळाचेंच शतक म्हणाना ! सारें जग द्वेषाच्या वावटळींत सांपडलें होतें. मुसलमान ख्रिश्चनांची, तर ख्रिश्चन मुसलमानांची कत्तल करीत होते आणि ज्यूंची कत्तल तर काय, सर्वच करीत ! न्यायासाठीं शस्त्र घेण्याला योग्य असे खरोखर कोणाचेच हात नव्हते. सारेच अपराधी व दोषी, सारेच खुनी व गुन्हेगार ! पण पोपनें एकांगी दृष्टि ठेवली व ख्रिश्चनांच्या पापांकडे डोळेझांक करून मुसलमानांना मात्र धडा शिकविण्याची पवित्र प्रतिज्ञा केली. त्यानें इ. स. १०९५मध्यें क्लर्मोंट येथें धर्मसभा बोलाविली व तीपुढें जळजळीत द्वेषाचें प्रवचन केलें. तें साऱ्या दुष्ट भावना जागृत करणारें व

मुसलमानांबद्दल सर्वांस चीड आणणारें भाषण होतें. तो म्हणाला, "तुम्ही या पवित्र युद्धांत भाग घ्याल तर तुम्ही ईश्वराचीच कृपा मिळवाल असें नव्हे, तर ऐहिक दृष्टीनेंहि तुमचा फायदाच होईल. मेल्यानंतर ईश्वराचें राज्य, इहलोकीं भरपूर लूट! हें युद्ध अशा रीतीनें दोन्ही लोकीं फायदेशीर आहे. पॅलेस्टाइन म्हणजे समृद्ध व संपन्न देश—दुधातुपानें, मधानें व द्राक्षांनीं भरलेला देश. जे कोणी परधर्मीयांपासून पॅलेस्टाइन जिंकून घेतील त्यांच्यांत ती जमीन वांटली जाईल. जा. धर्मयुद्ध करा." हें भाषण ऐकून जमलेल्या कोल्ह्यांकुत्र्यांनीं जिभा चाटण्यास सुरुवात केली. ते एकदम म्हणाले, "ईश्वराचीच अशी इच्छा आहेसें दिसतें" व या थोर युद्धासाठीं निघण्याच्या तयारीला लागले.

पीटर या लोकांच्या टोळीचा नेता झाला. तो शरिरानें खुजा, बुद्धीनें अप्रगल्भ व मनानें संकुचित आणि असंस्कृत होता. त्याचें चारित्र्यहि तिरस्करणीय होते. तो केसाळ झगा वापरी व पायांत कांहींच घालीत नसे. त्याच्या डोक्यावरचे केस पिंजारलेले असत. ही खुनशी स्वारी गाढवावर बसे. गाढवाला तो पवित्र मानी. त्याच्या हातांत एक लांकडी क्रॉस असे. हा पीटर फ्रान्समध्यें व जर्मनींत सर्वत्र हिंडला. चर्चमध्यें, रस्त्यात, कोंपऱ्यां-कोंपऱ्यांवर त्यानें प्रचाराचा घूमधडाका उडविला. गिबन म्हणतो, "पीटर-जवळ बुद्धि नव्हती, युक्तिवादहि नव्हता. पण ही उणीव भरून काढण्यासाठीं तो पदोपदीं ख्रिस्ताचें नांव उच्चारी, मेरी व देवदूत यांचे उल्लेख करी व या सर्वांबरोबर आपलें बोलणें होत असतें असें सांगे." १०९६च्या वसंत ऋतूंत त्यानें जवळजवळ एक लाख लोकांचा तांडा जमा केला. त्यांत बहुतेक सारे भिकारी, डाकू व गळेकापू होते. तो त्या सर्वांच्या अग्रभागीं होता. एक पवित्र हंसी व एक मेंढा त्या सर्वांपुढें चालत, या गोष्टीवरूनच त्यांच्या बुद्धीची प्रगल्भता दिसून येते. मेंढीच्या मार्गदर्शकत्वाखालीं निघालेले लोक! अशा थाटांत पीटर ख्रिश्चन नसणाऱ्या सारासीन मुसलमानांस ठार करण्याच्या अति थोर ध्येयासाठीं निघाला.

त्याला दिसून आलें कीं, सारासीन अजून बरेच दूर असले तरी मारामारी जवळच आहे. ज्यूंची कत्तलहि त्याला इष्टच होती. त्यांचा देव ख्रिश्चनांचा देव थोडाच होता! म्हणून त्यानें आधीं ज्यूंविरुद्धच क्रूसेड सुरू केलें. जेथें जेथें तो जाई तेथें तेथें ज्यूंची वस्ती असली तर तो त्या सर्वांची कत्तल करी

व नंतर 'शान्तिः शान्तिः शान्तिः!' असें म्हणे. त्याचे साथीदार—तीं पवित्रयुद्धवालीं स्त्री–पुरुष–मुलें–कोणालाहि शिल्लक ठेवीत नसत. ज्यूंना कोठेंहि जाता येत नसे. कारण, या वेताळांचे लोंढे चोहोंकडून घों घों करीत येत. क्वचित् कोणीं ज्यूंनीं सर्व संपत्ति देऊं केली तर एकादा बिशप त्याच्या रक्षणार्थ पुढें येई; पण तोहि ज्यूंची धनदौलत बळकावल्यावर पुनः त्या अकिंचनांना क्रूसेडर्सच्याच हवालीं करी. ट्रीव्ह्ज् शहरीं ज्यू तेथल्या बिशपच्या दारीं आश्रयासाठीं गेले; पण बिशप राजवाड्याचे सर्व दरवाजे बंद करून घेऊन गच्चीवरून म्हणाला, "नीचानो, हतपतितांनो, तुमचींच पापें तुमच्यावर उलटलीं आहेत. तुम्हीं ईश्वराच्या पुत्राची निंदा केली आहे, माता मेरी हिची अवहेलना केली आहे. जा. मरा."

या हतभागी ज्यूंनीं कधीं कधीं तर अलौकिक धैर्य दाखविलें! कत्तली करणाऱ्या या माथेफिरूंचा हा रक्ताळ धर्म स्वीकारण्यापेक्षां किती तरी ज्यू शांतपणें मरणाला तयार होत. नाझरेथ येथील त्या शांति–मूर्ति येशूचा संदेश क्रूसेडर्सना कळला होता येवढेंच नव्हे, तर ते तो कृतींतहि आणीत होते. एका मध्ययुगीन बखरींत पुढील वर्णन आहे :—"शांतीच्या ईश्वराला हांक मारून जणूं या बाया धैर्यानें पदर बांधून उभ्या राहत, आपल्या हातांनीं आपलीं मुलेंबाळें ठार मारीत व नंतर स्वतःला ठार मारीत. पुष्कळ पुरुषहि धैर्याचा अवलंब करून प्रथम आपल्या बायकांस ठार मारीत, मग मुलेंबाळें व नोकरचाकर यांसहि ठार करीत. कोमल स्वभावाच्या व शांत वृत्तीच्या सतीहि आपलीं मुलें ठार मारीत. परस्परांवर प्रेम जडलेलीं व विवाहबद्ध होऊं इच्छिणारीं तरुण जोडपीं खिडक्यांतून बाहेर पाहत व म्हणत, "हे प्रभो, तुझ्या नांवाचें पावित्र्य राखण्यासाठीं हें पाहा आम्ही काय करीत आहों!" आणि रक्ताचा पूर वाहूं लागे! स्त्रियांचें रक्त पुरुषांच्या रक्तांत, तसेंच आई–बापांचें मुलांच्या रक्तांत मिसळे; भावांचें रक्त बहिणींच्या रक्ताला, तर गुरुजनांचें शिष्याच्या रक्ताला मिळे! त्या एकाच दिवशीं अकराशें जीवांचें हनन झालें."

ज्यू धर्मोपदेशक यित्झॅक बेन अशेर याच्या कन्येची वीर व करुण रसांनीं भरलेली कथा कोणीं ऐकली आहे का? अशी कहाणी जगांत कोणासहि ऐकावयास मिळाली नसेल. ज्यू धर्मोपदेशक येहुदा याची शूर व निर्भय पत्नी

आपल्या मित्रांना विनवून म्हणाली, "माझीं चार मुलें आहेत, तीं ख्रिश्चनांच्या हातीं जिवंतपणीं पडतां कामा नये. ते माझ्या बाळांना डाकू, गळेकापू बनवतील; त्यापेक्षां तीं मरूं देत, ईश्वराच्या नावाच्या पावित्र्यार्थ बळी जाऊं देत." पण जेव्हां एका मित्रानें एका मुलास ठार करण्यासाठीं सुरा उगारला, तेव्हां ती तरुण माता दुःखानें हंबरडा फोडून, कपाळ आपटून घेऊन व छाती पिटून म्हणाली, "प्रभो, कुठं आहे तुझी प्रेमळ दया व उदार आणि वत्सल करुणा ?" नंतर ती निराशेनें आपल्या मित्रास म्हणाली, "या मुलांना एकमेकांच्या डोळयांसमोर तरी नको रे मारूं! आरॉनच्या समक्ष ऐझॅकला मारूं नको, ऐझॅकला आरॉनचं मरण दिसतां कामा नये. तो पाहाना आरॉन दूर गेला ?" मग तिनें ऐझॅकला हातांत घेतलें. तो लहान व दिसण्यास कोवळा व सुकुमार होता. तिनें त्याला ठार मारून त्याचें रक्त भांडयांत धरावें तसें आपल्या बाह्यांत घेतलें. आरॉननें हें दुरून पाहिलें. तो एका पेटीमागें लपूं पाहत होता. त्या बाईला बेला व याड्रोना नामक दोन सुंदर लहान मुली होत्या. त्यांनीं आपण होऊन धार लावलेले सुरे आईच्या हातीं आणून दिले व खालीं माना घालून आईनें आपलें हनन करावें म्हणून त्या तिच्यासमोर वांकल्या. रॅचेलनें अशा रीतीनें ऐझॅक व दोन मुली यांचें बलिदान करून उरलेल्या आरॉनला हांक मारली. 'बाळ, कुठें आहेस तूं ? मी नाहीं हो तुला वांचवूं शकत ?' असें म्हणून तिनें त्याला पेटीमागून ओढलें व त्याचाहि देवाला बळी दिला. तिच्या पतीनें त्या चार सुकुमार मुलांचें बलिदान पाहून तरवारीवर पडून आत्मबलिदान केलें. त्याचीं आंतडीं बाहेर आलीं. त्यांतून रक्त वाहत होतें. त्या बाईनें एकेका बाहींत दोन दोन मुलें लपविलीं. ती तेथें बसून विलाप करीत असतां क्रूसेडर्स त्या खोलींत आले व गर्जले, "ज्यू डाकिणी, दे सगळें धन. बाह्यांत लपवून ठेवतेस काय ?" पण झडती घेतां बाह्यांत त्यांना तीं मृत बाळें दिसलीं. एकाच घावासरशीं त्यांनीं तिलाहि मुलांच्या भेटीला पाठविलें. एकच घाव आणि ती मेली! किंकाळी फोडण्यासहि तिला वेळ नव्हता.

ख्रिस्ताच्या नांवानें युद्ध पुकारणाऱ्या ख्रिश्चनांच्या हृदयांत अशी ही दैवी धीरोदात्त प्रेरणा होती. एच. जी. वेल्स या इतिहासलेखकाला ज्या ध्येयामुळें व युरोपांतील ज्या आत्मदर्शनामुळें उचंबळून आलें तें ध्येय व तो

आत्मा यांचें स्वरूप एवंविध होतें. इ. स. १०९६ मध्यें पहिल्या क्रूसेडची ही भीषण लाट अशा प्रकारें युरोपभर पसरली.

भिक्षु पीटर याचे सैनिक केवळ ज्यूंनाच मारीत असें नव्हे, तर ते आपल्या ख्रिश्चन बांधवांनाहि लुटीत. या सैनिकांपैकीं पुष्कळ तर जेरुसलेमपर्यंत गेलेहि नाहींत. त्यांनीं आपले लहान लहान जथे केले. हे जथे युरोपभर प्रार्थना व लूटमार करीत आपलीं जीवनें पवित्र करते झाले. याच ध्येयाला त्यांनीं सारें जीवन वाहिलें. कांहीं मूठभर लोक जेरुसलेमकडे गेले; पण तुर्कांनीं त्यांचा फन्ना उडविला!

पहिल्या क्रूसेडची दुसरी तुकडी आली. तींत जरा अधिक वरच्या दर्जाचे व कडक शिस्तीचे लोक होते. पण हृदयांतील दुष्टता मात्र तीच होती. त्यांनीं मुसलमानांपासून जेरुसलेम जिंकून घेतलें. ब्रिटिश ज्ञानकोशांत 'क्रूसेड्स्'-बाबत लिहितांना अर्नेस्ट बार्कर म्हणतो, "ख्रिश्चनांनीं केलेली कत्तल केवळ अमानुष होती! रस्त्यांतून रक्ताचे पाट वाहत होते. रक्तप्रवाहांतून घोडेस्वार दौडत होते. रात्रीच्या वेळीं आनंदानें अश्रू ढाळीत क्रूसेडर्स तेथील ख्रिस्ताच्या थडग्याजवळ गेले व त्यांनीं आपले रक्तानें माखलेले हात प्रार्थनेसाठीं जोडले. त्या दिवशीं १०९७ च्या जुलैमध्यें पहिलें क्रूसेड संपलें.

यानंतर आणखी आठ क्रूसेड्स् म्हणजे धर्मयुद्धें जवळजवळ दोनशें वर्षें चाललीं होतीं. नेहमीं तेच ते रानटी व राक्षसी प्रकार! ज्यू, ख्रिश्चन, मुसलमान यांच्या कत्तली व लुटालुटी! या क्रूसेडरांपैकीं कांहीं थोडे उदात्त ध्येयवादानें प्रेरित झाले असतील, नव्हे, होतेहि. त्यांच्या मनांत कांहीं तरी गूढ आंतरिक प्रेरणा स्फुरलेली होती. या जगांत ख्रिश्चन धर्माला कोठेंहि अडथळा होऊं नये असें त्याना वाटे. प्रत्येक युगांत कांहीं मूर्ख पण ध्येयवादी लोक असतातच; त्याचप्रमाणें गूढ वृत्तीचे व उत्कट भावनाचे सारासीन मुसलमानांसाठीं जग निष्कंटक करूं इच्छीत होते. कत्तली केल्यामुळें इतर माणसें सुधारतात, अधिक चांगलीं होतात असें या वेडपटांना वाटत असतें. पण हे स्वप्नांत वावरणारे ध्येयवादी लोक महत्त्वाकांक्षी व स्वार्थी लोकांच्या हातचीं बाहुलीं बनतात. हे ध्येयवादी लोक युद्धाभोंवतीं एक तेजोवलय निर्माण करतात व घाणेरड्या कर्मांवर पावित्र्याचा पोषाख चढवितात! युद्ध धार्मिक असो वा व्यापारी असो, त्यांत असे कांहीं ध्येयात्मे असल्यामुळें एकादा कवि मग

त्या युद्धावर महाकाव्यहि लिहितो. पण अशीं काव्यें वा असे पोवाडे होऊनहि लाखों निरपराध लोकांची कत्तल कांहीं थांबत नाहीं. घरेंदारें लुटलीं जातातच ! मग शीं काव्यें काय चाटावयाचीं ? त्यांमुळें एकाद्या धर्मवेड्या माणसाच्या हातांतील तरवारीनें छिन्नविच्छिन्न झालेल्या बालकाला काय कमी वेदना होतात ? केवळ स्वार्थी व हडेलहप्प माणसानें मारलेल्या मुलाला होणाऱ्या वेदनांइतक्याच वेदना गूढ धर्मवृत्तीनें भारलेल्या माणसानें मारलेल्या मुलाला देखील होतात ! क्रुसेड्समध्यें मूठभर धर्मवेडे गूढवादी लोकहि होते, येवढ्यामुळेंच कांहीं त्या युद्धांना पावित्र्य येत नाहीं. तीं युद्धें माणुसकीस काळिमा फासणारीं, निंद्य व लाजिरवाणींच ठरतात ! ख्रिश्चन चर्चलाच नव्हे तर साऱ्या मानवजातीलाच या लांछनास्पद युद्धांचा कलंक लागतो.

## प्रकरण ३ रें

## कॅथॉलिक पंथी बंडखोर : ॲसिसीचा साधु फ्रॅन्सिस

### — १ —

नऊ रक्ताळ क्रुसेड्स् झालीं. त्यांत भर म्हणून सेंट फ्रॅन्सिसचें रक्तहीन दहावें क्रुसेडहि झालें. मुसलमानांनाच नव्हे तर ख्रिश्चनांनाहि खऱ्या ख्रिस्ती धर्माकडे वळविण्यासाठीं सेंट फ्रॅन्सिस जीवनभर धडपडला. तो प्रभूचा खरा भक्त होता, प्रभुसंदेश गाणारा सौम्यमूर्ति संत होता. त्यानें सारें जीवन प्रेमानें धर्मप्रसार करण्यांत घालविलें; पण त्या प्रयत्नांत त्याला फारसें यश आलें नाहीं.

सेंट फ्रॅन्सिसचें पूर्ण नांव फ्रॅन्सिस्को बर्नार्डोनो. तो इटॅलियन होता. ख्रिस्ताच्या जीवनाचें अनुकरण करावें अशी त्याला इच्छा होती. पण खरोखर तो बुद्धाच्या जीवनाप्रमाणें जगला. बुद्धाचें नावहि त्यानें कधीं ऐकलें नसेल. पण बुद्धाचेंच जीवन न कळत का होईना, त्याच्या डोळ्यांसमोर होतें. बुद्धाच्या जीवनांतील प्रसंगांशीं सेंट फ्रॅन्सिसच्या जीवनांतील प्रसंगांचें आश्चर्यकारक साम्य आहे. दारिद्र्याशीं समरस होण्यासाठीं दोघांनींहि आपापलें वैभव झुगारून दिलें ! दोघेहि खासगी मालमत्ता म्हणजे पाप—पापांचें. मूळ

असें समजतात. मानवांच्या कपाळावरील दुःखांच्या रेषा पुसून टाकण्यासाठीं दोघेहि आमरण परिव्राजक होऊन भटकत राहिले. दोघांनींहि जीवनांतील सौंदर्य व करुणा हीं नीट जाणलीं होतीं. अखिल मानवजातीच्या चालू असलेल्या अफाट सहानुभूतीच्या संगीतांतला आपण केवळ एक सूर आहों, फक्त एक अंश आहों असें त्या दोघांसहि वाटे. दोघेहि मरणप्रसंगीं आपल्या मित्रांस म्हणाले, "आम्हांला जमिनीवर निजवा." संसारांतील वस्तूंचें ओझें त्यांना नको होतें. त्यांचा स्पर्श त्यांना पापमय वाटे. "नको हा संग्रह, नकोत या भौतिक चिजा!" असें ते म्हणत.

— २ —

फ्रॅन्सिस हा पिएट्रो बर्नार्डोंचा मुलगा. पिएट्रो हा सुखवस्तु कापडाचा व्यापारी होता. फ्रॅन्सिस उधळ्या, बंडखोर व भावनाप्रधान होता; तो एकदम उसळे, उफाळे. तथापि तो अत्यंत उदार होता. त्याला पैशाची किंमत कळत नसे. पैसा देण्यासाठीं असतो, असेंच जणूं त्याला वाटे. डाव्याउजव्या हातांनीं तो बेसुमार पैसे खर्ची, पण स्वतःसाठीं नव्हे तर दुसऱ्यांच्या सुखासाठीं. पित्याच्या पेटींत पैसा उगाच पडून राहण्यापेक्षां मित्रांना आनंद देण्यासाठीं त्याचा उपयोग व्हावा हें त्याला पसंत पडे. त्याचा बाप काटकसरी होता, आईहि जपून खर्च करणारी होती. ती म्हणे, "फ्रॅन्सिस जसा कांहीं राजाच्या मुलासारखा वागतो! आपण एका इटॅलियन दुकानदाराचा मुलगा आहों हें जणूं त्याच्या ध्यानींहि नसतें!" आई फ्रॅन्सिसबाबत थोडें प्रेमानें बोले; पण बापानें त्याच्याविषयीं आशाच सोडली होती. फ्रॅन्सिस कधीं काळीं सुधारेल याची त्याला मुळींच शक्यता वाटत नसे.

आईबाप फ्रॅन्सिसवर नाराज असले तरी ॲसिसीचे सारे तरुण मात्र त्याला जीव कीं प्राण करीत. तो पैशाची किंवा स्वतःच्या प्राणाचीहि पर्वा करीत नसे. तो हाडकुळा होता; त्याचे डोळे काळेभोर व तेजस्वी होते. तो नेहमीं आनंदी व उल्हासी असे. तो तरुणांचा खेळांतला नेता—म्होरक्या—असे. तरुणांच्या फॅशन्स, त्यांच्या खोड्या, त्यांचे प्रेम-प्रकार या सर्वांत तो पुढें असे. तरुण टॉल्स्टॉयप्रमाणें, यौवनारूढ बुद्धाप्रमाणें त्यालाहि त्याचे मित्र "खरा सवंगडी, जानी दोस्त" असें म्हणत.

फ्रॅन्सिस तारुण्य ओलांडून पलीकडे जात होता. त्या वेळीं त्याचें शहर इटलींतील दुसऱ्या एका शहराशीं युद्ध करण्यांत गुंतलें होतें. त्या काळांत अशीं युद्धें नेहमींच चालत. पूर्वीचें रोमन साम्राज्य जाऊन त्याचीं अनेक लहानलहान स्वतंत्र संस्थानें झालीं होतीं. ठायीं ठायीं तट व भिंती असलेल्या शहरांत राहून सरदार आजूबाजूच्या प्रदेशांवर राज्य करीत. शेजारच्या राजांशीं अखंड युद्धें सुरू असत. जगाचें एकीकरण तरवारीनें करणाऱ्या रोमनांनीं स्वतःच्या राष्ट्राचे मात्र शत खंड केले! त्यांच्या त्या मूर्खपणामुळें उद्भवलेल्या मोठमोठ्या युद्धांतून छोटीं छोटीं युद्धें पैदा झालीं. पूर्वीं एकजात घाऊक कत्तली होत; आतां किरकोळ कत्तली होऊं लागल्या. प्रत्येक शहर दुसऱ्या कोणत्या तरी शहराविरुद्ध लढत होतें. व्हेनिस फ्लॉरेन्सविरुद्ध, फ्लॉरेन्स ॲसिसीविरुद्ध, ॲसिसी पेरुगियाविरुद्ध, पेरुगिया व्हेनिसविरुद्ध अशी अखंड युद्धमालिका इटलीभर चालू होती. सर्व युरोपभरच हा मारणमरणाचा प्रकार बोकाळला होता म्हणाना! पहिल्या सीझरची महत्त्वाकांक्षा हजारों छोट्या सीझरांनीं उचलली; पण एकाजवळहि त्याची प्रतिभा नव्हती. लहानलहान शहरांमधील कधीं न संपणाऱ्या या यादवींत मध्ययुगांतील संस्कृति नष्टप्राय होत होती.

पेरुगिया व ॲसिसी यांमध्यें जेव्हां हें मूर्खपणाचें द्वंद्वयुद्ध सुरू झालें, तेव्हां तरुण ॲसिसी भावनांनीं पेटून आपल्या शहरातर्फे स्वयंसेवक म्हणून नांव नोंदविता झाला. त्यानें आतांपर्यंत अनेक साहसाच्या पण शांततामय गोष्टी केल्या होत्या. त्याला आतां जरा बदल हवा होता. तो युद्धांतील चैतन्यमय अशीं तेजस्वी साहसें करावयाला, त्यांची चव घ्यावयाला उत्सुक झाला होता. पण युद्धांतील हीं साहसें त्याला फार पसंत पडलीं नाहींत. तो एका युद्धांत पकडला गेला व मध्यकाळांतल्या तुरुंगांचाहि अनुभव त्याला चाखावयाला मिळाला; युद्धाइतका तेजोमय तो नसला तरी रानवट तर होताच. तुरुंगवासामुळें त्याची युद्धोत्सुकता कायमची नष्ट झाली.

तुरुंगांतून घरीं आल्यावर तो फार आजारी पडला. क्षणभर तर तो मरणारसें देखील भासलें; पण शेवटीं तो वांचला. तथापि तो अशक्त असल्यामुळें अंथरुणांत पडून राही. पडल्या पडल्या तो जीवनाकडे एका नवीन दृष्टीनें पाहूं लागला. या जगात वायफळ बडबडच फार; करणें थोडें, मचमच

फार! हे जग निरुपयोगी वस्तूंच्या पाठीमागें उगीचच धावत असते. हे लोक क्षुद्र गोष्टींसाठीं उगीचच भांडत वा लढत असतात. असलें क्षुद्र जीवन अतःपर जगावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय केला व मानवाला शोभेसें वैचारिक जीवन जगण्याचें ठरविलें.

बरा झाल्यावर त्यानें पुनः सैनिक होण्याचें नाकारलें. त्याचे पूर्वींचे सारे मित्र एकामागून एक त्याला सोडून गेले. ते त्याला भितुरडा, मागें मागें राहणारा, नेभळट म्हणून निंदीत; पण त्यांची निंदा ऐकून तो शांतपणें स्मित करी. त्याला ती निंदा जणूं मुकुटाप्रमाणें वाटे, दूषणें भूषणें वाटत. तो दुसऱ्यांना पीडा देण्यास तयार नव्हता व म्हणून स्वतः कष्ट सोसण्यास सिद्ध झाला. हें एक नवीनच साहस होतें. कष्ट सोसण्याचा हा नवीनच आनंद, नवाच अनुभव होता. आजपर्यंतच्या सर्व साहसांपेक्षां दुसऱ्यास त्रास न देतां स्वतः हालअपेष्टा भोगण्याचें साहस त्याला अधिक रोमांचकारी वाटलें.

एकदां उंब्रिया गांवच्या शेतांतून घोडयावर बसून जात असतांना त्याला वाटेंत एक महारोगी भेटला. पूर्वी या जिवंत मढ्यांना पाहून त्याला शिसारी येत असे, तो डोळे मिटीत असे. त्याला जी जी कुरूप वस्तु दिसे त्या त्या वस्तूपासून तो भिऊन व विटून दूर सरे. तो जणूं कवि होता, सौंदर्योपासक होता! पण तो स्वतः आजारांतून गेला होता. शारीरिक दुःख म्हणजे काय, रोगामुळें कुरूपता कशी येते, याचा अनुभव त्यानें घेतला होता. त्यामुळें त्याला लोकांच्या कष्टांची, हालअपेष्टांची व रोगांची करुणा वाटूं लागली. जेव्हां त्याच्याकडे येणारा महारोगी त्याला दिसला, तेव्हा तो एकदम प्रेमानें व करुणेनें घोड्यावरून उतरला. त्यानें त्या दुंःखीकष्टी रोग्याला जवळचे पैसे दिले, येवढेंच नव्हे, तर स्वतःलाहि त्याला देऊन टाकलें. त्यानें त्याला आपल्या बाहूंनीं कवटाळलें व प्रेमानें त्याच्या सुखदुःखाची चौकशी केली. आतांपर्यंत त्यानें पांढरपेशा सुखी मंडळींतलें आदळआपटीचें, खाण्यापिण्याचें सुख अनुभवलें होतें; पण आतां त्याला निराळेंच शांत व दांत असें सुख अनुभवावयास मिळूं लागलें. परित्यक्तांवर प्रेम करण्यांत व दुःखीकष्टी लोकांच्या संगतींत राहण्यांत एक अधिकच खोल, गंभीर व अत्यंत शांत असा आनंद असतो हें त्याच्या अनुभवास आलें. त्यानें वरिष्ठ वर्गाचा त्याग केला व गरिबांच्या—अनाथांच्या—सेवेस आपणास वाहून घेतलें. ज्यांना जीवनांत अपयश आलेलें असे, जे

कोठेंच नीट बसूं शकत नसत, ज्यांना पुढें जातां येत नसे, ज्यांना अशक्तपणा-मुळें कामकाज करतां येत नसे, दरिद्री व दुबळे असल्यामुळें ज्यांच्याकडे कोणी कधीं लक्ष देत नसे, अशांकडे तो आपली सारी सहानुभूति घेऊन जाई. कोणीं तरी लिहिलें आहे, "ईश्वरहि ज्यांची हांक ऐकणार नाहीं, अशांचेंहि तो ऐके." इतकेंच नव्हे, तर तो याहिपलीकडे जाई. जरी तो निष्ठावंत कॅथॉलिक होता, तरी देवानें दुःखीकष्टी केलेल्यांना सुखी करून देवाची चूकहि दुरुस्त करण्याचें धाडस तो करी.

तो निष्ठावंत कॅथॉलिक असला तरी चर्चचा, येवढेंच नव्हे तर आपल्या पित्याचाहि, आज्ञाधारक पुत्र नव्हता. तो आपल्या मनोदेवतेचा हृदयांतील सूर ऐकावयाला उत्सुक असे. वरिष्ठांपेक्षां त्याचें हृदयच बहुधा अधिक बरोबर असे. एकदां त्याला कोणाला तरी मदत करण्यासाठीं पैसे हवे होते. त्यानें आपला घोडा विकला, तद्वतच पित्याच्या दुकानांतील कापडाचा एक गठ्ठाहि विकला. बापानें त्याला चोर म्हटलें व उपदेशाचे लोटे पाजले. आईबाप किती कष्ट करतात, मुलांना किती प्रेमानें वागवितात, परंतु मुले कशीं कृतघ्न निपजतात हें बापानें जळजळीत वाणीनें सांगितलें. तो फ्रॅन्सिसला म्हणाला, "अरे, तुझें सारें, तुझ्या अंगावरचे हे कपडेहि तुझ्या आईबापांच्या कृपेमुळें आहेत, समजलास ?" पित्याचे शब्द ऐकून फ्रॅन्सिसने अंगावरचे कपडे काढून त्याच्या समोर फेंकले व त्यानंतर दुसऱ्याच्या दयेवर अवलंबून न राहण्याचें ठरविले. लोक जर पदोपदीं केलेल्या उपकारांची आठवण करून देणार असतील तर त्यांचे उपकार शक्य तों न घ्यावे असे त्याने ठरविलें. एक फाटका झगा अंगावर घालून तो घरांतून बाहेर पडला. त्या वेळीं हिंवाळा होता. बाहेर सर्वत्र थंडगार धुकें पसरलें होतें. तो त्या कडक थंडींतून गाणें म्हणत जात होता. मालमत्तेच्या बंधनांतून तो कायमचा मोकळा झाला होता. सर्व चीजवस्त सोडून बाहेर पडल्यामुळें त्याला जणूं मुक्तपणा वाटत होता, अपार आनंद होत होता, जवळच्या किडुकमिडुकानेंहि जो संतुष्ट असतो तोच खरोखर श्रीमंत होय; ही गोष्ट जर सत्य असेल तर फ्रॅन्सिस बर्नार्डो जगातील सर्वांत श्रीमंत मनुष्य होता. त्याच्यापाशीं कांहींच नव्हतें; तरीहि तो अतीव सुखी होता. त्यानें सुखी असण्याचें केवळ सोंग केलें नव्हते. त्याला आपले हौतात्म्य दाखविण्याची असोशीहि नव्हती किंवा आपण मोठे त्यागवीर आहों अशी दवंडी

पिटण्याचीहि इच्छा नव्हती. सेंट फ्रॅन्सिस हा फकीर होता. पण तो स्वतःची टिमकी वाजविणारा नव्हता. तो ईश्वरासाठीं तर फकीर झालाच होता, पण त्याहिपेक्षां अधिक मानवबंधूंसाठीं झाला होता. आपले लाखों बंधू असुखी असतां आपण सुखांत राहावें याची त्याला लाज वाटे. लाखों उपाशी असतां आपण घृतकुल्या, मधुकुल्या खात बसावें हें त्याला कसेंसेंच वाटे. पण म्हणून जगाला कंटाळलेल्या एकाद्या माणसाप्रमाणें तो रानावनांत मात्र गेला नाहीं, तर दरिद्री, परित्यक्त, निराधार, रोगी अशा लोकांत मिसळला. तो त्यांची क्षुधा शांत करी, त्यांची सेवाशुश्रूषा करी, त्यांना त्यांचा स्वाभिमान देई. तो स्वतःचा फार कमी विचार करी म्हणूनच तो अतिशय सुखी होता. तो दुसऱ्यांचा अधिक विचार करी. त्याला मिळणाऱ्या अन्नांतला जाडाभरडा तुकडा तो स्वतःसाठीं ठेवून गोडधोड दुसऱ्यांना देऊन टाकी. हिंवाळा असो, उन्हाळा असो, तो त्याच फाटक्यातुटक्या झग्यांत आपला देह गुंडाळी व तो झगा कमरे-भोंवतीं एका दोरीनें बांधी. पुढें हाच फ्रॅन्सिस्कन साधूंचा सांप्रदायिक गणवेष झाला. हे फ्रॅन्सिस्कन साधू म्हणजे ख्रिस्ताची सेवापरायण शांतिसेना! अशी सेना कधीं कोणीं उभारली होती का? ही अपूर्व सेना युरोपभर दया दाखवीत, रोग्यांची शुश्रूषा करीत, अनाथांस प्रेम व आधार देत फिरत असे.

— ३ —

फ्रॅन्सिसनें सुरू केलेल्या या नव्या सेवापंथासाठीं त्याला प्रथम फक्त दोनच अनुयायी मिळाले. त्यांनीं महारोग्यांच्या एका वसाहतीजवळ एक झोंपडी बांधली व जिवंतपणीं मरणयातना भोगणाऱ्या त्या दीनवाण्या रोग्यांच्या सेवेला त्यांनीं आपणांस वाहून घेतलें. तीन वर्षांत या सेवासंघांतल्या दोघांचे बारा जण झाले. सेंट फ्रॅन्सिसचे हे जणूं लहान भाऊच होते. हे बारा जण फ्रॅन्सिसच्या पुढारीपणाखालीं पोपकडे जावयास निघाले. पोपच्या अंगचा खरा ख्रिश्चनभाव त्यांच्या येण्यामुळें प्रकट झाला. तो विरघळला व त्यांना म्हणाला, " ख्रिस्ताला आवडणारें हें तुमचें सेवेचें कार्य असेंच चालू ठेवा. फक्त संघटित अशा चर्चच्या व्यवस्थेआड येऊं नका म्हणजे झालें. चर्चविरुद्ध बंड नका करूं." फ्रॅन्सिस म्हणाला, "आम्हांला मुळीं राजकारणांत ढवळाढवळ करावयाचीच नाहीं. तुम्ही आमच्या मार्गांत येऊं नका, आम्हीहि तुमच्या मार्गांत येणार नाहीं."

पोपशीं असा समझौता करून फ्रॅन्सिस दरिद्री जनतेच्या दर्शनाच्या व सेवेच्या यात्रेला निघाला. तो सॅरासीन लोकांच्या पुढाऱ्याकडे गेला. या वेळीं पाचवें क्रूसेड सुरू होतें. तरीहि फ्रॅन्सिस निर्भयपणें निःशस्त्र स्थितींत सुलतानास भेटण्यास गेला. त्यानें पोपला खरा ख्रिश्चन करण्याची खटपट केली तशीच सुलतानालाहि ख्रिश्चन करण्यासाठीं खटपट केली. *सुलतानानें त्याचें प्रेमानें स्वागत केलें. शेवटीं तो म्हणाला, "साधुमहाराज, तुम्ही आपलें काम करीत राहा."

फ्रॅन्सिस इटलींत परत आला; पोप व सुलतान धर्मयुद्ध लढत राहिले.

— ४ —

सेंट फ्रॅन्सिसला फारसें शिक्षण मिळालेलें नव्हतें. त्याच्या ठायीं लहान मुलाची श्रद्धा होती, तशीच निर्मळ व खरीखुरी भक्तीहि होती. तो मान्य करो वा न करो, प्राचीन काळच्या सर्वांभूतीं परमेश्वर मानणाऱ्या तत्त्वज्ञान्यांप्रमाणेंच तोहि जणूं सर्वत्र प्रभु पाही. त्याला सर्वत्र चैतन्य दिसे. सर्व परस्परसंबद्ध वाटे. हें सारें एकजीव आहे, जणूं एकाच दोऱ्यांत ओंवलेलें आहे, हे एकाच विराट देहाचे जणूं भिन्न भिन्न भाग आहेत असें त्याला वाटे. तो एखाद्या मुलाप्रमाणें पांखरांना आपलीं भावंडें मानी, वारा व सूर्य त्याला जणूं भाऊ वाटत व पृथ्वी म्हणजे जणूं सर्वांची प्रेमळ प्राणमय माताच वाटे. होमरकालीन प्राचीन लेखकांत हीच भावना सर्वत्र आढळते; प्राचीन कवी सर्वत्र चैतन्य व पुरुषत्व पाहत. प्राचीन ऋषी पृथ्वीला मानवांची माता व अनंत आकाशाची पत्नी मानून प्रणाम करीत. दुसऱ्याहि एका प्राचीन देशांत आपणास हाच विचार आढळतो——अमेरिकेंतील इंडियन सूर्याला पिता मानीत, पृथ्वीला—या शस्यश्यामला पृथ्वीला—माता मानीत, सूर्याचें व वसुंधरेचें संगीत ऐकत. ते इंडियन, ते होमरप्रभृति कवि, ते सेंट फ्रॅन्सिस वगैरे संत, सारे सजीव व निर्जीव सृष्टींत प्राणमय संबंध पाहत. ते केवळ काव्य म्हणून असें मानीत असें नव्हे, तर त्याना तसा आन्तरिक अनुभवच येत असे. ते सारी सृष्टि जणूं मानवाच्या कुटुंबांत आणीत. हें करणें कोणाला बालिश वाटेल तर वाटो, पण त्यांत अनुपम माधुर्य तद्वतच सौंदर्य आहे यांत मुळींच संशय नाहीं. सेंट फ्रॅन्सिस पांखरांविषयींच बोलतो असें नव्हे, तर तो पांखरांबरोबरहि बोलतो. ज्या सारासिनांना ख्रिश्चन करण्यासाठीं तो गेला होता त्यांना भेटून

परत येत असतां त्याला वाटेंत पक्ष्यांचा थवा भेटला. तेव्हां एकाद्या लहान मुलाप्रमाणें तो त्या पांखरांस म्हणाला, " तुम्ही येतां माझ्या धर्मांत ? तुम्ही ख्रिस्ताचीं व्हा, परस्परांस प्रेम द्या, भांडूं नका." तीं पांखरें गोड किलबिल करीत होतीं—नव्हे, जणूं त्याचें अंतःकरणपूर्वक प्रेमळ स्वागतच करीत होतीं ! तो आनंदला, वेडा झाला. आपणांतहि पांखरांच्या संगीतापेक्षां अधिक दिव्य व मधुर संगीत आहे असें त्याला वाटे. " माझ्यांतल्या संगीतानें मलाहि नाहीं का या पांखरांचें स्वागत करतां येणार ?" असें मनांत येऊन तो प्रेमळ व गोड शब्दांत त्या पांखरांस म्हणाला, " लहान भावंडांनो, प्रेमळ बहिणींनो, आतांपर्यंत मीं तुमची किलबिल ऐकली, आतां तुम्ही माझीं गीतें ऐका." आणि त्यानें त्या पंखवाल्या श्रोतृवृंदास आपलें प्रवचन ऐकविलें. त्यांनीं आपले आत्मे वांचवावे, स्वतःचा उद्धार करून घ्यावा, असा उपदेश त्यानें त्यांना केला. चिकित्सक वाचकांस जरी हें सारें हास्यास्पद वाटलें तरी सेंट फ्रॅन्सिसनें आपल्या अग्निनारायण-बंधूला केलेलें आवाहन अत्यंत उदात्त आहे यांत शंकाच नाहीं. फ्रॅन्सिसची दृष्टि कमी होत होती. अजीबात अंधळे व्हावयास नको असेल तर एक डोळा लाल सांडसानें जाळून घ्या असें डॉक्टरांनीं सांगितलें व भट्टींतून लाल सांडस बाहेर काढला. फ्रॅन्सिस प्रेमळपणें उठला, एकाद्या प्रेमळ सजीव मित्राला बोलावें तसें तो त्या लाल सांडसाला म्हणाला, " अग्ने, हे बंधो, ईश्वरानें तुला बलवान्, सुंदर, उपयोगी बनविलें आहे; मजशीं नीट वाग ; मला फार दुखवूं नको हो !"

सेंट फ्रॅन्सिसच्या स्वभावांतील मुख्य गोष्ट म्हणजे अपरंपार सहानुभूति. त्याच्या मनांत सर्वांविषयीं प्रेम तद्वतच आदर असे. या बाबतींत तो बुद्धाप्रमाणें होता. तो जसा मोठ्यांतल्या मोठ्या माणसांशीं वागे, तसाच अत्यंत क्षुद्र माणसांशींहि वागे. एकाद्या सम्राटाला प्रणाम करण्यापेक्षां एकाद्या भिकाऱ्याची क्षमा मागणें त्याला अधिक आवडे. वृक्षवेलींची वा फुलाफळांचीहि झोंप मोडूं नये म्हणून तो अगदीं हळू बोले. त्याची नम्रता स्वतःला उगीचच क्षुद्र मानणारी नसून स्वतःचा विसर पाडणारी होती. ती खोटी व नीच निरहंकारिता नव्हती, तर स्वतःला शून्य करणारी, खरी, श्रेष्ठ निरहंकारिता होती. त्याला स्वतःचा विचार करण्यास वेळच नसे. दुसऱ्यांना साह्य करण्यांत व सुख देण्यांतच तो सदैव रंगलेला असे. त्याला या जगांतील साऱ्या

व्यक्ती जणूं राजाप्रमाणें वाटत व तो त्या सर्वांची जणूं आज्ञाधारक प्रजा असल्याप्रमाणें त्यांशीं वागे.

— ५ —

जगाचें भलें करीत भरपूर हिंडल्यावर तो घरीं परत आला, तेव्हां त्याचें वय चव्वेचाळीस वर्षांचेंच असेल. पण तो वृद्ध झाला होता—ध्येयासाठीं चाललेली अविश्रांत धडपड व तदर्थ भोगावे लागलेले कष्ट यांमुळें तो खूप वृद्ध झाला होता—जणूं अनेक शतकांनी वृद्ध झाला होता! डोळे अधू होत होते; तरीहि हा प्रेमळ देवदूत लोकांना सुख देत हिंडत होता, आशेचीं मधुर गाणीं गात सर्वत्र जात होता. पण त्याची शक्ति संपत आली. तो ॲसिसी येथील आपल्या घरीं आला. "तुम्ही कोठेंहि दूर यात्रा करावयाला गेलां, तरी शेवटीं घरीं या. तुमचें घर म्हणजे ईश्वराची पवित्र जागा होय."

आणि ती अखेरची वेळ होती. त्याच्याभोंवतीं प्रेमळ मित्र होते. तो भूमातेच्या मांडीवर निजला तो निजलाच. इ. स. १२२६ मध्यें तो देवाकडे गेला.

तो निराश होऊन मेला. जी. के. चेस्टरटन लिहितो, "सर्व मानवांनीं सहकार्यानें वागावें असें आमरण शिकविणाऱ्या फ्रॅन्सिसला सभोंवतीं झगडे व विरोध वाढत असतां मरण यावें हें दुर्दैव होय! त्यानें आत्यंतिक दारिद्र्याचा वसा घेतला होता. तो युद्धविरोधक होता, अराजकवादी होता. तो आपल्या पंथांतील बंधूंना खासगी मालमत्तेपासून दूर राहण्यास सदैव सांगे. तो म्हणे, "तुम्हीं मालमत्ता केली कीं तिच्या रक्षणार्थ तुम्हांला शस्त्रास्त्रें लागतील व मग तुम्हांला कायदेहि करावे लागतील." ईश्वराच्या गायकाला हातांत एक बांसरी, एक वीणा पुरे, असें तो नेहमीं म्हणे! पण त्याला आपल्याच नांवानें मोठमोठे व संपन्न मठ स्थापन झालेले पाहावे लागले! कांहीं फ्रॅन्सिस्कन बंधू घेतलेलें दारिद्र्याचें व्रत विसरून चर्चच्या मालमत्तेचे हक्क मिळावे म्हणून भांडत असल्याचें पाहण्याची पाळी त्याच्यावर आली. तथापि पुष्कळसे फ्रॅन्सिस्कन पंथीय घेतलेल्या व्रतांना चिकटून राहिले व सेंट फ्रॅन्सिसच्या शिकवणीशीं प्रामाणिक राहिले. त्यांचा छळ झाला. सर्व जण त्याचा तिरस्कार

तसाच द्वेष करीत. सेंट फ्रॅन्सिसच्या मरणानंतर थोड्याच वर्षांत शंभरांहून अधिक फ्रॅन्सिस्कन पंथीय जिवंत जाळले गेले!

## प्रकरण ४ थें

# मुक्या शतकांचा आवाज : डान्टे

## – १ –

सेंट फ्रॅन्सिस रोमन चर्चचा आनुषंगिक पुत्र होता, तर डान्टे रोमन चर्चचा खरा म्हणजे संपूर्ण अर्थानें पुत्र होता. सेंट फ्रॅन्सिसच्या मोठेपणाशीं त्याच्या कॅथॉलिक असण्याचा संबंध नव्हता. तो मुसलमान असता, ज्यू असता वा बुद्ध धर्मी असता तरीहि त्यानें आपल्या जीवनाचें दैवी काव्य लिहिलेंच असतें. त्याचा मोठेपणा अभिजात होता. तो गुण तो एका विशिष्ट धर्माचा वा पंथाचा असल्यामुळे आलेला नव्हता. तो कॅथॉलिक होता ही केवळ योगायोगाची गोष्ट होती. पण डान्टेचा मोठेपणा त्याच्या कॅथॉलिक पंथीय असण्यामुळेंच आहे. डान्टे कॅथॉलिक नसता तर त्याला इन्फर्नो हें महाकाव्य लिहिता आलें नसतें. नरकाचीं व भीषण शिक्षांचीं वर्णनेंहि करतां आलीं नसतीं. सेंट फ्रॅन्सिस मानवजातीची उत्कृष्टता दाखवितो, तर डान्टे रोमन कॅथॉलिक पंथाची उत्तमता दाखवितो. सेंट फ्रॅन्सिस हें मानवजातीच्या वेलीवरील सुगंधी व निर्दोष फूल आहे, डान्टे हें कॅथॉलिक धर्माच्या वेलीवरचें फूल आहे. कॅथॉलिक, बिन कॅथॉलिक, सर्वांसच सेंट फ्रॅन्सिस वांचवूं पाहतो, या जगांतील दुःखांतून त्या सर्वांचीच सुटका करण्यास धांवतो; पण डान्टे कांहीं अपवादात्मक कॅथॉलिक व्यक्ती सोडून बाकी सर्वांना परलोकींच्या नरकाग्नींत लोटून देतो!

सेंट फ्रॅन्सिसचा आवाज सर्व काळांसाठीं आहे. त्याची वाणी सर्व युगांसाठीं आहे; पण डान्टे केवळ मध्ययुगाची भाषा बोलतो, फक्त मध्ययुगाचा पुरस्कार करतो. त्याचें महाकाव्य चर्चचे गुण, दोष दोन्ही दाखवितें...... मध्ययुगांतल्या मनांतील सौंदर्य व कडवेपणा दोहोंचेंहि संपूर्ण चित्र तो देतो. मध्ययुगांतील भलें, बुरें, दोन्ही रंगवितो. मध्ययुगांतील मन—डान्टेचें कॅथॉलिक पंथीय मन—उत्कट प्रेम करी तद्वतच उत्कट द्वेषहि करी; चर्चमधल्या सर्व

गोष्टींवर तें मन प्रेम करी, पण चर्चबाहेरील जगाचा मात्र द्वेष व तिटकारा करी. तो द्वेष प्रेमामुळेंच होता. प्रत्येक कॅथॉलिकास असें शिकविण्यांत येत असे कीं, ईश्वराचें आपल्या लेंकरांवर प्रेम असल्यामुळेंच तो त्यांना शिक्षा करतो. जे चुकतील, पद–च्युत होतील त्यांना तो प्रेमानें कठोर शासन करतो. ईश्वराच्या या प्रेमाचे अनुकरण करणारे हे मध्ययुगांतील कॅथॉलिकहि त्यांना जे चुकलेले वाटत त्यांचा छळ करीत, त्यांना ठार मारीत. " यांच्या आत्म्यांचा बचाव व्हावा म्हणून, यांच्यावर आमचें प्रेम आहे म्हणूनच आम्ही यांना छळतों व ठार करतों " असें ते म्हणत. जी. के. चेस्टर्टन आपल्या 'सेंट फ्रॅन्सिस' या पुस्तकांत लिहितो, " माणसावर प्रेम करणें व त्याला ठार मारणें यात विसंगति नाहीं. " चेस्टर्टन हा आजकालच्या कॅथॉलिसिझमचा आचार्य आहे. चेस्टर्टनच्या मध्ययुगीन मनाला तेराव्या शतकांतील तें मन नीट समजते. डान्टेला नरकांत पडणारांविषयीं करुणा वाटे. फ्रॅन्सेस्का ऑफ रिमिनि ही व्यक्ति त्याला लहानपणापासून माहीत होती. त्याचें फ्रॅन्सेस्कावर प्रेम होतें; पण त्यानें फ्रॅन्सेस्कास नरकांतच लोटलें आहे. डान्टेला का करुणा नसे वाटत ? वाटे, पण आपल्या पापांसाठींच त्यांना शिक्षा भोगावी लागत आहे, त्यांचा अमानुष छळ होत आहे, या विचारानें डान्टेला एक प्रकारचा आनंद वाटतो; तो छळ पाहून त्याचे डोळे ओले होत नाहींत ! तो पाहण्यांत त्याला नकळत जणूं एक प्रकारचें दुष्ट समाधानच वाटतें ! आणि त्यांचीं तीं पापें तरी खरींखुरीं होतीं का ? डान्टेच्या मतें मात्र तीं त्यांचीं पापेंच होतीं व म्हणून तो त्यांना भराभरा नरकवासाच्या शिक्षा ठोठावतो. त्या सर्वांचा छळ व्हावा अशी प्रभूचीच इच्छा आहे असें त्याला वाटे. डान्टे ज्या चर्चचा प्रतिनिधि होता, त्या चर्चप्रमाणेंच तोहि ईश्वराची इच्छा काय आहे येवढें सांगूनच थांबत नसे, तर स्वतः शिक्षा देणारा व ठार मारणारा ईश्वराचा अमलदारहि बने. डान्टेचें हृदय विश्वकवीचें होतें; पण त्याचें मन मात्र मध्ययुगांतील पाद्र्याचें होतें.

मध्ययुगांतील इतिहासाचा आत्मा नीट समजावयाला हवा असेल तर डान्टेचें मन समजून घेणें फार महत्त्वाचें आहे. कारण मध्ययुगाचा आत्मा म्हणजेच डान्टे. म्हणून या बाबतींत मी जरा विस्तारानें लिहीत आहें.

— २ —

सेंट फ्रॅन्सिसच्या मृत्यूनंतर एकुणचाळीस वर्षांनीं म्हणजे सन १२६५ मध्यें डान्टे जन्मला. बायबल पटविण्यासाठीं जनतेला वळवूं पाहणारें इन्क्विझिशन त्याच्या जन्मापूर्वी चौतीस वर्षें निर्माण झालें होतें. डान्टेचा बाप फ्लॉरेन्स येथें वकील होता. त्याची वकिली छान चालत होती. डान्टेला लहानपणीं प्रामुख्यानें तीन गोष्टी शिकविण्यांत आल्या :—( १ ) आपल्या देवाची पूजा करणें, ( २ ) आपल्या शहराशीं एकनिष्ठ राहणें, ( ३ ) आपल्या चर्चसाठीं लढणें. जगात दोन प्रकारचे लोक आहेत :—ईश्वराचे आवडते असे ख्रिश्चन व त्याचे नावडते ख्रिश्चनेतर. ख्रिश्चन धर्मी नसलेल्यांनीं ख्रिश्चन धर्म सक्तीनें वा स्वेच्छेनें स्वीकारला तर देव त्यांच्यावरहि प्रेम करील. ईश्वराच्या लाडक्यांसाठीं त्याचा स्वर्ग होता; ईश्वराच्या नावडत्यांसाठीं त्याचा नरक होता. प्रभूची प्रीति वा प्रभूचा द्वेष होईल तदनुसार इकडून तिकडे वा तिकडून इकडे पाऊल टाकण्याची पायरी म्हणून स्वर्ग व नरक या दोहोंच्या दरम्यान पर्गेटरी असे. या सर्व गोष्टी डान्टेला शिकविण्यांत आल्या व त्या सर्व त्याला खऱ्या वाटल्या. त्याला त्या म्हणजे केवळ कल्पित कादंबरी असें वाटत नसे. त्याच्या मनासमोर स्वर्ग, नरक व पर्गेटरी हीं जणूं नकाशांतील निश्चित स्थानें होतीं! माणसें मरणोत्तर या तीन जागांपैकीं कोठें तरी निश्चित जातात असें त्याला वाटे. ऑस्ट्रेलिया स्वतः कधींहि पाहिला नसतांहि भूगोल वाचणारांना खरा वाटतो, तद्वतच डान्टेला स्वर्ग, नरक व पर्गेटरी हीं ठिकाणें वाटत. डान्टेचें भूगोलाचें अचूक पुस्तक म्हणजे बायबल!

बायबलमधील शब्दन् शब्द जसा डान्टेला खरा वाटे, तद्वतच ॲरिस्टॉटलचें लिहिणेंहि तो वेदवाक्य समजे! मध्ययुगांतील कॅथॉलिक, प्लेटो व ॲरिस्टॉटल यांचे भक्त होते हें मोठें आश्चर्य होय. मध्ययुगांतील कॅथॉलिक धर्म म्हणजे बाप्तिस्मा; देवाला जणूं प्लेटोचा धर्म आहे. ख्रिश्चनांना ग्रीक तत्त्वज्ञानाचें ज्ञान मुसलमान व ज्यू यांनीं करून दिलें. अर्थात् कॅथॉलिकांनीं या बाबतींत मुसलमान व ज्यू यांचें ऋणी राहिलें पाहिजे. मुसलमानांनीं सारें ग्रीक ज्ञान अरेबींत आणलें होतें. अरेबींतून तें ज्यूंनीं लॅटिनमध्यें आणलें. रोमन कॅथॉलिकांना सुसंस्कृत व प्रगल्भ अशी एकच भाषा समजे, ती म्हणजे लॅटिन. डान्टेनें ॲरिस्टॉटलचा

भाषांतराच्या द्वारेंच अभ्यास केला. पुष्कळदां तो ॲरिस्टॉटलच्या अर्थाचा अनर्थहि करी. ग्रीकमधून अरेबीच्याद्वारां लॅटिनमध्यें आलेलें भाषांतराचें भाषांतर वाचूनच डान्टे ग्रीक विचारांशीं परिचित झाला होता.

ॲरिस्टॉटल व प्लेटो यांच्यापासून डान्टे शिकला कीं, आत्मा ईश्वरापासून खालीं संसारांत आला असून पुनः ईश्वराकडे—माहेराला–जाण्यासाठीं सदैव धडपडत असतो. "आकाशांतून पडणारें पाणी ज्याप्रमाणें बाष्प होऊन पुनः आकाशाकडे जातें तद्वतच या आत्म्याचें आहे. ईश्वराजवळून खालीं आलेला हा आत्मा देहाच्या बंधनांत पडून अधःपतित होतो, त्याला देहासक्ति जडते व तो खालीं खालीं जातो. हें जीवन म्हणजे देहाच्या भुका व आत्म्याच्या क्षुधा यांमध्यें सतत चाललेला झगडा होय. आत्म्याचा आवाज व वासनांचा आवाज यांमधलें हें चिरंतन युद्ध आहे. इंद्रियांना निर्भयपणें नकार द्या म्हणजे आत्मा शुद्ध होत जाईल, आत्म्याच्या आशा–आकांक्षा शुद्ध होत जातील. ऐहिक सुखाचा त्याग करून दैवी, आध्यात्मिक सुखांच्या मार्गे लागा. या ऐहिक सुखोपभोगांतच रमाल तर तुमच्या आत्म्यांवर इतकीं वैषयिक पुटें चढतील कीं, नरकाग्नींत घालूनच तीं कश्मलें जाळावीं लागतील. तीं जळल्यावरच आत्मा पुनः झगझगीत सुवर्णाप्रमाणें होईल. स्वर्गांत प्रभूसमोर जाण्यापूर्वी जाळून घ्यावें लागेल.

ॲरिस्टॉटल व प्लेटो यांचें तत्त्वज्ञान याप्रमाणें मध्ययुगांतील ख्रिश्चन नीतींत मिसळून गेलें. स्वर्गनरकांचें हें तत्त्व, मानवी आत्मा आपल्याकडे ओढूं पाहणारें हें स्वर्ग व नरक यांचें तत्त्वज्ञान डान्टेच्या तरुण व संस्कारक्षम मनावर खोल बिंबविलें गेले होतें. ग्रीक तत्त्वज्ञान व कॅथॉलिक धर्मशास्त्र यांचा त्यानें पुरापुरा अभ्यास केला होता. त्यानें विज्ञानाचें ज्ञान बायबला-मधूनच घेतलें होतें. ज्या जगात तो राहत होता, त्याची फारशी माहिती त्याला नव्हती. त्याचें या जगाचें ज्ञान जवळजवळ शून्यच होतें. पण ज्या जगांत मरावयाला तो जाणार होता त्याचें ज्ञान आपणास भरपूर आहे असें त्याला वाटत होतें. स्वर्गाची राजधानी, अर्थात् सोन्याचें जेरुसलेम शहर, तद्वतच नरकाची राजधानी डिस या दोहोंचीहि माहिती त्याला तो राहत असलेल्या फ्लॉरेन्स शहराच्या माहितीपेक्षां अधिक होती.

डान्टे आपल्या शहरांतील राजकारणांत भाग घेत असे. तेराव्या शतकांत फ्लॉरेन्समध्यें पोपच्या व सम्राटाच्या अनुयायांमध्यें लढाया होत असत. डान्टे पोपच्या बाजूचा होता. कारण, त्याचा बापहि त्याच पक्षाचा होता. पण वयानें वाढल्यावर कांहीं पोपांचा अप्रामाणिकपणा तद्वतच त्यांची भीरुता पाहून तो विटला. त्यानें पोपचा पक्ष सोडून सम्राटाचा पक्ष धरला. तो राजकीय क्षेत्रांत भराभरा वर चढत चालला. तो वयाच्या पसतिसाव्या वर्षीच फ्लॉरेन्समधील प्रमुख न्यायाधिशांपैकीं एक निवडला गेला. पण पुढें दोनच वर्षांनीं त्याचा पराजय झाला. त्या प्रक्षुब्ध काळांत, बुद्धिहीन वासनाविकारांच्या व अंधळ्या भावनांच्या त्या काळांत पराभूत होणें म्हणजे हद्दपार होणें वा मरणेंच असे. मध्ययुगांतील द्वेष मध्यें थांबत नसे, द्वेष म्हणजे संपूर्ण द्वेष !—शेवटच्या टोंकाला जावयाचें. डान्टे फ्लॉरेन्समधून हद्दपार केला गेला. तो सांपडेल तेथें त्याला जिवंत जाळून टाकावे अशीहि शिक्षा दिली गेली !

डान्टेला आतां स्वतःचा देश राहिला नाहीं ! या ऐहिक जगानें त्याला दूर लोटलें. तो आपल्या धीरगंभीर व भीषण प्रतिभेच्या साह्यानें मृतांच्या जगांत–परलोकांत–वावरूं लागला. त्याला आपल्या इटलीमधल्या शत्रूंचा प्रत्यक्ष सूड घेतां येईना, तेव्हां त्याने त्यांच्यासाठीं नरकांतील अनंत प्रकारचे काल्पनिक छळ शोधून काढले व त्यांना तेथे नेऊन टाकले ! डान्टेला समाधान वाटावें व ईश्वराचे वैभव वाढावें म्हणून हे सारे शत्रू नरकांत लोटले जातात ! डान्टे आपल्या इन्फर्नोचीं चोवीस सर्कल्स करतो. त्या त्या विशिष्ट प्रकारच्या पापांसाठीं छळण्याचीं तीं तीं विशिष्ट यंत्रें त्या त्या विशिष्ट सर्कलमध्यें ठेवलेलीं असतात. डान्टेचें इन्फर्नोचें वर्णन अति दुष्ट व अति भव्य आहे. दूषित व विकृत झालेल्या अशा उदात्त प्रतिभेनें निर्मिलेलें हें नरकस्थान आहे. अमेरिकन तत्त्वज्ञानी सन्टायना लिहितो, "डान्टे पुष्कळ वेळां विकारवशतेनें लिहितो, शुद्ध बुद्धीनें निर्णय घेऊन तो लिहीत नाहीं." पण आपण विसरतां कामा नये कीं, डान्टे मध्ययुगाचा नागरिक तद्वतच रोमन कॅथॉलिक चर्चचें अपत्य आहे. तो आपल्या शत्रूंचेच नरकांत हाल करतो असें नाहीं, तर त्याला जे जे चर्चचे शत्रू वाटतात, त्या सर्वांना तो तेथें नेतो व त्यांचा छळ मांडतो. जे जे कॅथॉलिक नाहींत ते ते सारे चर्चचे

शत्रू असें डान्टे समजतो. ख्रिश्चन धर्मात नसलेले असे प्राचीन काळांतले कोणीहि डान्टेच्या स्वर्गात जाऊं शकत नाहींत. मध्ययुगांतील चर्च किती असहिष्णु होतें हें यावरून दिसून येतें. त्या प्राचीनांना स्वर्ग कां नाहीं? त्यांचें काय पाप? ते बाप्तिस्मा मिळण्यापूर्वी कित्येक शतकें जन्मले हे! ईश्वराची करुणा अनंत असली तरी तिची व्याप्ति फक्त कॅथॉलिकांपुरतीच आहे! निदान डान्टे तरी असें म्हणतो. डान्टेला नरकांतील गुंतागुंतीचे मार्ग दाखविणारा थोर गुरु व्हर्जिल देखील स्वर्गाकडे येऊं शकत नाहीं! त्यालाहि निराशेच्या चिरंतन आगींत रडत बसावें लागतें. त्यालाहि उद्धाराची आशा नाहीं! कारण, तो फार पूर्वी जन्मला. मग तो कसा ख्रिश्चन होणार?

ही असहिष्णुता, जे जे चर्चच्या मताचे नाहींत त्या सर्वांना खुशाल नरकाग्नीत खितपत ठेवणें व मनाला कांहींहि न वाटतां त्यांचे हाल व छळ पाहणें याला काय म्हणावें? किती संकुचित, स्वार्थी व असहिष्णु हें मन? डान्टेच्या "डिव्हाइन कॉमेडी" या महाकाव्यांत ही असहिष्णुता सर्वत्र भरलेली आहे. मी दोनच उदाहरणें देतों, दोनच उतारे दाखवितों:— (१) इन्फर्नोच्या दुसऱ्या सर्गात बिएट्रिस म्हणते, "ईश्वराच्या कृपेनें मला नरकांत खितपत पडणाऱ्यांच्या दुःखाचा स्पर्श होत नाहीं." ही बिएट्रिस स्वर्गात शाश्वत आनंद उपभोगीत असते; तिला नरकाग्नींत जळणाऱ्यांच्या दुःखाची कल्पनाहि येत नाहीं व याला ती ईश्वरी कृपा समजते. त्यांचें दुःख तिला दुःख असें वाटतच नाहीं. तिला त्यांच्या वेदना कळतील तेव्हां ना तिचे डोळे ओलावणार, तिचा आनंद अस्तास जाणार? हें मध्ययुगांतील रानटीपणाचें द्योतक आहे, त्या कालच्या रानटी वृत्तीला धरून आहे. सेंट थॉमस ॲक्विनस हा मध्ययुगांतील अत्यंत धार्मिक व अति प्रतिभावान् लेखक होऊन गेला. तो त्याच्याहि पुढें जाऊन म्हणतो, "परमेश्वराची आपल्या भक्तावर फार कृपा असते. नरकांत खितपत पडलेल्या प्राण्यांच्या होणाऱ्या छळांचा विचार करून स्वतःचें सुख वृद्धिगत करण्यास प्रभु त्याना परवानगी देतो." दुसऱ्यांचें दुःख पाहून आपण तसे दुःखी नाहीं असें मनांत येऊन अधिक सुखी होणें किंवा "दुसऱ्यांचा कसा छळ होत आहे!" असें मिटक्या मारीत म्हणून आपला आनंद द्विगुणित करणें रानटीपणाचें तर खरेंच, पण मध्ययुग जणूं रानटीपणाचेंच प्रतीक आहे. (२) दुसरा उतारा पर्गेटोरियाच्या

सातव्या सर्गांतला आहे. पर्गेटरींतल्या सॉर्डेलो नामक एका जिवाला व्हर्जिल नरकांतील एका भागाचें वर्णन ऐकवीत आहे. तो म्हणतो, " मी त्या निराशेच्या नरकात खालीं खोल खितपत पडलेला असतो. मर्त्य जन्मींच्या पापांपासून सुटका होण्यापूर्वीं लहान मुलांना तेथें मृत्यूचे दांत सारखे चावीत असतात. " डान्टेच्या मतें केवळ विधर्मी, नास्तिक व पाखंडीच तेवढे नरकांत पडतात असें नव्हे तर निष्पाप मुलेंहि नरकाग्नींत हाल भोगतात ! बाप्तिस्मा मिळण्यापूर्वीच जर लहान मुलें मेलीं तर तीं नरकांत आलींच पाहिजेत व त्यांनीं तेथील यातना भोगल्याच पाहिजेत. ज्या जगांत डान्टे राहत होता, तें मूर्खपणाचें जग होतें; तें अंधळें, संकुचित, दुष्ट, नष्ट, बेशरम आणि असहिष्णुतेनें भरलेलें असें होतें. डान्टेचें मन आपण जाणूं शकलों तरच क्रुसेड्स्–इन्क्विझिशनसारखीं छळण्याचीं मध्ययुगीन साधनें व संस्था आपण समजूं शकूं. मध्ययुगें सुंदर होतीं हें खरेंच; तें नाकारतां येणार नाहीं. पण केवळ सौंदर्य पुरेसें नसतें. भूकंपांतहि नसतें का एक प्रकारचें सौंदर्य ? एकादा हिमप्रपात, समुद्रावरील एकादें भीषण वादळ, ज्वालामुखीचा एकादा स्फोट, वेजेचा एकादा लखलखाट, व्यवस्थित रीतीनें योजनापूर्वक पार पाडलेला एकादा खून, दोन रानटी सैन्यांतील एकादें युद्ध, या सर्वांतहि एक प्रकारचें सौंदर्य असतेंच; पण ही सुंदरता, ही भव्यता विसंवादी असते. हें विनाशाचें, विध्वंसाचें, मूर्खतेचें सौंदर्य होय. हें सौंदर्य भेगांनीं विदीर्ण झालेल्या रोगट व फिक्कट जगाचें आहे. डान्टेच्या महाकाव्यांतील व तेराव्या शतकांतील जगाचें सौंदर्य असें भेसूर आहे. जवळजवळ हजार वर्षें युरोप या दुष्ट भ्रमात होतें कीं, सर्वांनी ख्रिश्चन तरी व्हावें नाहीं तर कायमचें नरकांत तरी पडावें अशी ईश्वराचीच इच्छा आहे. डान्टेनें या भ्रमाचा वारसा घेतलेला होता. इन्क्विझिटरहि याच भ्रमांत होते. या दुष्ट भ्रमाभोंवतीं डान्टेनें महाकाव्य निर्मिलें व छळ कसा करावा याची माहिती इन्क्विझिटरांनीं डान्टेच्या या छळाच्या ज्ञानकोशांतून घेतली. डान्टेनें चर्चच्या शत्रूंना काव्यांत केवळ अलंकारिकरीत्या जाळून टाकलें; पण इन्क्विझिटर्स कवी नसून प्रत्यक्षवादी व्यवहारी असल्यामुळें त्यांनीं चर्चच्या शत्रूंना प्रत्यक्षच जाळलें ! व्हॉल्टेअरच्या हिशेबाप्रमाणें चर्चच्या आज्ञेनुसार जवळजवळ एक कोटि माणसें जिवंत जाळलीं गेलीं असतील. व तीं कां ? तर तीं केवळ परधर्मीय होतीं म्हणून, कॅथॉलिक ख्रिश्चन नव्हतीं म्हणून !

डान्टेचें ' डिव्हाइन कॉमेडी ' हें जगांतील अत्यंत थोर अशा प्रतिभासंपन्न कवीचें, अतिशय उदात्त अशा स्वप्नवीराचें महाकाव्य. त्याच्यासारख्या अत्यंत थोर व प्रतिभासंपन्न कवीला असा विषय मिळावा, असें ध्येय मिळावें, पण असे दुष्ट भ्रम त्यानें धर्म म्हणून कवटाळावे ही एक दुर्दैवी घटना आहे. डान्टेची ही फार मोठी कींव येण्याजोगी चूक झाली. मानवी इतिहासांतील हा भयंकर दैवदुर्विलास होय !

— ३ —

डान्टे इ. स. १३२१ मध्यें मरण पावला व त्याच्याबरोबरच मध्ययुग संपलें असें सांगण्यांत येतें; पण असें वाटेल तें ठोकून देणें ऐतिहासिक-दृष्टया चुकीचें असतें. दुर्दैवानें अद्यापिहि कोट्यवधि स्त्री-पुरुष मध्ययुगीन असहिष्णु व संकुचित जगांतच वावरत आहेत ! आणि त्यामुळें शांति व प्रगति स्थगित झाल्या आहेत. मध्ययुग अजूनहि गेलेलें नाहीं. तोच रानटी-पणा, तोच अंधळेपणा, तीच संकुचितता, सारें तेंच अद्यापिहि कायमच आहे !

## प्रकरण ५ व

# युरोप व आशिया यांमधील दुवा : मार्को पोलो

— १ —

डान्टेचा मृत्यु आपणांस चौदाव्या शतकाच्या दुसऱ्या दशकात आणून सोडतो. तेराशें वर्षे चाललेले युरोपांतील राष्ट्रांचे सुसंस्कृत होण्याचे दुबळे प्रयत्न आपण पाहत आलों. ते प्रयत्न पाहून कींव येते. शहरें उभारीत आहेत व धुळीस मिळवीत आहेत, चित्रें रंगवीत आहेत, तरवारी परजीत आहेत, संगमरवरी पुतळे खोदीत आहेत, माणसांच्या कत्तली करीत आहेत, मंदिरें बांधीत आहेत, काव्यें व गीतें रचीत आहेत, आपल्या बांधवाना ठार मारीत आहेत, असे प्रकार आपणांस या शतकात दिसतात. गॅलिलीच्या ज्यू ख्रिस्ताचा तो शांत व सुंदर धर्म त्यांनीं घेतला; पण मानवांचा छळ करण्याचें साधन म्हणून तो वापरला. मानव प्राणी पशुकोटींतून मानवकोटींत यावयाला एक कोटि वर्षें लागलीं. पण चौदाव्या शतकाच्या आरंभास हा मानव कसा दिसतो ? अद्यापि त्याच्यामध्यें नव्वद टक्के पशुता तर केवळ दहाच टक्के

मानवता दिसून येते. आपण थोडा वेळ युरोपांतील श्वेतवर्णीयांना सोडून जरा दूर आशियांतील पीतवर्णीयांकडे जाऊं या व ख्रिस्ताच्या आगमनापासून तों डान्टेच्या निधनापर्यंतच्या चौदा शतकांचा या पीतवर्णीयांनीं कसा उपयोग केला तें पाहूं या.

— २ —

तिकडे युरोप सरंजामशाहीच्या रानटीपणांत बुडत असतां, अधःपतित होत असतां, इकडे चीन सुधारणेच्या व संस्कृतीच्या शिखरावर चढत होतें. युरोपला रानटी टोळ्यांच्या स्वाऱ्यांपासून त्रास झाला तसा चीनलाहि झाला. पण युरोपप्रमाणें चीन कोलमडलें नाहीं. चीनमध्यें सरंजामशाही जवळजवळ नव्हतीच. युरोपातील श्वेतवर्णीय लोकांत जसे परस्पर लढणारे शेंकडों पंथ व भेद निर्माण झाले, तसें चीनमध्यें झालें नाहीं. युरोपांतील संपत्ति, संस्कृति, ज्ञान व सौंदर्य मध्ययुगांतील युद्धानी धुळींत जात असतां इकडे चीनमधील संपत्ति, संस्कृति, ज्ञान व सौंदर्य हीं अविरत झगड्यामुळें नष्ट झालीं नाहीत, जिवंत राहिलीं. ग्रीक संस्कृति व रोमन संस्कृति जवळजवळ हजार वर्षांत जणूं नष्ट होऊन गेल्या; पण चिनी संस्कृति मात्र कधींच मेली नाहीं, एक दिवसहि दृष्टीआड झाली नाहीं. दुसऱ्या शतकापासून चौथ्या शतकापर्यंत चिनी चित्रकारांनीं जगांतील अत्यंत रमणीय अशीं निसर्गाचीं चित्रें रंगविलीं आहेत. त्या तीन शतकांतील अपूर्व व अप्रतिम अशीं चिनी चित्रे, सुंदर काव्यें व भव्य शिल्प यांना जगांत तुलना नाहीं. आजहि अमर सौंदर्याचे नमुने म्हणून त्यांच्याकडे बोट दाखवितां येईल. सहाव्या शतकांत चिनी लोकांनीं लांकडी ठसे निर्मून छापण्याची कला शोधून काढली. त्या काळांत चिनी लोक गॅस व दगडी कोळसे वापरीत असें आढळतें; पण युरोपांतील लोक मात्र या गोष्टी वापरण्यास कित्येक शतकांनंतर शिकले. सहाव्या शतकांतच चिनी लोकांस बंदुकीची दारू माहीत होती. पण शांतताप्रिय चिनी लोकांनीं या शोधाचा उपयोग स्वार्थासाठीं मात्र कधींहि करून घेतला नाहीं.

सातवें शतक म्हणजे चिनी संस्कृतीचे सुवर्णयुग. कला, बुद्धि, नीति, सर्वच बाबतींत कन्फ्यूशियसचे वारसदार साऱ्या जगाच्या किती तरी पुढें होते. इ. स. ६२८ मध्यें मुसलमानी धर्मप्रचारक चीनमध्यें आले. त्यानंतर सातच

वर्षोनीं ख्रिश्चन मिशनरीहि आले. त्या वेळेस टाई–त्सुंग हा चीनचा सम्राट् होता. या सम्राटानें आपला कन्फ्यूशियसचा धर्म त्यांच्यापुढें मांडून तीन धर्मांचा तिरंगी झगडा माजविण्याऐवजीं परधर्मीयांना मोठ्या सन्मानानें दरबारांत आणवून न्यू टेस्टामेंट व कुराण यांचीं चिनी भाषेंत भाषांतरें करवून घेतलीं आणि नंतर त्या धर्मग्रंथात काय आहे तें स्वतः पाहिलें व परीक्षिलें. कन्फ्यूशियसनें कित्येक शतकांपूर्वीं सांगितलें होतें तेंच त्याहि धर्मांत आहे असें त्याला आढळलें. कन्फ्यूशियसचा धर्म सोडून ख्रिस्त किंवा महंमद यांचा धर्म स्वीकारावा असेंहि त्याला वाटलें नाहीं, किंवा स्वतःचा धर्म या दोन्ही धर्मांहून श्रेष्ठ आहे हें दाखविण्यासाठीं तिकडे ख्रिश्चन व मुसलमान यांना वाटत होती तशी युद्ध करण्याचीहि जरूरी त्याला वाटली नाही. ईश्वराकडे जाण्याचे नाना मार्ग असूं शकतील आणि कोणताहि मार्ग पतकरला तरी तो देवाकडे नेणारा असेल तर ठीकच आहे असें टाई–त्सुंग याला वाटलें. म्हणून त्यानें मुसलमानांना मशिदी बांधण्यास, ख्रिश्चनांना चर्चें बांधण्यास व दोघांनाहि चिनी लोकांत धर्मप्रचार करण्यासहि खुशाल परवानगी दिली! केवळ धर्मवेडेपणानें त्यांनीं रक्तपात मात्र करूं नये येवढाच त्याचा कटाक्ष होता.

चिनी संस्कृतीचें विहंगमावलोकन करतांना टाई–त्सुंगची सहिष्णुता ख्रिश्चन सम्राट् शार्लमन याच्या असहिष्णुतेशीं तोलून पाहावी असें मनांत येतें. शार्लमन एका दिवसांत साडेचार हजार सॅक्सनांना ते ख्रिस्ती होईनात म्हणून ठार करतो! क्षणभर थांबून या दोन गोष्टींची तुलना करावी असें वाटतें, नाहीं!

— ३ —

मध्ययुगांत चीन संस्कृतीच्या शिखरावर होतें. तेराव्या शतकांत त्याची थोडा वेळ जराशी पीछेहाट झाली खरी; पण तीहि क्षणभरच. या सुमारास मध्यआशियांतील डोंगरपठारावर राहणारे भटक्ये मोंगोलियन चीनवर स्वाऱ्या करूं लागले. त्यांचे हूण व तुर्क यांच्याशीं थोडेफार संबंध होते. या मोंगोलियनांनीं अल्पावधींत पॅसिफिक महासागरापासून रशियांतील नीपर नदीपर्यंतचा प्रदेश व्यापून टाकला! चेंगीझखान हा त्यांचा अत्यंत प्रबळ

असा पुढारी होता. त्याच्या विद्युन्मय नेतृत्वाखालीं थोड्याशाच अवधींत मोंगोलियनांनीं येवढें मोठें साम्राज्य मिळविलें कीं, त्याच्यासमोर अलेक्झांडरचें साम्राज्यहि मुलाचें खेळणें वाटावें, पोरखेळ वाटावा. अलेक्झांडरची बेडर निर्भयता, हॅनिबॉलची सहनशीलता, आशियांतील प्राचीन विजेत्यांची अल्लड वृत्ति तसाच त्यांचा साधेपणा हे सारे गुण चेंगीझच्या ठायीं होते. त्याचा आहार म्हणजे घोडीचें मांस असे, त्याचा प्रासाद म्हणजे तंबू असे, त्याचें सिंहासन म्हणजे घोड्याचें जीन असे. राज्य चालविण्यापेक्षां जिंकून घेणें त्याला आवडे; पण इतर जगज्जेत्यांप्रमाणें त्याच्या ठायीं सूडबुद्धि नव्हती, रानवटपणा नव्हता. वेल्स लिहितो, " चेंगीझखानाच्या कारकीर्दींत, त्याच्या साम्राज्यांत, सर्व आशियाभर संपूर्ण धार्मिक सहिष्णुता होती." पराभूत राष्ट्रांवर आपला रानटीपणा लादण्याऐवजीं पराभूतांच्या श्रेष्ठ संस्कृतींतच तो स्वतः रंगला; त्या संस्कृतीनेंच त्याला जिंकलें, स्वतःमध्यें मिळवून घेतलें. त्यानें चीन देश भौगोलिकदृष्ट्या जिंकला; पण चीननें त्याला सांस्कृतिक-दृष्ट्या जिंकलें. एकाद्या महासागरावर मेघांनीं वर्षाव करावा तद्वत् मोंगोलियन आले; पण ते चिनी जनतेच्या महासागरांत विलीन झाले व त्या सर्वांचें एक सुसंवादी राष्ट्र बनलें. ग्रीसची व रोमची संस्कृति व्हॅंडॉल व गॉथ यांनीं नष्ट केली; पण मोंगोलियनांनीं तसें केलें नाहीं. त्यांनीं चिनी संस्कृति तर नष्ट नाहींच केली, पण उलट स्वतःच ती स्वीकारली. कुब्लाईखान हा चेंगीझचा नातू. कुब्लाई हा चीनच्या सांस्कृतिक, ज्ञानोपासक व कलोपासक परम्परेचा ऋणी आहे. स्वतःच्या रानटी पूर्वजांच्या चालीरीतींपासून त्याला कांहींहि मिळालें नाहीं. त्याचें मन व त्याची बुद्धि हीं चिनी संस्कृतीवरच पोसलीं गेलीं.

या कुब्लाईखानच्या दरबारांत राहिलेल्या मार्को पोलोच्याद्वारां आशियांतील आश्चर्यकारक संस्कृतीशीं युरोप परिचित झालें.

— ४ —

मार्को पोलो कुब्लाईकडे कां आला व राहिला ! त्याचें कार्य आर्थिक व धार्मिक असें द्विविध होतें. युरोप चीनशीं व्यापार सुरू करूं इच्छीत होतें आणि पोप चीनला ख्रिश्चन धर्मी करूं इच्छीत होता. मार्को पोलो हा व्हेनिसचा रहिवासी. त्याचे वडील व चुलते चीनशीं व्यापार करीत. वडिलांचें नांव

निकोलो पोलो व चुलत्यांचें मॅथ्यू किंवा मफ्फेओ पोलो. चिनी सम्राट् कुब्लाईखान यानें या दोघां युरोपियन व्यापाऱ्यांस आपल्या दरबारीं बोलावलें. त्यानें त्या वेळेपर्यंत युरोपियन ख्रिश्चन व्यापारी पाहिला नव्हता. ख्रिश्चन व्यापारी हा कसा काय प्राणी असतो हें त्याला पाहावयाचें होतें.

हे दोन्ही व्हेनिशियन व्यापारी त्याच्या दरबारीं आले. कुब्लाईला ते आवडले. निकोलो मोठा हुषार पण जरा काळसर रंगाचा होता. तो हिऱ्यांचा तद्वतच तरवारींचा पारखी होता. त्याचा भाऊ मफ्फेओ उंच व धिप्पाड होता. त्याची दाढी लाल रंगाची होती. तो घोड्यांचा तद्वतच स्त्रियांचाहि पारखी होता. त्या दोघांचाहि असंस्कृत व रंगेल स्वभाव, वाटेल तेव्हां देवाशपथ म्हणण्याची त्यांची संवय व मोकळी वृत्ति पाहून सम्राटाला गंमत वाटली. त्यानें त्यांच्याशीं व्यापारी चर्चा केली, तीवरून ते चांगलेच हुषार आहेत असें त्याला आढळून आलें. त्यानें त्यांच्याशीं धर्म व राजकारण यांचीहि चर्चा केली, तेव्हा त्या बाबतींत मात्र ते मूर्ख व अडाणी असल्याचें दिसून आलें. दोघांनींहि सम्राटाला ख्रिश्चन करण्याची पराकाष्ठा केली. साऱ्याच मोंगोलियनांना ख्रिश्चन करावें अशी पोपची इच्छा होती. कुब्लाईखान त्या दोघांना म्हणाला, " आपण काय बोलतों हें ज्याला नीट समजतें असा कोणी ख्रिश्चन धर्मी आला तर त्याच्याशीं मी चर्चा करीन व ख्रिश्चन धर्म काय आहे तें पाहीन. म्हणून तुम्ही पोपकडे परत जा व ख्रिश्चन धर्माचे शंभर उपदेशक इकडे पाठवायला त्याला सांगा. ते सुसंस्कृत, सर्व ललितकलांशीं परिचित व नीट वादविवादकुशल असावे. सर्व मूर्तिपूजकांस तद्वतच इतरांसहि ख्रिस्ताचा कायदाच सर्वोत्कृष्ट आहे हें त्यांना पटवून देतां आलें पाहिजे.

निकोलो व मफ्फेओ पोपकडे जाण्यास निघाले. पण ते युरोपला पोंचण्यापूर्वीच पोप मेला होता व कॅथॉलिक चर्चमध्यें मतभेद माजले होते; त्यामुळें दोन वर्षेंपर्यंत नवीन पोपचीहि निवड झालीच नव्हती. चिनी सम्राटाची इच्छा ऐकतांच नव्या पोपनें शंभर सुसंस्कृत धर्म-तज्ज्ञ पाठविण्याऐवजीं साधु डॉमिनिक यानें स्थापलेल्या संप्रदायांतील दोन मूर्ख डोमिनिकन पाठविले. साधु डॉमिनिक हा स्पेनमधला सेंट फ्रॅन्सिसचा समकालीन संत होता. सेंट डॉमिनिक याचा स्वाक्या सेंट फ्रॅन्सिसपेक्षां अगदीं निराळा होता. तो लढाऊ वृत्तीचा होता, संकुचित ख्रिश्चन धर्माचा पुत्र होता. जिभेनें लोकांना एकादी गोष्ट

पटवून देतां येत नसे तेव्हां तो तरवार हातीं घेई. तो एकदां नास्तिकांना म्हणाला, "तुम्ही ख्रिश्चन धर्मांत आपण होऊन न याल तर तुम्हांला त्यांत हांकून नेण्यांत येईल. किती तरी वर्षे मी तुम्हांला उपदेश करीत आहें, गोड शब्दांनीं सांगत आहें, तुमची मनधरणी करीत आहें, डोळ्यांत पाणी आणून तुमचें मन वळवूं पाहत आहें. आमच्या स्पॅनिश भाषेंत म्हण आहे कीं जेथें गोड शब्दांनीं काम होत नाहीं, तेथें ठोसे यशस्वी होतात ; आशीर्वाद विफल झाले तरी आघात मात्र सफल होतात. अर्थात् आम्ही आमचे राजे, महाराजे पोप, धर्मगुरू, सारे तुमच्याविरुद्ध उठवूं. ते फौजा घेऊन तुमच्या देशावर चालून येतील व प्रार्थना निरुपयोगी ठरल्या तेथें प्रहार विजयी होतील."

अशा वृत्तीचे ते दोन डोमिनिकन ख्रिश्चन वीर निकोलो व मफ्फेओ यांच्या बरोबर कुब्लाईला 'ख्रिस्ताचा धर्म कन्फ्यूशियसच्या धर्मापेक्षां श्रेष्ठ आहे' हें पटवून देण्यासाठीं आले. त्या दोघांप्रमाणेंच आपला मुलगा मार्को यालाहि निकोलोनें आपल्याबरोबर आणलें होतें. मार्को ऐन उमेदींत होता. त्याला धर्माची आवड होती तशीच व्यापराचीहि हौस होती. त्याला बरोबर नेलें तर कुब्लाई चागला ख्रिश्चन होईल, मार्कोहि चागला व्यापारी होईल व चर्चच्या फायद्याप्रमाणें स्वतःचा स्वार्थहि साधेल असें निकोलो व मफ्फेओ या दोघांनाहि वाटलें.

या वेळेस ते व्हेनिसपासून चीनपर्यंत खुष्कीनें गेले. हा प्रवास दीर्घ, कठिण आणि धोक्याचा होता. पर्वत ओलांडावयाचे, वाळवंटें उल्लंघावयाचीं, याला कंटाळून ते दोघे मिशनरी परत गेले; पण मार्को, त्याचे वडील व त्याचे चुलते हे तिघे मात्र संकटास न जुमानतां पुढें पुढें चालले, ते जेरुसलेम येथें थांबले व तेथील ख्रिस्ताच्या समाधीपुढील नंदादीपांतील तेल त्यांनी बरोबर घेतलें. कारण, त्या तेलानें सारे रोग बरे होतात अशी समजूत होती. त्या मोंगोलियन सम्राटाचा हृदयपालट करावयाला आपल्यापाशीं धर्मोपदेशक नसले तरी निदान हें तेल तरी आहे अशी आशा तर त्यांना होतीच, पण शिवाय मार्को तरुण, देखणा व गोड वाणीचा असल्यामुळें तो शंभर शहाण्याची उणीव भरून काढील असें त्यांना वाटत होतें. मार्को कुब्लाईला चुकीच्या धर्मापासून परावृत्त करील अशी श्रद्धा, असा विश्वास त्यांना होता. पण त्या पोलोंची ही समजूत म्हणजे हास्यास्पद अहंकारावांचून दुसरें काय होतें ? व्यापारांत

यशस्वी होत असल्यामुळें आपण जें जें हातीं घेऊं त्यांत यशच मिळेल असें त्यांना वाटे. मार्कोच्या मदतीनें आपण केवळ आपल्या पेट्याच सोन्याच्या नाण्यांनीं भरूं असें नव्हे तर स्वर्गहि कोट्यवधि चिनी ख्रिश्चनांनीं भरून टाकूं अशी अहंकारी आशा करीत ते येत होते.

साडेतीन वर्षें प्रवास करून ते चीनला पोंचले. कुब्लाईखानाच्या दरबारीं ते सोळा वर्षें राहिले. त्यांनीं लाखों रुपये मिळविले; पण एकाहि माणसास ख्रिश्चन करून स्वर्गांत पाठविण्याचें काम त्यांस करतां आलें नाहीं. पाश्चात्य संस्कृतीचा परिणाम तर कुब्लाईखानावर झालाच नाहीं, पण उलट कुब्लाईनेंच पौर्वात्य संस्कृतीचा खोल ठसा मार्कोवर उठविला. मार्को युरोपियन व ख्रिश्चन होता तरी, कुब्लाईनें त्याला एक बडा अधिकारी म्हणून नेमलें. तेराव्या शतकांतील चिनी आजच्या युरोपियनांपेक्षांहि उदार व विशाल दृष्टीचे होते. १९३५ सालीं एखाद्या कन्फ्यूशियस किंवा बौद्ध धर्माच्या चिनी माणसाला इंग्लंडमध्यें महत्त्वाची सनदी नोकरी मिळणें कितपत संभवनीय वाटते! कल्पना करा.

मार्को पोलो व्हेनिसला परतला तेव्हा व्हेनिस व जिनोआ यांच्या दरम्यान चाललेल्या आरमारी लढाईत त्यानें भाग घेतला. ही लढाई १२९८ सालीं झाली. जिनोईजनीं मार्कोला कैद केलें. तुरुंगात वेळ घालविण्यासाठीं व बरोबरच्या कैद्यांची करमणूक व्हावी म्हणून तो आपला पूर्वेकडील वृत्तात रस्टिसिआनो नामक एका लेखकाला सांगून लिहवून घेऊं लागला. 'मार्को पोलोचें प्रवासवृत्त' या नांवानें रस्टिसिआनोनें तो वृत्तांत पुस्तकरूपानें प्रसिद्ध केला. हें पुस्तक चौदाव्या शतकातील फार खपणाऱ्या पुस्तकांपैकीं एक होतें. मार्को जरा अतिशयोक्ति करणारा होता. तो प्रवासी व्यापारी व हिंडताफिरता विक्रेता होता व असे लोक कसें बोलतात, काय काय गप्पा मारतात हें सर्वांस माहीतच आहे. लाखों हिरेमाणकें, लाखों मैल सुपीक जमीन, लाखों सोन्याचीं नाणीं, आश्चर्यकारक स्त्रीपुरुष, इत्यादि नानाविध गोष्टींविषयीं तो अतिशयोक्तीनें बोलतो व लिहितो. त्याच्या या अतिशयोक्तिपूर्ण लेखन-पद्धतीमुळें लोक त्याला " लाखोंनीं लिहिणारा मार्को, लक्षावधि मार्को " असें थट्टेनें म्हणत. आधींच मार्कोची अतिशयोक्ति व तींत आणखी रस्टिसिआनोच्या अलंकाराची भर पडतांच अशी एक नवलपूर्ण कथा जन्मास आली कीं, ती

वाचतांना आपण एकाद्या जादूगाराच्या सृष्टींत किंवा पऱ्यांच्या अथवा गंधर्वांच्या नगरींतच आहों असें वाटतें. पण ही अतिशयोक्ति व हे अलंकार वगळतांहि मार्को पोलोचें हें पुस्तक उत्कृष्ट आहे यांत शंकाच नाहीं. तें इतिहासांत नवयुग निर्माण करणारें आहे. स्वतःच्या संस्कृतीहून वेगळ्या दुसऱ्याहि संस्कृती आहेत, आपल्या देशाशिवाय दुसरे देशहि आहेत असें या ग्रंथानें युरोपियनांस शिकविलें व त्यांची दृष्टि या अन्य संस्कृतींकडे व देशांकडे वळविली. या पुस्तकानें मध्ययुगांतील झांपड पडलेल्या मनाला जागृत केलें. जागृत करणाऱ्या अनेक कारणांपैकीं मार्को पोलोचें प्रवासवृत्त हें एक महत्त्वाचें कारण आहे. या ग्रंथामुळें मध्ययुगांतील युरोपीय मनासमोरचें क्षितिज विस्तृत झालें व त्याला पूर्व व पश्चिम यांमध्यें विचारांची व वस्तूंची अधिक उत्साहानें देवघेव व्हावी व व्यापारी आणि सांस्कृतिक संबंध वाढावे असें आंतून वाटूं लागलें. जग अधिक मोठें झालें, जगाचा अधिक परिचय झाला, मानवजात अधिक जवळ आली, पूर्वेकडे जाण्यास अधिक सोपे व जवळचे रस्ते शोधून काढावे असें युरोपियनांस वाटूं लागलें व या प्रयत्नांतूनच अमेरिका त्यांना एकदम अचानक सांपडली.

युरोपियनांनीं चिनी लोकाची बंदुकीची दारू घेतली. चिनी लोकांनीं ती शोधून काढली, पण ती केवळ शोभेसाठीं व मुलांच्या खेळांसाठीं वापरली. युरोपियनांनीं ती युरोपांत नेली व तिजपासून मरणाचें प्रभावी साधन तयार करून तिचा युरोपीय युद्धांत प्रचार सुरू केला.

## प्रकरण ६ वें

# नवयुगाचे तीन पुरस्कर्ते : पेट्रार्क, जोहान्स हस, जॉन बॉल

— १ —

प्राचीन ग्रीक व रोमन संस्कृतींचा ख्रिश्चन जगांत झालेला पुनर्जन्म म्हणजे नवयुग असें सर्वधारणपणें समजण्यांत येतें. चौदाव्या शतकांत केव्हां तरी युरोपियनांस मातींत गाडलेलें सौंदर्य आढळलें. ते तें शोधूं लागले. उत्खनन सुरू झालें. ग्रीक लोकांनीं तयार केलेले अप्रतिम पुतळे उपलब्ध झाले. पुनः

एकदां या अप्रतिम शिल्पवस्तू निळ्या नभाखालीं नीट मांडून ठेवण्यांत आल्या. जुन्या मठांतील ग्रंथालयें धुंडाळण्यांत येऊं लागलीं. जुन्या कचऱ्यांत, गळाठ्यांत, रद्दींत रत्नांचें संशोधन होऊं लागलें. धुळीनें भरलेल्या कपाटांत, पेट्यांत वगैरे पुस्तकें सांपडूं लागलीं. एसचायलस, प्लेटो, ॲरिस्टोफेन्स, सिसरो, होरेस, ल्युक्रेशियस, इत्यादि थोर आचार्यांचे ग्रंथ मिळाले. ग्रीक लोकांच्या हास्याचा, आनंदाचा व विनोदाचा ध्वनि चौदाव्या शतकांत पुनः युरोपच्या कानावर आला. गंभीर व चंबूसारखें तोंड करणारें सुतकी युरोप पुनः एकदां हंसायला व विचार करायला शिकलें. युरोपीय जनता दुसऱ्या देशाकडे, जातींकडे व काळांकडे पाहूं लागली, तिचे डोळे उघडले, संकुचित, बंद मनें जरा मोठीं झालीं, उघडलीं. चौदाव्या शतकांतील युरोपियन लोक आपल्या उच्च शिक्षणासाठीं साऱ्या जगांतील ज्ञान घेऊं लागले. त्यांनीं साऱ्या जगाचें जणूं विद्यापीठच बनविलें! चिनी लोकांपासून ते छापण्याची कला व कागदांचा उपयोग शिकले, अरबांपासून बीजगणित व वैद्यक शिकले व प्राचीन ग्रीकांपासून तत्त्वज्ञान व काव्य शिकले. प्राचीन लोकांचे देव पुनः एकदां मानवांत वावरावयाला लागले, मानवांशीं हंसावयाला, खेळावयाला व बोलावयाला आले. पुढच्या जन्मांतील सुखासाठीं—अनिश्चित अशा भविष्य काळांतील सुखासाठीं—ताटकळत बसण्यापेक्षां या जगांतच प्रत्यक्ष सुख कसें मिळवावें हें ते सांगूं लागले.

बहुतेक इतिहासांत नवयुगाचें हें अशा अर्थाचें चित्र बहुधा आढळतें व तें फारसें खोटें असतें असेंहि नाहीं; पण तें अपुरें असतें. झोंपीं गेलेल्या युरोपीय हृदयांत प्राचीनांचें ज्ञान-विज्ञान पुनः जिवंत झालें येवढाच नवयुगाचा अर्थ नव्हता. नवयुग हें त्रिविध बंड होतें :—(१) अज्ञानाविरुद्ध, (२) असहिष्णुते-विरुद्ध, (३) छळ व जुलूम यांविरुद्ध. अज्ञानाविरुद्ध बंडाचा झेंडा पेट्रार्क नामक पंडितानें उचलला; असहिष्णुतेविरुद्ध झेंडा धर्मोपदेशक जोहान्स हस यानें उचलला; छळ व जुलूम यांविरुद्ध झेंडा प्रसिद्ध चळवळ्या जॉन बॉल यानें उचलला. या तिघांचें जीवन थोडक्यांत पाहूं या. नवयुग या नांवानें ज्ञात असलेल्या क्रान्तीमध्यें जे तीन प्रवाह होते ते या तिघांनीं उचलून घेतले होते.

— २ —

डान्टे मेला तेव्हां पेट्रार्क तेरा वर्षांचा होता. त्याचें पूर्ण नांव फ्रॅन्सिस पेट्रार्क, १३०४ मध्यें अरेझो गांवीं त्याचा जन्म झाला. त्याचा बाप फ्लॉरेन्समधील प्रतिष्ठित नागरिक होता. पण त्याला तेथें हद्दपार करून ठेवण्यांत आलें होतें. ज्या अल्पसंख्य पक्षाला मागाहून डान्टे मिळाला, त्याच पक्षाचा पेट्रार्कचा बापहि होता; वयाच्या पंधराव्या वर्षी पेट्रार्कला कायद्याचा अभ्यास करण्यासाठीं फ्रान्समधील मॉंटपेलियर विद्यापीठांत घालण्यांत आलें. कायद्याकडे त्याच्या मनाचा ओढा नव्हता; पण बापाचा धंदा पुढें चालविण्यासाठीं तो कायदे-पंडित होणार होता. तो इतर वाचन करी, काव्य करी. त्यानें लॅटिनचा सांगोपांग अभ्यास केला होता; पण तत्कालीन युरोपियन विद्यार्थ्यांप्रमाणें त्यालाहि ग्रीकचा गंध सुद्धां नव्हता.

१३२६ सालीं त्याचा बाप वारला तेव्हां तो ॲव्हिगनॉन येथें धर्मोपदेशक झाला. १३२७ सालच्या एप्रिलच्या सहाव्या तारखेस ॲव्हिगनॉनमधील एका चर्चमध्यें लॉरा नांवाच्या तरुणीशीं त्याची गांठ पडली त्या वेळीं तो तेवीस वर्षांचा होता. लॉराचें लग्न झालेलें होतें. तरुण कवीकडे—या पेट्रार्ककडे—तिचें मन आकर्षिलें गेलें. ती त्याच्या भावना व वासना चेतवी, उचंबळवी, पेटवी; पण ती त्याला स्वतःच्या अधिक जवळ येऊं देत नसे. ती त्याला दुरून दुरूनच खेळवी. त्यांची पहिली भेट झाली त्या क्षणापासून लॉरानें पेट्रार्कच्या मनावर व प्रतिभेवर सत्ता मिळविली. ती त्याच्या काव्याची स्वामिनी होती. त्याच्या सुनीतांमुळें ती अमर झाली आहे. नवयुगांतील अत्यंत मनोहारिणी स्त्री म्हणून ती ओळखली जाते. चौदाव्या शतकांतील या भावनाशून्य सुंदरीच्या सन्मानार्थ भावनाप्रधान तरुण आजपर्यंत भावनोत्कट काव्याच्या राशी निर्माण करीत आले आहेत. लॉरानें जरी पेट्रार्कचें मन सर्वस्वीं व्यापिलें होतें तरी इतर स्त्रियांच्या बाबतींतहि तो कांहीं अंधळा नव्हता. त्याला त्याच्या एका पूजकानें एक बेवारशी मूल अर्पण केलें, दुसऱ्या एकानें एक बेवारशी मुलगी दिली व पोपच्या खास फर्मानानें पुढें हीं मुलें कायदेशीर मानलीं गेलीं.

पेट्रार्क ॲव्हिगनॉन येथें १३३३ पर्यंत राहिला. नंतर तो प्राचीन काळांतील सौंदर्य मिळविण्यासाठीं आपल्या पहिल्या दीर्घ यात्रेवर निघाला. विनवुड रीड

आपल्या ग्रंथात म्हणतो, " त्यानें ग्रंथ धुंडाळण्याचें युग सुरू केलें. " पॅरिस, घेंट, लीज, कोलोन, रोम, इत्यादि शहरीं तो गेला. त्यानें जुने हस्तलिखित लॅटिन ग्रंथ शोधून काढले व त्यांच्या नकला करून घेऊन तें जुनें ज्ञान व ते प्राचीन विचार त्यानें आत्मसात् करून घेतले. मॅटरलिंकच्या ' निळा पक्षी ' या पुस्तकांत दोन जिज्ञासू भावंडांचे मृत बंधू जिवंत होतात, त्याप्रमाणें लॅटिन वाङ्मयांतील प्राचीन वागीश्वर पेट्रार्कच्या स्मृतीचा जादूचा स्पर्श होतांच जणूं पुनः जिवंत झाले! पेट्रार्कनें सिसरो व सेनेका यांना पत्रें लिहिलीं : जणूं ते त्याचे समकालीनच होते! शेकडों शतकें ओलांडून तो आपल्या सहानुभूतिपूर्ण दृष्टीनें त्यांना भेटला, त्यांच्याबरोबर त्यांच्याच भाषेंत बोलला, त्यांचेच वाक्संप्रदाय वापरूं लागला. जरी तो कॅथॉलिक चर्चचा धर्मनिष्ठ पुत्र होता तरी तो प्राचीन ज्ञानमन्दिराचा व प्राचीन धर्मांचाहि चाहता व उद्गाता बनला. ईश्वराच्या तोंडावरील मध्ययुगीन बुरखा दूर करून त्यानें ख्रिस्त केवळ दुःखमूर्ति नसून आनंदमूर्तीहि आहे असें दाखवून युरोपला चकित केलें. दुःखमूर्ति ख्रिस्त म्हणजे हास्यमूर्ति व विनोदमूर्ति बॅकसचा जुळा भाऊ असें त्यानें दाखविलें.

सौंदर्यासाठीं ही भूतकाळांतील यात्रा करण्यांत पेट्रार्कचीं बरींच वर्षें गेलीं. नंतर तो लोकांपासून दूर अशा व्हॉक्लूज येथील भव्य व भीषण पर्वतांमधील एका दरींत घर करून राहिला व तेथें त्यानें आपलें शेष आयुष्य अत्यंत शांतपणें घालविलें, प्राचीनांच्या काव्याचा अभ्यास केला आणि संगीत व नादमाधुर्य हे त्यांचे गुण आपल्या काव्यांत आणले. वाङ्मयांत त्यानें एक नवीनच तार छेडली व मध्ययुगीन विचाराच्या छंदाला एक नवीन, तेजस्वी आणि उत्कट जोड दिली. मरण वा नरकयातना यांविषयींच काव्यें करीत बसण्याऐवजीं तो जीवनाविषयीं व प्रेमाच्या आनंदाविषयीं लिहूं लागला. झोंपून उठल्याप्रमाणें जग त्याचीं हीं गीतें ऐकूं लागलें व टाळ्या वाजवून त्याची वाहवा करूं लागलें.

पेट्रार्क जरी अवलियासारखा–संन्याशासारखा–राहत होता, तरीहि त्याला ही स्तुति आवडली नाहीं असें नाहीं. ही स्तुति लाभावी म्हणून त्यानें खटपट केली, प्रयत्न केले. तो सर्व प्रकारच्या संगीताचा भोक्ता होता. टाळ्यांचें तद्वतच स्तुति करणाऱ्या जिभेचेंहि संगीत त्याला आवडे. आपल्या

लिखाणांत जरी तो अधिकाऱ्यांची टिंगल करी तरी प्रत्यक्ष वागतांना मात्र तो त्यांच्याशीं सौम्यपणानेंच नव्हे तर जरा अदबीनेंहि वागे. अधिकारीहि त्याच्या साहित्यिक टिंगलीबद्दल स्मित करीत; पण खासगी वागणुकींत तो नमून वागे, म्हणून ते त्याचा मानसन्मान व उदोउदो करीत. पेट्रार्कचा देह, तसाच आत्मा कॅथॉलिक चर्चच्या प्रेमळ व वत्सल बाहुपाशांत सुरक्षित असेतोंपर्यंत त्याचें मन प्राचीनांच्या पुष्पवाटिकेंत हिंडत फिरत राहिलें तरी चिंता नाहीं असें ते अधिकारी म्हणत.

त्याची ज्ञानाची तहान व रोमन वाङ्मयावरील त्याची उत्कट प्रीति या गोष्टी वगळल्या तर पेट्रार्क धोकेबाज नव्हता. तो सनातनी, समतोल वृत्तीचा व शहाणा गृहस्थ होता. तो इतका साळसूद व भरंवसा ठेवण्यालायक गृहस्थ होता कीं, तो कांहीं वेडेवांकडें करील अशी कोणाला शंकाहि येण्याची शक्यता नव्हती. पॅरिसच्या विद्यापीठानें त्याला प्राध्यापक म्हणून बोलाविलें; पण नेपल्सचा राजा रॉबर्ट याच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यानमाला गुंफण्यासाठीं आलेलें आमंत्रण त्याला अधिक महत्त्वाचें वाटलें. विद्यापीठांतल्यापेक्षां प्रासादांतला मानसन्मान त्याला अधिक आकर्षक वाटला. नेपल्सच्या वाटेवर रोम शहरीं त्याचें सार्वजनिक स्वागत करण्यांत आलें. त्याला विजयमाला अर्पण करण्यांत आली. श्रेष्ठतम कवि म्हणून त्याचा गौरव करण्यांत आला. तो अर्वाचीन जगांतील पहिला राजकवि होय.

त्याच्या आयुष्यांतील शेवटच्या भागांत तर त्याच्यावर मानसन्मानांची नुसती वृष्टि झाली! परंतु या काळांत त्याच्या वांट्यास दुःखेंहि आलीं. इ. स. १३४८ मध्यें त्याची स्फूर्तिदेवता लॉरा ही मेली. युरोपांतील काळ्या प्लेगनें तिचा बळी घेतला. प्लेगनें सर्वत्र कहर उडविला होता. थोड्या वर्षांनीं याच रोगाला त्याचा एकुलता एक मुलगाहि बळी पडला. याच साथींत त्याचे कांहीं जिवाभावाचे मित्रहि मेले. तो पुनः एकदां पुस्तकांत शिरला; त्यानें वाङ्मयांत बुडी मारली. तो असा एक आश्रम काढूं इच्छीत होता कीं, तेथें ख्रिश्चन धर्मांतील ज्ञानवैराग्यांबरोबरच प्राचीन काळांतील मुक्त विचार व मोकळी संस्कृति यांचीहि पूजा–अर्चा व्हावी, प्राचीन धर्म व ख्रिस्ती धर्म दोन्ही तेथें भेटूं व एकत्र नांदूं शकावे. पण हें स्वप्न अशक्य आहे असें त्याला आढळून आलें व त्यानें तो नाद सोडून दिला. त्या वेळेस सर्व

जगभर क्रांतिकारक वारे वाहूं लागले होते. थोडा वेळ पेट्रार्कहि या क्रांतीच्या वातचक्रांत सांपडला, पण थोड्याशा अनुभवानंतर तो क्रांतीच्या लाटांतून बाहेर पडला. त्याचा आत्मा प्रत्यक्ष सृष्टींत, आसपासच्या प्रत्यक्ष जीवनांत रमत नसे, तर काव्यांत रमत असे, वाङ्मयांत विहरत असे. १३७४ च्या १८ व्या जुलैला तो मरण पावला. मरतांना त्यानें आपलें पवित्र मस्तक एका पुस्तकाच्या उशीवर ठेवलें होतें.

— २ —

पेट्रार्कचें नवयुग म्हणजे शाब्दिक क्रांति होती. त्यानें रोमन वाङ्मय उजेडांत आणलें व त्याच्या अनुयायांनीं ग्रीक साहित्य उजेडांत आणलें. चिनी लोकांची छापण्याची कला युरोपांत वाढत होती. जर्मनींत गुटेम्बर्ग व हॉलंडमध्यें कोस्टर यांनीं या कलेंत शोध लावले. पुस्तकें छापलीं जाऊं लागलीं, मृत भूतकाळ सजीव होऊं लागला, पुस्तकांचा प्रसार होऊं लागल्यामुळें ज्ञान बहुजनसमाजांत जाऊं लागलें. युरोपला आपल्या थोर साहित्यिक वारशाची जाणीव झाली. मध्ययुग रानटी युद्धांत गुंतलेलें होतें. युद्धांत गुंतलेल्या जगाला वाचण्याची सात्त्विक व सांस्कृतिक करमणूक लाभली. तरवार बाजूस ठेवून पुस्तक हातांत घ्यावयास मानवजात प्रथमच शिकत होती.

नवयुगाची ही पहिली स्थिति. अज्ञानाविरुद्ध बंड ही नवयुगांतील पहिली महत्त्वाची गोष्ट. दुसरी स्थिति म्हणजे असहिष्णुतेविरुद्ध बंड. येथें शब्दांशीं तितकेंसें काम नसून प्रत्यक्ष कृतीशीं काम होतें. मध्ययुगांतील असहिष्णु धर्मवेडेपणाविरुद्ध बंड उभारणाऱ्यांमधील अग्रेसर वीर म्हणून जोहान्स हस याचा गौरव केला पाहिजे.

हस हा बोहेमियन होता. तो प्रेगच्या विद्यापीठांत प्राध्यापक होता. त्याला चर्चचे ठरीव विधिनिषेध पसंत पडेनात. बायबलमधील शब्दन् शब्द तो विश्वसार्ह मानीत नसे. त्याचा ख्रिस्ताच्या शिकवणीवर विश्वास होता; पण बायबलमधील चमत्कारांचा कांहीं उपयोग नाहीं असें तो म्हणे. तो भटांभिक्षुकांच्याविरुद्ध होता. मधल्या उपाध्यायांच्या लुडबुडीशिवायहि ईश्वर भक्तांच्या प्रार्थना समजूं शकतो असें तो म्हणे. पोपांच्या थाटमाटावर तद्वतच चर्चच्या उद्धटपणावर व धर्मान्धतेवर तो टीका करी. तो जॉन वुइक्लिफचा

मित्र व अनुयायी होता. जॉन वुइक्लिफनें लॅटिनमधील बायबलचें इंग्रजींत भाषान्तर केलें होतें. चर्चनें सांगितलेला अर्थ डोळे मिटून ऐकण्याऐवजीं जनतेनें बायबल स्वतः वाचून पाहावें म्हणून त्यानें त्याचा इंग्रजींत अनुवाद केला होता. पददलितांच्या हक्कांसाठीं तो झगडे. त्या काळांत युरोपांतील भूमीपैकीं तिसरा हिस्सा जमीन चर्चच्या मालकीची होती. ही सारी जमीन शेतकऱ्यांस परत दिली जावी असें हस म्हणे. आद्य ख्रिश्चन लोकांतले बंधुभाव व साम्यवाद पुनः येऊं देत असें तो उपदेशी. थोडक्यांत बोलावयाचें तर जोहान्स हस यथार्थपणें ख्रिश्चन होऊं पाहत होता. यामुळें संघटित चर्च त्याला शत्रु मानूं लागलें व चर्चचे अधिकारी त्याला पाण्यांत पाहूं लागले.

इ. स. १४१२ मध्यें आर्चबिशपनें जॉन वुइक्लिफच्या दोनशें पुस्तकें जाळून टाकलीं व हसला धर्मबाह्य केलें. त्यानें सारें प्रेग शहरच जणूं कायदेबाह्य ठरविलें. पण हस डगमगला नाहीं. आपलें काम हातीं घेऊन तो पुढें जात होता. त्या वेळीं रोमन कॅथॉलिक चर्चचे दोन पोप असत. एक रोम येथें व दुसरा अॅव्हिग्नॉन येथें. कॅथॉलिक धर्माला दुहीचा रोग मधूनमधून जडत असे, तसाच रोग या वेळेस जडला होता. असे तट पडल्यामुळें पृथ्वीवर ईश्वराचा एक प्रतिनिधि असण्याऐवजीं दोन प्रतिनिधी झाले. वेल्स लिहितो, "प्रत्येक जण आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या अनुयायांना शाप देई, त्यामुळें थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास सारेच जणूं नरकाचे धनी झाले!"

इ. स. १४१५ मध्यें कॉन्स्टन्स येथें धर्मोपाध्यायांचा मेळावा जमला. चर्चमधली दुही मिटावी म्हणून ही परिषद् भरली होती. या परिषदेसाठीं हसलाहि आमंत्रण देण्यांत आलें होतें. "तुम्ही या व पोप, सम्राट्, तेवीस कार्डिनल्स, तेहतीस आर्चबिशप व बिशप, दीडशें अॅबट व चर्चची सुधारणा करण्यासाठीं येणार असलेले शंभरांवर ड्यूक व राजेरजवाडे वगैरेंना आपलीं मतें समजावून सांगा" असें हसला कळविण्यांत आलें होतें व "तुम्ही याल तर तुमच्या सुरक्षिततेची हमी आम्ही घेतों" असेंहि आश्वासन त्याला देण्यांत आलें होतें.

अशक्त, हाडकुळा, आजारी हस तेथें जातांच वचन मोडून त्याला पकडण्यांत आलें व नास्तिक म्हणून जिवंत जाळण्यांत आलें! हें दुष्ट कृत्य केल्यानंतर जमलेल्या कौन्सिलनें जॉन वुइक्लिफची हाडें उकरून काढून

जाहीररीत्या जाळून टाकलें ! वेल्स लिहितो, "हें पापी, नीच कृत्य एकाद्या विक्षिप्त धर्मवेड्या पीरानें केलें नव्हतें तर अधिकृतरीत्या चर्चनें केलें होतें."

हसच्या मरणानंतर पांच वर्षांनीं पोप पांचवा मार्टिन यानें वटहुकूम काढला कीं, सारे हसवाले, वुइक्लिफवाले व बोहेमियांतील नास्तिक नष्ट केले जावे. क्रूसेड्स्वरून परत आलेल्यांनीं पोपचें हें फर्मान वाचतांच ठिकठिकाणीं त्याची अमलबजावणी केली. सर्वांच्या कत्तली झाल्या; पण हसचे विचार मारले गेले नाहींत.

— ४ —

पेट्रार्क हा नवयुगांतील साहित्यिक जागृतीचा प्रतिनिधि होता, जोहान्स हस हा धार्मिक जागृतीचा प्रतिनिधि होता व जॉन बॉल हा सामाजिक जागृतीचा प्रतिनिधि होता. मध्ययुगाच्या अंतीं ही सारी पृथ्वी ओसाड झाली होती. सर्वत्र विध्वंस व विनाश दिसून येत होते. क्रूसेड्स्च्या युद्धांतून दुष्काळ व साथी यांचा उद्भव झाला. युद्धांतून शेवटीं सर्वत्रच रोग फैलावतात. मागील महायुद्धांतहि ही गोष्ट अनुभवास आली होती. क्रूसेड्स्मधून काळा मृत्यु म्हणून एक भयंकर रोग सर्वत्र फैलावला. एका युरोपातच या रोगानें जवळजवळ दीड कोटि लोकांचा बळी घेतला ! सर्वच मानवजातीचें उच्चाटन होणारसें दिसूं लागलें. या मरणान्तिक साथीनें लोकांचे डोळे उघडले व ते जीवनाच्या मूल्यांचा फेरविचार करूं लागले. आपण ज्या मार्गांनीं जात आहों ते भले आहेत कीं बुरे आहेत, याची चिकित्सा ते करूं लागले. मागील महायुद्धानंतर आपणहि अशाच प्रकारें विचार करूं लागलों होतों. आपले पुढारी, आपले राजेमहाराजे वगैरे ज्या रीतीनें जात आहेत तींत कितपत अर्थ आहे याची परीक्षा लोक करूं लागले. युद्धें व साथी यांमुळें सर्वांहून अधिक धक्का जर कोणास बसला असेल तर तो शेतकऱ्यांना. हे शेतकरी ठायीं ठायीं बंड करून उठले—ज्यांनीं त्यांना निव्वळ पशुसम स्थितींत डांबून ठेवलें होतें त्यांच्या सत्तेविरुद्ध ते बंड करून उठले. त्या काळ्या आजारानें लाखों लोकांचे बळी घेतल्यामुळें मजूर भरपूर मिळेनासे झाले. ॲबट, बिशप व इतर जमीनदार यांचें अर्थशास्त्राविषयक अज्ञान जसें अपरंपार होतें, तसाच त्यांचा स्वार्थहि अपरंपार होता. शेतकऱ्यांनीं आणि कामगारांनीं दुप्पट काम करावें असे जुलुमी कायदे या प्रतिष्ठित वर्गांनी केले. काम वाढलें, पण मजुरींत मात्र वाढ

झाली नाहीं ! आणि दुःखावर डागणी म्हणूनच कीं काय कामगारांनीं वा मजुरांनीं स्वसंरक्षणार्थ संघटना करतां कामा नये असेहि कायदे केले गेले. चांगली नोकरी शोधण्यासाठीं दुसरीकडे जाण्यासहि त्यांना कायद्यानें बंदी करण्यांत आली. हा तोंड दाबून बुक्क्यांचा मार होता. या सर्व जुलुमामुळें शेतकरी व कामकरी साहजिकच बंडास प्रवृत्त झाले. ही इतिहासांतील एक नवीनच गोष्ट होती. समाजांतील जे अन्याय व ज्या विषमता दैवायत्त व देवेच्छित म्हणून अनिर्बंध चालत आल्या होत्या, ज्यांविरुद्ध कोणी ब्रहि काढीत नसे, त्याविरुद्ध सारी पददलित जनता गर्जना करून उठली. दारिद्य, दैन्य, दुष्काळ, रोग, उपासमार, मरण, शक्तीबाहेर काम, या सर्वांविरुद्ध श्रमजीवी जनता निर्भयपणें गर्जना करून भिंतीस पाठ लावून उभी राहिली. वस्तुतः हें नवदर्शन होतें. पण सनातनी वृत्तीचा फ्रॉइसार्ट राजामहाराजांची व पोपबिशपांची बाजू घेऊन लिहितो कीं, जनता बंड करून उठली ती ती सुखवस्तु होती म्हणून ! भरपूर खावयाला प्यावयाला मिळत होतें म्हणून ही बंडाची शक्ति !

शेतकऱ्यांचें बंड प्रथम फ्रान्समध्यें पेटलें. पुढें चारशें वर्षांनीं झालेल्या फ्रेंच राज्यक्रांतीची हें बंड ही एक आगाऊ सूचनाच होती म्हणाना ! फ्रान्समधील बंडाच्या ज्वाला इंग्लंडांत आल्या. केंट परगण्यांतील जनतेला जॉन बॉल यानें समतेचें तत्त्व उपदेशिलें. फ्रॉइसार्ट, जॉन बॉल याचें हें धाडस पाहून चकित होतो. जॉन बॉल याची त्याला जणूं गंमत वाटते. तो त्याला 'केंटमधील वेडा धर्मोपदेशक' असें संबोधितो. त्याच्या प्रवचनाला बहुजनसमाजांतील पुढील सूत्राचा आधार असे :—

"जेव्हां ॲडम काम करी आणि ईव्ह कांती,
तेव्हां प्रतिष्ठित वा सभ्य गृहस्थ होता का कोणी ?"

'कांहीं लोक ईश्वराच्या कृपेनेंच दुसऱ्यांवर सत्ता गाजविण्यासाठीं जन्माला येतात' असल्या चावट मतांची तो हुरेवडी उडवी व शेतकऱ्यांस सांगे कीं, हा सारा फालतू पसारा आहे, अन्यायी व जुलुमी लोकांचा हा पापमूलक अनाचार आहे. तो म्हणे, "बंधूंनो, जोंपर्यंत आपण सारी संपत्ति सारखी विभागून घेत नाहीं, सर्वांस सारखें अन्नवस्त्र वांटून देत नाहीं, मिळेल तें सर्व सारे मिळून जोंपर्यंत सारखें उपभोगीत नाहीं, तोंपर्यंत जगांत

श्रीमंत–गरीब, मालक–मजूर असे भेद राहणारच. ज्यांना आपण लॉर्ड म्हणतों त्यांच्यांत आपणां सामान्य लोकांहून विशेष असें काय आहे? त्यांना कां म्हणून मोठें मानावयाचें? त्यांची कोणती श्रेष्ठता? कोणती लायकी? ते आपणांस दास्यांत कां ठेवतात? ते स्वामी कां? व आपण त्यांचीं हीन–दीन कुळें कां? आपण सारेच ॲडम व ईव्ह यांपासून जन्मलों, तर 'आम्हीच श्रेष्ठ' असें हें कोणत्या तोंडानें म्हणतात? यांचा मोठेपणा एकच आहे व तो म्हणजे ते तुम्हांआम्हांस राबावयाला लावतात. त्यांना चैन करावयासाठीं जें जें लागतें तें सारें आपण निर्माण करतों व ते बेटे गाद्यांवर बसून गर्वानें सारे भोगतात. ते गरम कपडे घालतात, मलमलीचे व लोकरीचे सुंदर कपडे वापरतात, पण आपल्या अंगावर मात्र चिंध्या! त्याना प्यावयास उंची मद्यें, खावयाला छानदार भाकरी, नाना भाज्या, नाना मसाले! आणि आपणांस मात्र साधी भाकर! आपण चंद्रमौळी झोंपड्यांत राहतों, पेंढ्यावर निजतों, साधें पाणी पितों, तर त्यांना राहण्यास सुंदर घरें व भरपूर आराम! आपणांस पावसापाण्यात व थंडीवाऱ्यांत शेतांत राबावें लागतें, हाल व कष्ट आपल्या कपाळीं! हे बडे लोक जी ऐट व जें वैभव दाखवितात त्यांचा जन्म तुमच्या-आमच्या श्रमांतूनच होतो."

चौदाव्या शतकाच्या मध्याला उच्चारलेले हे क्रान्तिकारक शब्द जणूं काय मार्क्सचे, एंजल्सचे किंवा यूजेनडेब्सचेच आहेत असें वाटते.

जॉन बॉल जें सांगत होता तें लोकांना, विशेषतः वरिष्ठ वर्गांतल्या लोकांना, जरी विचित्र वाटे, तरी त्यांत खरोखर विचित्र असें कांहींच नव्हतें. ख्रिस्ताची शिकवणच तो जणूं पुनः नव्याने सांगत होता. पण ती खरी ख्रिस्ताची शिकवण ऐकून कँटरबरीचा आर्चबिशप दांतओठ खाऊं लागला. तो अत्यंत संतप्त झाला. युरोपातील एकतृतीयांश जमीन चर्चच्या मालकीची होती. जॉन बॉल ख्रिस्ताची शिकवण शिकवूं लागल्यापासून पांच वर्षांनीं म्हणजे इ. स. १३६६ मध्यें त्याला धर्मबाह्य ठरविण्यांत आलें. त्याचें प्रवचन वा व्याख्यान कोणाहि इंग्रजानें ऐकूं नये असें फर्मान काढलें गेलें. पण त्या वटहुकुमामुळें जॉन बॉल डरला नाहीं; शेतकरीहि घाबरले नाहींत. त्यानें आणखी पंधरा वर्षें आपली चळवळ सुरूच ठेवली. शेवटीं १३८१ मध्यें त्याला अटक करून मेडस्टन येथील तुरुंगांत ठेवण्यांत आलें. पण या वेळपर्यंत शेतकरी चांगलेच उठले

होते. ते चांगलेच जागृत झाले होते. त्यांनीं तुरुंग फोडला व आपल्या पुढाऱ्यास वांचविलें. जॉन बॉलनें पुनः आपलें काम सुरू केलें. तो पुनः गिरफदार केला गेला. १३८१ च्या जुलैच्या पंधराव्या तारखेस बड्या सरदारवर्गाच्या लोकांसमक्ष त्याला फांशीं देण्यांत आलें. त्याची ती शिक्षा पाहण्यास दुसरा रिचर्ड राजाहि हजर होता.

शेतकरी व कामकरी यांचें बंड तात्पुरतें शमलें; पण पुढें तें फ्रान्समध्यें, जर्मनींत, बोहेमियांत तसेंच रशियांतहि पेटलें. हें पुस्तक लिहिण्यांत येत असता तें चीनमध्येंहि पेटत आहे. जॉन बॉलचें बंड म्हणजे मानवजातीच्या इतिहासांतला एक नवीनच म्हणजे नवयुगाचा, नवक्रान्तीचा प्रारंभ होता. तो श्रमजीवी व कामगार वर्गाच्या पुरस्काराच्या युगाचा प्रारंभ होता. ऐतिहासिक चळवळीचीं बीजें रुजण्यास, वाढण्यास व फोंफावण्यास बराच काळ लागतो. जॉन बॉल यानें पेरलेलीं बीजें आज विसाव्या शतकांत मूळ धरूं लागलीं आहेत असें दिसत आहे. मानवजात संस्कृतीच्या मार्गावर एक पाऊल टाकायला कधीं कधीं कित्येक शतकें घेते. चौदाव्या शतकापासून एक नवीनच शक्ति जगांत प्रादुर्भूत झाली. पददलित लोकांना स्वतःच्या शक्तीचा साक्षात्कार झाला. स्वतःच्या हक्कांच्या रक्षणार्थ व समर्थनार्थ ते आपली शक्ति दाखवूं लागले. या श्रमजीवी वर्गाला जागें होण्यास शेंकडों वर्षें लागलीं, तशींच आतां शक्तिसंपन्न व्हावयाला आणखी कित्येक शतकें लागतील. पण भविष्यराज्य निश्चितपणें त्याचें आहे. त्याचा भाग्याचा दिवस निश्चितपणें जवळ येत आहे. मानवी मनाची जागृति, मानवी आत्म्याचें मुक्त होणें, अशा अर्थाचें जें हें नवयुग उजाडलें तें इतिहासांतलें सर्वांत मोठें युग होय, इतिहासांतील चळवळींत ही अत्यंत महत्त्वाची चळवळ होय. या नवयुगाचा आरंभ चौदाव्या शतकांत झाला. तें नवयुग आज पांचशें वर्षें होऊन गेलीं तरी अद्यापि बाल्यावस्थेंतच आहे. ज्या वेळेस मानवकुटुंबांतील प्रत्येक घटकाला विकासाची समान संधि लाभेल, ज्या वेळेस पक्षपात नाहींसा होईल, जेव्हां आवडता–नावडता हा भेद निघून जाईल, जेव्हां या धनधान्यसंपन्न वसुंधरेचीं फळें सर्वांना नीटपणें मिळतील व सर्वांना सुखी, सुंदर व निरामय जीवन कंठितां येईल, तेव्हांच हें नवयुग विजयी, कृतार्थ झालें असें म्हणतां येईल. जेव्हां युद्धें, अज्ञान, जुलूम, असहिष्णुता, द्वेष व मत्सर

पृथ्वीवरून निघून जातील तेव्हांच नवयुगाची संपूर्ण कथा सांगण्याचा योग्य प्रसंग आला असें म्हणतां येईल.

## प्रकरण ७ वें

# ऑर्लीन्स येथील कुमारी जोन ऑफ आर्क : फ्रान्सची माता

— १ —

विशुद्ध करणारे नवयुगाचे वारे जरी अशा रीतीनें वाहूं लागले तरी अद्यापि मध्ययुगांतील दुष्टतेचें भूत पश्चिम युरोपच्या मानगुटीस बसलेंच होतें. हे वारे आले तरी हें दुष्ट धुकें पश्चिम युरोपच्या मुखमण्डलास आच्छादून राहिलेंच होतें. पंधराव्या शतकभर फ्रान्स, जर्मनी, इटली, स्पेन, बोहेमिया, इत्यादि देशांत हजारों स्त्रीपुरुषांस जिवंत जाळण्यांत येत होतें. मानवी चरबी सर्वत्र जळत होती व तिची घाण चोहोंकडे भरून राहिली होती. धर्मान्ध आचार्यांना टीकेचें तोड बंद करण्याचा फारच सोपा उपाय सांपडला होता. तो म्हणजे टीकाकारांना ठार मारण्याचा. जे जे चर्चशीं सहमत नसत अगर ज्यांची ज्यांची संपत्ति पाहून पोप प्रभृतींचा स्वार्थ जागृत होई, त्या साऱ्यांना जिवंत जाळून त्यांची धनदौलत जप्त करण्यांत येई !

चर्चशीं सहमत नसणारे तेवढेच नव्हेत तर राजकीय गुन्हेगारहि नास्तिक म्हणून जाळण्यांत येत असत. पोप व राजे हातांत हात घालून जात होते. राजाला धर्माचा व धर्माला राजाचा पाठिंबा असे. राजाविरुद्ध वर्तन ईश्वराविरुद्धच समजण्यांत येई.जणूं ईश्वरच राजांना अभिषेक करतो असें मानण्यांत येत असे. चर्चनें मान्यता दिलेल्या शासनसंस्थेस विरोध करणें हें देहान्त शिक्षेचा गुन्हा करण्यासारखें गणण्यांत येई. हा गुन्हा केवळ शासनसंस्थेविरुद्धच नसे, तर चर्चच्याहि विरुद्ध असे. जोन ऑफ आर्कची जीवितकथा समजून घेण्यासाठीं चर्च व स्टेट यांच्यांतील हें परमैक्य लक्षांत ठेवणें आवश्यक आहे. चर्चचे अधिकारी ज्याला धार्मिक गुन्हा समजत, तो हातून घडल्यावर त्या काळच्या रिवाजाप्रमाणें धार्मिक गुन्ह्याच्या सदराखालीं तिचा खटला चालणें क्रमप्राप्तच होतें व नास्तिक म्हणून तिला जाळण्यांत येणार हेंहि ठरलेलेंच होतें. आजच्या चिकित्सक मनाला जोन ऑफ आर्कचें सारें जीवन विश्वासार्ह वाटत नाहीं ;

पण पंधराव्या शतकांतल्या भोळ्या श्रद्धाळू मनाला तिचें जीवन विचित्र वाटत नसे आणि तत्कालीन परिस्थितींत तिला ज्या प्रकारचें मरण आलें त्या प्रकारचेंच येणें साहजिक होतें.

— २ —

मध्ययुगांत प्रत्येक जण देवदूतांशीं बोले, प्रत्येकाचा चमत्कारांवर विश्वास असे. पॅरिसमध्यें रिचर्ड नांवाचा कोणी एक साधु होता तो आपणास स्वर्गाचा प्रत्यक्ष आवाज ऐकूं येतो व आपणास देवाच्या इच्छेचा अर्थ समजतो असें म्हणे. त्यानें साऱ्या पॅरिस शहराला वेड लावलें. श्रद्धाळू धर्मभावनांना वाटे कीं, पॅरिसमध्यें त्यानें जणूं समुद्रच उंच बनविला! दुसरा एक कार्थेलाइट पंथी थॉमस कॉनेटा नांवाचा साधु होता तो स्वर्गांतील देवदूतांनीं आपणास धर्माची किल्ली दिली आहे असें म्हणे. फ्रान्समध्यें व बेल्जममध्यें त्याच्या प्रवचनांस पंधरा ते वीस हजारपर्यंत श्रोते जमत. ब्रिटनींमधली पिएरेटी नामक एक स्त्री आपल्या बंधुभगिनींस म्हणे, "मी नेहमीं ख्रिस्ताशीं बोलत असतें." एका फ्रेंच धनगराचा एक मुलगा होता, त्याच्या अंगातून रक्ताचा घाम बाहेर येई असें सांगत. ज्यांच्या अंगांत येतें असे स्त्रीपुरुष प्रत्येक प्रान्तांत असत. आपण स्वर्गांतील आत्म्यांशीं सदैव बोलतों असें हे स्त्रीपुरुष मानीत व इतरांना मानावयास लावीत.

स्वर्गांतील देवदूतांशीं व आत्म्यांशीं बोलतां येतें अशा प्रकारच्या चमत्कार-मय कथा छोटी जोन ऑफ आर्क आपल्या आईच्या तोंडून नेहमीं ऐके. तिची आई धर्मशील होती. जोनला लिहितां-वाचतां येत नव्हतें. तें तिला शिकविण्यांत आलें नव्हतें. धार्मिक दन्तकथा व पऱ्यांच्या गोष्टी हेंच तिचें शिक्षण. तिला या गोष्टी खऱ्या मानावयाला शिकविण्यांत आलें होतें. फ्रेंच इतिहासकार मायचेलेट म्हणतो, "चर्चच्या भिंतींजवळ ती जन्मली होती. चर्चमधील घंटांच्या नादावर ती पाळण्यांत आंदुळली जाई, झोंपविली जाई. तिचें मन व तिची बुद्धि हीं दन्तकथांवर पोसलीं गेलीं होतीं. आणि या सर्वांचा परिणाम म्हणजे तीच एक जिवंत दन्तकथा बनली. तिच्या बापाच्या घराजवळच जंगल होतें. त्या जंगलांत पऱ्या राहतात असें मानण्यांत येई. वर आकाशांत नाचणाऱ्या मेघमालांवर किंवा तेजस्वी रथांत बसून देवदूत उडत्या-पळत्या मेघांमधून जात आहेत असें तिला दिसे. जेव्हां तिचा बाप

शेतांत काम करीत असे आणि आई घरकामांत मग्न असे, तेव्हा उंबऱ्यावर बसून ती गावांतील सारे आवाज ऐकत राही. सर्वांचा मिळून एक संमिश्र, संमीलित आवाज होई. अतिमधुर व स्वप्नमय अशी ती अस्पष्ट वाणी तिला गुंगवी. 'माझ्याशीं बोलणाऱ्या देवदूतांचाच नव्हे का हा आवाज? हो, तोच.' असें तिला वाटे. परलोक व इहलोक यांची सीमान्त-रेषा कोठें, कशी, कोण काढणार? स्वर्ग व पृथ्वी जणूं एकमेकांशीं मिळूनच गेलीं आहेत व शेजारचीं माणसें रस्त्यावर एकत्र येऊन भेटतात, बोलतात, त्याप्रमाणें स्वर्गीय देवदूत व मानव एकमेकांस भेटूं शकतील, परस्परांशीं बोलूं शकतील असें तिच्या बालनिर्मळ कल्पनेस वाटे. स्वयंपाकघरांतून आईनें हांक मारणें जितकें साहाजिक तितकेंच देवदूतांनीं बोलावणें वा हांक मारणेंहि साहजिक असून त्यांत चमत्कार वगैरे कांहीं नाहीं असें तिला वाटे. इतकेंच नव्हे तर उलट देवदूत देवाच्या या पृथ्वीवरील लेंकरांबरोबर कधीं बोलत नाहींत असें तिला कोणीं सांगितलें असतें तर तो मात्र तिला चमत्कार वाटला असता. थोडक्यांत सांगावयाचें तर जोन अशा जगांत जगत होती कीं, तेथें सत्य व असत्य, खरें व काल्पनिक यांत फरक करणें तिला अशक्यप्राय होतें. देवदूत आपणांस भेटावयास येऊं शकतील व आपणांसहि त्यांना भेटण्यासाठीं वर नेलें जाणें शक्य आहे असें तिला वाटे.

ती अशा काल्पनिक पऱ्यांच्या सुंदर जगात, स्वतःच्या कल्पनारम्य जगांत जगत होती. तिच्या या जगांत प्रत्यक्ष सृष्टींतील एकच कुरूपता होती, एकच दुष्ट गोष्टीचा डाग होता व ती म्हणजे इंग्रजांनीं चालविलेली लढाई होय. फ्रेंच लोक इंग्रजांना 'देवाचा शाप' म्हणत, 'नतद्रष्ट व प्रभुशापित लोक' मानीत. हे शापित इंग्रज फ्रान्सच्या दुर्दैवी राज्यावर हल्ले चढवीत होते, सारा प्रदेश उध्वस्त करीत होते; इंग्रज टॉमी फ्रेंच शेतकऱ्यांचीं पिकें कापून नेत होते, त्यांच्या घरादारांची राखरांगोळी करीत होते, गुरेंढोरें पळवून नेत होते. कधीं कधीं मध्यरात्रीं आसपासच्या गांवांहून आश्रयार्थ येणाऱ्या अनाथ स्त्रीपुरुषांच्या व मुलांबाळांच्या आक्रोशानें ती जागी होई. एकदां तिच्या आईबापासहि या लुटारूंपासून रक्षणार्थ पळून जावें लागलें. जेव्हा ती आईबापांसह परत आली तेव्हा त्यांना काय आढळलें?—सारा गाव बेचिराख झाला होता, जोनचें घर लुटलें गेलें होतें, चर्चची होळी शिलगलेली होती!

स्वर्गीतील देवदूतांचा चांगुलपणा व फ्रान्सची अगतिक दयामय स्थिति या दोन गोष्टी त्या लहान किसानकन्येच्या जीवनांत जणूं जळजळीतपणें लिहिल्या गेल्या होत्या. या दोनच गोष्टी तिला दिसत होत्या. बाकी साऱ्याचा तिला जणूं विसर पडला होता! 'फ्रान्स—माझा हा फ्रान्स—देवाचा लाडका आहे. माझ्या भूमीवर देवदूतांचें प्रेम आहे' असें तिच्या आईनें तिच्या मनावर सारखें बिंबविलें होतें. फ्रान्सच्या पवित्र भूमीवरून लुटारू इंग्रज डाकूंस घालवून देण्यासाठीं देवदूत शक्य तितकें सर्व करतील अशी तिची श्रद्धा होती; आणि अशी एक भविष्यवाणी सर्वत्र प्रसृत झाली होती कीं, एक तरुण कुमारी फ्रान्सला वांचवील. जादूगार मर्लिन व 'मी देवदूतांशीं बोलतें' असें सांगणारी ॲव्हिगनॉनची पवित्र बाई मेरी या दोघांनीं हें भविष्य केलें होतें.

आणि जोन आकाशाकडे दृष्टि लावून देवदूत फ्रान्समधून इंग्रजांना घालवून देणारा उद्धारकर्ता कधीं पाठवितात·याची वाट पाहत बसे. ती या स्वप्नांतच जणूं मग्न असे.

— ३ —

आणि उन्हाळ्यांतील तो पवित्र दिवस आला होता. सारे श्रद्धाळू लोक त्या दिवशीं उपवास करीत होते. पूर्वी कधीं आलीं नव्हतीं इतकीं स्वर्ग व पृथ्वी हीं जवळ आलीं होतीं व जोनला भास झाला कीं, आसपासच्या निस्तब्ध व पवित्र शांततेतून आपणास. कोणी तरी हांक मारीत आहे. मुख्य देवदूत मायकेल याचा तो आवाज होता. मायकेल काय सांगत होता? तो म्हणाला, "जोन, तूं चांगली मुलगी हो व नेहमीं चर्चमध्यें जात जा."

तिला जरा भीति वाटली, पण आश्चर्य वाटलें नाहीं. देवदूत इतरांशीं बोलतात असें तिनें ऐकिलें होतें. मग आपणाशीं तो कां नाहीं बोलणार, असा विचार तिच्या मनांत आला. सेंट मायकेल हा तिला कांहीं परका नव्हता. त्याची गोष्ट तिला माहीत होती. त्याचें चित्रहि तिनें पाहिलें होतें. गांवातील धर्मोपाध्यायानें सांगावें त्याप्रमाणें मायकेलनें आपणास सांगितलें असें तिला वाटलें. 'चांगली मुलगी हो व चर्चमध्यें जात जा' असें मायकेलनें सांगितलें यांत आश्चर्य तें काय?

देवदूत आपणाशीं बोलतात हा भ्रम तिला दिवसेंदिवस अधिक सत्य वाटूं लागला. तिला आणखी देवदूत भेटूं लागले. मायकेलनंतर सेंट मार्गराइट व सेंट कॅथेराइन यांनीं तिला भेटी दिल्या. जोनला त्यांचा परिचय होताच. तिला त्यांच्या मूर्ती वर हवेंत दिसतांच त्यांच्या चित्रांवरून तिनें त्यांना पट्कन् ओळखलें.

जोनला देवदूत प्रथम भेटले त्या वेळीं ती केवळ तेरा वर्षांची होती. ते तिच्याशीं रोज बोलत. कधीं कधीं ते दिवसांतून अनेकदां येत व बोलत. तिला ते स्पष्टपणें दिसत व त्यांचे आवाज स्पष्ट ऐकूं येत. चर्चमधील घंटा वाजत; तिला त्यांच्या मूर्ती दिसत व आवाज ऐकूं येत. प्रथम प्रथम हे देवदूत तिच्याशीं सामान्य गोष्टींबाबतच बोलत. एके दिवशीं देवदूत मायकेल तिला म्हणाला, "फ्रान्सच्या राज्याविषयीं मला करुणा वाटते, दया येते. हे ईश्वराच्या कन्ये, आपला गांव सोडून फ्रान्सच्या साह्यार्थ जाण्याची तुझी पाळी आली आहे." मायकेलनें तिला 'ईश्वराची कन्या' हे नांव दिलें होतें. पुनः दुसऱ्या एका वेळीं 'तूं फ्रान्सचें राज्य योग्य राजाला---ज्या राजाचा कायदेशीर हक्क आहे त्याला--परत दे' असें त्यानें तिला आग्रहानें सांगितलें.

मर्लिनचें भाविष्य खरें होणारसें दिसूं लागलें. डॉमरेमी गांवची किसान-कन्या जोन 'फ्रान्सची संरक्षणकर्त्री' म्हणून प्रभूकडून निवडली गेली व हळूहळू जोनलाहि तेंच आपलें जीवितकार्य असे वाटूं लागलें. ती शाळेंत शिकलेली नव्हती. तिचें जीवन श्रद्धामय होतें. तिची स्वतःची उत्कट इच्छा तिला जणूं स्वच्छ, स्पष्ट व मूर्त अशी दिसत होती. ती मध्ययुगांतली प्रतिभासंपन्न बालिका होती, कवि-हृदयाची कन्यका होती. तिच्या मनांतील विचारांनीं जणूं मूर्तरूप घेतलें, त्यांना जणूं पंखच फुटले! तिला आपलेच्च विचार देवदूतांच्या स्वरूपांत वर आकाशांत दिसूं लागले व ते प्रभूची आज्ञा तिला समजावून देऊं लागले. प्रभूची कोणती आज्ञा? प्रभूचा कोणता आदेश?

"तुझें घरदार सोड, सारी प्रिय आप्तमंडळी सोड व जोन! फ्रान्सच्या राजाच्या मदतीला जा" असा आदेश तिला ऐकूं आला. तेव्हां तिनें थरथरत विचारलें, "मी एक क्षुद्र मुलगी आहें. मला घोड्यावर बसतां येत नाहीं, लढावें कसें हेंहि माहीत नाहीं." तेव्हां सेंट मायकेलनें तिला सांगितलें,

"रॉबर्ट डी बॉड्रिकोर्ट याच्याकडे जा. तो डॉमरेमी गांवचा व व्हॉकूलर्स शहरचा स्वामी आहे. तो तुला सारी मदत देईल, माणसें देईल, साधनें देईल. मग तूं चिनॉन येथें जा. तेथें फ्रान्सच्या गादीचा वारस—तो भित्रा डॉफिन—सातवा चार्लस, जित देशाचा अनभिषिक्त राजा एका राजवाड्यांत राहत आहे."

जोन देवदूतांच्या सागीप्रमाणें बॉड्रिकोर्टकडे गेली. पण तो साशंक होता. तो तिला मदत करीना. तथापि सामान्य जनता तिच्याभोंवतीं गोळा झाली, तिच्या मदतीला आली. ते मध्ययुगांतील श्रद्धाळू ख्रिश्चन होते. त्याचा तिच्या सांगण्यावर विश्वास बसला. देवदूत वगैरे सर्व त्यांना खरें वाटलें. लोकांनीं तिला एक घोडा विकत घेऊन दिला व हत्यारी लोकांची एक टोळीहि तिच्याबरोबर दिली. जनतेचा हा उत्साह पाहून बॉड्रिकोर्टहि शेवटीं उत्साहित झाला व त्यानें जोनला एक समशेर बक्षीस दिली. आणि इ. स. १४२९ च्या वसंतऋतूच्या प्रारंभीं सतरा वर्षांची ही किसानकन्या जोन पुरुषाच्या पोषाखांत आपल्या सैनिकासह दुःखीकष्टी फ्रान्सचें दुःख दूर करण्यासाठीं, मायभूमीच्या जखमा बऱ्या करण्याच्या ईश्वरदत्त जीवनकार्यासाठी निघाली.

— ४ —

फ्रान्सचा कायदेशीर राजा सातवा चार्लस हा चंचल वृत्तीचा, दुबळा, मूर्ख, भोळसट व श्रद्धाळू असा असंस्कृत मनुष्य होता. जोन त्याच्यासमोर आली तेव्हां त्याचे दरबारी लोक त्याच्याभोंवतीं होते. पण राजा कोणता हें ओळखण्यास तिला अडचण पडली नाहीं. कारण, तो राजवाड्यातील अत्यंत कुरूप पुरुष होता. तो पंधराव्या शतकांतील सर्व प्रकारच्या धार्मिक चमत्कारांवर व भोळसट कथांवर विश्वास ठेवणारा होता. त्याला जोननें आपली सर्व कथा निवेदन करतांच त्याचा तिच्यावर एकदम विश्वास बसला. मार्लिनचें व अॅव्हिगनॉनच्या मेरीचें ते भविष्य त्यालाहि स्फूर्ति देतें झालें. 'एक कुमारी फ्रान्सला वांचवील' असें तें भविष्य होतें व त्याच्यासमोर ती कुमारी उभी होती. ती ईश्वराच्या आज्ञेनें संनद्ध व राजाला विजय आणि मुकुट देण्याला सिद्ध होती. त्या किसान-किशोरीची ती उत्कट इच्छा सातव्या चार्लस राजाचीहि इच्छा झाली.

देवदूतांच्या म्हणजेच तिच्या मनच्या योजनेप्रमाणें तिला दोन गंभीर कर्तव्यें पार पाडावयाचीं होतीं. एक, शापित इंग्रजांच्या हातून ऑर्लीन्स शहर मुक्त करणें व दुसरें, डॉफिनला ऱ्हीम्स शहरीं नेऊन राजा करणें. फ्रान्सचा—फ्रान्सच्या राजघराण्यांतला—पहिला ख्रिश्चन राजा क्लोव्हिस याला ज्या पवित्र तेलानें राज्याभिषेक करण्यांत आला होता त्याच तेलानें ती डॉफिनलाहि राज्याभिषेक करूं इच्छीत होती.

राजानें जोनचें ईश्वरदत्त कार्य मान्य केलें व तिला सेनापति नेमलें. जें कांहीं सैन्य तो आपल्या निशाणाभोंवतीं गोळा करूं शकला त्याचें आधिपत्य तिच्याकडे देण्यांत आलें. स्त्रियांनीं पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून लढणें ही त्या काळांत कांहीं अपूर्व गोष्ट नव्हती. अमीन्सच्या लढाईत तीस स्त्रिया जखमी झाल्या होत्या. बोहेमियांतील जोहान्स हस याच्या अनुयायातील कित्येक स्त्रियांनींहि लढाईत भाग घेतला होता. मध्ययुगांतील असा एकहि वेढा नसेल, कीं ज्यांत एकाद्या स्त्रीनें अपूर्व शौर्य गाजविलें नव्हतें—नांव केलें नव्हतें. जोनची लष्करी मदत घेणें ही गोष्ट चार्लसला चमत्कारिक वाटली नाहीं. त्याला ती गोष्ट साहजिक वाटत होती. त्याच्या दृष्टीनें तींत अनैसर्गिक असें कांहींच नव्हतें. जुन्या करारांतील डेबोरा, जूडिथ व जेल या स्त्रिया त्याला आठवल्या. त्या स्त्रियांनीं ईश्वराच्या मदतीनें इस्राएलचे शत्रू पराभूत केले होते. तशीच आज ही जोन उभी राहिली होती. फ्रान्सच्या शत्रूंना जिंकण्यासाठीं देवदूतांनींच तिलाहि बोलाविलें होतें. देवदूत मायकेल तिला मार्ग दाखवीत तिच्यापुढें चालला होता. तिच्या दोहों बाजूंस सेंट कॅथेराइन व सेंट मार्गेराइट होते. अशा रीतीनें प्रभूचा आदेश पार पाडण्यासाठीं निघालेली ही संस्फूर्त किसानकन्या इंग्रजांना हाकून देण्याच्या कामीं आपणास नक्की मदत करील असें राजाला वाटलें.

तिनें आठ हजार सैन्य उभें केलें. त्या काळांत आठ हजार सैन्य म्हणजे कांहीं अगदींच लहान नव्हतें. हें सैन्य बरोबर घेऊन ऑर्लीन्स शहराला वेढा घालणाऱ्या इंग्रजांवर तिनें चाल केली. हिमधवल चिलखत घालून व काळयाकाळया घोड्यावर स्वार होऊन सैन्याच्या अग्रभागीं चालणाऱ्या या तरुणीची धीरोदात्तता, तशीच निर्भयता, पाहून जनता चकित झाली. तिनें

तरवार व कुऱ्हाडी बरोबर घेतल्या होत्या. तिच्या हातांत एक श्वेत ध्वज होता व त्यावर देवांचीं आणि देवदूतांचीं रंगीत चित्रें काढलेलीं होतीं. ती त्यांना स्वर्गांतून उतरलेली अभिनव वीरांगना भासली. पण ती स्वभावानें युद्धप्रिया नव्हती. लढल्याशिवाय इंग्रजांना फ्रान्समधून घालवून देतां आलें तर किती छान होईल असें तिला वाटत होतें. तिनें " मी आपल्या हातांतल्या तरवारीनें कोणासहि मारणार नाहीं " अशी प्रतिज्ञा केली होती. ऑर्लीन्स आल्यावर " तुम्ही येथून जा " असे तीन शब्दांचे पत्र तिनें इंग्रजांस लिहिलें.

ऑर्लीन्सच्या लढाईचा वृत्तान्त सर्वांस माहीतच आहे. जोननें शेवटीं इंग्रजांवर जय मिळविला. तो विजय म्हणजे चमत्कार नव्हता. इंग्रजांचा सेनापति टाल्बॉट शूर पण मतिमंद होता. त्याचें सैन्यहि दोनतीन हजारच होतें व त्यांत पुष्कळ फ्रेंचहि होते. हें दोनतीन हजार सैन्य आसपासच्या किल्लेकोटांच्या रक्षणार्थ अनेक ठिकाणीं पांगलेलें होतें. हे किल्ले ऑर्लीन्सच्याभोंवतीं होते. या पांगलेल्या सैन्यांत दळणवळण नसल्यामुळें जोनला आपल्या संरक्षक सैन्यासह ऑर्लीन्स शहरांत प्रवेश करतां आला. फ्रेंच व इंग्रज दोघांसहि जोनचें सैन्य संस्फूर्त वाटे. त्यांचा सेनानी जोन नसून जणूं प्रत्यक्ष मायकेलच होता असें त्यांना वाटे. मग फ्रान्समधून इंग्रजांना हांकून देण्यासाठीं अवतरलेल्या या मायकेलच्या हल्ल्यासमोर कोण टिकणार? अर्थातच इंग्रजांचा पुरा मोड होणार ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट होती.

फ्रेंच सैनिक इंग्रज सैनिकांसारखेच दुष्ट व हलकट होते. युद्धाच्या उदात्ततेचें काव्य त्यांच्याजवळ नव्हतें. युद्ध म्हणजे फायद्याचें, आनंदाचें काम असेंच त्यांनाहि वाटे. चांचांप्रमाणें किंवा डाकूंप्रमाणें त्यानाहि युद्ध ही एक लुटालुटीची बाब आहे असेंच प्रामाणिकपणें वाटे. शिपाई सभ्य असणें वा सद्गृहस्थ असणें ही गोष्ट केवळ अशक्य आहे असें ते प्रांजलपणें कबूल करीत. युद्ध हा त्यांचा धंदा होता व त्या धंद्याला अनुरूप असे उघड उघड पशुत्वाचे प्रकार करण्यास ते मागेंपुढें पाहत नसत. ऑर्लीन्स येथील जोनच्या सैन्याचा सेनापति ला हायर एकदां म्हणाला, " ईश्वर सैन्यात दाखल झाला तर तोहि दुष्ट व नीच बनल्याशिवाय राहणार नाहीं." पण अदृश्य देवदूतांनीं युक्त अशी जोन तेथें असल्यामुळें—तिच्या अस्तित्वामुळें—त्या सैनिकांतहि जरा पावित्र्य आलें. ते पवित्र शिपाई बनले. फ्रेंच सैन्यांतील शेवटच्या

शिपायापर्यंत सारे खरोखरच मानीत कीं, देवदूत आपल्या बाजूनें लढत आहेत व इंग्रज सैनिकांसहि तसेंच वाटत होतें. कांहीं इंग्रजांना असें वाटत होतें कीं, जोनच्या बाजूनें देवदूत लढत नसून सैतान व भुतें लढत आहेत. पण एका गोष्टीची इंग्रजांना खात्री होती : ते अजिंक्य अशा सैन्याशीं लढत होते. पृथ्वीवरच्या शक्तीचा मुकाबला करण्यास इंग्रज तयार होते ; पण स्वर्गांतल्या वा नरकांतल्या शक्तींविरुद्ध लढण्यास त्यांना बळ नव्हतें. थोडक्यांत म्हणजे फ्रेंचांच्या सैन्याधिक्यामुळें तद्वतच दैवी शक्तीच्या भीतीमुळें इंग्रज ऑर्लीन्समधून हांकलले गेले.

— ५ —

ऑर्लीन्सचा वेढा उठला. जोन ऑफ आर्क आतां बारा हजार फौज उभारूं शकली. सारे जण तिजकडे सन्त म्हणून पाहूं लागले. कोणी तिला चेटकीण म्हणूं लागले. फ्रेंचांची बाजू घेणारे तिला सन्त म्हणत ; इंग्रजांची बाजू घेणारे तिला डाकीण म्हणत. जोन चार्लसला टूर्स येथें भेटली व मग उभयतां लॉयरी नदीच्या तीरानें ऱ्हीम्स शहरीं आलीं. तेथें असलेलें इंग्रज सैन्य घाबरून गेलें व भयभीत होऊन पळून गेलें. कांहीं कांहीं ठिकाणीं इंग्रजांनीं थोडा विरोध केला. जार्गो, पॅटे, ट्रॉयीझ वगैरे ठिकाणीं झटापटी झाल्या ; पण जोनच्या संस्फूर्त सैनिकांनीं त्यांना ' दे माय धरणी ठाय ' करून सोडलें. लढाई शक्य तो टाळावी असें जोनचें धोरण असे. इंग्रजांनीं फ्रान्स सोडून जावें येवढेंच तिला हवें होतें. ती त्यांचा द्वेष करीत नव्हती. रक्त पाहून ती खिन्न होई. रक्तपातानें तिचें मन विटे. स्वतःच्या लोकांच्या वेदना पाहून तिला जितकें दुःख होई, तितकेंच शत्रूच्या सैनिकांच्या वेदना पाहूनहि होई. जखमी शिपाई—मग तो इंग्रज असो वा फ्रेंच असो—तिला संकटांत सांपडलेला ख्रिश्चन बंधु वाटे. पॅटे येथील लढाईत रणांगणांत शत्रूचे पुष्कळसे सैनिक मेलेले पाहून ती रडली. तिच्या एका सैनिकानें एका इंग्रज कैद्याला मरणान्तिक प्रहार केला तेव्हां आपल्या घोड्यावरून उतरून तिनें त्या मरणोन्मुख इंग्रज शिपायाच्याजवळ गुडघे टेंकले व त्याचें डोकें आपल्या हातांत घेतलें. ती त्याला कांहीं सौम्य व मृदु शब्द बोलली व त्याचे प्राण गेले.

तिच्या निष्ठावन्त सैनिकांना तिची ही उदार दया समजत नसे. ते तिजसाठीं लढावयाला व मरावयाला तयार होते. पण ही करुणा, या

करुणेंतील भावना ते समजूं शकत नसत. ती विरोध करी तरीहि तिच्या विरोधास न जुमानतां तिचे सैनिक युद्धांतील बहुतेक कैद्यांस ठार मारून टाकीत.

इ. स. १४२९ च्या जुलैच्या पंधराव्या तारखेस विजयी फ्रेंच सेना -हीम्स येथें आली. नंतर दोन दिवसांनीं तेथील भव्य चर्चमध्यें राजाला राज्याभिषेक झाला. आर्चबिशपनें चार्लसच्या डोक्यावर मुकुट ठेविला. समारम्भाच्या वेळीं दरबारची कांहीं स्त्रीपुरुष मंडळी हजर होती. कांहीं सरदार होते, कांहीं वारांगना होत्या; पण राणी मेरी द अंजो ही चिनॉन येथें मागें राहिली होती. प्रवासाच्या खर्चांत बचत व्हावी म्हणून राजानें तिला मागें ठेविलें होतें. चार्लस दरिद्री व निर्धन होता, तसाच अति अनुदारहि होता.

जोन ऑफ आर्कचें आरंभींचें काम आतां संपलें होतें. ऑर्लीन्सचा वेढा तिनें उठविला होता. राजाला राज्याभिषेक झाला होता. आतां इंग्रजांना फ्रान्समधून हांकलणें येवढेंच काम राहिलें होतें. पण तिची लोकप्रियता कमी होऊं लागली. जोन दररोज देवदूतांशीं बोले. पण तिच्या शिपायांना आतां तिच्या या दैवी मुलाखतींचें व भेटींचें कौतुक वाटेनासें झालें. तिला जीं दिव्य दर्शनें घडत त्यांची प्रभा आतां फिकी, निस्तेज झाली. एक रोजची सामान्य गोष्ट अशा दृष्टीनें लोक त्यांकडे पाहूं लागले. तिचे लोक आतां तिला कंटाळले. तिचें त्यांच्याबरोबर असणें जसजसें लांबूं लागलें तसतसे ते अधीर होऊं लागले. कारण, ती त्यांना लुटालूट करूं देत नसे. ती त्यांच्यावर पावित्र्याचे जीवन लादीत होती; पण त्यांना अशा जीवनाची संवय नव्हती. "ही जोन आम्हांला बायका बनवीत आहे" असें ते म्हणत. तिचे कांहीं शिपाई तिला सोडून गेले, कांहींनीं बंड केलें!

आणि इकडे तिचे शत्रू तिच्या नाशाची योजना करीत होते, नाशाचीं जाळीं विणीत होते. आपल्या मार्गांतून जोन जावी असें निरनिराळ्या चार पक्षांना वाटत होतें : (१) इंग्रज, (२) इंग्रजांना अनुकूल असलेले फ्रेंच, (३) तिच्या राजप्रियतेचा मत्सर वाटणारे कांहीं दरबारी व (४) देवदूतांशीं तिच्या होणाऱ्या भेटींगांठींबद्दल मत्सर वाटणारे बिशप.

१४१५ मध्यें जी अजिनकोर्टची लढाई झाली, तींत इंग्रजांना लॉइरी नदीच्या उत्तरेचे बहुतेक प्रांत मिळालेच होते. संपूर्ण फ्रेंच राज्यावर कबजा

मिळविण्यासाठीं इंग्रज उत्सुक होते. पण डॉमरेमी गांवची ही चेटकीण—जोन—त्यांच्या प्रगतीच्या आड येत होती येवढेंच नव्हे, तर जो कांहीं फ्रेंच प्रदेश त्यांच्या हातांत होता तोहि ती काढून घेऊं इच्छीत होती. इतक्या श्रमांनीं व इतकें रक्त सांडून मिळविलेला प्रदेश गमावावा लागणार म्हणून ते जळफळत होते. कांहींहि करून जोनला प्रतिबंध झालाच पाहिजे असें त्यांना वाटत होतें.

कांहीं फ्रेंच सरदार या इंग्रजांशीं मसलती करीत होते. चार्लस राजावर इंग्रजांना जय मिळवून देऊन स्वतःचा स्वार्थ साधून घेण्याचा त्यांचा विचार होता. अशा या स्वार्थान्ध व देशद्रोही सरदारांत ड्यूक ऑफ बर्गंडी व फिलिप दि गुड हे दोघे प्रमुख होते. हा 'चांगला' फिलिप वास्तविक 'वाईट' होता: तो अठरा अनौरस मुलांचा बाप होता! चार्लसला झालेला राज्याभिषेक म्हणजे फिलिपच्या स्वार्थावर मोठा आघात होता. या डॉफिनपेक्षां, या चार्लसपेक्षां फिलिप अधिक श्रीमंत व अधिक कार्यक्षम होता. निदान आपण अधिक लायक आहों असें त्याला वाटे. इंग्रजांच्या संरक्षणाखालीं फ्रान्सचा स्वामी होण्याचा त्याचा बेत होता. पण जोनच्या आगमनानें त्याचे बेत मुळांतच खुडले गेले! तिच्या या नसत्या ढवळाढवळीबद्दल तिला शासन झालेंच पाहिजे असें इंग्रजाप्रमाणेंच त्याचेंहि मत होतें.

पण तिच्या उघड उघड शत्रूंपेक्षां तिचे मित्र म्हणून मिरविणारेच अधिक घोकेबाज होते. सातव्या चार्लसचे लबाड दरबारी तिला पाण्यांत पाहत होते. विशेषतः राजाचा सल्लागार जॉर्जीस ला ट्रेमाइली हा जोनला फार भीत असे. जोनचा मोकळेपणा व अत्यंत सरळ प्रामाणिकपणा याची त्याला धास्ती वाटे. ला ट्रेमाइली हा कपटी व जोरदार मनुष्य होता. तो इतरांवर आपली छाप बसवी, आपलें प्रभुत्व स्थापी. त्यानें आपल्या पहिल्या पत्नीचा त्याग केला होता. दुसऱ्या एका स्त्रीशीं त्यानें पुनः लग्न लावलें व तिच्या पहिल्या नवऱ्याला ठार मारलें. खोटें बोलून व खुशामती करून त्यानें राजाची कृपा संपादिली होती. तो अत्यंत दुष्ट वृत्तीचा व दांभिक मनुष्य होता. तो राजालाहि फसवावयाला तयार होता. त्याचें इंग्रजांशीं आतून सूत होतें. त्याच्या मनांत काय चाललें आहे हें जोनला समजत होतें. ही आपलें कपटकारस्थान राजाला सांगेल अशी त्याला भीति वाटत होती; म्हणून या किसानकन्येला आपल्या मार्गांतून कसें दूर करतां येईल याचा विचार तो

करीत होता. आपल्या कपटी स्वभावानुसार तो वरपांगी जोनविषयीं अत्यंत आदर दाखवीत होता पण आंतून तिच्या नाशाचीं कारस्थानें रचीत होता.

पण तिच्याविरुद्ध उभ्या राहिलेल्या शत्रूंपैकीं सर्वांत भयंकर जर कोणी असतील तर ते भटभिक्षुक व धर्मोपदेशक. ऱ्हीम्स येथील आर्चबिशप, बोव्हिस येथील बिशप व पॅरिसच्या विद्यापीठांतील एकजात सारे धर्माधिकारी तिला मारूं पाहत होते. चर्चची परवानगी घेतल्यावांचून तिनें लोकांस ईश्वराचे आदेश सांगितले होते. 'मी देवदूतांशीं बोलत्यें' असें म्हणण्याचें धाडस करून तिनें सर्व धर्ममार्तंडांचा आणि उपाध्यायांचा अपमान केला होता. दैवी शक्तीशीं बोलण्याचा अधिकार फक्त या उपाध्यायांचा—धर्मगुरूंचा. ईश्वर व मानव यांच्यांतील दुभाष्याचें काम फक्त चर्चच करूं शकतें, अशी त्यांची प्रामाणिक समजूत असल्यामुळें त्यांना खरोखरच वाटे कीं, जोनला जे आदेश मिळत, ते ईश्वराचे नसून सैतानाचे असले पाहिजेत; देवदूतांचे आदेश चर्चमार्फत आले असते. सैतानाकडून जिला आदेश येतात ती नास्तिक व पाखंडीच असली पाहिजे. ती प्रभुद्रोह करणारी आहे. अर्थात् धर्माला व धर्मगुरूंना तिच्यापासून धोका असल्यामुळे ती ठार मारली गेलीच पाहिजे.

काल्पनिक देवदूतांच्या रक्षणापेक्षां जोनच्या शत्रूंचें कापट्य अधिक प्रभावी ठरलें. कॉपेन येथील लढाईंत तिच्याच कांहीं देशबांधवांनीं तिला पकडून इंग्रजांच्या हवालीं केलें. सोन्याच्या दहा हजार पौंडांस त्यांनीं तिला इंग्रजांना विकून टाकलें! तिच्या मरणाबाबत निश्चिंत होण्यासाठीं इंग्रजांनीं तिला इन्क्विझिशन संस्थेच्या स्वाधीन केलें. आणि अशा रीतीनें जोन युद्धकैदी होती तरी ती धर्मगुरूंच्या ताब्यांत दिली गेली व त्यांच्या न्यायासनासमोर तिचा खटला चालून तिला नास्तिक म्हणून जिवंत जाळण्याची सजा देण्यांत आली!

तिच्या खटल्याच्या वेळेस मुख्य न्यायाधीश बोव्हिसचा बिशप पेरी कौचॉन हा होता. तो अत्यंत श्रद्धाळू व निष्ठावन्त ख्रिश्चन होता. पॅरिसच्या विद्यापीठानें त्याच्या धार्मिकतेची जाहीर स्तुति केली होती. "बिशप देवासाठीं किती तळमळतात! किती त्यांचें धैर्य, केवढी त्याची धडपड! ते कसे वाट पाहत बसतात! किती मानसिक व्यथा व वेदना! चर्चसाठीं त्यांना किती यातना!" अशा प्रकारें पॅरिसच्या विद्यापीठानें बिशपांची पाठ थोपटली होती. पण विद्यापीठाच्या वरील प्रशस्तींत शेवटीं "चर्चसाठीं त्यांनीं किती

लोकांस छळलें व किती लोकांचे प्राण घेतले !" असे शब्द घातले असते तर बरें झालें असतें. कारण जळणाऱ्या नास्तिकांच्या चरबीचा वास त्यांच्या नाकांना फार आवडे. कॉन्स्टन्स येथें जी धर्म-परिषद् भरली होती व जेथें हसला वचन मोडून अटक करून ठार मारण्यांत आलें होतें त्या परिषदेंत हे बिशपहि होते. हसच्या खटल्याच्या वेळीं हेच बिशप म्हणत होते कीं, कधीं कधीं न्यायाचा औपचारिक देखावा न करतांहि अपराध्याला मारणें रास्त असतें, क्षम्य असतें.

इंग्रजांनीं जेव्हां जोनला पेरी कौचॉन याच्या हातीं दिलें तेव्हांच त्यांनी तिच्या मरण-पत्रावर सही केली. ती जिवंत सुटावी अशी त्याना इच्छाच नव्हती. चर्चनें जर नास्तिक म्हणून तिला ठार केलें नाहीं तर तिला पुनः इंग्रजांच्या ताब्यांत द्यावयाचें असें ठरलें होतें. It was a case of "heads you lose, tails I win." खटल्याच्या आरंभीं न्यायाधीश-मण्डळांत असलेल्या दोघां न्यायाधीशांनीं एकंदर सारें काम बेकायदेशीर आहे असें म्हटलें, तेव्हां त्यांपैकीं एकाला ताबडतोब कमी करून अध्यक्षाच्या परवानगीनें कैदेंत टाकण्यांत आलें व दुसरा त्याला शिस्त लावण्याची फुरसत वरिष्ठांना मिळण्यापूर्वींच पळून गेला !

खटला जवळजवळ चार महिने चालला होता. आरंभीं न्यायाधीश बेचाळीस होते, ते शेवटीं शेवटीं त्रेसष्ट झाले. शिकारी कुत्र्यांप्रमाणें ते तिच्या पाठीस लागले होते. त्यांनीं तिच्यावर लादलेले आरोप बाष्कळ होते. चर्चच्या मदतीवांचून ती स्वर्गांतील शक्तींशीं बोलली हा तिच्यावरील मुख्य आरोप होता. दुसऱ्या शब्दांत हेंच सांगावयाचें झाल्यास भटांभिक्षुकांच्या इच्छेला मान देण्याऐवजीं तिनें देवाची इच्छा मानली हा तिचा गुन्हा होता. ते पुनः म्हणाले, "तिला ज्या शक्ती दिसल्या त्या दैवी नसून सैतानी होत्या." आणि न्यायाधीश त्रेसष्ट व ती एकटीच असल्यामुळें त्यांची इच्छा बलीयसी ठरली!

तिला आपलें भवितव्य माहीत होतें. तरीहि त्या खटल्याचे वेळेस वातावरणांत तिनेंच जरा विनोदी रंग भरला. एके दिवशीं खटल्याच्या वेळीं ते सर्व धार्मिक कावळे एकदम कावकाव करूं लागले, तेव्हां ती त्यांना गोड

आवाजांत म्हणाली, “ भल्या बापांनो, सारे असे एकदम नका बोलूं. तुम्ही एकमेकांचा गोंधळ उडविण्याचें पाप कराल. ”

इ. स. १४३१ च्या मेच्या तिसाव्या तारखेस न्यायाचा हा फार्स संपला. जोनला जिवंत मारण्याची शिक्षा झाली. पॅरिसच्या विद्यापीठानें पेरी कौचॉनची पाठ पुनः थोपटली. “ बिशपनें हा खटला अत्यंत गंभीरपणें व पवित्र आणि न्यायी वृत्तीनें चालविला ” असे उद्गार विद्यापीठानें काढले.

तिला मरणाची शिक्षा देऊन चर्चच्या प्रतिनिधींनीं तिला स्टेटच्या मारेकऱ्यांच्या हवालीं केलें. रक्तपाताकडे आपणांस पाहवत नाहीं असे चर्चचें म्हणणें असे. चर्च मरणाची शिक्षा देई, पण स्वतः तिची अमलबजावणी करीत नसे. तें काम स्टेटकडे असे. चर्च शिक्षा देऊन पुनः त्या मरणोन्मुखांना मारलें जात असतां त्यांच्या आत्म्यासाठीं प्रार्थना करी !

जोनला जाळण्यापूर्वी पॅरिसच्या विद्यापीठांतील प्रोफेसर निकोलस मिडी यानें तिला प्रवचन दिलें. तो म्हणाला, “ चर्चचा एकादा अवयव बिघडला तरी सारें चर्च रोगी होतें. ” नंतर “ तूं मरावयालाच लायक आहेस ” असें तिला सांगून तो म्हणाला, “ चर्चच्या बऱ्यासाठीं तूं मर. जा, जा, शांतीनें मर. चर्च तुला वांचवूं शकणार नाहीं. ” आपल्या गुन्हेगारांच्या कत्तलीचा दोष आपणांकडे येऊं नये म्हणून चर्चवाले शेवटीं नेहमीं म्हणत, “ चर्च काय करणार ! चर्चच्या हातांत काय आहे ? ” पण जोन ऑफ आर्कला अधिक समजत होते. पेरी कौचॉनकडे बोट करून ती म्हणाली, “ बिशप, तुमच्यामुळेंच मला मरावें लागत आहे. ”

— ६ —

हें जें शोकपर्यवसायी नाटक झालें त्याचा शेवटचा भाग साडेपांचशें वर्षांनीं केला गेला तेव्हां पोपनें शेवटीं असें जाहीर केलें कीं, “ जे संदेशदाते जोनला भेटत ते सैतानाचे दूत नसून देवदूतच होते. मी तिची शिक्षा रद्द करतों व ती सन्त होती असे जाहीर करतों. ”

## प्रकरण ८ वें

# टॉर्कीमीडा व पवित्र 'इन्क्विझिशन' न्यायसंस्था

— १ —

इन्क्विझिशन या संस्थेविषयीं मीं कदाचित् पूर्वग्रहदूषित होऊन लिहीत आहें असें कोणास वाटूं नये म्हणून तिचें वर्णन मी तिच्या समर्थकांच्याच शब्दांत देणार आहें. या प्रकरणासाठीं गोळा केलेली सारी माहिती रोमन कॅथॉलिक पुस्तकांतून घेतली आहे. ज्यांनी ही संस्था सुरू केली, ज्यांनीं तिचें भूतकाळांत समर्थन केलें व जे आजहि एक थिअरी किंवा सिद्धान्त म्हणून तिचें मंडन करूं पाहत असतात अशांच्याच दृष्टींतून मी या 'इन्क्विझिशन' संस्थेकडे पाहणार आहें.

ते पहिले आरंभींचे ख्रिश्चन लोक ख्रिस्ताच्या शिकवणीनुसार हरएक अत्याचाराच्याविरुद्ध होते. टरटुलियन म्हणे, "ख्रिश्चनांना लष्करांत नोकरी करण्याचा हक्क नाहीं. धर्माची सक्ति करणें हें कोणत्याहि धर्माचें काम नाहीं. धर्माचा स्वीकार मोकळेपणानेंच केला जावा. तो कधींहि लादला जाऊं नये." ओरिजेन व लॅक्टॅन्टियस यांचींहि मतें अशींच होतीं. लॅक्टॅन्टियस लिहितो, "धर्म बळजबरीने लादतां येणार नाहीं. अत्याचाराचें समर्थन कधींहि करतां येणार नाहीं."

पण चौथ्या शतकांत ख्रिश्चनांचा हृदयपालट होऊं लागला. ऑगस्टाइन म्हणे कीं, कांहीं बाबतींत धर्मावर विश्वास न ठेवणाऱ्यांस ठार मारणें योग्य आहे. ऑप्टेटस तर "जे जे नास्तिक असतील त्या साऱ्यांना ठार मारलेंच पाहिजे" असे उघड उघड म्हणे. ऑगस्टाइन व ऑप्टेटस आज सन्त मानले जातात.

चौथ्या शतकापासून पुढें ख्रिश्चनांचीं सदय व सहिष्णु हृदयें अदय व दुष्ट होऊं लागलीं आणि परधर्मीयांचा म्हणजे ख्रिश्चन धर्मावर विश्वास न ठेवणाऱ्यांचा छळ करावयाचा हें जणूं ठरूनच गेलें. पण अकराव्या शतकापर्यंत खरा ख्रिश्चनपणा थोडा तरी शिल्लक होता; त्यानंतर मात्र ख्रिश्चन साधुता जणूं पुरी लोप पावली! परधर्मीय किंवा अधिकृत रोमन कॅथॉलिक

धर्मावर विश्वास न ठेवणारे यांची सररास होळी होऊं लागली—अशांचें प्रचंड प्रमाणावर भस्म होऊं लागलें.

बाराव्या शतकांत ही जिवंत जाळण्याची प्रथा अधिकच बळावली. लोकांना ही दुष्टता आवडूं लागली. ११४० साली ग्रेशियन यानें असें आज्ञापत्र काढलें कीं, नास्तिकता हा मरणार्ह गुन्हा आहे. क्रूसेडर्सना सांगण्यांत आलें कीं, जेथें जेथें परधर्मी दिसेल तेथें तेथें त्याला ठार करा. कॅथॉलिक इतिहासकार व्हॅकॅन्दार्ड लिहितो, "हें कत्तलीचें काम जे जे करीत त्यांना पोप क्षमापत्रें देत असे."

तेरावें शतक तर ख्रिश्चन इतिहासकार—विशेषतः रोमन कॅथॉलिक इतिहासकार—फारच मोठें मानतात. अशा या महत्तम शतकांतच पोप तिसरा इनोसन्ट झाला. त्यानें बिशपांना आज्ञापत्र लिहिलें, "जे जे रोमन कॅथॉलिक धर्म मानणार नाहींत, त्या सर्वांना बहिष्कृत करा. 'या धर्मबहिष्कृततेच्या नरकांत पडाल' अशा शापाच्या आध्यात्मिक तरवारीनें न भागलें तर खरी भौतिक तरवार उपसून तिचा उपयोग करा." १२०९ साली बेझेरिस येथें मोठी कत्तल झाली. कत्तल करणारांनीं अॅबट आर्नोल्ड याला विचारलें, "हा रोमन कॅथॉलिक आहे कीं नाहीं हें आम्हीं ओळखावें कसें?" तो म्हणाला, "साऱ्यांचीच कत्तल करा. कोण कोणत्या धर्माचा हें देव पाहून घेईल."

सहाव्या क्रूसेडचा नेता राजा दुसरा फ्रेडरिक होता. तो वरील अॅबटपेक्षां जरा सौम्य होता. त्यानें आपल्या धार्मिक अनुयायांना सांगितलें, "परधर्मीयांना जिवंत नका जाळूं. फक्त त्यांच्या जिभा छाटा, उपटा."

पण इन्क्विझिशन नामक जी प्रसिद्ध छळणारी न्यायसंस्था स्थापली गेली तिचें सारें श्रेय पोप नववा ग्रेगरी याला आहे. १२३१ साली त्यानें असा कायदा केला कीं, जे जे हट्टी विधर्मी असतील त्यांना ठार मारलेंच पाहिजे. आपल्या नास्तिकपणाचा पश्चात्ताप होऊन जे कॅथॉलिक होतील त्यांना सोडून द्यावें, म्हणजे ठार मारूं नये, पण जन्मभर तुरुंगांत मात्र ठेवावें. ग्रेगरीनें आपल्या हाताखालच्या बिशप वगैरे सर्वांना पटवून दिलें कीं, नास्तिकांना जिवंत जाळणें हें मुख्यतम कर्तव्य आहे. बिशपांनीं या कर्तव्यात कला

ओतली. या कर्तव्यांत ते परम आनंद मानूं लागले. केवळ एका व्हेरोना शहरांत एका महिन्यांत त्यांनीं साठ माणसें जिवंत जाळलीं!

बिशपांना असें कळविण्यांत आलें कीं, परधर्मी कोण, कॅथॉलिक मताचे कोण नाहींत, हें हुडकून काढण्यासाठीं त्यांनीं बातमीदार नेमावे. सामान्य कॅथॉलिकापेक्षा ज्यांची ज्यांची राहणी निराळी असे, त्यांच्या मरणयाद्या होऊं लागल्या. याद्या आल्या म्हणजे बिशप त्यांची छाननी करून ज्यांना शिक्षा देणें योग्य त्यांना शिक्षा देत. जे बिशप भरपूर प्रमाणात नास्तिकांस जाळीत नसत त्यांना पोप पदच्युत करी. कमींत कमी इतके तरी जाळले गेलेच पाहिजेत असें ठरवून दिलें जाई. प्रत्येकानें आपला आंकडा पुरा करणें भाग असे. नाहीं तर धर्माधिकारापासून त्याची हकालपट्टी होई. बिशपांनीं या नास्तिकांना जरा दया दाखविली तर त्यांच्यावरच नास्तिकपणाचा आरोप लादला जाऊन त्यांना तुरुंगांत टाकण्यांत येई. अशा रीतीनें पोप आपला नरमेध तेज राखी आणि ईश्वराचें वैभव वाढवी. ईश्वराचें वैभव वाढवितां वाढवितां तो स्वतःहि कुबेर बने. कारण जो जो जाळला जाई त्याची त्याची मालमत्ता चर्चच्या ताब्यांत येई.

पण बिशप कितीहि धर्मोत्कट असले तरी ते पोपचें समाधान होण्याइतके रक्तपिपासु नव्हते. तद्वतच ते या वधकर्मांत तितके वाकबगारहि नव्हते. खिश्चन धर्मी युरोपांतील सर्व पाप नाहींसें करण्यासाठीं, सारे परधर्मीय निवडून त्यांचें निर्मूलन करण्यासाठीं, चांगलें शिक्षण दिलेलें गुप्त पोलिसांचें सैन्य उभारण्याची जरूरी होती. म्हणून पोपनें डोमिनिक पंथीयांची मदत मागितली. सन्त डॉमिनिक—तरवारीनें बाप्तिस्मा देण्याच्या मताचा अध्वर्यु—याचे अनुयायी कसे असतील हें सांगण्याची जरूरीच नाहीं. या डोमिनिक पंथियांस धार्मिक दुष्टतेचें नीट शिक्षण देण्यांत येत असे. पोपनें या शिक्षणाचा उपयोग करून घेण्याचें ठरविलें आणि इन्क्विझिशन नांवाची अत्यंत प्रभावी व फायदेशीर संस्था उभी केली. ग्रेगरीनें डोमिनिकांना लिहिलेल्या पत्रात त्यांच्या कर्तव्यांविषयीं असा उल्लेख आहे :—

" एकाद्या शहरांत तुम्ही गेला म्हणजे तेथील बिशप, कलर्जी व लोक यांस एकत्र बोलवा व त्याना धर्मश्रद्धेवर एक गंभीर प्रवचन ऐकवा. नंतर तुमच्या

न्यायासनासमोर आणल्या जाणाऱ्या संशयास्पद नास्तिकांची चौकशी करण्याच्या कामीं शहरांतील प्रतिष्ठितांचें साह्य घ्या. चौकशीअंतीं अपराधी ठरतील त्यांना सांगा, ‘ अतःपर चर्चची आज्ञा संपूर्णपणें व बिनतक्रार मानली पाहिजे.’ जर ते नाकारतील तर त्यांना योग्य ती शिक्षा द्या.”

जे कॅथॉलिक धर्माचे नव्हते, जे पोपला नास्तिक वाटत, त्याच्याविरुद्ध पोप इतका कां उठला होता ? एक गोष्ट म्हणजे नास्तिकांना—कॅथॉलिक धर्म न मानणाऱ्यांना—पोपचें तें वैभव व त्याचा तो डामडौल पसंत नसत. मध्ययुगातील ते खिश्चन जणूं समाजवादी होते ! ते जणूं तात्त्विक अराजकवादी होते ! टॉल्स्टॉय व इमर्सन यांचे ते जणूं पूर्वदूत वा आध्यात्मिक पूर्वजच होते ! मध्ययुगांत असल्या लोकांचे नाना संघ होते व त्या सर्वांना एक गोष्ट समान होती : खिस्ताच्या अहिंसक वृत्तीवर श्रद्धा. धर्मोपदेशक व भटभिक्षुक यांची मगरुरी त्यांना खपत नसे. ते म्हणत, “ खिस्ताला जगांत डोकें टेकावयाला घरहि नव्हतें ; पण हे पोप तर राजवाड्यांत राहतात ! खिस्त ऐहिक सत्ता व संपत्ति तुच्छ मानी, तर हे पोप सत्तालोलुप आहेत ! मानसन्मान व धनदौलत यांच्यासाठीं हपापलेल्या या रोमन कॅथॉलिक धर्मगुरूंत व खिस्तात थोडें तरी साम्य आहे का ?” पुढच्या काळांतील क्वेकरांप्रमाणें हे कॅथॉलिक नसलेले लोक जोरजुलमाच्या, तद्वतच द्वेष, देहान्तशासन, युद्धें याच्याहि विरुद्ध प्रचार करीत. इतिहासकार व्हॅकॅन्दार्ड लिहितो, “ या लोकांच्या अशा क्रान्तिकारक विचारसरणीमुळें ते केवळ कॅथॉलिक पंथाविरुद्ध होते इतकेंच नव्हे, तर देशद्रोही व समाजद्रोहीहि होते. आणि या अशा शान्ति-दूतांना, या धोकेबाज लोकांना, ठार मारण्यात चर्चची केवळ आत्मरक्षणाचीच दृष्टि होती. अशा लोकांच्या विचारांना वाटेल ती किंमत देऊन पायबंद घालणें जरूर होतें.”

पण काय, हजारोंच्या प्राणांची किंमत ? ‘ होय,’ हे इतिहासकार म्हणतात. व हें मत एकाद्या मध्ययुगीन धर्मोपदेशकाचें नसून अर्वाचीन काळांतील कॅथॉलिक इतिहासकाराचें आहे हें पाहून जरा गंमत वाटते. इन्क्विझिशनची वृत्ति कांहीं ठिकाणीं अद्यापि जिवंत आहे तर एकूण !

— २ —

जे कॅथॉलिक पंथी ख्रिश्चन नसत त्यांचाच छळ इन्क्विझिशनपुढें केला ात असे असें नाहीं, तर मुसलमान, ज्यू, सर्वांनाच या न्यायासनापुढें उभें करण्यांत येई. ख्रिश्चन युरोपात जे मुसलमान व ज्यू राहत, विशेषतः स्पेनमध्यें े राहत, ते तर या पवित्र होमासाठीं चांगलें जिवंत जळणच होते. त्यांचीं ृदयें पापमय होतीं म्हणून नव्हे, तर त्यांच्या तिजोऱ्या भरलेल्या होत्या हणून त्यांचा बळी घेण्यांत येई. प्रथम, त्यांनीं ख्रिश्चन व्हावें म्हणून त्याना ळण्यांत येई आणि ते ख्रिश्चन झाल्यानंतर ते चांगले ख्रिश्चन नाहींत हणून त्यांना जिवंत भाजण्यांत येई.

मुसलमान व ज्यू यांच्या होळया करण्यांत परमानंद मानून पुढाकार घेणारा ॉमस ऑफ टॉर्केमाटा किंवा थॉमस ऑफ टॉर्कीमीडा हा होय. तो दुसऱ्या ांवानेंच अधिक माहीत आहे. नववा ग्रेगरी हा इन्क्विझिशन या संस्थेचा ानक होता. पण या संस्थेच्या ध्येयाप्रमाणें जर कोणी निष्ठेनें वागला असेल र तो टॉर्कीमीडाच होय. टॉर्कीमीडा इन्क्विझिशनचा सत्पुत्र होता. प्रार्थना, सा व खून या तीन गोष्टींचें त्याला वेड होतें. तो प्रामाणिक धर्मवेडा होता. ानवप्राण्यांतील अत्यंत भयानक अशी ही व्यक्ति होती. आपल्या बांधवांना ारण्यांत खरोखरच आपण देवाची इच्छा पुरी करीत आहों असें त्याला ाटे. पोप त्याच्यावर पूर्णपणें खुष होता. आपल्या वेडेपणाच्या लहरीनुसार ागण्याची सत्ता पोपनें त्याला दिली होती. तो इन्क्विझिशनचा अध्यक्ष ोता. आपल्या कारकीर्दींत त्यानें दोन हजार लोक जिवंत जाळले (कोणी ा आंकडा आठनऊ हजार असा सांगतात.) आणि छळाच्या यंत्रावर ालून हजारोंचीं, लाखोंचीं हाडें भरडून काढलीं! तो स्वतःच आरोप लादी, वतःच साक्षीदार होई, स्वतःच न्यायाधीश होई; येवढेंच नव्हे तर जेथें छळ ेला जाई तेथेंहि तो भाग घेई. त्यानें इन्क्विझिशन ही एक अत्यंत अमानुष शी संस्था बनविली. मानवी बुद्धीनें आजवर निर्मिलेल्या छळाच्या साधनांत यंत्रांत इन्क्विझिशन केवळ अद्वितीय होय! टॉर्कीमीडा याच्या नेतृत्वाखालीं ा इन्क्विझिशनचें काम कसें चालें तें आपण पाहूं या.

पहिली गोष्ट म्हणजे या संस्थेचा अधिकारी कॅथॉलिक नसणाऱ्या सर्व हरवासीयांना तीस दिवसांच्या आत हजर होऊन क्षमा मागण्याचें फर्मान

काढी. तीस दिवसांच्या आंत येऊन 'आम्ही चुकलों' असें म्हणणें जरूर असे. पण फारच थोडे आपण होऊन येत व कबुली देत. तीस दिवस संपले म्हणजे सर्व कॅथॉलिकांस 'तुम्हांला ज्यांची ज्याची शंका असेल त्यांचीं त्यांचीं नावें जाहीर करा' असें सांगण्यांत येई. एकाद्यावर खटला चालवून त्याला सजा देण्यासाठीं दोन साक्षीदार बस्स होत असत. हे साक्षीदार खुनी, डाकू असले तरी चालत; फक्त ते नांवानें ख्रिश्चन असले म्हणजे पुरें असे! आरोपीला वकील देण्याची किंवा साक्षीदार बोलावण्याची मुभा नसे. आरोपीच्याविरुद्ध जे साक्षीदार असत, ज्यांनीं त्याचें नांव सांगितलेलें असे, त्या सर्वांचीं नांवें आरोपीपासून लपवून ठेवण्यांत येत असत. अशा रीतीनें सारेच स्वतःच्या-विरुद्ध उभे केलेले असल्यामुळें आरोपीला स्वतःचा बचाव करणें अवघड जाई—नव्हे, अशक्यच असे. त्यानें आरोप कबूल केला तर त्याला तुरुंगांत टाकण्यांत येई. 'मी निरपराध आहे' असेंच तो म्हणत राहिल्यास त्याला छळ-भवनांत नेण्यांत येई. प्रभूच्या सेवेसाठीं म्हणून शोधून काढण्यांत आलेल्या या छळ-यंत्रांवर एक ग्रंथच लिहितां येईल; पण तें माणूसघाणें काम आहे. तरीहि दोनतीन प्रकार सांगतोंच. एक म्हणजे दोरी-कप्पीचा: इन्क्विझिशनचें समर्थन करणारा अर्वाचीन इतिहासकार व्हॅकॅन्दार्ड लिहितो, "अपराध्याला त्याचे हात पाठीमागें बांधून उभा करीत, नंतर त्याला कप्पीनें वर उंच नेत व थोडथोडें खालीं सोडीत सोडीत एकदम खालीं सोडून देत. हा प्रकार पुनः पुनः करण्यांत येई. पडण्याचा धक्का जोरांत बसावा म्हणून निर्दय छळक अपराध्याच्या पायाना पुष्कळदां वजनें बांधीत." दुसरा विस्तवानें छळण्याचा: अपराध्याचे पाय निखाऱ्यांवर ठेवीत. आगीला आणखी जळण मिळावें आणि पायाहि चांगले भाजावे यासाठीं पायांना मेण वगैरे फाशीत. इन्क्विझिटर्स शेजारीं उभे राहून हें भाजणें बघत व पुनः पुनः अपराध्याला विचारीत, "ज्या ख्रिस्ताच्या नांवानें तुला आम्ही इतक्या सौम्यतेनें व दयेनें वागवीत आहों त्या ख्रिस्ताची शिकवण—कॅथॉलिक शिकवण—मान्य कर." विस्तवांत जाळण्याच्या शिक्षेप्रमाणेंच पाण्यांत बुडविण्याचीहि शिक्षा असे. पीळ असलेल्या दोरीनें अपराध्याचे हातपाय इतके करकचून बांधीत कीं, ती दोरी शरीरांत घुसे; नंतर त्याचें तोंड खूप उघडून त्यांत सारखें भराभरा पाणी ओतीत. हे प्रकार आरोपी कबूल होईपर्यंत अगर गुदमरून मरेपर्यंत चालत.

डान्टेनें आपल्या कल्पनाशक्तीनें वर्णिलेल्या नरकांतल्या साऱ्या शिक्षा इन्क्विझिशनवाल्यांनीं या पृथ्वीतलावर प्रत्यक्ष अमलांत आणल्या. इन्क्विझिटरांच्या कोमल करुणेवर विश्वास नसणाऱ्या सर्वांचीं शरीरें भाजण्यांत वा शीर्णविदीर्ण करण्यात आलीं. त्यांचीं हाडें मरडण्यात आलीं !

एम्. व्हॅकॅन्दार्डचाहि एक उतारा वाचूं या:—" कायद्याप्रमाणें छळ एकदांच करावयाचा असे; हा कायदा सहज मोडण्यांत येत असे. ......पुनः छळ करावा असें जेव्हां त्यांना वाटे तेव्हां मध्यंतरीं कांहीं दिवस गेलेले असले तरी इन्क्विझिटर्स म्हणत, ' आम्ही नव्याने छळ करीत नसून पूर्वी अर्धवट राहिलेलें छळण्याचें काम पूर्ण करीत आहों. छळ पुढें चालू आहे. ' असा शब्दच्छल करून ते निर्दयपणें अपराध्याचा पुरा पुरा छळ करीत व आपली रानटी हौस पुरवून घेत. " आणि छळाला कंटाळून एकाद्या अपराध्यानें ' अतःपर मी भला कॅथॉलिक होईन ' असें कबूल केल्यास त्याला जन्मभर तुरुंगांत ठेवण्यांत येई. पण इतका छळ झाला तरीहि ख्रिस्ताच्या बाहुपाशांत जाण्याचें हट्टानें नाकारणाऱ्यास अग्निज्वाळांच्या स्वाधीन करण्यांत येई. तात्त्विक दृष्टया चर्च म्हणे, " आम्ही केवळ शिक्षा फर्मावतों. प्रत्यक्ष शिक्षा देण्याचें काम स्टेटचें आहे. आम्हांला हत्येचा दोष नाहीं. " चर्च त्या अपराध्यांना असलेलें संरक्षण काढून घेई व त्या अनाथांना स्टेटच्या स्वाधीन करी. अशा रीतीनें चर्चचे हात वरवर पाहणारास निर्दोष दिसत. अर्वाचीन इतिहासकारहि शब्दांचा खेळ करून चर्चला निर्दोषी ठरवूं पाहत असतात. एकोणिसाव्या शतकांतील इतिहास-लेखक जोसेफ डी मेस्ट्री लिहितो, " आपण इन्क्विझिशनची चर्चा करीत असतों तेव्हां स्टेटच्या व चर्चच्या कामांतील फरक आपण लक्षांत घेतला पाहिजे. या न्यायसंस्थेंत जें जें भयंकर व भीषण असे तें तें स्टेटचें असे. विशेषतः मरणाची शिक्षा स्टेटच अमलांत आणी व जी जी न्याय्यता वा सदयता असे तिचें श्रेय मात्र चर्चकडे जाई. "

पण खरें पाहिलें तर चर्चच देहान्त-शिक्षा देई, येवढेंच नव्हे तर तदर्थ आग्रह धरी. ' यांना ठार मारलेंच पाहिजे ' असें चर्चचें निक्षून सांगणें असे. पोप चौथा इनोसंट याचें एक शासनपत्र आहे. त्यांत असें म्हटलें आहे कीं, " चर्च जे जे अपराधी स्टेटच्या ताब्यांत देईल त्यांना त्यांना स्टेटनें पांच दिवसांच्या आंत जाळलेंच पाहिजे. " चर्चनें गुन्हेगार ठरविलेल्यांस न जाळणाऱ्या

राजांना चर्च धर्मबाह्य, बहिष्कृत व नरकास योग्य ठरवी. पण सर्वांत अधम कृष्णकृत्य म्हणजे मारल्या वा जाळल्या जाणाऱ्यांच्या मुलांना वागवितांना दाखविण्यांत येणारी निर्दयता. मनुष्य खांबाला बांधून जाळला गेल्यावर चर्च त्याची सारी मालमत्ता जप्त करी; त्याच्या मुलांबाळांना एक पैहि मिळत नसे. एकाच अटीवर नास्तिक बापाच्या मुलाबाळांना वडिलांच्या इस्टेटींतला थोडासा भाग मिळूं शकत असे. ही अट कोणती ? मुलांनीं बापावर हेरगिरी करावी ही ! आपला बाप नास्तिक आहे अशी बातमी देणाऱ्या मुलास थोडी इस्टेट मिळे. ही अट तर अधिकच नीचतेची व क्रूरतेची द्योतक आहे. मुलांना बापांचे जणूं मारेकरी बनविण्यांत येई ! आणि तेंहि कशासाठीं ? तर दोन दमड्यांसाठीं ! अशी अट असेल असें मानवतहि नाहीं ! पण दुसऱ्या फ्रेडरिकनें खरोखरच असा एक कायदा केला होता व बऱ्याच इन्क्विझिटरांनीं— विशेषतः टॉर्कीमीडा यानें या कायद्याच्या अक्षराबरहुकूम अमलबजावणी केली. चर्चचे पिते हा कायदा मानीत येवढेंच नव्हे, तर त्यांना या कायद्याचा अभिमान वाटे. 'ईश्वराच्या प्रेमानें प्रेरित होऊन मुलें आपल्या पित्यांच्या—आईबापांच्या—विरुद्ध जात आहेत हें पाहून माझें हृदय उचंबळून येतें' असें नववा ग्रेगरी म्हणे.

ख्रिस्त म्हणे, "लहान मुलें मजकडे येऊं देत." इन्क्विझिशन संस्थेचें भ्रातृ-मण्डळ म्हणे, "होय, प्रभो ! मुलें तुमच्याकडे येतील; पण आम्ही त्यांना छळूं तेव्हांच तीं येतील. तुझ्याकडे त्यांनीं जावें यासाठीं त्यांना छळावें लागेल."

— ३ —

इन्क्विझिशनचें एक प्रमुख कार्य व टॉर्कीमीडाच्या जीवनाचा कळस म्हणजे स्पेनमधून ज्यूंचें उच्चाटन हें होय. टॉर्कीमीडा तरुण होता तेव्हां पुढें जी राजा फर्डिनंडची राणी झाली त्या राजकन्या इझाबेलाचा तो धर्मगुरु होता. इझाबेला आपल्या धर्मांध गुरुप्रमाणेंच रानटी, मूर्ख, धर्मवेडी व धार्मिक होती. टॉर्कीमीडाच्या सतत सांगण्याचा चित्तावर परिणाम होऊन ती म्हणाली, "नास्तिकतेचीं पाळेंमुळें खणून काढण्यांत मी आपली जिंदगी खर्चीन करीन."

स्पेनची राणी झाल्यानंतर तिच्या उत्साहांत तिला एक भागीदारहि मिळाला. तो म्हणजे तिचा नवराच. राजा–राणी धर्मकर्माला वाहून घेतीं झालीं. फर्डिनंडसारखा स्वार्थलोलुप व हांवरा राजा इतिहासांत दुसरा झाला नाहीं. तो ज्यूंना जिवंत जाळूं इच्छीत असे. कारण, ज्यूंपाशीं भरपूर धन–दौलत असे. ज्यूंना जाळल्यावर त्यांची संपत्ति राजा व चर्च यांच्यांत निमे-निम वांटली जाई. टॉर्कीमीडा यानें स्पेनच्या राजाला सारे ज्यू स्पेनमधून घालवून देण्यास सांगितलें. तेव्हां स्पेनचा राजा आनंदला. कारण, ज्यूंची एकजात हकालपट्टी म्हणजे त्यांची एकजात लूट—ज्यूंचें सोनें, जड-जवाहीर वगैरेंतील बराचसा भाग राजाच्या तिजोरींत येणें—असल्यामुळें लेखणीच्या एका फटकाऱ्यानें तो युरोपांतील सर्वांत श्रीमंत मनुष्य होऊं शकत होता.

इझाबेलाला स्वतःची विचारशक्तीच नव्हती. ती टॉर्कीमीडाच्या हातचें बाहुलें असल्यामुळें ज्यूंच्या मूलोत्पाटनांत सामील झाली. ज्यूंच्या उत्पाटनाचा कायदा तयार होऊन राजाची सही होण्यासाठीं त्याच्यापुढें ठेवला गेला. तेव्हां राजाच्या हृदयाला पाझर फुटावा म्हणून ज्यूंनीं शक्य तें सारें केलें. धार्मिक असहिष्णुतेमुळें ते सर्वच देशांतून हांकलले जात होते. त्यांना कोठेंहि थारा मिळेना, निवारा लाभेना. ते दशदिशांत इतस्तत फेंकले जात होते. ते राजा फर्डिनंड याला एकच गोष्ट पुनःपुनः सांगत होते, “राजा, आम्हांला शांतपणें राहूं दे; कृपा कर.” त्यांनीं राजाकडे उत्कृष्ट वक्ते पाठविले. मूर लोकांविरुद्ध ख्रिश्चनांनीं व राजा फर्डिनंड यानें ज्या लढाया केल्या त्यांत ज्यूंनीं मदत केली होती. ते राजाला तीस हजार ड्यूकट्स् द्यावयास तयार झाले. त्या काळांत ही रकम लहान नव्हती; राजाला मोह पाडील येवढी ती निःसंशय होती. राजा फर्डिनंड बुद्धिवाद ऐकण्यास तयार नव्हता, तरी सोनें त्याचें हृदय वितळवील असें वाटत होतें. पण इतक्यांत टॉर्कीमीडा राजवाड्यांत येऊन दत्त म्हणून उभा राहिला. तो या वेळीं सत्तर वर्षांचा होता. आपल्या सुरकुतलेल्या हातांत क्रॉस धरून तो मोठ्यानें ओरडला, “हा पाहा येशू, भगवान् ख्रिस्त! याला पूर्वीं ज्युडासनें चांदीच्या तीस नाण्यास विकलें! आज त्याला तूं पुनः तीस हजारांना विकणार काय?”

नाहीं. तीस हजारांची रकम पुरेशी नव्हती. टॉर्कीमीडानें राजा-राणींचें मन परावृत्त केलें. १४९२ सालच्या मार्चच्या एकतिसाव्या तारखेस ज्यूंच्या हकालपट्टीच्या कायद्यावर राजानें सही केली. या कायद्यानुसार स्पेनमधील प्रत्येक ज्यूला चार महिन्यांच्या आंत बाप्तिस्मा तरी द्यावा, नाहीं तर हांकलून तरी द्यावें असें ठरविण्यांत आलें. तीन लक्ष ज्यू ख्रिश्चन धर्म स्वीकारण्यापेक्षां वनवासास जाण्यास तयार झाले. त्यांना आपली मालमत्ता विकण्याची परवानगी देण्यांत आली. पण विकत घेणारे शेवटच्या दिवसाची वाट पाहत होते. शेवटच्या दिवशीं विकत घेणारे मागतील त्या किंमतींत घरेंदारें वगैरे सारें विकून ज्यू निघाले. त्या काळचा एक लेखक बर्नाल्डीम लिहितो, "एकानें आपला राजवाडा एका गाढवाच्या मोबदल्यांत दिला! दुसऱ्या एकानें आपला द्राक्षाचा मळा एका कापडाच्या ठाणास देऊन टाकला!" या निर्वासितांना बरोबर सोनें घेऊन जाण्याची बंदी होती.

याप्रमाणें ज्यूंना लुटून व हद्दपार करून ख्रिश्चन लोक आनंदानें नाचूं लागले. त्यांस आपल्या क्रूरतेची कृतार्थता वाटली. डोमिनिकन पंथीय ब्लेडा म्हणाला, "स्पेनच्या इतिहासांतील हा अतिशय भाग्याचा दिवस पाहा! आता धार्मिक ऐक्य सुरक्षित राहील. भरभराटीचा काल आतां लांब नाहीं. लवकरच सुखाचा सूर्योदय होईल."

पण अपेक्षित सुखाची उषा तर कधीं आलीच नाहीं, उलट ज्यूंच्या निर्वासनानंतर स्पेनच्या भाग्यसूर्याचा मात्र अस्त झाला!

स्पेनमधून निर्वासित झाल्यावर कोठें जावयाचें हें ज्यूंना कळेना. पुष्कळसे पोर्तुगालमध्यें गेले. तेथील राजा इमॅन्युएल दया दाखवील असें त्यांना वाटलें. पण तो धार्मिक कॅथॉलिक होता. ज्यू जें कांहीं किडूकमिडूक घेऊन आले होते तेंहि त्यानें लुटलें व 'माझ्या देशांतून चालते व्हा!' असें त्यांस सांगितलें. त्या 'दयाळू' ख्रिश्चन राजानें आपलें कार्य उत्कृष्टपणें पार पाडलें. ज्यूंची मालमत्ता, चीजवस्त, येवढेंच काय, पण त्यांचीं मुलेंबाळेंहि त्यानें लांबविलीं. त्यानें असा गुप्त हुकूम सोडला होता कीं, चौदा वर्षांखालचीं सारीं ज्यू मुलें पकडण्यांत यावीं. त्यांना बाप्तिस्मा देऊन ख्रिश्चन म्हणून वाढविण्यांत येणार होतें.

ही झाली ज्यूंची कथा. पण ख्रिश्चन धर्मांतीलच असूनहि जे कॅथॉलिक नव्हते त्यांची होळी टॉर्कीमीडा यानें सतत पेटती ठेवली होती. शेंकडों लोक त्यानें या होळींत फेंकले. त्याचीं स्तुतिस्तोत्रें गाणारे कौतुकानें लिहितात, "टॉर्कीमीडा इतका कसा दुष्ट, असें तुम्हांस वाटेल. पण जे पाखंडी होते त्यांचा उद्धार व्हावा म्हणून त्याला असें दुष्ट व्हावें लागत असे." सेंट थॉमस ॲक्विनसवर टॉर्कीमीडाची फार प्रीति तशीच भक्ति असे. ॲक्विनसप्रमाणेंच टॉर्कीमीडा मनाचें समाधान करी कीं, "चर्चच्या कल्याणासाठींच मी असा वागत आहें."

आपण दुष्ट आहों याची टॉर्कीमीडाला जाणीवच नसे. इतर इन्क्विझिटरांप्रमाणेंच तोहि आपल्या आरोपींची दयेनें व न्यायबुद्धीनें विटंबना करी, त्यांचें अवयवच्छेदन करी आणि मग त्याचे हालहाल करून त्यांना ठार करी. हे इन्क्विझिटर लोक जेव्हां जिवंत जाळण्याची शिक्षा देत, तेव्हां ते नेहमीं "दयेनें व न्यायबुद्धीनें" असे शब्द वापरीत. चौऱ्याहत्तराव्या वर्षी टॉर्कीमीडा इन्क्विझिशनचें अध्यक्षपद सोडून मोकळा झाला. पुढें दोन वर्षांनीं इ. स. १४९८ मध्यें तो मेला. पण इन्क्विझिशन संस्था पुढें एकोणिसाव्या शतकापर्यंत होती.

## प्रकरण ९ वें

# अमेरिका न शोधणारा कोलंबस

— १ —

१४४२ च्या जुलै महिन्यांत ज्यू स्पेनमधून हांकलले गेले. त्याच वर्षाच्या नोव्हेंबर महिन्यांत कोलंबसानें अमेरिका शोधून काढली; पण शोधून काढली असें म्हणण्याऐवजीं त्यानें पुनः शोधून काढली असें म्हणणें अधिक यथार्थ होईल. कारण, पांचशें वर्षांपूर्वीच अमेरिका लीफ एरिक्सन यानें शोधून काढली होती. तो मोठा धाडसी दर्यावर्दी होता. (Viking Captain होता.) ज्याला आज आपण नोव्हास्कोशिया म्हणतों त्याच्या किनाऱ्यावर त्याचें गलबत वादळानें जाऊन लागलें होतें. त्या देशांत खूप द्राक्षें आढळल्यामुळें त्यानें त्याला व्हाइनलँड असें नांव दिलें. तो तेथें सर्व

हिंवाळाभर राहिला. परत घरीं आल्यावर त्यानें आइसलंडमधील कांहीं पिल्ग्रिम–फादरांना अमेरिकेंत जाण्यास आग्रहानें सांगितलें. इ. स. १००३ मधील ही गोष्ट. ही वसाहत वसविली गेली; पण तेथील इंडियन लोकांच्या वैरभावामुळें ती मोडली. आणि हे भटक्ये यात्रेकरू (Vikings) पुनः स्वदेशीं परत आले. नॉर्समन लोकांच्या प्राचीन बखरींतून लीफ व हे दर्यावर्दी लोक यांचे हे पराक्रम वर्णिले आहेत.

तरुणपणीं कोलंबस आइसलंडमध्यें गेला होता. पेरू देशचे प्रोफेसर लुई उल्लोआ म्हणतात कीं, " कोलंबस त्या वेळीं ग्रीनलंडपर्यंत गेला होता. अमेरिकेच्या जमिनीवरहि त्यानें त्या वेळीं पाय ठेवले असावे. या त्याच्या जलपर्यटनाचा उद्देश केवळ चांचेगिरी हा होता. प्रोफेसरसाहेबांचा हा अंदाज बरोबर असेल तर कोलंबसाची १४९२ मधली ती सुप्रसिद्ध अमेरिकन सफर पहिली नसून दुसरी असली पाहिजे.

पण हा सारा तर्क आहे. कारण, कां कोणास माहीत, पण कोलंबस स्वतःच्या पूर्वचरित्राविषयीं फारसें कधीं सांगत नसे. म्हणून त्याच्या पूर्वचरित्रांतील रिकामे भाग भरून काढण्यासाठीं अनेक दंतकथा निर्मिल्या गेल्या. इतिहासकारांनीं कोलंबसाविषयीं लिहिलेलें सर्व जर आपण खरें मानूं लागलों तर निरनिराळया प्रकारचे शंभर तरी परस्परविरोधी कोलंबस आपणांस पाहावे लागतील ! त्याचा जन्म अनेक शहरीं करावा लागेल, त्याला ज्यू, स्पॅनियर्ड, इटॅलियन म्हणावें लागेल; कधीं त्याला विद्वान् म्हणावें लागेल, तर कांहींच्या मतानुसार त्याला अगदीं 'ढ' म्हणावें लागेल; कोणी म्हणतात कीं, तो सरदारपुत्र होता, तर कोणी म्हणतात तो एका खाणावळवाल्याचा मुलगा होता; कोणी त्याला ध्येयवादी मानतात, तर कोणी त्याला दांभिक म्हणतात; कोणी त्याला कवित्वहृदयाचा गूढवादी म्हणतात, तर कोणी त्याला भावना–शून्य धंदेवाला समजतात; कोणी त्याला देशभक्त म्हणतात, तर कोणी त्याला देशद्रोही म्हणतात; कोणी तो अत्यंत दारिद्र्यांत मेला असें म्हणतात, तर कोणी म्हणतात कीं मरणकालीं तो संपत्तींत लोळत होता ! कोणी त्याला उत्कृष्ट व कुशल नावाडी म्हणतात, तर कोणी म्हणतात कीं, त्याला नौकानयनविद्येचा गंधहि नव्हता !

स्वतःच्या आयुष्याच्या ज्या भागाविषयीं कोलंबस मौन पाळतो तो भाग आपणहि सोडून देऊं या. अज्ञात भूतकालाच्या धुक्यांतून पुढें आलेला असा तो आपणांस कोठें बरें दिसतो ? पोर्तुगाल देशाचा राजा दुसरा जॉन याच्याकडे गेला असतां अटलांटिक महासागरामधून एक मोठी सफर योजावी व तिचा प्रमुख म्हणून आपणास नेमावें असें तो राजास सांगत होता. राजाचें मन तो अशा सफरीसाठीं वळवीत होता. त्या काळांत पोर्तुगीज लोक दर्यावर्दी म्हणून जगप्रसिद्ध होते. व्हेनिसचे तसेच जिनोआचे व्यापारी जवळच्या भूमध्यसमुद्रांत व्यापार करीत असता पोर्तुगीज लोक अज्ञात व अगाध अशा अटलांटिक महासागरांत धाडसानें शिरत होते ! आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यानें तसेंच दूर मदीरा व कॅनरी बेटांपर्यंत ते जात. कांहीं धाडसी पोर्तुगीज दक्षिण आफ्रिकेस वळसा घालून हिंदुस्थानला पोंचूं पाहत होते. १४९३ मध्यें तुर्कांनीं कॉन्स्टँटिनोपल घेऊन युरोपचा आशियांतील अतिपूर्वेकडील देशां-जवळचा खुष्कीचा मार्ग तोडून टाकल्यामुळें युरोपियन व्यापाऱ्यांना जलमार्ग शोधून काढणें भाग झालें.

आणि या सुमारास तो अज्ञात साहसी ख्रिस्तोफर कोलंबस पुढें आला व म्हणाला, "नीट पश्चिमेकडे जाऊन मी पूर्वेकडचा रस्ता शोधून काढतों. पृथ्वी वाटोळी आहे आणि ज्यांच्याविषयीं आपण इतकें ऐकतों ते पूर्वेकडचे राजे आपल्या पायांखालीं पाताळांत आहेत. मला जर माणसें व गलबतें मिळतील तर मार्को पोलोनें स्वप्नांत सुद्धां कधीं पाहिली नसेल इतकी संपत्ति मी पोर्तुगालमध्यें आणीन. आणि पैशाहूनहि अधिक महत्त्वाची किंवा निदान तितक्याच महत्त्वाची दुसरी गोष्ट म्हणजे मी साऱ्या हिंदूंना पोर्तुगीज राजाच्या नांवाने ख्रिश्चन करीन."

हें ऐकून जॉन राजाच्या तोंडाला पाणी सुटलें. कारण, स्वार्थ व धर्मप्रसार या दोन्ही गोष्टी साधारण होत्या. पृथ्वी वाटोळी आहे ही गोष्ट कांहीं कोलंबसानेंच प्रथम नाहीं सांगितली. ख्रि. पू. चौथ्या शतकांतला ॲरिस्टॉटल म्हणतो, "पृथ्वी वाटोळी आहे असें पूर्वीपासून बरेच जण म्हणत आले आहेत." ॲरिस्टॉटलच्याहि काळीं ही गोष्ट—हा शोध—जुनाच होता. मध्ययुगांत या बाबतींत मोठमोठे पंडित वाद करीत असत. जॉन राजाच्या दरबारांत येण्यापूर्वीं कोलंबसानेंहि ही गोष्ट पुष्कळदां चर्चेंत ऐकली असेल. जॉन राजानें

इटलींतील प्रसिद्ध ज्योतिर्विद् टॉस्कनेली याला पत्र लिहून ' युरोप व हिंदुस्थान याच्यांतला सर्वांत जवळचा रस्ता कोणता ?' असें विचारलें होतें, ही गोष्ट तर प्रसिद्धच आहे. टॉस्कनेलीनें उत्तर दिलें, "पृथ्वी निःसंशय वाटोळी आहे. अर्थातच अटलांटिक ओलांडून पश्चिमेकडे जातां जातांच हिंदुस्थानचा रस्ता सांपडेल." तो पुढें लिहितो, "ज्या देशांत मसाले होतात, ते देश पूर्वेकडील असें आपण म्हणतों; पण या देशांना मी पश्चिमेकडचे म्हणतों याचें आश्चर्य वाटूं देऊं नका. कारण, जे समुद्रमार्गानें सारखे पश्चिमेकडे जात राहतील त्यांना हे प्रदेश साहजिकच पृथ्वीच्या दुसऱ्या बाजुला आढळतील."

टॉस्कनेलीचें हें निश्चित मत कळल्यावर जॉननें कोलंबसास न समजूं देतां आधींच एक तुकडी पाठवून देण्याचा प्रयत्न केला. कारण, कोलंबस पोर्तुगीज नव्हता व एका विदेशी माणसाकडे या टोळीचें प्रमुखत्व जावें ही गोष्ट जॉन राजास नको होती. पण जॉन राजानें पाठविलेल्या तुकडींतील खलाशांनीं बंड केलें, त्यामुळें त्या तुकडीच्या कप्तानाला परत यावें लागलें.

जॉन राजाचा हा लबाडाव पाहून कोलंबस चिडला, विटला व स्पेनच्या राजाकडे गेला.

— २ —

या वेळेस स्पेनच्या गादीवर फर्डिनंड व इझॅबेला हीं होतीं. तीं कोलंबसाच्या म्हणण्याकडे लक्ष देईनात. त्यांचें लक्ष मुसलमानांबरोबरच्या लढायांत होतें. ज्यूंविरुद्ध चाललेल्या दुष्ट कारवायांत तीं मग्न होतीं, त्यामुळें कोलंबसाच्या म्हणण्याकडे लक्ष देण्यास त्यांचें मन तयार नव्हतें. कोलंबसानें निराश होऊन आपला भाऊ बार्थोलोमो यास इंग्लंडचा राजा सातवा हेन्री याच्याकडे पाठविलें. तो स्वतःहि फ्रान्सच्या राजाकडे जाणार होता; पण इतक्यांत अकस्मात् १४९२ च्या वसंतऋतूंत स्पेनच्या दरबारांतून त्याला मदत मिळाली. पश्चिम युरोपांतील मुसलमानांच्या हातचें शेवटचें मजबूत ठाणें ग्रॅनाडा हें स्पॅनिशांच्या हातीं पडलें. ज्यू लोक देशांतून हांकलले गेले होते व जग आतां ख्रिश्चन धर्मीयांसाठीं सुरक्षित झालें होतें. अर्थातच कोलंबसाच्या योजना ऐकावयाला फर्डिनंड व इझॅबेला यांना आतां फुरसत होती. हिंदंना

फसवून ख्रिश्चन करण्याची, तशीच त्यांना लुटण्याची कोलंबसाची योजनाहि त्या स्वार्थी व रानटी राजाराणींना पसंत पडली.

राजाराणींचें उत्तेजन मिळालें. पॅलास शहरांतल्या कांहीं श्रीमंत व्यापाऱ्यांनीं मदत केली. आणि तीन लहान गलबतें घेऊन कोलंबस आपल्या ऐतिहासिक सफरीवर निघाला. त्या दिवशीं शुक्रवार होता, ऑगस्टची तिसरी तारीख होती. त्याच्याबरोबर अठ्याऐशीं खलाशी होते. ते बहुतेक कैदी व कायदेबाह्य असे लोक होते. कोणीहि प्रतिष्ठित नावाडी कोलंबसाच्या साहसांत सामील व्हावयाला तयार नव्हते. कारण, आपण असेच पुढें गेल्यास पृथ्वीवरून खालीं एकदम खोल खड्डयांत पडूं असे त्यांना वाटे.

पर्यटन सुरू झालें; प्रवासांत रोमांचकारी प्रसंग फारसे नव्हते ; हवा चांगली होती; खलाशांनींहि बंड वगैरे कांहीं केलें नाहीं. ते समाधानांत होते. महासागराच्या पलीकडे अपरंपार संपत्ति मिळेल या आशेने ते उत्साही होते. काहीं रसवेल्हाळ इतिहासकारांनीं खलाशांनीं कोलंबसाविरुद्ध बंड केलें वगैरे कल्पित कथा दिल्या आहेत. पण तसे कांहीं एक झालें नाहीं. ऑक्टोबरची नववी तारीख उजाडली. त्या दिवशीं मंगळवार होता. त्या दिवशीं रात्रभर डोक्यांवरून पक्षी जातांना त्यांना दिसले व दुसरे दिवशीं पाण्यावर तरंगत येणारी एक झाडाची फांदी दिसली. ऑक्टोबरच्या अकराव्या तारखेला उजाडतां उजाडतां ते एका बेटावर उतरले. हें बेट जपानच्या बाह्य सीमेवर असावें असा कोलंबसाचा तर्क होता. पण फ्लॉरिडाच्या दक्षिणेस असणाऱ्या वेस्ट इंडीज बेटांपैकीं तें एक होतें. पृथ्वी वाटोळी आहे हा त्याचा तर्क खरा ठरला; पण पृथ्वीचा आकार त्यानें फारच लहान कल्पिला होता. जेथें अमेरिका आहे तेथें हिंदुस्थान, जपान वगैरे पूर्वेकडचे देश असतील असें त्याला वाटलें. मरेपर्यंत कोलंबसाची अशीच समजूत होती कीं, आपण एकादें नवीन खंड शोधलेलें नसून आशियालाच जाऊन पोंचलों.

— ३ —

कोलंबस अज्ञात प्रदेशाच्या शोधास कां प्रवृत्त झाला ? त्याची महत्त्वाकांक्षा द्विविध होती : धनार्जनाची व विधर्मीयांस स्वधर्मांत आणण्याची. वेस्ट इंडीज बेटांवर उतरल्यावर आपल्या दोन्ही महत्त्वाकांक्षा आतां सफळ होणार असें त्याला वाटलें. ऑक्टोबरच्या बाराव्या तारखेस तो आपल्या रोजनिशींत

लिहितो, "हे इंडियन चांगले ख्रिश्चन होतील, चांगले गुलाम होतील." या लोकांना सहज फसवितां येतें हें पाहून तो आनंदला. तो लिहितो, "या लोकांना ख्रिश्चन धर्मी करून त्यांचा उद्धार करावा अशी इच्छा मला होती; पण त्यांना बळजबरीनें ख्रिश्चन धर्म देण्यापेक्षां प्रेमानें ख्रिश्चन करून घ्यावें असें मला वाटतें. त्यांचा सद्भाव, विश्वास लाभावा म्हणून मीं त्यांना लाल टोप्या दिल्या, कांचेचे मणी दिले. फुटलेल्या आरशांचे तुकडे व फुटलेल्या चिनी मातीच्या भांड्यांचे तुकडे घेऊन ते सोनें देत. एका टाकाऊ पट्टयाबद्दल एका खलाशास अडीच कॅस्टेलान्स वजनाचें सोनें मिळालें तेव्हां ही फसवणूक असावी असें कोलंबसाला प्रथम वाटलें व हा असमान व्यापार, ही विषम देवघेव बंद करण्याचें त्यानें ठरविलें. पण असें वाटण्याच्या मुळाशीं न्यायबुद्धि नव्हती, तर इंडियनांचा विश्वास संपादून व त्यांची सदिच्छा मिळवून मग त्यांना गोडीगुलाबीनें ख्रिश्चन करतां यावें व नीट लुटतां यावें असा त्याचा डाव होता. त्यानें राजाला लिहिलें, "एकदां यांचा विश्वास मला संपादन करूं द्या कीं मग यांना सहज ख्रिश्चन धर्मी करतां येईल व जिंकतां येईल."

इंडियनांना ख्रिश्चन करणें व नंतर धनकनकसंपन्न होणें या दोन इच्छा त्याच्या मनांत होत्या. या दोन गोष्टी त्याच्या रोजनिशींतील उताऱ्यांत निरनिराळया वेळीं पुनः पुनः दिसतात. इंडियनांमुळें स्वर्गाला आध्यात्मिक फायदा मिळेल व आपणांला ऐहिक वैभव मिळेल या दोन गोष्टी पुनः पुनः त्या रोजनिशींत लिहिलेल्या आहेत. तो निःशंकपणें राजाला लिहितो, "हीं बेटें चीन व हिंदुस्थान यांच्या उंबरठ्यांत आहेत. या दोन्ही देशांत अगणित संपत्ति आहे—हिरेमाणकें, मोतीं व सोनें यांना तर अंतच नाहीं! तुम्हांला हवें असेल तितकें सोनें मी आणून देईन. तुम्हांला हवे असतील तितके गुलाम गलबतांत भरून पाठवीन." तो पुढें लिहितो, "या गोष्टीचा साऱ्या ख्रिश्चन धर्मी राष्ट्रांस आनंद वाटला पाहिजे. त्यांनीं महोत्सव करावे, प्रभूचे आभार मानावे. लाखों लोकांना आपणांस आपल्या धर्मांत घेतां येईल. केवढी उदात्त गोष्ट! ही जी कृतकृत्यता, तीबद्दल प्रभूचे आभार."

अशा रीतीनें कोलंबस पौर्वात्यांना सक्तीनें व प्रेमानें ख्रिश्चन धर्मी व गुलाम करण्यासाठीं निघाला होता. पण ती गोष्ट दूरच राहून 'अमेरिकेचा संशोधक' ही पदवी त्याला आकस्मिक मिळून गेली.

— ४ —

कोलंबस कांहीं बाबतींत मोठा मनुष्य होता यांत शंकाच नाहीं. विज्ञानाच्या बाबतींत तो आपल्या काळाच्या फार पुढें होता. त्याचें धैर्य व त्याची चिकाटी हीं अतुलनीय होतीं. तो स्वप्नसृष्टींत वावरणारा एक अज्ञात मनुष्य होता. पण आपलें स्वप्न प्रत्यक्ष सृष्टींत आणलें जावें म्हणून त्यानें राजाचें मन वळविलें. अज्ञात महासागराच्या पृष्ठावर साहसाचें नवीन महाकाव्य लिहिणारा तो महाकवि होता. तो धर्मान्ध, संकुचित, डामडौली, स्वार्थी व अहंकारी होता. देवाचें वैभव व सुवर्णाचा लखलखाट या दोन गोष्टींसाठीं त्यानें आपलें सारें जीवन वाहिलें होतें ; पण त्याचीच कसोटी लावून पाहिलें तर त्याचें जीवन विफल झालें असेंच म्हणावें लागेल. त्याला परधर्मीयांस ख्रिश्चन धर्म देतां आला नाहीं कीं स्पेनमध्यें सोनेंहि आणतां आलें नाहीं. स्पॅनिश लोकांनीं इंडियनांस वाईट रीतीनें वागविलें. इंडियनांनींहि त्यांना त्याच प्रकारें उत्तर दिलें. त्यांनीं जशास तसें केलें. एका हातांत क्रॉस व एका हातांत चाबूक घेऊन येणाऱ्या या पाहुण्यांविषयीं इंडियनांना विश्वास वाटेना. स्पेनमध्यें थोडे दिवस राहून कोलंबस वेस्ट इंडीज बेटात परत आला, तेव्हां मागें ठेवलेल्या शिबंदींतील एकहि मनुष्य जिवंत नाहीं असें त्याला आढळून आलें !

अमेरिकेंत तो एकंदर चारदां आला. तो पुनः पुनः सोनें व हिरेमाणकें शोधीत होता. पण त्याचा सारा शोध फुकट गेला. राजा फर्डिनंड अधीर झाला. कोलंबस खूप सोनें आणून देईल अशी राजाची अपेक्षा होती. पण प्रत्यक्ष सोनें मिळण्याऐवजीं सोन्याचीं फक्त अभिवचनेंच मिळत. वस्तुस्थिति काय आहे, सोन्याच्या मार्गांत कोणतें विघ्न आहे हें पाहण्यासाठीं राजानें बोबॅडिला नांवाचा एक दरबारी सरदार पाठविला. बोबॅडिला आला व बेटांचें संशोधन केल्यावर त्याला असें आढळून आलें कीं जो प्रदेश कोलंबसानें शोधला होता तो भिकार होता. कोलंबसानें अपराध केला होता— त्यानें राजाला फसविलें होतें. म्हणून त्या सरदारानें कोलंबसाला कैद करून फर्डिनंड राजासमोर कैदी म्हणून उभें केलें. त्याचें हें करणें पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धांत स्पॅनिश न्यायनीतीचा जो प्रकार होता त्याला अनुरूपच होतें.

— ५ —

कोलंबस अज्ञात जन्मला व अज्ञातपणेंच मेला. त्यानें जगाला नवीन खंड दिलें: जगानें त्याला शृंखला लेववून कृतज्ञता दाखविली! त्याच्या शोधाचें महत्त्व त्या काळीं कोणालाहि समजलें नाहीं.

इ. स. १५०३ मध्यें अमेरिगो व्हेस्पुक्कि नामक इटॅलियन साहसिकानें 'नवीन जग' म्हणून एक वृत्तान्त प्रसिद्ध केला. हें नवीन जग आपण १४९७ मध्यें शोधलें असें तो म्हणतो. पण ती सारी असत्यकथा होती. तथापि त्याच वेळेस एक जर्मन प्रोफेसर जगाचा भूगोल छापीत होता, त्यांत त्यानें या नव्या खंडाला अमेरिका असें नाव दिलें. अमेरिगोनें जें खोटेंच सांगितलें तें खरें मानून त्याचेंच नाव या नव्या खंडाला त्या जर्मन प्रोफेसरानें दिलें.

इतिहासातला हा केवढा विरोध आहे कीं ज्यानें खरोखरच प्रथम इ. स. १००० मध्यें अमेरिका शोधली त्याचें नांवहि कोणास माहीत नाहीं! ज्यानें पुनः दुसऱ्यांदां (१४९२ मध्यें) ती शोधली त्याला अमेरिकेचा पहिला शोधक मानण्यांत येतें!! आणि ज्यानें मुळींच कांहीं न करतां सन १४९७ सालीं आपण अमेरिका शोधली अशी नुसती गप्प मारली त्याचें नांव त्या नव्या जगास मिळून अमर झालें!!! घोडचुका करणारी आपली ही मानवजात खरोखरच्या कर्तृत्वाबद्दल मानसन्मान कसे वांटीत असते याचें हे एक उत्कृष्ट उदाहरण आहे.

## प्रकरण १० वें

# कला-विज्ञान-वेत्ता लिओनार्डो डी व्हिन्सी

— १ —

समुद्राच्या अज्ञात मार्गाचें संशोधन करण्यांत कोलंबस गुंतला असतां दुसरा एक मोठा प्रगति-वीर मानवी बुद्धीच्या व मनाच्या अज्ञात प्रदेशांत प्रकाश पसरीत जात होता—त्या अज्ञात क्षेत्रांत रस्ते तयार करीत होता. या अपूर्व विभूतीचें नांव लिओनार्डो डी व्हिन्सी. नवयुगांतील संस्कृतीचा हा अत्यंत परिपूर्ण असा नमुना होता असें म्हटलें तरी चालेल. त्याची सर्वगामी बुद्धिमत्ता हें त्याच्या पिढींतील एक महदाश्चर्य होतें. "येवढ्याशा लहान

डोक्यांत इतकें ज्ञान मावतें तरी कसें ?" असें मनांत येऊन लोक त्याच्याकडे बघत राहत व त्यांचें आश्चर्य अधिकच वाढे. आजचें आपलें युग विशिष्ट क्षेत्रांत पारंगत होण्याचें आहे. अशा स्पेशलायझेशनच्या काळांत लिओनार्डोच्या अपूर्व बुद्धिमत्तेची अनंतता लक्षात येणें जरा कठिण आहे. त्याच्या सर्वंकष बुद्धीची आपणांस नीट कल्पनाहि करतां येणार नाहीं. लिओनार्डोनें जें जें केलें तें पहिल्या दर्जाचें केलें. कोठेंहि पाहिलें तरी तो पहिला असे. तो जें कांहीं करी तें उत्कृष्टच असे. सारें जगच त्याचें कार्यक्षेत्र होतें. अमुक एक विषय त्यानें वगळला असें नाहीं. जगांतील सौंदर्यांत त्यानें नवीन सौंदर्य ओतलें. जगांतील सौंदर्याची गूढता समजून घेण्याची तो खटपट करी. तो चित्रकार होता, शिल्पकार होता, इमारती बांधणारा होता, एंजिनियर होता, वाद्यविशारद होता, शारीर शास्त्रज्ञ होता, संशोधक होता, रंगभूमीची सजावट करणारा होता, नैतिक तत्त्वज्ञानी होता. त्याच्यांत सारें एकवटलेलें होतें. साऱ्या कला व शास्त्रें मिळून त्याची मूर्ति बनली होती. मरतांना अप्रसिद्ध अशीं पांच हजार पृष्ठें तो मागें ठेवून गेला. या पांच हजार पृष्ठांपैकीं पन्नास पृष्ठांकडेहि आपण किंचित् पाहिलें तरी त्याच्या मनाची व्यापकता आपणांस दिसून येईल. त्या पन्नास पृष्ठांत लिओनार्डोनें पुढील विषय आणले आहेत :—प्राचीन दन्तकथा व मध्ययुगीन तत्त्वज्ञान, समुद्राच्या भरती-ओहोटींचीं कारणें, फुप्फुसांतील हवेची हालचाल, पृथ्वीचें मोजमाप, पृथ्वी व सूर्य यांमधील अंतर, घुबडाची निशाचरत्वाची संवय, मानवी दृष्टीचे भौतिक नियम, वाऱ्यांत वृक्षांचें तालबद्ध डोलणें, उडणाऱ्या यंत्राचें स्केच, मूत्राशयांतील खड्यावर वैद्यकीय उपाय, वाऱ्यानें फुगविलेलें कातड्याचें जाकीट घालून पोहणें, प्रकाश व छाया यांवर निबंध, क्रीडोपवनाचा नकाशा, नवीन युद्धयंत्रें, सुगंध बनविण्याच्या पद्धतींचें टांचण, स्वतंत्र भौमितिक सिद्धान्तांची यादी, पाण्याच्या दाबाच्या शक्तीचे प्रयोग, पशुपक्ष्यांच्या संवयींचें निरीक्षण-परीक्षण, निर्वाततेवर निबंध, शक्ति म्हणून वाफेचा उपयोग करण्याची योजना, नवीन म्हणींवर प्रकरण व चंद्राच्या रचनेसंबंधीं माहिती.

लिओनार्डोच्या पाच हजार पृष्ठांपैकीं पन्नासच पृष्ठें आपण घेतलीं तरी त्यांत आलेल्या अनेक विषयांपैकीं फक्त एकदशांशच वरच्या यादींत आलेले आहेत.

यावरून या पांच हजार पृष्ठांत किती विषयांवर टीपा-टिप्पणी आल्या असतील याची कल्पनाच करणें बरें. या शेंकडों विषयांत आणखी पुढील कलानिर्मितीची भर घाला:—अत्यंत निर्दोष असें मोनालिसा पोर्ट्रेट, 'शेवटचें जेवण', हें अत्यंत सुंदर चित्र आणि त्या काळांत आठवें आश्चर्य मानला जात असलेला त्यानें तयार केलेला घोड्यावर बसलेल्या स्फोर्झाचा पुतळा. असा लिओनार्डो होता. त्याच्या बुद्धीची वा प्रतिभेची खोली येईल का मोजतां? त्याच्या खोल बुद्धींत व प्रतिभेंत येईल का डोकावतां?

निसर्गाला क्षुद्र मानवांबरोबर सतत प्रयोग करीत राहिल्यामुळें कटाळा येत असेल व म्हणून तो मधूनमधून एकादा खराखुरा मनुष्य निर्माण करतो. लिओनार्डो हा असला खराखुरा मनुष्य होता.

— २ —

फ्लॉरेन्समध्यें सेर पिअरो ॲन्टोनिओ नांवाचा वकील होता, त्याचा अनौरस पुत्र लिओनार्डो. हा ॲन्टोनिओ व्हिन्सी किल्ल्याच्या टस्कन टेंकड्यांत राहत असे. सभोंवतालचे दगडाळ रस्ते पाहून लिओनार्डोच्या मनावर परिणाम झाला असेल. टेंकड्यांवर होणाऱ्या छाया-प्रकाशांच्या खेळांचाहि त्याच्या आत्म्यावर खूप परिणाम झाला असेल. लिओनार्डोचें मन, त्याची बुद्धि व त्याचा आत्मा त्या निसर्गावर पोसलीं जात होतीं. लहानपणीं लिओनार्डो अतीव सुंदर होता. त्याचें लावण्य पाहून सारे दिपून जात. त्याचे केस सोनेरी होते. तो अंगांत गुलाबी रंगाचा झगा घाली. तो जणूं मेघांतून खालीं उतरलेला एकादा देवदूतच भासे! आणि तो गाणें तरी किती सुंदर गाई!—जणूं गंधर्वच स्वर्गांतून उतरलासें वाटे! अगदीं लहानपणींच तो फ्ल्यूट वाजवावयास शिकला. बापाकडे येणाऱ्या पाहुण्यांना तो गाऊन दाखवी; पण गातांना व वाजवितांना मूळच्या शब्दांत तो सुधारणा करी व संगीतांत नावीन्य ओती, त्यायोगें पाहुणे चकित होत!

पण केवळ संगीतांतच अपूर्वता दाखवून लिओनार्डोचें समाधान झालें नाहीं. त्यानें मानवी विचाराच्या प्रत्येक क्षेत्रांत पारंगत व्हावयाचें ठरविलें व तो त्यासाठीं प्रयत्न करूं लागला. लिओनार्डोचें मन गणितज्ञाचें होतें, बोटें

कुशल यंत्रज्ञाचीं होतीं, आत्मा कलावन्ताचा होता. (हृदय कलावन्ताचें होतें, बुद्धि गणितज्ञाची होती, बोटें मेकॅनिकचीं-यंत्रज्ञाचीं-होतीं.) त्या काळीं ॲन्ड्री डेल व्हेरोशिया हा प्रसिद्ध कलावन्त होता. तो चित्रकार, शिल्पकार, मूर्तिकार होता. त्याच्या कलाभवनांत लिओनार्डो वयाच्या अठराव्या वर्षीं इ. स. १४०० मध्यें शिरला आणि थोड्या वर्षांतच त्यानें या तिन्ही कलांत आपल्या गुरूला मागें टाकलें. वयाच्या एकतिसाव्या वर्षीं त्यानें मिलनच्या ड्यूकला एक पत्र लिहिलें. या पत्रांत त्यानें आपणाला शांतीच्या कला व युद्धाचीं शस्त्रास्त्रें यांचा मिलनमधील मुख्य डायरेक्टर नेमावें अशी मागणी केली होती. या ड्यूकचें नांव लुडोव्हिको स्फोर्झा. या पत्रात लिओ-नार्डोनें आपल्या अंगच्या गुणांचें वर्णन केलें आहे. 'हें पत्र लिहिणारा एक तर अपूर्व बुद्धीचा तरी असला पाहिजे, नाहीं तर मूर्ख तरी असला पाहिजे असें कोणालाहि वाटलें असतें' असें जीन पॉल रिक्टर म्हणतो. हा आश्चर्यकारक तरुण, ड्यूकला साध्या व स्पष्ट शब्दांत लिहितो, "शत्रूचा पाठलाग करतांना बरोबर घेऊन जातां येतील असे पूल मी बांधून देऊं शकेन. तसेंच शत्रूचे पूल मी नष्ट करूं शकेन. मी नद्या व दलदली बुजवूं शकेन, कोरड्या करूं शकेन, दगडी पायावर न बांधलेला कोणताहि किल्ला मी उध्वस्त करूं शकेन. मी नवीन प्रकारची तोफ बनवूं शकेन. नद्यांच्या खालून आवाज न करतां बोगदे कसे बांधावे हें मीं शोधून काढलें आहे. शत्रूवर हल्ला करण्यासाठीं आच्छादित रणगाडे कसे बांधावे हें मला माहीत आहे. पाण्याखालून लढण्याचीं, बचावाचीं व चढाईचीं शस्त्रें करण्याची आश्चर्यकारक योजना माझ्याजवळ आहे. तद्वतच शांततेच्या काळांत मी शिल्पकामांत कोणाचीहि बरोबरी करूं शकेन; चित्रकलेंतहि उत्तमोत्तमांच्या तोडीचें काम मी करूं शकेन; आणि तुमच्या (स्फोर्झांच्या) कीर्तिमान् वडिलांचा घोड्यावर बसलेला पुतळा जगांत कोणींहि पाहिला नसेल इतका सुंदर मी करून देईन.

त्या तरुण लिओनार्डोला जवळच्या वेड्यांच्या दवाखान्यांत न पाठवितां ड्यूकनें त्याला आपल्या राजवाड्यांत बोलावलें. लिओनार्डो आला. राजवाड्यांतील पुरुषमंडळीवर त्यानें प्रभाव पाडला आणि महिला मण्डळाचा तो आवडता झाला. लुडोव्हिको स्फोर्झा याच्या दरबारीं लिओनार्डो वीस वर्षें राहिला.

मिलन येथें तो सरकारी एंजिनिअर होता आणि आनंदोत्सवाचा अनधिकृत आचार्य होता. तो करमणुकीच्या योजना आंखी, संगीत रची, पडदे रंगवी, पोषाखांच्या नवीन नवीन पद्धती निर्मी व दरबारांत होणाऱ्या साऱ्या करमणुकींच्या कार्यक्रमांत स्वतः प्रमुखपणें भाग घेई. त्याच्या काळच्या प्रक्षुब्ध जीवनांत त्यानें खूप ॲक्टिव्ह काम केलें. तो नेहमीं पुढें असे.

पण तो या रोजच्या करमणुकी वगैरेंतच रमणारा नव्हता. तो त्या काळचा एक अतिप्रतिभावान् व स्वप्नसृष्टींत वावरणारा महापुरुष होता. तो नवयुगांतील नवीन नगरी बांधीत होता. ही नवीन नगरी कशी बांधावी, सजवावी, उदात्त व सुंदर दिसणारी करावी याच्या योजना तो मांडी. सुरक्षितपणें जातां यावें म्हणून त्यानें निरनिराळ्या उंचीचे रस्ते तयार करविले. त्यानें एकाखालीं एक असे रस्ते केले. स्वच्छता व आरोग्य अधिक राहावीं म्हणून रस्ते रुंद असावे असें तो म्हणे. मिलन शहर सुंदर दिसावें म्हणून ठायीं ठायीं चर्चें, धबधबे, कालवे, सरोवरें व उपवनें यांची योजना तो मनांत मांडी. त्याच्या मनांत अशी एक योजना होती कीं, शहरें फार मोठीं नसावीं, पाच हजारच घरें प्रत्येक शहरांत असावीं व कोणत्याहि घरांत सहांहून अधिक माणसें नसावीं. तो म्हणे, "माणसें फारच गर्दी करून राहतात, मग तीं सुखी कशीं होणार? एके ठिकाणीं दाटी करून शेळ्यांमेंढ्यांप्रमाणें राहणाऱ्या या माणसांना जरा अलग अलग राहावयाला शिकविलें पाहिजे. गर्दी करून राहिल्यानें सगळीकडे घाणच घाण होते, दुर्गंधी सुटते व साथींचीं आणि मरणाचीं बीजें सर्वत्र पसरतात."

त्यानें स्वतःचें मिलन शहर तर सुंदर केलेंच, पण भविष्यकालीन सुंदर शहराचीहि निर्दोष योजना त्यानें आंखून ठेविली. जरी तो अनेकविध कार्यांत सदैव मग्न असे, तरी तो चित्रकला व मूर्तिकला या आपल्या आवडत्या दोनच कलांस सारा वेळ देई. इ. स. १४९८ मध्यें त्यानें Last Supper हें चित्र संपविलें. त्यानें हें चित्र एका मठांतील भिंतीवर रंगविलें आहे. तो मठ सँटा मेरिया डेले ग्रॅझी येथील होता. भिंतीवरचें तें चित्र आतां जरा पुसट झालें आहे. त्याला भेगा व चिरा पडल्या आहेत. लिओनार्डोनें रंगांत तेल मिसळलें. भिंतीवरील चित्रांसाठीं रंगांत तेल मिसळणें हा शोध घातक होता. या चित्रांतील रंग कांहीं ठिकाणीं निघून गेला आहे. येशू व

त्याचे शिष्य यांचे चेहरे दुय्यम दर्जाच्या कलावंतांकडून पुनः सुधारून ठेवण्यांत आले आहेत. तरी त्या जीर्णशीर्ण झालेल्या चित्रामधूनहि सौंदर्याचा आत्मा अद्यापि प्रकाशत आहे. डिझाइन भौमितिक आहे, चित्राची कल्पना अव्यंग आहे, चित्रांतील बौद्धिक भावदर्शन गूढ व गंभीर आहे. मानवी बुद्धि व प्रतिभा यांची ही परमोच्च निर्मिति आहे. या चित्रांत शास्त्र व कला यांचा रमणीय संगम आहे. आणि शास्त्रकलांच्या या निर्दोष व परिपूर्ण मीलनावर तत्त्वज्ञानानें घेतलेल्या चुंबनाचा ठसा उमटला आहे.

हें चित्र रंगवावयाला लिओनार्डो याला किती तरी दिवस लागले. परिपूर्णतेकडे त्याचे डोळे सारखे लागले होते. आदल्या दिवशीं झालेलें काम पुनः दुसऱ्या दिवशीं तो पाही आणि त्यांत सुधारणा करी. तें चित्र हळूहळू फुलत होतें. तें अत्यंत काळजीपूर्वक तयार होत होतें. चरित्रकार लोमाझ्झो लिहितो, "चित्र काढावयाला आरंभ करतांना लिओनार्डोचें मन जणूं भीतीनें भरून जाई. ... त्याचा आत्मा कलेच्या उदात्त भव्यतेनें भरलेला असे. तो आदर्श सारखा समोर असल्यामुळें स्वतःच्या रेषांमधल्या रंगांतील चुका त्याला दिसत व चित्र नीट साधलें नाहीं असें त्याला सारखें वाटे. त्याचीं जीं चित्रें इतरांना अपूर्व वाटत, त्यांत त्याला दोष दिसत." त्याचा दुसरा एक चरित्रकार सिनॉर बॅन्डेलो लिहितो, "पुष्कळ वेळां तो मठांत अगदीं उजाडतां उजाडतां येई. ... शिडीवर चढून तो चित्र काढीत बसे. सायंकाळीं अंधार पडेपर्यंत तो काम करीत बसे. आतां चित्र काढतां येणें शक्य नाहीं, दिसत नाहीं, असें होई तेव्हांच तो नाइलाजानें काम थांबवी. तो तहानभूक विसरून जात असे. तो तन्मय होऊन जाई. परंतु कधीं कधीं तीन तीन—चार चार दिवस तो नुसता तेथें येई व केवळ बघत बसे. तो चित्राला हातहि लावीत नसे. छातीवर स्वस्तिकाकार हात ठेवून तो भिंतीवरील आकृति पाहत उभा राही. तो त्यांतील गुणदोषच जणूं पाही."

स्वतःच उत्कृष्ट टीकाकार व दोषज्ञ असल्यामुळें संपूर्ण अशी एकादी कलाकृति त्याच्या हातून क्वचितच पुरी होई. पण तो अविश्रांत कर्मवीर होता. थकवा तर त्याला माहीतहि नव्हता. बँडेलो लिहितो, "तो किल्ल्यांत मोठ्या घोड्याचा पुतळा तयार करीत होता. तेथल्या कामावरून मोठ्या लगबगीनें भरदुपारीं येतांना मीं त्याला कधीं कधीं पाहिलें आहे. मिलनच्या

रस्त्यांत दुपारच्या उन्हांत चिटपांखरूंहि नसे. डोळे दिपविणारें प्रखर ऊन तापत असे; पण सांवलीची कल्पनाहि मनांत न आणतां लिओनार्डो धांवपळ करीत मठाकडे जाई, तेथल्या 'शेवटचें भोजन' या चित्रावर ब्रशाचे कांहीं फटकारे मारी व पुनः किल्ल्यांतील घोड्याच्या पुतळ्याकडे जाई."

हा घोडा अर्वाचीन मूर्तिकलेंतील एक आश्चर्य आहे. लुडोव्हिकोचा पिता या घोड्यावर बसलेला काढावयाचा होता. घोड्याचा आकार प्रचंड होता. एकंदर पुतळ्याची ती कल्पनाच अतिशय भव्य होती. इ. स. १४९३ मध्यें या पुतळ्याचा मातीचा नमुना प्रदर्शनार्थ मांडला गेला होता. त्रिकोणी मंडपाखालीं--मेघडंबरीखालीं हा पुतळा ठेवला गेला. मिलन शहराची ती अमरशोभा होती. मिलनमधील तें अपूर्व आश्चर्य होतें. नंतर पितळेचा तसा पुतळा ओतून घ्यावा म्हणून योजना केली गेली; पण ती सिद्धीस गेली नाहीं. कारण, इ. स. १४९९ मध्यें फ्रेंच सैनिकांनीं मिलन घेतलें व हा पुतळा हें त्यांच्या तिरंदाजीचें एक लक्ष्य होतें. बाण मारून पुतळा छिन्नभिन्न केला गेला.

आपल्या या अर्धवट रानटी मानवसमाजांत प्रतिभावान् व प्रज्ञावान् पुरुष जें निर्माण करीत असतात, त्याचा मूर्ख लोक विनाश करितात. मूर्खांनीं विध्वंसावें म्हणूनच जणूं शहाण्यांनीं निर्मिलें कीं काय कोण जाणे! युद्धानें मनुष्याचा देहच नव्हे तर आत्माहि मारला जातो, हा युद्धावरचा सर्वांत मोठा आरोप आहे.

— ३ —

आपण पाहिलें कीं, रणविद्येंतील एंजिनिअर या नात्यानें लिओनार्डोच्या कारकीर्दीस सुरुवात झाली. पण आयुष्याच्या अखेरच्या काळांत तो लष्करशाहीचा कट्टा शत्रु झाला. " युद्ध म्हणजे अत्यंत पाशवी मूर्खपणा व वेडेपणा " असें तो म्हणतो. पाण्याखालीं राहून लढण्याचें यंत्र पुरें करण्याबद्दल जेव्हां त्याला सांगण्यांत आलें तेव्हां तें नाकारून तो म्हणाला, " मनुष्याचा स्वभाव फार दुष्ट आहे." युद्धांतील सारी पशुता व विद्रूपता यथार्थतेनें पाहणारे जे कांहीं लोक नवयुगांत होते त्यांतील लिओनार्डो हा पहिला होय. त्यानें लढाईचीं अशीं चित्रें काढलीं कीं, टॉलस्टॉय जर कलावान् असता तर तीं त्यानें काढलीं असतीं. पण केवळ रंग व ब्रश, कॅन्व्हस व कापड, यांवरच

युद्धांची क्रूरता व भीषणता दाखविणारीं चित्रें तो काढी असें नव्हे, तर अंगिहारी येथील लढाईचें त्यानें केलेलें वर्णन---त्यानें काढलेलें शब्दचित्र--- इतकें उत्कृष्ट आहे कीं, थोर रशियन कादंबरीकारांच्या उत्कृष्ट लिखाणांशींच ते तुलितां येईल. ती तेथली रणधुमाळी, ती धूळ, तो धूर, लढणाऱ्यांच्या वेदनाविव्हल तोंडांवर पडलेला सूर्याचा लालसर प्रकाश, जखमी होऊन पडलेल्या शिपायांचे शीर्णविदीर्ण देह, छिन्नविच्छिन्न झालेले घोडे, प्रत्येक दिशेनें येणारी बाणांची वृष्टि, पाठलाग करीत येणाऱ्यांचे पाठीमागें उडणारे केस, रक्तानें माखलेल्या धुळींतून व घसरड्या रस्त्यांतून, पाठीवरच्या स्वाराना वाहून नेताना घोड्यांच्या टापांनीं पडलेले खळगे, फुटकींतुटकीं चिलखतें, मोडलेले भाले, तुटलेल्या तरवारी, फुटलेलीं शिरस्त्राणें, या साऱ्या वस्तू मेलेल्याच्या व मरणाऱ्यांच्या तंगड्यांमध्यें विखुरलेल्या असत; त्या मोठमोठ्या जखमांच्या तोंडांतून भळभळां वाहणारें रक्त, ते टक लावून पाहणारे डोळे, मेलेल्यांच्या त्या घट्ट मिटलेल्या मुठी, त्यांच्या त्या नाना दशा, श्रमलेल्या शिपायाच्या अंगांवरची घाण आणि धूळ, रक्त, घाम व चिखल यांची घाण--या व अशा हजारों बारीकसारीक गोष्टी लिओनार्डोनें लढाईच्या त्या वर्णनात आणल्या आहेत. त्यानें हें शब्दचित्र कॅन्व्हसवर रंगवून ठेवलें नाहीं ही किती दुःखाची गोष्ट ! तें चित्र किती भीषण व हृदयद्रावक झालें असते ! त्यानें अंगिहारीच्या लढाईचीं कांहीं स्कोचिस केलीं; पण रंगीत चित्र तयार केलें नाहीं. त्याला कदाचित् असेंहि वाटलें असेल कीं, हें काम आपल्याहि प्रतिभेच्या व बुद्धीच्या पलीकडचें आहे. मनुष्याची क्रूरता दाखवावयाला मनुष्याची कला जणूं अपुरी पडते असें वाटतें.

— ४ —

आपण पाहिलें कीं, लिओनार्डो हा अत्यंत स्वयंभू व अभिजात असा कलावान् होता. त्याच्या कृतींत अनुकरण नाहीं. तो म्हणे, " आपण निसर्गाचें अनुकरण करावें, दुसऱ्या कलावन्तांचें करूं नये." ग्रीक हे उत्कृष्ट कलावंत होते. कारण, ते निसर्गानुकारी होते. पण रोमन कलावन्त दुय्यम दर्जाचे वाटतात. कारण, निसर्गाचें अनुकरण करण्याऐवजीं त्यांनीं माणसांचें-ग्रीकांचें-

अनुकरण केलें. जुन्या ग्रीक कलावेत्त्यांत जी प्रतिभेची ज्वाला होती ती लिओनार्डोमध्यें होती. लिओनार्डो जीवनांतून स्फूर्ति घेई. कधीं कधीं तर तो जीवनाच्या पलीकडेहि जाई. जीवनांत नसलेलेंहि त्यांत ओतून तो अधिक सौंदर्य निर्मी. मोना लिसाची जी प्रतिकृति त्यानें काढली आहे तींत किती नाजूकपणा, किती कोमलता, किती सुंदरता व एक प्रकारची प्रभुशरणता आहेत! मूळच्या खऱ्या मोना लिसाच्या चेहऱ्यांत या साऱ्या भावना क्वचितच असतील. हें चित्र काढतांना लिओनार्डोनें निसर्गाचें अनुकरण केलें नसून निसर्गानेंच जणूं लिओनार्डोचें अनुकरण केलें आहे असें वाटतें. त्या मानवी मुखमंडलावर त्यानें इतकी मधुरता रेखाटली आहे आणि इतका चांगुलपणा उमटविला आहे, याचें कारण त्याच्या हृदयांतच अपार साधुता, अपार मधुरता होती. फिडियसच्या कलेचा आत्मा जसा लिओनार्डोजवळ होता, तसें त्याच्याजवळ सेंट फ्रॅन्सिसचें हृदयहि होतें. तो जीवनाकडे दुःखी स्मितानें पाहतो. त्याला मानवांचीं दुःखें पाहून त्यांची करुणा येई; पण त्यांचा मूर्खपणा पाहून तो स्मित करी.

कधीं कधीं स्मिताचें परिवर्तन मनमोकळया हास्यांतहि होई. या बाबतींत ग्रीक लेखक ॲरिस्टोफेन्स याच्याशीं त्याचें साम्य आहे. आपण असेंहि म्हणूं शकूं कीं, लिओनार्डो हा रेखा व रंग यांचा ॲरिस्टोफेन्स होता. ग्रीक ॲरिस्टोफेन्स शब्दसृष्टींतील तर हा रंगसृष्टींतील. त्या ग्रीक नाटककाराप्रमाणें मानवी जीवनाच्या हास्यरसात्मक नाटकांतील जे अधिक हास्यास्पद प्रकार दिसत त्यांवर दृष्टि टाकणें त्याला बरें वाटे. जीवनांतील नाना प्रकारचे हास्यास्पद चेहरे त्यानें आपल्या नोटबुकात काढले आहेत. त्याचीं नोटबुकें अशा चेहऱ्यांनीं भरलेलीं आहेत. कधीं कधीं तो शेतकऱ्यांना आपल्या घरीं बोलावी व गोष्टी सांगून त्यांची हंसवून हंसवून मुरकुंडी वळवी. हंसतांना त्यांचे चेहरे निरानिराळ्या प्रकारचे होत ते पाहून तो लगेच कागदाच्या तुकड्यांवर ते टिपून घेई व नंतर आपल्या अमर स्केचबुकांत त्या चेहऱ्याना तो अमरत्व देई.

अपूर्व अशा परिस्थितींत मानवी भावना कशा दिसतात हें पाहण्याचें लिओनार्डोला जणूं वेडच होतें! ज्यांचा शिरच्छेद व्हावयाचा असे अशा गुन्हेगारांचे चेहरे काढण्यासाठीं तो तासन् तास बसे व त्यांच्या मरणान्तिक

भावना रेखाटी; पण त्या मरणोन्मुखांचीं करुण मुखें रंगवितांना त्याला आसुरी आनंद मात्र होत नसे. तो त्या वेळीं केवळ शास्त्रीय दृष्टीनें तें भावनांचें आविष्करण पाहत असे. तो जणूं मानसशास्त्राचा अभ्यास करी व त्यावर रेखारूप निबंध लिही. तो कलावान् होता. जीवनाची व मरणाची प्रत्येक स्थिति, प्रत्येक दशा अभ्यासावयाची जिज्ञासा त्याला असे. कलावान् या नात्यानें तो अभ्यास करी; पण मनुष्य या नात्यानें त्यानें जीवनालाच गौरविलें आहे व मरणाला धिक्कारलें आहे. त्याचा चरित्रलेखक व्हासरि लिहितो, "जेथें पांखरें विकलीं जात त्या जागीं तो जाई, आपल्या हातांनीं पिंजऱ्यांतील पक्षी घेई, त्यांची मागण्यांत येई तितकी किंमत देई व नंतर त्यांना सोडून देऊन त्यांचें स्वातंत्र्य त्यांना परत देई!"

त्याला प्राणिमात्राबद्दल अनुकंपा वाटे, प्रत्येक जीव पवित्र वाटे. तो शाकाहारी झाला. आपण जर प्राणी निर्मूं शकत नाहीं तर त्यांना ठार मारण्याचा आपणांस काय अधिकार? तो लिहितो, "कोणत्याहि प्राण्याचा जीव घेणें ही अत्यंत अमानुष गोष्ट आहे. रागानें अथवा मत्सरानें आपण कोणाचा प्राण घ्यावा अशी आत्म्याची खरोखरच इच्छा नसते. ज्याला प्राणांची किंमत वाटत नाहीं, ज्याला दुसऱ्याच्या जिवाची पर्वा नाहीं, तो जिवंत राहण्यास अपात्र नव्हे काय?"

लिओनार्डो स्वानुभवानें बोलत होता. आपण कशाच्या जोरावर हें असें बोलूं शकतों हे तो जाणत होता. जीवनांतील दुर्दैव, करुणा, विरोध व क्रूरता या गोष्टी त्यानें स्वतः पाहिल्या होत्या. लुडोव्हिको स्फोर्झाच्या दरबारांत व नंतर सीझर बोर्जिआ याच्या राजवाड्यांत त्याला दिसलें कीं, अत्यंत क्षुद्र स्वार्थासाठीं व क्षुद्र कारणांसाठीं माणसें माणसांची कत्तल करीत असतात. तो मानवांतील सौंदर्याचा उपासक होता व म्हणून तो कलावान् झाला. पण मानवांतील दुष्टता व जंगलीपणा पाहून तो तत्त्वज्ञानी झाला.

— ५ —

लिओनार्डोचें तत्त्वज्ञान सर्वसंग्राहक आहे. तत्त्वज्ञानाच्या प्रत्येक संप्रदायांत जें जें चांगलें दिसलें तें तें सारें त्यानें घेतलें. सर्व ठिकाणचे उत्कृष्ट विचार घेऊन त्यानें स्वतःचें तत्त्वज्ञान उभारलें. जीवनमरणांसंबंधींचे लिओनार्डोचें

विचार सुसंबद्ध नाहींत. त्याच्या स्फुट व विस्कळित विचारांना 'दर्शन' किंवा 'मीमांसा' म्हणतां येणार नाहीं. त्यानें टीपा, टिप्पणी लिहिल्या. त्याच्या पांच हजार पृष्ठात सर्व कांहीं संक्षेपानें आलें आहे. तो डाव्या हातानें लिही, म्हणून त्याचें बरेंचसें लिखाण लागत नाहीं. तसेंच तो आपलें इटॅलियन अक्षर हिब्र्यू व अरेबिक यांप्रमाणें उजवीकडून डावीकडे लिही. लिओनार्डोच्या तत्त्वज्ञानात्मक सूत्रांची नीट व व्यवस्थित मांडणी अद्यापि कोणीं केलेली नाहीं. पण त्याच्या इतस्ततः विखुरलेल्या विचारांतून स्टोइकांची धैर्यशीलता व ख्रिस्ताची मधुर सौम्यता यांचें मिश्रण आपणांस आढळून येतें. लिओनार्डो चर्चचा सभासद नव्हता; पण तो येशूचा अनुयायी होता. त्यानें काढलेल्या ख्रिस्ताच्या चित्रांतील ख्रिस्ताचें मुखमंडल रंगवितांना ख्रिस्ताचा आत्मा आपण ओळखला आहे असेंच जणूं तो दाखवीत आहे. पण त्यानें ख्रिस्ताचें मुख तेवढेंच नीट रंगविलें असें नाहीं, तर ख्रिस्ताचे विचारहि सहानुभूतिपूर्वक समजून घेतले होते. तो ख्रिस्ताप्रमाणें, स्टोइक बंधूंप्रमाणें, स्वतःचीं दुःखें समाधानानें व सहजतेनें सहन करी; तो त्यांचा बाऊ करीत नसे. दुसऱ्यांच्या दुःखांविषयीं तो सहानुभूति दाखवी. शत्रूंचा द्वेष व मित्रांचा मत्सर यामुळें त्याला बराच त्रास होई. मायकेल-एंजेलो हा त्यांचाच समकालीन महान् चित्रकार; पण लिओनार्डोच्या कलेकडे तो सहानुभूतीनें बघत नसे व त्याचा सार्वजनिकरीत्या अपमान करण्याची एकहि संधि गमावीत नसे. लिओनार्डो मात्र हे सर्व अपमान सोशी, धीरोदात्ततेनें सहन करी. तो आपल्या हस्तलिखितांत एके ठिकाणीं लिहितो, "कपड्यांमुळें थंडीपासून बचाव होतो, तसा सहनशीलतेमुळें दुसऱ्यांनीं दिलेल्या त्रासापासून बचाव होतो. थंडी वाढेल तसतसे अधिकाधिक कपडे अंगावर घातल्यास थंडी कांहीं करूं शकणार नाहीं; तद्वतच लोक तुमच्या बाबतींत अधिकाधिक अन्याय करूं लागले तर अधिकाधिक सहिष्णु व सहनशील बना. म्हणजे त्या अन्यायांनीं व निंदा-अपमानांनीं तुमचें मन त्रस्त होणार नाहीं व त्यांची शक्ति नष्ट होईल."

व्यक्तींचा मूर्खपणा सहन करावयाला तो सिद्ध होता. पण मानवजातीचा मूर्खपणा पाहून मात्र त्याला तिरस्कार वाटे. तो एके ठिकाणीं लिहितो, 'मानवा, तुझ्या जातीविषयीं तुला काय वाटतें ? मानवजातीची मूर्खता व तिचा टोणपेपणा पाहून तुला लाज नाहीं वाटत ?'

पोकळ मानसन्मानांसाठीं सदैव आपापसांत झगडणारे राजे व सरदार पाहून त्याला गंमत वाटे. त्याचे आश्रयदाते राजवैभवाच्या कलेंत तज्ज्ञ होऊं पाहत होते; पण लिओनार्डो कलेच्या राजवैभवांत—भक्तिप्रेमांत—रंगला होता. त्याला जीवनाचा खरा आनंद सौंदर्यांतच सांपडला. इतर सारे खटाटोप ‘मृगजळापाठीमागें लागण्याप्रमाणें फोल’ असें तो म्हणे. (Koheleth-प्रमाणें) महत्त्वाकांक्षेंत अर्थ नाहीं. आशा शेवटीं निराशाच निर्मिते. तो लिहितो, “इच्छापूर्तीपेक्षां इच्छाच अधिक गोड असते.” कीर्तीसाठीं धडपडत असता स्वतःची मान व दुसऱ्याच्या माना मोडून घेणें हें हास्यास्पद होय. “झाडावर असताना गोड वाटणारें फळ तोंडात गेलें म्हणजे कडू लागतें.” आपल्या शक्तीच्या मर्यादा ओळखण्यास आपण शिकलें पाहिजे. फार मोठ्या ध्येयाची आशा धरणें मूर्खपणाचेंच नव्हे तर धोक्याचेंहि आहे. आपल्या बुद्धीच्या शक्त्यनुसार आपण आपल्या महत्त्वाकांक्षेचें मोजमाप ठेवावें; आपल्या आशा-आकांक्षा त्या पूर्ण करण्याच्या आपल्या शक्तीच्या पलीकडच्या असूं नयेत. “ज्यांची इच्छा आपण करतों तें प्राप्त होतेंच असें नसल्यामुळें मिळूं शकेल त्याचीच इच्छा आपण करूं या.”

इच्छा गोड असते; पण पूर्ति कडू असते, दुःखदायी असते. “अशी कोणतीहि निर्दोष देणगी नाहीं कीं जिच्यासाठीं खूप कष्ट पडत नाहींत.” हालाशिवाय, दुःखाशिवाय देणगीच नाहीं. लिओनार्डोसारख्या कलावन्ताच्या बाबतींत तर हें अधिकच सत्यार्थानें खरें आहे. कलावन्ताला अधिक निर्मितां येतें, अधिक प्राप्त करून घेता येतें; कारण, तो दुःखहि खूप सोसतो. ग्रीक कवींची अशी एक मीमांसा होती कीं, ज्ञान दुःखांतून व वेदनांतूनच संभवतें. जीवनाचा गंभीर अर्थ त्यांना समजला होता. म्हणूनच त्यांनीं असा प्रचार मांडला. Pathei Mathos. आपण सोसण्यास तयार असतों म्हणूनच आपण शिकूं शकतों. आपणांस असलेल्या मृत्यूच्या जाणिवेमुळेंच आपण जीवनाचा अर्थ समजूं शकतों.

लिओनार्डोला जीवनाचा खोल अर्थ नीट समजला होता; कारण, तो मृत्यूशीं नीट परिचित होता, मृत्यूचा अर्थ त्यानें पूर्णपणें ओळखला होता. त्याला वाटे कीं, मृत्यु मोठा फसव्या आहे. कधींहि पूर्ण न होणाऱ्या आशांचीं आमिषे दाखवून फसविणें हेंच मृत्यूचें काम! जो भविष्यकाळ कधींहि येणार

नाहीं त्याची आशा दाखवून मृत्यु फसवीत असतो. तो म्हणतो, "आपण नेहमीं भविष्याची आशा करीत असतों; पण भविष्य आपल्यासाठीं एकच निश्चित अशी गोष्ट ठेवीत असतें व ती म्हणजे सर्व आशांचें मरण! आपलें सारें जीवन म्हणजे मरणाची तयारी. मी जगण्यासाठीं शिकत आहें असें मला वाटे; पण तें शिकणें वस्तुतः मरण्यासाठींच होतें."

पण लिओनार्डो जें जें भोगावें लागे तें तें एकाद्या स्टोइकप्रमाणें शांतीने व हंसतमुखानें सहन करी. मृत्यूचें शेवटचें बोलावणें आलें तेव्हां तो दमल्याभागलेल्या मुलाप्रमाणें झोपीं जाण्यास तयार होता. विश्रांतीवर त्याचा हक्क होता. मरणापूर्वी थोडाच वेळ त्यानें आपल्या मित्रास लिहिलें, "एकादा दिवस चांगल्या कामांत गेला, सार्थकीं लागला, म्हणजे जशी झोंप सुरेख लागते, तद्वत् ज्यानें आपले जीवन नीट व्यतीत केलें आहे त्याला मरतांना आनंद होतो." तो वयाच्या सदुसष्टाव्या वर्षीं वारला. त्याचा मित्र मेल्सी लिहितो, "त्याचा वियोग प्रत्येकाला दुःसह आहे. त्याच्या मरणामुळें सर्वांना दुःख होत आहे. असा आणखी एकादा पुरुष निर्माण करणें निसर्गाच्या शक्तीच्या बाहेरचे आहे." लिओनार्डोच्याच शब्दांत सांगावयाचें झालें तर, विभूतिमान् पुरुषांविषयीं त्याने काढलेलेच शब्द आपणास त्यालाहि लावतां येतील : "तो मानवांत जन्मलेला देवदूत होता."



## प्रकरण १ लें

# पोपला धाब्यावर बसविणारा शेतकरी मार्टिन ल्यूथर

— १ —

लिओनार्डोच्या मृत्यूनें आपणांस सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धात आणून सोडलें आहे. दीड हजार वर्षें ख्रिश्चन धर्मांत राहणारी मानवजात आपण पाहिली व आपणांला लाजेनें कबूल करावें लागतें की, हें चित्र कांहीं फारसें अभिमानास्पद आहे असें नाहीं. मनुष्यप्राण्याच्या आरंभींच्या वृत्तींच्या रानांतून तो बराचसा बाहेर पडला आहेसें दिसत नाहीं. अद्यापिहि तो पशूच आहे. अद्यापिहि तो विनाशाचीं साधनेंच निर्मितांना दिसतो. त्याची भाषा पुष्कळ वेळां फसवी व दांभिकच असते. सत्यापासून व अहिंसेपासून तो अद्यापि दूर आहे. तो प्रासाद व मन्दिरें बांधण्यास शिकला, काव्यें-चित्रें-प्रवचनें निर्माण करण्यास शिकला, आपल्या करमणुकीसाठीं चुना व संगमरवर यांच्या उत्कृष्ट बाहुल्या करावयास शिकला; पण कलेच्या पूजेने जीवनाची पूजा करावयाला मात्र तो अद्याप शिकला नव्हता. तो ईश्वराची पूजा करीत असूनहि अद्यापि मानवबंधूंना खुशाल ठार करतो! तो खुनाचा जणूं धर्मच बनवितो. तो ख्रिस्ताच्या पावलांवर पावलें ठेवून जाणाऱ्यांचा ख्रिस्ताच्याच नांवानें छळ करतो. ख्रिश्चन धर्मांत पंधराशें वर्षे राहूनहि मानव अद्यापि माणुसकी शिकला नव्हता.

पण या चित्राला दुसरी, आशादायक अशीहि एक बाजू आहे. हा जो मानवांचा—दांभिकांचा, दुबळयांचा, पशूंचा-मेळावा दिसतो त्यांतूनच कधीं कधीं प्रज्ञेचे व अनंत धैर्याचे पुरुषहि निघतात; ज्या मानवी मातीतून आपण बनविले जातों, तिच्यांतूनच कधीं कधीं दैवी सौंदर्यहि प्रकट होऊं शकतें. असे दैवी पुरुष विरळा ही गोष्ट खरी; पण इतिहासांत मधूनमधून दिसणाऱ्या या व्यक्ती आशा दाखवितात कीं, याहून थोर मानव पुढें पैदा होतील; या नमुन्याहून अधिक थोर नमुने या मातींतूनच पुढें आणखीहि प्रकट होतील. भावी पिढ्यांना या व्यक्ती नीट दिसाव्या म्हणूनच जणूं त्या थोर व्यक्तींना त्यांच्या समकालीनांनीं क्रॉसवर खिळे ठोकून टांगून ठेवलें किंवा पुढील पिढ्यांना प्रकाश दिसावा म्हणूनच त्यांच्या शरीरांच्या मशाली पेटवून ठेवल्या!

जोंपर्यंत माणसें आपल्या मनांतील कल्पना व विचार स्थापण्यासाठीं दुसऱ्यांस ठार करीत आहेत, तोंपर्यंत मानवजात जंगलीच राहणार! तथापि आपल्या ध्येयासाठीं शांतपणें मरणास मिठी मारणारेहि आहेत तोंपर्यंत आपण अखेर सुधारणार, शेवटीं कां होईना पण सुसंस्कृत होणार, अशी अमर आशा बाळगण्यासहि जागा आहे.

कधीं कधीं आपल्या ध्येयार्थ स्वतःचें बलिदान करूं पाहणारा—मरावयाला तयार असणारा–समकालीनांच्या विषमय वृत्तीस बळी न पडतांनाहि दिसतो, मग तें सुदैव म्हणा वा दुर्दैव म्हणा. समकालीनांच्या तावडींतून वांचलेल्यांपैकीं मार्टिन ल्यूथर हा एक होता. त्याला पाखंडीपणाबद्दल पुनः मरणाची धमकी देण्यांत येत होती. पण तो नेहमीं निसटे. त्याचें वांचलेलें दीर्घ जीवन मानवजातीला केवळ आशीर्वादरूप व मंगलमय होतें का? आपण पाहूं या.

— २ —

इ. स. १५१० मधील गोष्ट. त्या वेळीं रोममधील सेंटपीटर चर्चची दुरुस्ती करावयाची होती, त्याचा जीर्णोद्धार करावयाचा होता. त्यासाठीं पोपनें क्षमापत्रें द्यावयाचें ठरविलें. जो कोणी या कामाला मदत करील त्याला पापमुक्तीचीं प्रशस्ति–पत्रें पोप दुसरा ज्यूलियस हा देणार होता. या प्रॉमिसरी नोटांत 'चर्चला मदत करतील त्यांना प्रभु मरणोत्तर सर्व पापांची क्षमा करील' असें आश्वासन देण्यांत येत असे. सनातनी लोकांना यांत कांहीं वावगें आहे असें वाटलें नाहीं. पोपचा स्वर्गाशीं प्रत्यक्ष व्यवहार असतो असें समजलें जाई. एकाद्यानें चर्चला लहानशी देणगी दिली तर त्याचा नरकांतील निवास थोडा कमी होई; देणगी मोठी असेल तर नरक अजी चुकवितां येत असे. यामुळें क्षमापत्रांचा हा पोपचा पापी धंदा चांगलाच तेजींत होता. हीं पाप–मुक्ति–पत्रें जास्तींत जास्त पैसे घेऊनच भटभिक्षुक विकीत.

सेंटपीटर चर्चच्या जीर्णोद्धारार्थ हीं पापमोचन–पत्रें मोठ्या गाजावाजानें विकलीं जाऊं लागलीं. ऐपतीपेक्षां अधिक पैसे देऊनहि शेतकऱ्यांनीं हीं चिठोरीं विकत घ्यावीं अशी जबरदस्ती त्यांच्यावर होऊं लागली. यामुळें ल्यूथरचा संताप जागृत झाला. तो धार्मिक वृत्तीचा कॅथॉलिक व डोमिनिकन पंथी होता, तरी त्याचें मन स्वतंत्र विचारांचें होतें. तो विटेनबर्ग विद्यापीठांत

धर्म या विषयाचा प्राध्यापक होता. ईश्वर राजकारणांत ढवळाढवळ करणार नाहीं, तद्वतच पोपांच्या या पापमोचक पत्रांशींहि त्याचा कांहींच संबंध नाहीं याविषयीं ल्यूथर निःशक होता.

१५५७ सालच्या ऑक्टोबरच्या एकतिसाव्या तारखेस त्यानें तेथील किल्ल्यांतल्या चर्चच्या दारावर पोपच्या कृत्यांचा जाहीर निषेध करणारें पत्रक लावलें. "मनुष्यांनीं केलेल्या पापांच्या बाबतींत प्रभूची जी कांहीं इच्छा असेल तिच्यांत ढवळाढवळ करण्याची शक्ति पोपला नाहीं, पोपचा असा हेतु असणें शक्य नाहीं. पोपकडून असलीं क्षमापत्रें घेण्यापेक्षां कांहीं खरीखुरीं सत्कर्में केल्यास मात्र ईश्वराचें लक्ष वेधलें जाण्याचा अधिक संभव आहे. भाडोत्री धर्मोपदेशक बहुजनसमाजावर करीत असलेले अनन्वित जुलूम पोपला समजल्यास सेटपीटर चर्च धुळीस मिळाले तरी चालेल, पण जनतेच्या रक्तानें व हाडांमासांनीं तें बांधणें नको, असेंच त्यालाहि निःसंशय वाटेल. ख्रिश्चन धर्मीयांनीं ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, पोप अत्यंत श्रीमंतांहूनहि श्रीमंत, कुबेराचाहि कुबेर आहे; तेव्हां त्याला एकट्याला सेंटपीटर चर्च बाधून काढणे मुळींच अवघड नाहीं. गरीब श्रद्धाळू लोकांपासून पैसे उकळून त्या पैशानें हें चर्च बांधण्यापेक्षां पोपनें आपल्या स्वतःच्याच पैशानें तें कां बांधूं नये?"

या जाहीर पत्रकाच्या शेवटीं तो म्हणतो, "माझ्याशीं मतभेद असणाऱ्यांना माझें आव्हान आहे. वाटल्यास त्यांनीं माझीं मतें व माझे मुद्दे खोडून काढावे." या वेळीं ल्यूथर चौतीस वर्षांचा नवजवान होता.

ल्यूथरच्या आव्हानामुळें वादाचें वादळच उठलें! पोपची सत्ता धुडकावून लावणारा हा ल्यूथर पाखंडी आहे असें भटभिक्षुक, धर्मोपदेशक, सारे म्हणूं लागले. पण जुलुमामुळें गांजलेली जनता नवीन धर्म्य बंड करणाऱ्या या वीराभोंवतीं उभी राहिली व 'हा आमचा पुढारी!' असें म्हणूं लागली.

पोपला सेंटपीटरचें कॅथॉलिक चर्च बांधावयाचें होतें. त्याला विरोध करण्यास उभा राहिलेला ल्यूथर 'प्रॉटेस्टंट चर्च बांधणारा' म्हणून अमर झाला. त्याच्या मनांत नसतांहि त्याला प्रॉटेस्टंट चर्चचा पाया घालावा लागला.

पण प्रॉटेस्टंट पंथीय सुधारणेचें कारण केवळ येवढेंच नव्हतें. खरीं कारणें दुसरींच व फार खोल आणि गंभीर होतीं. या चळवळीचीं बीजें कित्येक

शतकांपूर्वीच नास्तिक म्हणून समजल्या गेलेल्या लोकांकडून पेरलीं गेलेलीं होतीं. तीं नवयुगांत नीट रुजलीं; त्यांनी मूळ धरलें व चर्चनें जुलूम केला तरी—नव्हे, चर्चनें जुलूम केल्यामुळेंच-तीं अंकुरलीं व योग्य वेळीं ल्यूथरनें केलेल्या धार्मिक स्वातंत्र्याच्या घोषणेच्या रूपानें फुललीं. धार्मिक स्वातंत्र्याचा आत्मा चारशें वर्षे साकार होऊं पाहत होता. ल्यूथरनें त्या आत्म्याला देह दिला; पण देह देऊन त्यानें आत्मा मारला असेंच पुढें दिसून येईल.

— ३ —

ल्यूथरनें धार्मिक वादळ उत्पन्न केल्यामुळें त्याला १५१८ सालच्या ऑक्टोबरांत ऑग्सबर्ग येथें बोलावण्यांत आलें व बंडखोर विचार सोडून देण्याबद्दल आज्ञा करण्यांत आली. पण ल्यूथर ठाण मांडून उभा होता. त्यानें कांहींहि करण्याचें नाकारलें. तो जर्मनींत फारच लोकप्रिय होता. दोन वर्षेपर्यंत चर्च त्याच्या वाटेला गेलें नाहीं. पण सौम्यतेनें मन वळवून काम होत नाहीं असें आढळतांच पोप छळण्यास उभा राहिला. १५२० सालच्या जूनमध्यें एक आज्ञापत्र काढून 'ल्यूथरचीं मतें अधार्मिक आहेत' असा शिक्का पोपनें त्यांवर मारला आणि ल्यूथरचीं सर्व पुस्तकें जाळून टाकण्याची आज्ञा केली. त्यानें ल्यूथरला क्षमा मागण्यासाठीं साठ दिवसांची मुदत दिली. तेवढ्या मुदतींत क्षमा मागून आपलें म्हणणें मागें न घेतल्यास त्याला शापित ठरविण्यांत येईल अशी धमकी दिली! ल्यूथरनें शापित होणेंच पसंत केलें. पोपच्या पत्रकाला त्यानें तेजस्वी उत्तर देऊन पोपला त्याच्या चिल्यां-पिल्यांसकट आशीर्वादपूर्वक सैतानाकडे पाठवून दिलें. विटेनबर्ग येथील जनता व विद्यार्थी यांचा उत्साह उचंबळला. ल्यूथरनें पोपच्या पत्रकाची व विरोधकांच्या लिखाणाची जाहीररीत्या होळी केली!

पोपनें नाटकाच्या शेवटच्या अंकाची सजावट सुरू केली व पाखंडी ल्यूथरला भस्मसात् करण्याचें ठरविलें. पण अंकाला सुरुवात होण्यापूर्वी मुख्य पात्रच पळून गेलें! ल्यूथरला त्याच्या इच्छेविरुद्ध त्याच्या मित्रांनीं वार्टबर्गच्या किल्ल्यांत नेलें व तो तेथें नांव बदलून राहूं लागला. जर्मनीमध्यें नव्या करारांचें ग्रीकमधून भाषांतर करून तो आपला वेळ घालवीत होता. 'बायबल प्रत्येकाला वाचतां आलें पाहिजे' असें वुइक्लिफप्रमाणेंच त्याचेंहि

मत होतें व पोपांचीं भाष्यें, विवरणें व स्पष्टीकरणें वाचण्याऐवजीं बायबल स्वतः वाचून स्वतःच त्याचा अर्थ करावा असें त्यानें प्रतिपादिलें.

ल्यूथर अदृश्य झाल्यावर एक महिन्यानें सम्राटानें 'ल्यूथर चर्चचा पाखंडी शत्रु व स्टेटचाहि वैरी आहे' असें जाहीर केलें. ल्यूथर कायद्याच्या ऐहिक व पारमार्थिक बाहूंत ( दोर्दंडांत ) सांपडला. ल्यूथर आतां एक तर कायमचा अंधारांत तरी गडप होणार अगर हुतात्मा तरी होणार असें स्पष्ट दिसत असतां पुनः त्याला दैवानें हात दिला. कारण याच वेळीं फ्रेंचांनीं जर्मनीशीं युद्ध सुरू केल्यामुळें नास्तिकांना माफी देण्यांत आली ! सम्राट् दहा वर्षें युद्धांत गुंतल्यामुळें ल्यूथरला आपल्या सुधारणेची योजना आंखून कार्यक्रम निश्चित करण्यास भरपूर वेळ मिळाला.

त्याला प्रारंभीं तरी कॅथॉलिक चर्चपासून अलग होण्याची इच्छा नव्हती, नवीन धर्म सुरू करण्याचीहि त्याची मनीषा नव्हती. तो जुन्याच धर्मांतील दोष काढून टाकूं इच्छीत होता. त्याचा धर्मोपाध्यायाच्या उद्दामपणाला विरोध होता. या धर्मोपाध्यायांनीं आपण इतरांहून श्रेष्ठ असें का समजावें हेंच त्याला कळेना. चर्चच्या अधिकाऱ्यांनीं केवळ ईश्वराचेच सेवक होऊन भागणार नाहीं, तर त्यांनीं जनतेचेहि सेवक झालें पाहिजे असें त्याला वाटे. ल्यूथरनें धर्मोपदेशकांना " सामान्य लोकांप्रमाणें राहा, विवाह करा, आपली वागणूक सुधारा, आढ्यतेनें जनतेपासून दूर राहूं नका, निराळे पोषाख नकोत, कांहीं नको ! " असें सांगितलें.

चर्चच्या कांहीं उत्सव-समारंभांनाहि ल्यूथरचा विरोध होता. एका विशिष्ट पद्धतीनेंच प्रार्थना केली पाहिजे असा सनातनी कॅथॉलिकांचा आग्रह असे. ल्यूथर म्हणे कीं, आपलीच प्रार्थनापद्धति प्रभूला अधिक पसंत पडेल. अर्थातच हा प्रश्न औपचारिक होता. पण सोळाव्या शतकात औपचारिकपणालाहि फार महत्त्व असे. एकाद्या धार्मिक वचनाचा अर्थ कसा लावावा यावर रणें माजत, कत्तलीहि होत ! एकाद्या अध्यात्मिक वाक्यांत स्वल्पविराम कोठें असावा इतक्या क्षुल्लक मुद्द्यावरूनहि युद्धें पेटत !

ल्यूथरची सनातन कॅथॉलिक चर्चवरची श्रद्धा अजीबात उडाली होती असें नव्हे. 'थोडीं नवीं तत्त्वें, थोडे नवे विचार, कांहीं नवे विधि-निषेध, कांहीं जुन्या अवडंबरांची छाटाछाट' असें जुनें चर्च सुधारण्याचें त्याचें धोरण होतें.

त्याचे कांहीं विचार उदात्त असले तरी त्याचें पुष्कळसें म्हणणें. हास्यास्पदच होतें. त्याला नवें बांधावयाचें नव्हतें तर जुन्यालाच थोडेंसें वळण द्यावयाचें होतें. त्याला कॅथॉलिकांनीं बहिष्कृत केल्यामुळेंच तो स्वतःचें नवें प्रॉटेस्टंट चर्च स्थापण्यास सिद्ध झाला. कॅथॉलिक चर्च व प्रॉटेस्टंट चर्च यांत केवळ बाह्यतःच फरक होता असें नव्हे, तर आंतर फरकहि होणार होता. दोन्ही चर्चमध्यें अंतर्बाह्य भेद होता. प्रॉटेस्टंट चर्चमध्यें जो तो आपआपला धर्मोपाध्याय होता. ईश्वर व भक्त यांच्या दरम्यान मधल्या पंड्यांची जरुरी राहिली नव्हती. प्रत्येकास आपापल्या इच्छेनुसार ईश्वराची पूजा करण्याची मुभा देण्यांत आली होती. प्रॉटेस्टंट पंथीयांनीं पोपची सत्ता मानण्याऐवजीं बायबलची सत्ता मानावयाची होती व हें आपलें धोरणच अधिक चांगलें असें प्रॉटेस्टंट रोमन कॅथॉलिकांना पटवून देत असत.

पण आतां प्रॉटेस्टंट व कॅथॉलिक एकमेकास जाळूं लागले, फांशीं देऊं लागले. चर्चच्या पूर्वीच्या कांहीं पाद्र्यांप्रमाणें ल्यूथरहि आपल्या अनुयायांना सर्वांत महत्त्वाची एक गोष्ट सांगावयाला विसरला. त्यानें धार्मिक सहिष्णुतेचें महत्त्व शिकविलें नाहीं.

— ४ —

ल्यूथर आपल्या सार्वजनिक जीवनाच्या आरंभीं दयाळू, धैर्यशाली व शहाणा होता. त्याचें धैर्य शेवटपर्यंत टिकलें; पण दया व प्रज्ञा यांनीं मात्र त्याला पुढील वादविवादाच्या गोंधळांत दगा दिला. तरुणपणीं तो परित्यक्तांना व धर्मबाह्यांना दया दाखवी. स्वतः शेतकरी असल्यामुळें तो शेतकऱ्यांचा कैवारी व मोठा मित्र होता. छळाची कटुता त्यानें स्वतः चाखली होती, त्यामुळें छळल्या जाणाऱ्या ज्यूंविषयीं त्याला सहानुभूति वाटे. 'येशू हा ज्यू होता' या निबंधांत ल्यूथर लिहितो, " ज्यू हे येशूचे आप्तच आहेत. त्यांचें रक्त एकच आहे आणि रक्त व मांस यांची प्रतिष्ठा अधिक असेल तर आपण जितके ख्रिस्ताचे आहों त्यापेक्षां ज्यूच ख्रिस्ताचे अधिक आहेत. ... म्हणून माझें सांगणें आहे कीं, ज्यूंना आपण दयाळूपणानें वागविलें पाहिजे. पोपच्या कायद्याला न मानतां आपण ख्रिस्तानें शिकविलेला प्रेमाचा कायदाच पाळला पाहिजे. आपण ज्यूंचे मित्र होऊं या. "

पण पुढें जेव्हां शेतकरी राजेरजवाड्यांच्या जुलुमाविरुद्ध बंडाची भाषा बोलूं लागले, तेव्हां पोपच्या जुलुमाविरुद्ध बंड करणारा ल्यूथरच राजाची बाजू घेऊन शेतकऱ्यांना शाप देऊं लागला. त्यानें 'वरिष्ठ सत्ता प्रत्येकानें मानलीच पाहिजे' अशी गर्जना केली. पोपच्या बाबतींत निर्णय ठरविण्याचा हक्क लोकांस आहे असें म्हणणाराच ल्यूथर राजाच्या बाबतींत मात्र जनतेचा निर्णय ठरविण्याचा हक्क नाकारीत होता. राजानें कांहींहि अन्याय केला तरी त्याच्याविरुद्ध बंड करणें कधींहि क्षम्य होणार नाहीं असें तो म्हणे. स्वर्गामध्यें सामाजिक न्याय स्थापण्यासाठीं तो जन्मभर धडपडला; पण पृथ्वीवर सामाजिक न्याय स्थापण्यासाठीं धडपडणाऱ्या शेतकऱ्यांना मात्र त्यानें शिव्याशाप दिले. 'खुनी व लुटालूट करणारे गुंड शेतकरी' असें एक पत्रक त्यानें लिहिलें. थोर इरॅसम्‌नें या पत्रकावर 'केवळ रानटी' असा शेरा मारला. या पत्रकांत ल्यूथर राजांना आग्रहानें सांगतो, "हें शेतकऱ्यांचें बंड रक्तांत बुडवून टाका." ख्रिस्ताच्या प्रेमधर्माचा हा शेवटचा भाष्यकार लिहितो, "राजेरजवाड्यांनो, इकडे या. हें बंड मोडावयाचें आहे. हें अराजक थांबवायचें आहे. स्टेट वांचवायचें आहे. या सारे धांवून. हाणा, मारा, भोंसका, ठार करा, गळे दाबा." राजेरजवाड्याना पुनः असें प्रवचन पाजण्याची गरज नव्हती. या नवीन धर्मसुधारकापासून स्फूर्ति व संदेश घेऊन त्यांनीं शेतकऱ्यास ठायीं ठायीं ठेंचलें, मारलें, हाणलें, ठार केलें आणि अल्पावधींतच हें बंड शांत केलें.

ज्यूंच्या बाबतींतहि त्याची पूर्वींची वृत्ति बदलली. ज्यूंना ते पुढें प्रॉटेस्टंट होतील या आशेनें त्यानें सहानुभूति दाखविली होती. पण आपल्याच धर्माला चिकटून राहण्याचा त्यांचा अभंग निश्चय जेव्हां दिसून आला तेव्हां तो त्यांच्यावरहि आग पाखडूं लागला. पूर्वी जसा तो शेतकऱ्यांवर तुटून पडला तसा आतां तो ज्यूंवरहि उलटला. "ज्यूंच्या बाबतींत काय करावें?" असा प्रश्न विचारला असतां त्यानें जाहीररीत्या दिलेल्या उत्तरांत तो म्हणतो, "त्यांचीं धर्ममंदिरें व त्यांच्या पाठशाळा जाळून टाका." जें जळणार नाहीं तें मातींत गाडून टाका. त्यांचीं घरें लुटा, बरबाद करा. त्यांचीं प्रार्थनापुस्तकें, त्यांचे धर्म-ग्रंथ, सारें जप्त करा. त्यांच्या धर्मोपाध्यायांना धर्म शिकविण्याची बंदी करा. जर ते ऐकणार नाहींत तर त्यांना 'तुम्हांला ठार मारण्यांत

येईल, तुमचें अवयवच्छेदन होईल' असें सांगा व तरीहि त्यांनीं न ऐकल्यास त्याच्या जिभा उपटा." ज्या ज्यूंनीं ल्यूथरला त्याचा देव दिला, येशू दिला, त्या ज्यूंवरच त्यानें अशी आग पाखडली! जवळजवळ चारशें पृष्ठांचें शापपुराण त्यानें ज्यूंच्या बाबतींत खरडलें आहे.

वयाच्या त्रेसष्ठाव्या वर्षीं म्हणजे १५४६ सालीं ल्यूथर मरण पावला. जुलुमाविरुद्ध बंड करून त्यानें सार्वजनिक जीवनास आरंभ केला, पण शेवटीं तो स्वतःच जुलूम करणारा झाला. प्रो. जॉर्ज फूट मूर हा आपल्या 'धर्माचा इतिहास' नामक ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत लिहितो, "मध्ययुगांतील चर्च ज्याप्रमाणें सत्ता व मत्ता यांमागें उभें असे, त्याचप्रमाणें ल्यूथरचा धर्महि सत्ताधीशांना व मालदारांना आशीर्वाद देण्यासाठींच उभा राहिला. बायबलांतून इहलोकीं व परलोकीं नवीन आशा मिळेल असें ज्यांस वाटत होतें, त्यांच्या आशेची ल्यूथरनें राखरांगोळी करून टाकली!"

हेंच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, ख्रिस्तानें पददलितांच्या रक्षणासाठीं धर्म स्थापला; पण ल्यूथरनें मात्र पूर्वीच्या कित्येक कॅथॉलिकांप्रमाणेच पददलितांवर जुलूम करणारा धर्मच स्थापण्याचा यत्न केला. रूढ ख्रिश्चन धर्म ख्रिस्ताच्या धर्मापासून अद्याप फार दूर होता.

## प्रकरण २ रें

# सैतानाचा शिष्य मॅकिआव्हिली

— १ —

इतिहासांत प्रामाणिक दुष्ट-शिरोमणि कोणी असेल तर तो मॅकिआव्हिली होय. ज्या काळांत लोक देवदूताप्रमाणें बोलत व डाकूंप्रमाणें वागत त्या काळांत तो होऊन गेला. तो स्पेनच्या फर्डिनंड राजाचा समकालीन होता. फर्डिनंड ही काय व्यक्ति होती हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. लोकांना विषें देऊन त्यांच्या आत्म्यांना पुनः आशीर्वाद देणारा पोप सहावा अलेक्झांडर व त्याचा मुलगा सीझर बोर्जियो यांचा तो समकालीन होता. त्या काळांत पोपांना लग्नाची परवानगी नसे. पण त्यांना मुलें असलीं तरी मात्र चालत! सीझर बोर्जियो हा सत्पात्र पित्याचा सत्पात्र पुत्र होता. त्यानें आपल्या वडील भावाचा खून केला

व आपल्या मेहुण्याचा तसेंच जे जे मार्गांत आडवे आले त्या सर्वांचा वध केला. दंभकलेंत तो पित्याप्रमाणेंच पारंगत होता, दुसऱ्यांचे खून करण्यांत पटाईत होता. मित्रांना मिठी मारतां मारतां तो खंजीर भोंसकी, जेवावयास बसलेल्यांना अन्नांतून विष चारी. पित्याच्या कारस्थानामुळें मध्यइटलींतील मोठ्या भागाचा तो ड्यूक झाला व स्वतःच्या कारवायांनीं पश्चिम युरोपातील राजांमहाराजांत त्यानें मानाचें व महत्त्वाचें स्थान मिळविलें.

राजा फर्डिनंड, पोप अलेक्झांडर व सीझर बोर्जियो हे त्या काळांतील तशा प्रकारच्या लोकांचे जणूं प्रतिनिधीच होते! त्यांच्याप्रमाणें वागणारे पुष्कळ लोक त्या काळांत होते. सामान्य लोकांचें लक्ष स्वर्गाकडे वळवून त्यांचा संसार हे लुटून घेत. त्यांना पारलौकिक गोष्टींत रमवून त्यांच्या ऐहिक वस्तू हे लुबाडीत. यांना न्याय व दया माहीत नसत; सत्ता व संपत्ति हींच यांचीं दैवतें! ईश्वराच्या शब्दावर आमचा विश्वास आहे असे हे दाखवीत, पण वस्तुतः स्वतःच्या स्वार्थाचा आवाज मात्र ऐकत. बायबल म्हणजे गुलामांचें आचार–पुस्तक असें हे मानीत. ज्यांना जगांत मोठेपणा मिळवावयाचा आहे, सर्व विरोध नष्ट करावयाचे आहेत, वैभवाच्या शिखरावर चढावयाचें आहे, त्यांच्यासाठीं बायबलांतील आज्ञा नाहींत. पण फर्डिनंडसारख्यांच्या डोळ्यांसमोर एकच ध्येय असे व तें म्हणजे लोकांचे पुढारी होणें. त्यांच्या मतें एकच वर्तन योग्य असे व तें म्हणजे पशूचें वर्तन.

मॅकिआव्हिलीच्या काळांतील महत्त्वाकांक्षी युरोपचें ध्येय हें असें होतें. सर्व लोकांना वाटत होतें कीं, नवें नीतिशास्त्र हवें. मात्र दंभामुळें त्यांना तसें बोलण्याचें धैर्य नव्हतें. त्यांना असें नीतिशास्त्र हवें होतें कीं, त्याच्या योगानें कसें फसवावें व कसें चोरावें हें शिकावयास मिळेल; सर्वांच्या डोक्यांवर बसतां यावें म्हणून कोणास कसें ठार करावें हें सांगणारें नीतिशास्त्र त्यांना हवें होतें. थोडक्यांत म्हणजे त्यांना चोरांचें व डाकूंचें एक क्रमिक पुस्तक पाहिजे होतें.

ही उणीव मॅकिआव्हिलीनें दूर केली. माणसें खरोखर जशीं होतीं तशीं त्यानें रंगविलीं. माणसें जशीं दिसतात तशीं नसतात. मॅकिआव्हिली यथार्थवादी होता. युरोप रानटी प्राण्यांचें एक वारूळ आहे असें त्यानें

दाखवून दिलें व निर्लज्ज आणि बेशरम मोकळेपणानें या रानटी पशुपणांत कसें यशस्वी व्हावें हें युरोपियन जनतेस समजेल अशा भाषेंत सांगितलें.

त्यानें युरोपला पशुत्वाचें एक नवीन सूत्रमय शास्त्रच दिलें. जगानें धक्का बसल्याचा बहाणा केला, पण मनांत त्याला गुदगुल्याच झाल्या! मॅकिआव्हिलीनें नेमकें त्याच्या मनांतलेंच सांगितलें होतें. सुवर्णमध्याच्या कायद्याऐवजीं त्यानें लोखंडी कायदा दिला. ख्रिस्ताचें पर्वतोपनिषद् त्यानें अव्यवहार्य स्वप्न म्हणून फेंकून दिलें! त्याऐवजीं त्यानें तरवारीचें उपनिषद् उपदेशिलें. तोहि इतरांप्रमाणें जंगलीच होता; पण तो निदान दांभिक तरी नव्हता. जंगली असून तो साळसूदपणाचा आव आणीत नसे.

— २ —

मॅकिआव्हिली हा जन्मानें फ्लॉरेन्टाइन होता. युरोपातील अनेक दरबारात त्याला मुत्सद्देगिरीचें शिक्षण मिळालें होतें. इ. स. १५०२ ते इ. स. १५१२ पर्यंत दहा वर्षें तो फ्लॉरेन्सच्या आमरण अध्यक्षाचा—सॉडेरिनी याचा—उजवा हात होता. युरोपांतील नाटकाच्या पडद्याआड चाललेल्या भानगडी नीटपणें पाहण्याची संधि त्याला मिळाली. त्यानें फ्लॉरेन्सच्या सैन्याची पुनर्रचना केली; सॉडेरिनीचीं भाषणें तोच लिहून देई; सॉडेरिनीच्या पुष्कळशा कृत्यांबद्दलहि तोच जबाबदार होता.

लॉरेंझो डी मेडिसी यानें जेव्हां सॉडेरिनीस पदच्युत केलें, तेव्हां मॅकिआव्हिलीचा खूप छळ केला गेला आणि नंतर फ्लॉरेन्सपासून बारा मैलांवर असलेल्या एका गांवीं त्याला निर्वासित करण्यांत आलें. फ्लॉरेन्समध्यें काय काय चाललें आहे हें तो तेथून पाहूं शकत असे. पण मेडिसीच्या धोरणांत ढवळाढवळ करण्याइतका जवळ तो नव्हता. राजकारणांत प्रत्यक्ष भाग घेतां येत नसल्यामुळें यशस्वी राजकारणी कसें व्हावें याचें शिक्षण तो इतरांस देऊं लागला. राजकारणावर, मुत्सद्देगिरीवर, त्यानें अनेक पत्रकें लिहिलीं. त्यानें या पत्रकांस 'शासनविषयक कापट्य' असें नांव दिलें होतें. 'स्टेट-क्रॅफ्ट' म्हणजे मुत्सद्दी होण्यासाठीं करावें लागणारें क्रॅफ्ट किंवा कपट. युद्धाच्या कलेवर त्यानें सात पत्रकें लिहिलीं, विवाहावर एक उपरोधक निबंध लिहिला, एकदोन सैतानी नाटकें लिहिलीं, पुष्कळशा विषय-

लंपटतेच्या यथार्थवादी गोष्टी लिहिल्या. त्यानें नीतीची उलटापालट केली व रानवटांच्या जगाला बिनदिक्कत सांगून टाकलें कीं, अप्रामाणिकपणाचें धोरणच यशस्वी होते; तोच सर्वोत्तम मार्ग! या जगांत पुढारीपणासाठीं निर्दय झगडा चाललेला असतो. अशा या जगांत उदात्ततेला व उदारतेला, सहृदय व सुसंस्कृत अभिरुचीला वाव आहेच कोठे? युद्ध आणि तें प्रामाणिकपणें करणें ही गोष्ट हास्यास्पद होय. तो म्हणतो, "युद्धांत प्रामाणिकपणा कधींहि नसतो. जें जें कराल तें तें चांगलेंच असतें. जर शत्रूला भोंसकावयाचें असेल तर निदान त्याच्या पाठींत भोंसकण्याइतके तरी शहाणे व्हा."

मॅकिआव्हिलीचें शाठ्यनीतीचें जगप्रसिद्ध पुस्तक 'प्रिन्स' म्हणजे 'राजा' हें होय. या पुस्तकांत त्यानें आपले विचार स्पष्टपणें मांडले आहेत. हें पुस्तक म्हणजे जुलुमाचें क्रमिक पुस्तकच म्हणाना! मॅकिआव्हिली हा सीझर बोर्जियाचा चाहता होता. आपल्या 'राजा' या पुस्तकांत मोठेपणाचा आदर्श म्हणून त्यानें सीझर बोर्जिया पुढे ठेवला आहे. बोर्जियाप्रमाणें सर्व राजांनीं वागावें असें तो सांगतो. एकाद्या नवीन स्टेटचा कारभार हातीं घ्यावयाचा असेल, आपलें प्रभुत्व त्या राष्ट्रावर ठेवावयाचें असेल, तर बोर्जिया वागतो तसेंच वागले पाहिजे असें तो सांगतो. त्याला प्रजेच्या कल्याणाची पर्वा नसे. राजाचा स्वार्थ कसा साधेल येवढेंच तो पाही. पंधराव्या व सोळाव्या शतकांत युरोपांतील नीति कशी होती या बाबतींत हें पुस्तक म्हणजे उत्कृष्ट टीका होय.

या पुस्तकाची नीट कल्पना यावी म्हणून त्यांतील मॅकिआव्हिलीच्या जणूं 'दहा आज्ञा'च अशीं दहा सूत्रें पुढें दिलीं आहेत :—

१. स्वतःचा फायदा पाहा.
२. स्वतःशिवाय दुसऱ्या कोणाला मान देऊं नका.
३. साधुतेचें ढोंग करून दुष्ट आचरण करा.
४. जें जें शक्य असेल तें तें मिळवा, घ्या.
५. कंजूष असा.
६. पशुवत् वागा.

७. संधि सांपडेल तेव्हां तेव्हां दुसऱ्यांना फसवा.

८. शत्रूंना ठार कराच करा, पण जरूर तर मित्रांनाहि.

९. —(दुसऱ्यांशीं वागतांना) दया दाखविण्यापेक्षां शक्ति दाखवा.

१०. युद्धाशिवाय कशाचाहि विचार करूं नका.

यांतील प्रत्येक आज्ञा आपण जरा नीट पाहूं या:—

१. 'स्वतःचा फायदा पाहा' ही त्याची पहिली आज्ञा. मॅकिआव्हिली हा नैतिकदृष्ट्या अंध होता. हें सारे जग एक आहे ही कल्पनाहि त्याला शिवली नव्हती! हा मानवसमाज म्हणजे भावांभावांचें एक कुटुंब आहे, सुखदुःखांत त्यांनीं परस्परांशीं एकरूप व्हावें, असें त्याला कधींहि वाटलें नाहीं. माणसें म्हणजे इतस्ततः पसरलेले रानटी पशूंचे कळप आहेत, अडाणी पशूंचे गट आहेत, असेंच तो मानी! या जगांत कांहीं भोळे लोक आहेत, कांहीं दुष्ट पशू आहेत. दुष्टांनीं भोळ्यांभाबड्यांना स्वतःच्या सेवेसाठीं राबवावें असे त्याचें स्पष्ट मत होतें. या भोळसटांवर जुलूम करणे, त्यांना चाबूक दाखविणें, हाच खरा मार्ग. याच रीतीनें त्यांचा उपयोग करून घेतां येईल असें तो म्हणे. जंगलचा कायदा असा आहे कीं, तुम्ही जर दुसऱ्याला हीनदीन न कराल तर दुसरे तुम्हांस हीनदीन करतील. बळी तो कान पिळी! म्हणून तो म्हणतो कीं, जे बलवन्त आहेत त्यांनीं आपल्या शक्तीचा प्रभाव दाखवावा व दुबळ्यांनीं आपल्या स्वतःच्या संरक्षणासाठीं गडबड करूं नये, अशा अर्थाचे कायदे करावे. प्रबळांची सेवा करणें हें दुबळ्यांचें कर्तव्य आहे. प्रबळांचें कर्तव्य मात्र एकच व तें म्हणजे स्वतःची सेवा करणें, स्वतःचा स्वार्थ साधणें.

२. दुसरें सूत्र 'स्वतःशिवाय दुसऱ्या कोणाला मान देऊं नका' हें आहे. तो लिहितो, दुसऱ्याच्या मोठेपणास जो कारणीभूत होईल तो स्वतःच नष्ट होईल. दुसऱ्यांचे हितसंबंध तोंपर्यंतच वाढवावे, दुसऱ्यांना तोंपर्यंतच गौरवावें, कीं जोंपर्यंत त्यांचा स्वतःच्या स्वार्थासाठीं उपयोग करून घेतां येईल. पण ते अधिक लोकप्रिय होऊं लागले तर त्यांना ठार करावें. महत्त्वाकांक्षी मनुष्याला प्रतिस्पर्धी असणें बरें नव्हे; ते नाहींसे केलेच पाहिजेत. यशस्वी राष्ट्राला एकच धनी असावा, एकच हुकूमशहा असावा; बाकी सर्वांनीं त्याचे गुलाम असावें. राजानें दुसऱ्यांपासून नजराणे घ्यावे, दुसऱ्यांकडून

स्तुतिसुमनांजलि घ्यावी, पण स्वतः मात्र कोणाचीहि स्तुति करूं नये, कोणालाहि देणगी वगैरे कांहीं देऊं नये.

३. 'साधुतेचें ढोंग करून दुष्ट आचरण करा' हें तिसरें सूत्र. वाईटच करा, पण चांगलें करीत असल्याची बतावणी करण्यास चुकूं नका. अप्रामाणिकपणा व दंभ यांवर मॅकिआव्हिलीचा विश्वास होता. मुत्सद्द्यानें कधींहि मनांतील गोष्ट मोकळेपणानें सांगूं नये असें तो प्रांजलपणें म्हणे. आपण भलेपणानें वागणें अहितकर होय. पण भलेपणाचे सोंग करणें मात्र फायदेशीर असतें. जो अत्यंत चांगुलपणानें राहण्याची पराकाष्ठा करील, जो साधुतेचा आदर्श होऊं इच्छील, त्याचाच शेवटीं या भोंदू व दुष्ट जगांत नाश होईल. मॅकिआव्हिली म्हणतो, "आपली सत्ता राहावी, दुसऱ्यांना लुटतां यावें, म्हणून राजानें न्यायबुद्धि, भूतदया, माणुसकी, विश्वास वगैरेंना रजा दिली पाहिजे. या सद्गुणांच्या विरुद्ध, याच्या उलट त्यानें वागलें पाहिजे; पण आपण अशा रीतीनें वागतों असें प्रजेला कळूं मात्र देतां कामा नये. राजा उदार आहे, दयाळू आहे, धार्मिक आहे, न्यायी आहे, असेंच प्रजेला सतत वाटेल अशी खबरदारी त्यानें घेतली पाहिजे. राजा प्रजेला वस्तुतः चिरडून टाकीत असतांहि तो आपलें रक्षण करीत आहे, असेंच ज्याला प्रजेला भासवितां येईल तोच खरा यशस्वी राजा!" ओठांवर दया जरूर असूं दे, पण पोटांत मात्र पापच असूं दे, अशी राजांना मॅकिआव्हिलीची शिकवण आहे.

४. 'जें जें शक्य असेल तें तें मिळवा, घ्या' हें चवथें सूत्र. स्वार्थी असा, लोभी असा, जें जें मिळवितां येईल तें तें मिळवा. मॅकिआव्हिलीच्या दुष्ट स्मृतीप्रमाणे राजानें स्वतःच्या इच्छापूर्तीशिवाय अन्य कशाचाहि विचार करूं नये, दुसऱ्यांच्या हक्कांची काळजी करूं नये. शक्य तें सारें लुटा, विरोध करणाऱ्यांना गप्प बसवा, पण उदार असण्याची शेखी मिरविण्यास मात्र चुकूं नका. तथापि अतिलोभ नको; पण तो वाईट आहे म्हणून नव्हे, तर त्यांत धोका आहे म्हणून. परकीयांची लुटालूट करणें फार चांगलें; मात्र ते सूड घेऊं शकणार नाहींत असे असावे. स्वतःच्याच प्रजेवर फार कर बसवाल तर बंड होण्याची शक्यता असते. राजाला प्रजा रागानें पदच्युत करील अशी भीति असते. थोडक्यांत सांगावयाचें तर दुबळ्यांना लुटा व प्रबळांच्या बाबतींत सावध राहा. अशा रीतीनें वागाल तरच तुम्ही मोठे व्हाल.

५. ' कंजूष असा ' हें पांचवें सूत्र. कृपणपणा करा. मॅकिआव्हिली आपल्या पाशवी नीतिशास्त्रात पुढें सागतो कीं, शक्य तों दुसऱ्यांच्या पैशांतून खर्च चालवावा व स्वतःचा पैसा वाचवावा. आपल्या प्रजेचें मनोरंजन करण्यांत राजानें उधळपट्टी करूं नये. स्वतःच्या पैशानें खावें, पण मेजवान्या वगैरे देऊं नये. प्रजेसाठीं खूप द्रव्य खर्चें केल्यास उदारात्मा म्हणून कीर्ति होईल. पण लवकरच जवळचें सारें संपेल, प्रजेवर अधिक कर बसवावे लागतील व शेवटीं नाश होईल. स्वतःच्याच देशांत उभारलेल्या व मिळविलेल्या पैशांतून उदार-पणा दाखविणाऱ्या राजाचा शेवटीं विनाश होतो. " स्वतःचें जें आहे तें देऊन टाकाल तर शेवटीं पस्तावाल." पण युद्धांत परकीयांपासून लुटून आणलेल्या पैशानें उदारपणा खुशाल दाखवावा, प्रजेचें वाटेल तितकें मनोरंजन करावें. कारण, त्यामुळें प्रजा राजाला उदार म्हणेल, इतकेंच नव्हे तर त्याच्यासाठीं ती लढावयाला व मरावयालाहि सदैव तयार राहील.

६. ' पशुवत् वागा ' हें सहावें सूत्र. राजानें सौम्य वा मृदुप्रकृति असून कधींहि चालणार नाहीं. सर्वांना गुलाम करणें हें तर राजाचें काम. मॅकिआ-व्हिली सागतो, " सीझर बोर्जिया समकालीन राजांहून श्रेष्ठ आहे; कारण, तो सर्वांहून अधिक दुष्ट आहे." [ पण या दुष्टपणामुळेच या सीझर बोर्जियाचें भाग्य अस्तास गेलें हें मॅकिआव्हिलीला दिसलें नाहीं. ] स्पेनचा राजा फर्डिनंड याच्या दुष्टपणाचीहि मॅकिआव्हिलीनें स्तुति केली आहे. मॅकिआव्हिली म्हणतो, " पशु असेल तोच यशस्वी राजा होऊं शकेल. जे न्यायाचे भक्त आहेत, दुष्टपणाचे वैरी आहेत, दयाळू आहेत, ज्यांच्याजवळ माणुसकी आहे, अशा सम्राटांची शेवटीं वाईट गत होते. चांगुलपणा अंतीं फलदायक ठरत नाहीं. प्रजेनें नेहमीं आज्ञा पाळावी व सैनिकांनीं आदर दाखवावा म्हणून राजाने सदैव कठोरच राहिलें पाहिजे. स्वतःमधली माणुसकी मारून त्यानें पशूच झालें पाहिजे.

७. ' संधि सांपडेल तेव्हां तेव्हां दुसऱ्यांना फसवा ' हें सातवें सूत्र. प्रतिस्पर्ध्यांस चिरडण्यासाठीं मनुष्याने जाणूनबुजून पशु झालें पाहिजे, असें मॅकिआव्हिलीचें मत आहे. राजानें सिंहाप्रमाणें भीषण व कोल्ह्याप्रमाणें धूर्त झालें पाहिजे. " कोल्ह्याप्रमाणें ज्याला नीट वागतां येतें, तोच नीट यशस्वी होऊं शकतो." न्यायापेक्षां बळाची प्रतिष्ठा अधिक आहे. कापट्य

सत्याहून बलशाली आहे. राजानें वचन-पालनाच्या भ्रमांत कधींहि राहूं नये. या जगांत कोणीच दिलेलें वचन पाळीत नाहीं. "सारेच लोक चांगले असते तर असा उपदेश करणें चुकीचें झालें असतें; पण लोक दुष्ट असतात, त्यांचा कोणावर विश्वास नसतो, म्हणून आपणहि कोणावर विश्वास ठेवूं नये." राजाला तर वचन मोडणें फारच सोपें असतें. "दिलेला शब्द मोडण्यास राजाला शेंकडों सबबी सांगणें शक्य असतें." कारण, बहुतेक लोक शुद्ध नंदीबैल असतात. फसवले जाण्यासाठीं, नकळत लुबाडले जाण्यासाठीं हें जग सदैव तयारच असतें.

अर्वाचीन काळांतील मुत्सद्देगिरी व व्यापारधंदा यांचा मॅकिआव्हिलीच जनक आहे ही गोष्ट आपणांस दिसून येईल. यशस्वी होणारा मुत्सद्दी वा धंदेवाला हा मॅकिआव्हिलीच्या सांगण्याशींच अधिक जवळ असतो व ख्रिस्ताच्या आज्ञांपासून फार दूर असतो असें दिसून येईल. पण तें जाऊं द्या. मॅकिआव्हिलीचें 'राजा' हें पुस्तक आपणांस अद्यापि पाहावयाचें आहे.

८. 'शत्रूंना तर ठार कराच करा, पण जरूर तर मित्रांनाहि' हें आठवें सूत्र. ज्या युगांत मॅकिआव्हिली राहत होता तें माणुसकीला पारखें होतें. सोळाव्या शतकांतील प्रमुख खेळांपैकीं प्राण्याची शिकार व नास्तिकांना जाळणें हे दोन खेळ लोकप्रिय होते; करमणुकीचीं हीं आवडतीं साधनें होतीं. त्या काळांतील एका सम्राटाला मनुष्याच्या पचनक्रियेची सर्व माहिती समजून घेण्याची इच्छा झाली. एकाद्या वैद्यशास्त्राचा विद्यार्थी दोन बेडूक फाडतो त्याप्रमाणें त्या सम्राटानें दोन जिवंत माणसांची आपल्यासमोर चिरफाड करून घेतली व आपली ज्ञानतृष्णा भागविली. शेंकडों वर्षे लढाया सारख्या चालू असल्यामुळें मनुष्यांचीं हृदयें दगडासारखीं झालीं होतीं; मानवी प्राणांची किंमतच नाहींशी झाली होती; खून म्हणजे एक मामुली बाब वाटे, मित्रांची फसवणूक म्हणजे जणूं मान्य कायदा! जीवनाच्या या शिकारींत अशा गोष्टी क्षम्यच नव्हेत तर कर्तव्यहि भासत, त्यामुळें मॅकिआव्हिलीचें बोलणें लोकांना पट्‌कन् पटे. त्याच्या तर्कशास्त्रांतले हे सारे दुवे ऐकावयाला ते तयार असत.

९. '(दुसऱ्यांशीं वागतांना) दया दाखविण्यापेक्षां शक्ति दाखवा' हें नववें सूत्र. दुसऱ्यांच्या बाबतींत दयेपेक्षां दुष्टता व बळजोरी यांचाच प्रयोग

करीत जा. मॅकिआव्हिलीनें एक सर्वसामान्य नियम सांगून ठेवला आहे कीं, आपल्याबद्दल लोकांना प्रेम वाटण्यापेक्षा भय वाटणें अधिक बरें. एकाद्या प्रतिस्पर्धी राजाचें सर्वस्व हिरावून घेतल्यावर त्याचें निसंतान करा. काम अर्धवट सोडूं नका, पुरें करा. नाहीं तर एकादा नातलग उद्यां उभा राहून सूड घेऊं पाहील. महत्त्वाकांक्षी माणसानें अर्धवट दुष्ट असून भागणार नाहीं. दुष्टपणा करावयाचाच तर तो पुरता तरी करावा. तुम्ही मनांतला सद्भाव अजीबात गुंडाळून तरी ठेवा, नाहीं तर महत्त्वाकांक्षा तरी सोडून द्या. महत्त्वाकांक्षी व्हावयाचें असेल तर सदसद्विवेकबुद्धीची नांगी मोडून टाका. पण तुमच्या दुष्टपणास सीमा नसली तरी त्याला रीत मात्र अवश्यमेव हवी. तुम्हीं एकादा देश घेतला किंवा एकाद्याला लुबाडलें तर जो कांहीं दुष्टपणा करावयाचा असेल तो त्याच वेळेस करा. म्हणजे हळूहळू सारें विसरलें जाईल. एकाच तडाक्यांत सारें करून घ्यावें. पण कृपा करावयाची असेल तर ती मात्र तीळतीळ करावी म्हणजे तिची सारखी आठवण राहील. पण सर्वांत चांगली गोष्ट म्हणजे शक्य तों दया न दाखविणें, कृपेची खैरात न करणें. हुकूमशहानें बळाच्या जोरावर सत्ताधीश राहिलें पाहिजे, प्रेमाच्या जोरावर नव्हे. प्रजेची सदिच्छा हें त्याचें बळ नसावें, तर स्वतःची शक्ति हें त्याचें बळ असावें.

आतां मॅकिआव्हिलीची शेवटची, सर्वांत महत्त्वाची व रानटी आज्ञा पाहावयाची. कोणती बरें ती? ऐका:—

१०. 'युद्धाशिवाय कशाचाहि विचार करूं नका' हें दहावें सूत्र. मॅकिआव्हिलीचा या पशूत्तमाचा—युद्ध हाच मुख्य धंदा असला पाहिजे. मॅकिआव्हिली सांगतो कीं, राजानें आपणास वधाच्या कलेला संपूर्णपणें वाहून घेतलें पाहिजे. "जो राज्यकर्ता आहे त्याच्या ठिकाणीं एकच कला पाहावी: ती म्हणजे युद्धाची कला." राजानें लष्करी गोष्टीशिवाय कोणत्याहि गोष्टींत लक्ष घालूं नये. शांततेच्या काळांत त्यानें सदैव युद्धाची तयारी करीत राहिलें पाहिजे. राजाचें संभाषण, त्याचा अभ्यास, त्याचे खेळ, त्याचें वाचन, त्याचें गंभीर चिंतन, त्याचे विचार, या सर्वांचें ध्येय एकच असलें पाहिजे व तें म्हणजे युद्ध. आपल्या लोकांना कसें जिंकून घ्यावे, मानवजातीला कसें गुलाम करून टाकावें याचाच ध्यास त्यानें घ्यावा.

मॅकिआव्हिलियन शासनपद्धतींत सारे रस्ते युद्धाकडे जातात आणि आजपर्यंत युद्धच सर्वत्र जारी आहे. कारण, मॅकिआव्हिलीचेच शिष्य सर्वत्र राज्य करीत आहेत—वाईट राज्य करीत आहेत. मॅकिआव्हिलीनें दिलेली राजनीतीच जगांतील सर्व लष्करी हडेलहप्यांची व मुत्सद्द्यांची नीति आहे. माणसांमाणसांतील व्यवहारांत आपण थोडें तरी बरे वागूं लागलों आहों. पण राष्ट्रांराष्ट्रांतील व्यवहारांत मात्र आपण साम्राज्यवादी स्वार्थाचें अंधळें धोरणच चालवीत आहों. मुत्सद्देगिरी, कपट व रानटी पिळवणूक हेंच धोरण सतत चालू आहे. आपल्या आंतरराष्ट्रीय संबंधांत आपण मॅकिआव्हिलीच्या कपटनीतीचें अनुकरण करतों, येवढेंच नव्हे तर तिचें कौतुक करतों. जगातील आजकालचे प्रमुख मुत्सद्दी, नामांकित इतिहासकार व कांहीं मोठे तत्त्वज्ञानी मॅकिआव्हिलीचेच शिष्य आहेत. अर्वाचीन काळांतील अति-बुद्धिमान् लॉर्ड बेकन सांगतो कीं, राजकारणांत पुष्कळसा दंभ असावा व थोडासा प्रामाणिकपणा असावा. आठव्या हेन्रीचा प्रधान थॉमस क्रॉमवेल हा मॅकिआव्हिलीचें 'प्रिन्स' हें पुस्तक राजकीय शहाणपणाचें सार मानी. एकोणिसाव्या शतकांतील मोठा इतिहासकार मेकॉले म्हणतो, "या 'प्रिन्स' पुस्तकांत पुष्कळच उदात्त भावना आहेत." १९१४ सालच्या महायुद्धांत लाजिरवाणी कत्तल साडेचार वर्षे चालली होती, तिचें कारण हेंच कीं, जगांतील सारे मुत्सद्दी मॅकिआव्हिलीच्या उपदेशाप्रमाणें वागत होते. तोंडानें ते केवढींहि मोठीं तत्त्वें पुटपुटत असले तरी त्यांचा व्यवहार मॅकिआव्हिलीच्या सारखाच होता. आजचे सारे साम्राज्यवादी मुत्सद्दी, हुकूमशहा, योद्धे, मानवजातीचे नानाविध स्वरूपांतील छळवादी, सारे मॅकिआव्हिलीचेच अनुयायी आहेत.

## प्रकरण ३ रें

# नवसृष्टीचा निर्माता शेक्स्पिअर

— १ —

एक लाख वर्षेपर्यंत निसर्ग मानवाचे निरनिराळे नमुने बनवीत होता मानवांवर प्रयोग करीत होता. शेवटीं १५६४ सालीं सर्व संमीलित ज्ञान एकत्र ओतून निसर्गानें एक मूर्ति जन्माला घातली, ती शेक्स्पिअर ही होय

या जगांत अनेक अनाकलनीय गूढें असतात. शेक्स्पिअरसारख्यांची अलौकिक बुद्धि हें एक गूढच आहे. शेक्स्पिअरचे आईबाप सामान्यांहून सामान्य होते. त्याच्या पित्याला स्वतःची सहीहि करतां येत नसे. तो मोजे विणी, लोंकर पिंजी. तो एका अज्ञात कुटुंबांत जन्मला, आकाशांत तेजानें तळपला; त्याच्या वंशांत पुनः पुढें कोणीहि चमकलें नाहीं. शेक्स्पिअरच्या पूर्वी आणि नंतरहि त्याचें कुळ अज्ञातच होतें. त्याला तीन मुली होत्या. त्यांपैकीं दोघी दहा जणींसारख्या होत्या; पण तिसरी मात्र अगदींच अडाणी होती.

शेक्स्पिअर म्हणजे निसर्गाची एक लहर होती. निसर्गाच्या हातून ही व्यक्ति नकळत जन्माला घातली गेली. तो मानवांत अतिमानुष, देव होता. त्याच्या मनाची खोली कार्लाइललाहि कळली नाहीं; जॉर्ज ब्रँडिसनेंहि त्या कामीं हात टेंकले. आणि कोणाहि टीकाकाराला तिचा अंत लागणार नाहीं, असें म्हणण्याचें धाडस मी करतों. शेक्स्पिअर समजून घेणें म्हणजे सृष्टीचें गुंतागुंतीचें गूढच समजून घेणें होय. जीवनाचा हा जो विराट् खेळ चालला आहे, जीवनाचें हें जें विराट् नाटक चाललें आहे, तेंच शेक्स्पिअरनें थोडक्यांत आपल्या नाट्यसृष्टींत निर्मिलें आहे. त्याचीं नाटकें म्हणजे सृष्टीची प्रतिनिर्मिति आहे. अमेरिकन कवि व तत्त्वज्ञानी सन्तामना एका सुनीतांत म्हणतो, "शेक्स्पिअरला निर्मून ईश्वरानें सृष्टि दुप्पट केली."

शेक्स्पिअरला जणूं देवाची बुद्धि व देवाची भाषा लाभल्या होत्या! पण बाह्यतः मात्र त्याचें जीवन अगदीं निराळें होतें. या कविसम्राटाचें जीवन जगांतील अत्यंत नीरस जीवनासारखें होतें. वयाच्या चौदाव्या वर्षी तो एका खाटकाजवळ उमेदवार म्हणून राहिला. त्याच्या वयाच्या अठराव्या वर्षी सव्वीस वर्षांच्या एका बाईनें त्याला किंवा त्यानें तिला मोह पाडला. तिचें नांव ॲन हॅथावे. तिच्याशीं लग्न झाल्यावर लवकरच स्वतःचें स्ट्रॅटफर्ड गांव त्याला सोडावें लागलें. कारण हरणें चोरण्याच्या आरोपावरून त्याला अटक होणार होती. लंडनला आल्यावर तो रंगभूमीकडे वळला. तो सतरा वर्षें नाटकें लिहीत होता. नाटकांत बारीकसारीक कामहि तो करी. रंगभूमीवर काम करण्याबाबत तो उदासीन होता. आपलीं सारीं नाटकें छापून काढावीं असें त्याला केव्हांहि वाटलें नाहीं.

धंद्यांत त्यानें कमाई केली व तो थोडीफार सावकारी करूं लागला. ऋण-कोंनीं वेळेवर पैसे न दिले तर तो फिर्यादी करी. तो दरसाल एकदां कुटुंबीयांना भेटावयास जाई. आयुष्याच्या अखेरीस त्यानें स्ट्रॅटफर्ड येथें एक घर विकत घेतलें व तेथें तो मरेपर्यंत एकाद्या सुखवस्तु गृहस्थाप्रमाणे राहिला.

रंगभूमीवरील काम करणारे वागत तसाच तोहि वागे. तें वागणें मोठेंसें सुसंस्कृत अगर सदभिरुचीला पोषक होतें असें मुळींच नव्हे. एकदां तर त्यानें इतकी दारू घेतली कीं, तो रस्त्याच्या कडेला एका झाडाखालीं झिंगून पडला! प्रेमाची विफलताहि त्यानें अनुभविली होती. तो आपल्या एका सुनीतांत लिहितो, "माझी प्रियकरीण जेव्हां 'मी सत्यनिष्ठ आहें' असें सांगते, तेव्हां मी तिच्यावर विश्वास ठेवतों. पण ती खोटें बोलत आहे हें मला ठाऊक असतें." नारीजनांना आकर्षण वाटेल असा पुरुष तो नव्हता, पण कधीं कधीं आपल्या प्रतिस्पर्ध्यांना तो प्रेमस्पर्धेत जिंकी. टूले नामक एका तत्कालीन अभिनय करणाऱ्यानें १६०२ सालीं शेक्स्पिअरची म्हणून एक आठवण दिली आहे: शेक्स्पिअरचा बरबॅज म्हणून एक नाटकी मित्र होता. त्याचा एका नागरिकाच्या पत्नीशीं संबंध होता. पण एके दिवशीं शेक्स्पिअर तिच्याकडे गेला तेव्हां तिनें त्याचें स्वागत केलें व बरबॅज आला तरी ती व शेक्स्पिअर रंगांत असल्यामुळे बरबॅज बिचारा बाहेरच उभा राहिला! शेक्स्पिअरनें निरोप पाठविला, "तिसऱ्या रिचर्डच्या आधीं वुइल्यम दि कॉकरर आला होता."

त्याचें कौटुंबिक जीवन सुखाचें नव्हतें. तें वादळी होतें. दुसऱ्यांच्या बायकांजवळ तो यशस्वी होई, पण स्वतःच्या पत्नीच्या बाबतींत तो अपेशी होता. दुसऱ्यांच्या बायकांच्या बाबतींत तो वुइल्यम दि कॉकरर असला तरी त्याच्या स्वतःच्या घरीं मात्र निराळीच परिस्थिति होती. मरेपर्यंत त्याची पत्नी त्याला सतावीत होती. त्यानें आपल्या मृत्युपत्रांत तिला केवळ आपला एक भिकार बिछाना— चांगला होता तो मात्र नव्हे हो!— ठेवला.

थोडक्यांत त्याची जीवनकथा ही अशी आहे. पण या हकीकतीनें त्याच्या मनाचा थांग लावून घेण्यास प्रकाश मिळत नाहीं. मनुष्य या दृष्टीनें त्याच्याच नाट्यसृष्टींतल्या कॅलिबन नांवाच्या पात्राहून फार फार तर थोड्या उच्च दर्जाचा तो होता असें म्हणतां येईल. कॅलिबन हा अत्यंत क्षुद्र वृत्तीचा व क्षुद्र वासना-

विकारांत लडबडलेला असा दाखविण्यांत आला आहे. पण मानवजातीचा शिक्षक या दृष्टीनें आपण त्याच्याकडे पाहिल्यास तो पृथ्वीवरचा नसून स्वर्गातील आहे असें वाटतें. तो अतिमानुष वाटतो. क्षुद्र मनाच्या या मानवांत तो चुकून जन्माला आला असावा असें वाटतें.

जगांतील अत्यंत प्रतिभासंपन्न प्रज्ञावंतांनीं शेक्स्पिअरच्या बुद्धीचें मोजमाप करण्याची खटपट केली, त्याची विचारसृष्टि तर्कदृष्टीनें मांडून दाखविण्याची त्यांनीं पराकाष्ठा केली, पण तो खटाटोप यशस्वी झाला नाहीं. टीकाकार त्याला रोमन कॅथॉलिक म्हणतात. कोणी त्याला नास्तिक म्हणतात, कोणी देशभक्त मानतात, तर कोणी युद्धविरोधक मानतात. कोणी त्याला प्रवचनकार समजतात, तर कोणी त्याला सिनिक म्हणजे कशांतच अर्थ नाहीं असें म्हणणारा मानतात. कोणी त्याला मानव्यवादी म्हणतात, तर कोणी संशयात्मा म्हणतात. कोणी त्याला राजांचा बडेजाव करणारा म्हणतात, तर कोणी त्याला स्वप्नसृष्टींत रमणारा लोकशाहीचा पुरस्कर्ता मानतात. वस्तुतः तो यापैकी कांहींच नव्हता ; पण असें असूनहि तो सारें काहीं होता असें विरोधाभासानें म्हणावें लागतें ! कोणाहि एका मनुष्याचे वा मानवसंघाचे जे विचार अगर त्याच्या ज्या कल्पना असूं शकतील त्यांच्यापलीकडे शेक्स्पिअरचे विचार व कल्पना जात. तो विचार–सिंधु होता, कल्पनाविश्वंभर होता. तो जें जें पात्र निर्मी, त्याच्या त्याच्या जीवनाशीं तो तितक्याच प्रेमानें व सहानुभूतीनें मिळून जाई. कॅलिबाशीं तो जितका एकरूप होई, तितकाच प्रॉस्पेरोशींहि. शेक्स्पिअरची मनोबुद्धि मानवजातीच्या मनोबुद्धीला व्यापून राहिलेली होती, तिजशीं एकरूप झाली होती.

शेक्स्पिअरचें पृथक्करण करण्याचा प्रयत्न मी करणार नाहीं किंवा त्याची विचारसृष्टि विवरूनहि सांगणार नाहीं. कारण, असा प्रयत्न करणें निरुपयोगी आहे. पण मी त्याच्या विशाल मनोभूमीच्या कोंपऱ्यांत शिरून पाहणार आहें. त्याच्या अनंत बुद्धीच्या सागरांत बुडी मारून पेलाभर शहाणपण मिळालें तर मी आणणार आहें.

या दृष्टीनें शेक्स्पिअरच्या तीन नाटकांकडे आपण जरा नजर टाकूं या. पहिल्या नाटकांत तो उपहास करणारा दिसतो, दुसऱ्यांत केवळ ऐहिक दृष्टीचा दिसतो, तिसऱ्यांत तत्त्वज्ञानी दिसतो. कोणतीं बरें हीं तीन नाटकें ? १ टिमॉन ऑफ अथेन्स, २ हॅम्लेट, ३ टॅंपेस्ट.

— २ —

टिमॉन ऑफ अथेन्स या नाटकांत एकाद्या ज्यू प्रेषिताप्रमाणें जगांतील अन्यायांविरुद्ध तो गर्जना करतो व शिव्याशाप देतो. दुसऱ्या नाटकांत तो फक्त जीवनाचें प्रतिबिंब दाखवितो, नीतीचे पाठ देत बसत नाहीं. जेव्हा कधीं त्या वेगानें जाणाऱ्या नाट्यक्रियेंत मध्येंच क्षणभर जीवनावरील टीकेचें एकादें वाक्य उच्चारण्यासाठीं तो थांबतो, तेव्हा जणूं काय दुसऱ्या एकाद्या गोलावरून उतरलेल्या माणसाप्रमाणें या जगाला क्षुद्र व तुच्छ समजून तो फेंकून देतो ! या जगाला तो फार महत्त्व देत नाहीं. हे जग म्हणजे मूर्खांची कथा, फुकट आदळआपट व आरडाओरड, निरर्थक पसारा असें म्हणून तो निघून जातो. पण या 'टिमॉन ऑफ अथेन्स' नाटकांत जगाबद्दलचा त्याचा तिरस्कार क्रोध-ज्वालेंत परिणत झालेला दिसतो. जीवन ही मूर्खानें नव्हे तर कपटपटु सैतानानें सांगितलेली कथा असें येथें वाटतें. आणि जग निरर्थक न वाटतां द्रोह, नीचता, द्वेष, दंभ, कपट, यांनीं भरलेलें दिसतें. टिमॉन हा अथेन्समधील एक श्रीमंत मनुष्य आहे. तो उदारपणामुळें आपली सर्व संपत्ति मित्रांना वांटून टाकतो. त्यांना तो कधीं नाहीं म्हणत नाहीं. मित्रांना त्यांच्या सावकारांचा तगादा लागला कीं तो त्यांचें कर्ज फेडून टाकी, मित्रांचीं लग्नें होत तेव्हां त्यांना आंदण देई, त्याचा नवा संसार मांडून देई, तो त्यांना मेजवानीस बोलावी व जातांना देणग्या देई, हिरेमोतीं देई. त्याचा कारभारी फ्लेव्हियस 'हें औदार्य अखेर तुम्हांला धुळीला मिळवील' असें सांगतो; पण आपली संपत्ति संपणार नाहीं व आपले मित्र कृतज्ञ राहतील असें टिमॉनला वाटतें. फ्लॅव्हियसच्या सांगण्याकडे तो लक्ष देत नाहीं व शेवटची दिडकी संपेपर्यंत दुसऱ्यांना देतच राहतो.

अखेर तो कर्जबाजारी होतो. त्याचे सावकार त्याला सतावूं लागतात. ज्या मित्रांना आपण आपलें सर्वस्व दिलें ते आपल्या संकटकाळीं धांवून येतील असें त्याला वाटतें. पण एकामागून एक सारे त्याला सोडून जातात; प्रत्येक जण निरनिराळ्या सबबी सांगतो व मदत नाकारतो.

पुनः एकदां टिमॉन त्या सर्वांना मेजवानीस बोलावतो व त्यांच्यासमोर केवळ कढत पाण्याचे पेले ठेवतो. पण त्या वेळेपर्यंत आपणांस त्याचे मित्र

म्हणविणारे ते आश्चर्यचकित होऊन कांहीं बोलण्याच्या आधींच तो तें कढत पाणी त्यांच्या तोंडांवर व ताटें त्यांच्या अंगांवर फेंकतो व त्यांना घालवून देतो.

या स्वार्थी जगांत निःस्वार्थीपणा म्हणजे मूर्खपणा असें तो शिकतो. जग काय हें त्याला नीट समजतें. तो अथेन्स शहर सोडून जंगलांतील गुहेंत राहावयाला जातो. तेथें त्याला 'अत्यंत निर्दय पशूहि माणसांहून अधिक दयाळू' आढळतात. आपल्या गुहेसमोर तो कंदमुळांसाठीं खणीत असतां त्याला अकस्मात् एक ठेवा—'पिवळा गुलाम'—पिंवळें सोनें सांपडतें; मानवजातीला गुलाम करणारें व मानवजातीचें गुलाम असणारें सोनें त्याला आढळतें. पण तें पिंवळें सोनें त्याला दिपवूं मात्र शकत नाहीं. तें सोनें पाहून त्याला त्याचा तिटकारा वाटतो व तो तें पुनः मातींत पुरून टाकतो. पण कांहीं नाणीं मात्र कोणी मानवी प्राणी त्रास द्यावयास आले तर त्यांना मारण्यासाठीं म्हणून तो वर ठेवतो.

टिमॉनला सोनें सापडल्याची गोष्ट अथेन्समधील लोकांना कळते व एकामागून एक ते त्याच्या गुहेकडे येतात. कवी, चित्रकार, योद्धे, वेश्या, भिकारी, डाकू, सारे येतात. पुनः एकदां टिमॉनची मैत्री जोडण्यासाठीं ते उत्सुक होतात. तो प्रत्येकाला मूठ, दोन मुठी नाणीं देतो. एकाद्या संतप्त व तिरस्कार करणाऱ्या देवाप्रमाणें तो त्यांना म्हणतो, "जा, चालते व्हा. तुमच्या शहरांत जा व हें द्रव्य पुजून ठेवा, नाहीं तर सूकरवत् चाललेल्या तुमच्या सुखोपभोगांत खर्च करा." कांहीं चोरांना तो द्रव्य देतो व म्हणतो, "जा, लुटा एकमेकांना, म्हणजे अधिक मिळेल. कापा गळे. जे तुम्हांला भेटतील ते सारे चोरच आहेत. जा अथेन्स शहरांत व फोडा दुकानें. ज्यांचें लुटाल तेहि चोरच! चोर चोरांना लुटूं देत. सारेच चोर! हें सारें जग टिमॉनला डाकूंची गुहा वाटते. पण एक अपवाद मात्र असतो, तो म्हणजे त्याचा कारभारी फ्लॅव्हियस. तो आपल्या धन्याच्या दुःखांत भागीदार होतो. फ्लॅव्हियस म्हातारा झालेला असतो. तो जेव्हां धन्याजवळ येतो, त्याला भक्तिप्रेम दाखवितो व रडतो, तेव्हां टिमॉन म्हणतो, "जगांत अद्यापि थोडी माणुसकी आहे. या जगांत एक—फक्त एकच—प्रामाणिक मनुष्य आहे. पण फक्त एकच हो! माझें म्हणणें नीट लक्षांत घ्या. एकच, अधिक नाहीं; व तो म्हणजे हा माझा वृद्ध कारभारी." पण तो फ्लॅव्हियसला म्हणतो, "तूं

फसशील हो! इतकें चांगलें असणें बरें नव्हे. तूं प्रामाणिक आहेस; पण शहाणपणांत कमी दिसतोस. तूं मला फसवून व छळून दुसरी चांगली नोकरी मिळवूं शकशील. आपल्या पहिल्या धन्याच्या मानेला फांस लागला म्हणजे शहाणे नोकर दुसरा धनी मिळवितात. जगाची तर ही रीतच आहे. तूं वेडाच दिसतोस."

शेक्स्पिअर खालच्या वर्गांतील लोकांना तुच्छ मानतो असा त्याच्यावर एक आरोप आहे. टीकाकार म्हणतात, "अशांविषयीं शेक्स्पिअरला सहानुभूति वाटत नसे. तो त्यांच्याबद्दल नबाबी तिरस्कारानें व तुच्छतेनें बोलतो. काटक्याकुटक्या, दगडधोंडे, यांच्याहून त्यांची किंमत अधिक नाहीं असेंच जणूं तो दाखवितो." अशा टीकाकारांना शेक्स्पिअरच्या मनाची विश्वव्यापकता कळत नाहीं. 'अथेन्सचा टिमॉन' या नाटकात शेक्स्पिअरनें अथेन्समधील जी मानवसृष्टि उभी केली आहे तींत त्यानें अत्यंत प्रेमळ पात्र जर कोणतें रंगविलें असेल तर तें टिमॉनच्या गुलामाचें—फ्लॅव्हियसचें होय. टीकाकारांच्या तत्त्वज्ञानांत जितकी सहानुभूति असेल तीपेक्षां अपरंपार अधिक सहानुभूति शेक्स्पिअरच्या अनंत मनांत आहे.

जीवनाकडे प्रत्येक दृष्टिकोनांतून पाहणारा शेक्स्पिअरसारखा महाद्रष्टा दुसरा झाला नाहीं. प्रसंगविशेषीं तो शेलेप्रमाणें क्रांतिकारक होऊं शके, हीनप्रमाणें कडवट व कठोर होऊं शके, तसाच युरिपिडीसप्रमाणें निराशावादी तर बायरनप्रमाणें निस्सारवादी (सिनिक) हि होऊं शके. स्विनबर्नप्रमाणें तो मायेंतून पाहणारा होई, तर गटेप्रमाणें तत्त्वज्ञानीहि होई; टेनिसनप्रमाणें तो आशावादी आणि शांतपणें शरणागति स्वीकारणारा, जें आहे तें चांगलेंच आहे असें मानणाराहि होई. जीवनाकडे नाना रंगांच्या चष्म्यांतून पाहणारा हा महाकवि आहे. याची दृष्टि एकांगी नाहीं. 'अथेन्सचा नागरिक टिमॉन' या नाटकांत निराशेच्या काळ्या चष्म्यातून तो पाहत आहे. जगांत कशांतहि सार नाहीं, सारा चोथा, सारें निःसार, घाण! टिमॉनचा एक मित्र अल्सिबिआडीस म्हणून असतो. तो अथेन्स शहर वांचवूं पाहतो; पण त्याला हद्दपारीचें बक्षीस मिळतें! अल्सिबिआडीस रागानें सैन्य उभारून आपला अपमान करणाऱ्या मातृभूमीवरच चालून येतो तेव्हां सीनेटर घाबरतात. ते सारे टिमॉनकडे जातात व म्हणतात, "अथेन्स संकटांत आहे.

म्हणविणारे ते आश्चर्यचकित होऊन कांहीं बोलण्याच्या आधींच तो तें कढत पाणी त्यांच्या तोंडांवर व ताटें त्यांच्या अंगावर फेंकतो व त्यांना घालवून देतो.

या स्वार्थी जगांत निःस्वार्थीपणा म्हणजे मूर्खपणा असें तो शिकतो. जग काय हें त्याला नीट समजतें. तो अथेन्स शहर सोडून जंगलांतील गुहेंत राहावयाला जातो. तेथें त्याला 'अत्यंत निर्दय पशूहि माणसांहून अधिक दयाळू' आढळतात. आपल्या गुहेसमोर तो कंदमुळांसाठीं खणीत असता त्याला अकस्मात् एक ठेवा—'पिंवळा गुलाम'—पिंवळें सोनें सांपडतें; मानवजातीला गुलाम करणारें व मानवजातीचें गुलाम असणारें सोनें त्याला आढळतें. पण तें पिंवळें सोनें त्याला दिपवूं मात्र शकत नाहीं. तें सोनें पाहून त्याला त्याचा तिटकारा वाटतो व तो तें पुनः मातींत पुरून टाकतो. पण कांहीं नाणीं मात्र कोणी मानवी प्राणी त्रास द्यावयास आले तर त्यांना मारण्यासाठीं म्हणून तो वर ठेवतो.

टिमॉनला सोनें सापडल्याची गोष्ट अथेन्समधील लोकांना कळते व एकामागून एक ते त्याच्या गुहेकडे येतात. कवी, चित्रकार, योद्धे, वेश्या, भिकारी, डाकू, सारे येतात. पुनः एकदां टिमॉनची मैत्री जोडण्यासाठीं ते उत्सुक होतात. तो प्रत्येकाला मूठ, दोन मुठी नाणीं देतो. एखाद्या संतप्त व तिरस्कार करणाऱ्या देवाप्रमाणें तो त्यांना म्हणतो, "जा, चालते व्हा. तुमच्या शहरांत जा व हें द्रव्य पुजून ठेवा, नाहीं तर सूकरवत् चाललेल्या तुमच्या सुखोपभोगांत खर्च करा." कांहीं चोरांना तो द्रव्य देतो व म्हणतो, "जा, लुटा एकमेकांना, म्हणजे अधिक मिळेल. कापा गळे. जे तुम्हांला भेटतील ते सारे चोरच आहेत. जा अथेन्स शहरांत व फोडा दुकानें. ज्यांचें लुटाल तेहि चोरच! चोर चोरांना लुटूं देत. सारेच चोर! हें सारें जग टिमॉनला डाकूंची गुहा वाटते. पण एक अपवाद मात्र असतो, तो म्हणजे त्याचा कारभारी फ्लॅव्हियस. तो आपल्या धन्याच्या दुःखांत भागीदार होतो. फ्लॅव्हियस म्हातारा झालेला असतो. तो जेव्हां धन्याजवळ येतो, त्याला भक्तिप्रेम दाखवितो व रडतो, तेव्हां टिमॉन म्हणतो, "जगांत अद्यापि थोडी माणुसकी आहे. या जगांत एक—फक्त एकच—प्रामाणिक मनुष्य आहे. पण फक्त एकच हो! माझें म्हणणें नीट लक्षांत घ्या. एकच, अधिक नाहीं; व तो म्हणजे हा माझा वृद्ध कारभारी." पण तो फ्लॅव्हियसला म्हणतो, "तूं

फसशील हो! इतकें चांगलें असणें बरें नव्हे. तूं प्रामाणिक आहेस; पण शहाणपणांत कमी दिसतोस. तूं मला फसवून व छळून दुसरी चांगली नोकरी मिळवूं शकशील. आपल्या पहिल्या धन्याच्या मानेला फांस लागला म्हणजे शहाणे नोकर दुसरा धनी मिळवितात. जगाची तर ही रीतच आहे. तूं वेडाच दिसतोस."

शेक्स्‌पिअर खालच्या वर्गांतील लोकांना तुच्छ मानतो असा त्याच्यावर एक आरोप आहे. टीकाकार म्हणतात, "अशांविषयीं शेक्स्‌पिअरला सहानुभूति वाटत नसे. तो त्यांच्याबद्दल नबाबी तिरस्कारानें व तुच्छतेनें बोलतो. काटक्याकुटक्या, दगडधोंडे, यांच्याहून त्यांची किंमत अधिक नाहीं असेंच जणूं तो दाखवितो." अशा टीकाकारांना शेक्स्‌पिअरच्या मनाची विश्वव्यापकता कळत नाहीं. 'अथेन्सचा टिमॉन' या नाटकात शेक्स्‌पिअरनें अथेन्समधील जी मानवसृष्टि उभी केली आहे तींत त्यानें अत्यंत प्रेमळ पात्र जर कोणतें रंगविलें असेल तर तें टिमॉनच्या गुलामाचें—फ्लॅव्हियसचें होय. टीकाकारांच्या तत्त्वज्ञानांत जितकी सहानुभूति असेल तीपेक्षां अपरंपार अधिक सहानुभूति शेक्स्‌पिअरच्या अनंत मनांत आहे.

जीवनाकडे प्रत्येक दृष्टिकोनांतून पाहणारा शेक्स्‌पिअरसारखा महाद्रष्टा दुसरा झाला नाहीं. प्रसंगविशेषीं तो शेलेप्रमाणें क्रांतिकारक होऊं शके, हीनप्रमाणें कडवट व कठोर होऊं शके, तसाच युरिपिडीसप्रमाणें निराशावादी तर बायरनप्रमाणें निस्सारवादी (सिनिक) हि होऊं शके. स्विनबर्नप्रमाणें तो मायेंतून पाहणारा होई, तर गटेप्रमाणें तत्त्वज्ञानीहि होई; टेनिसनप्रमाणें तो आशावादी आणि शांतपणें शरणागति स्वीकारणारा, जें आहे तें चांगलेंच आहे असें मानणाराहि होई. जीवनाकडे नाना रंगांच्या चष्म्यांतून पाहणारा हा महाकवि आहे. याची दृष्टि एकांगी नाहीं. 'अथेन्सचा नागरिक टिमॉन' या नाटकांत निराशेच्या काळ्या चष्म्यातून तो पाहत आहे. जगांत कशांतहि सार नाहीं, सारा चोथा, सारें निःसार, घाण! टिमॉनचा एक मित्र अल्सिबिआडीस म्हणून असतो. तो अथेन्स शहर वांचवूं पाहतो; पण त्याला हद्दपारीचें बक्षीस मिळतें! अल्सिबिआडीस रागानें सैन्य उभारून आपला अपमान करणाऱ्या मातृभूमीवरच चालून येतो तेव्हां सीनेटर घाबरतात. ते सारे टिमॉनकडे जातात व म्हणतात, "अथेन्स संकटांत आहे.

या वेळेस तूं ये." पण टिमॉन त्याच्या म्हणण्याकडे लक्ष देत नाहीं. तो शक्य तेवढे सारे शिव्याशाप त्यांना देतो. पण शेवटीं त्याच्या मनात एक विचार येतो. तो म्हणतो, "आल्सिबिआडीसच्या हातून मरण येऊं नये असें वाटत असेल तर एक गोष्ट मी करूं शकेन." आणि मग तो म्हणतो, "माझ्या शेजारींच एक झाड आहे. मला तें माझ्यासाठींच कापावें लागणार आहे. मी तें तोडणारच आहें. पण अथेन्समधील माझ्या-मित्रांना—साऱ्या अथेन्सलाच—खालपासून वरपर्यंत, रावापासून रंकापर्यंत, सर्वांना—माझा हा निरोप सांगा: ज्यांना ज्यांना येणारें संकट टाळावयाचें असेल, ज्याना ज्यांना आपलीं दुःखें थांबवावयाचीं असतील, त्यांनीं त्यांनीं येथें त्वरेनें धांवून यावें. माझ्या कुऱ्हाडीनें झाड पडण्यापूर्वीच या झाडावर त्यांनीं स्वतःला टांगून घ्यावें."

आपल्या विषारी तिरस्काराचा शेवटचा बाण शहराकडे परतणाऱ्या त्या आपल्या नगरबंधूंवर सोडून टिमॉननें स्वतःचे थडगें खणलें. तेथील खारट पाण्याच्या प्रवाहाजवळ त्यानें खड्डा खणला व स्वतःचें विषण्ण जीवन संपविलें. मातींतील—पृथ्वीच्या पोटांतील—कृतज्ञ किड्यांना मेजवानी देणेंच अधिक चांगलें. पृथ्वीवर चालणाऱ्या द्विपाद मानवी पशूंपेक्षां पृथ्वीच्या पोटांतले किडे व जीवजंतू किती चांगले!

या नाटकांत टिमॉन हा एकच सिनिक नाहीं. ॲपेमॅन्टस नांवाचा तत्त्वज्ञानीहि सिनिकच आहे. मानवजातीचा मूर्खपणा पाहून तोहि नाक मुरडतो, पण टिमॉनची दुःखी विषण्ण कटुता व ॲपेमॅन्टसचा उपहासात्मक चावटपणा यांत फरक आहे. मानव मानवाशीं माणुसकी विसरून वागतो हे पाहून टिमॉनला जीवन अशक्य होतें. पण तेंच दृश्य पाहून ॲपेमॅन्टस उपहासानें हंसतो. त्याला जणूं सैतानी आनंद वाटतो. टिमॉन हें जग नाहींसें करून ज्यांत प्रेमळ मित्र असतील असें नवें जग निर्मूं पाहतो. पण ॲपेमॅन्टस जगाला नांवें ठेवतो, जग सुधारूं इच्छीत नाहीं. अथेन्समधील एक सरदार त्याला "किती वाजले? कोणता समय आहे?" असें विचारतो, तेव्हां तो उत्तर देतो, "प्रामाणिक असण्याचा हा समय आहे." पण आजूबाजूला जरासें प्रामाणिक जग दिसलें तरी तो तें लगेच बिघडवूं पाही. जगांत अप्रामाणिकपणाच नसेल तर मग जगाची टिंगल कशी करतां येईल? 'जग वाईट असावें. म्हणजे गंमत पाहता येईल.' अशी ॲपेमॅंटसची वृत्ति आहे.

मित्रांची कृतघ्नता पाहून टिमॉनला मरणान्तिक यातना होतात, प्राणान्तिक वेदना वाटतात, ॲपेमॅंटसला ती मोठ्यानें हंसण्याची संधि वाटते ! एकाच नाटकांत टिमॉन व ॲपेमॅंटस यांचीं पात्रें रंगविणारा फारच सूक्ष्मदर्शी असला पाहिजे. त्याला स्वभावदर्शन फारच सूक्ष्म साधलें आहे. बारीकसारीक छटा दाखविणें फार कठिण असतें. पण शेक्स्पिअर स्वभावदर्शनांत अद्वितीय आहे. टिमॉनाशिवाय ॲपेमॅंटसला पूर्णता नाहीं, ॲपेमॅंटसाशिवाय टिमॉनला पूर्णता नाहीं. दोघांच्याद्वारां मिळून जगांतील अन्यायाला शेक्स्पिअर उत्तर देत आहे. जगाचा उपहास करणारा शेक्स्पिअर या दोघांच्या डोळ्यानीं बघून उत्तर देत आहे.

— ३ —

'हॅम्लेट'मध्यें व्यवहारी माणसाचें, संसारी शेक्स्पिअरचें, रामरगाड्यांत पडलेल्या शेक्स्पिअरचे जगाला उत्तर आहे. त्याच प्रश्नाला—जगांतील अन्यायाला—त्यानें उत्तर दिलें आहे. जगांतील नीचता पाहून टिमॉन आत्महत्या करतो, ॲपेमॅंटस हंसतो, पण हॅम्लेट काय करतो? तो खुनाचा सूड घेऊं पाहतो. हॅम्लेट टिमॉनपेक्षां कमी भावनाप्रधान आहे, पण ॲपेमॅंटसपेक्षां अधिक उदार वृत्तीचा आहे. तो जगांतील अन्यायाला शासन करूं पाहतो. जुन्या करारांतील 'डोळ्यास डोळा', 'दांतास दांत', 'प्राणास प्राण', 'जशास तसें' हा न्याय त्याला पसंत पडतो. जगांतील अन्याय पाहून हॅम्लेटच्या मनावर जशी प्रतिक्रिया होते, तशीच सर्वसामान्य माणसाच्या मनावर होते. टिमॉनप्रमाणें तो जगापासून पळून जात नाहीं किंवा ॲपेमॅंटस-प्रमाणें जगाचा उपहासहि करीत नाहीं. तो विचार करीत बसतो. या सर्व जगाचा अर्थ काय याची मीमांसा करीत बसतो. पण शेवटीं त्याच्या भावना जेव्हां पराकोटीला पोंचतात, तेव्हां तो प्रहार करतो; मात्र तो प्रहार दुष्ट कृत्यावर नसून दुष्ट कृत्य करणाऱ्यावर असतो आणि असें करीत असतां तो आपल्या शत्रूचा व स्वतःचाहि नाश करून घेतो.

'सूड घेणें हेंच जणूं जीवनाचें उदात्त ध्येय' असें हॅम्लेटला वाटतें. या सूड घेण्याच्या पवित्र कर्माच्या आड त्याच्या मतें ऑफेलियाचेंहि प्रेम येतां

कामा नये. हॅम्लेटचें जग एकंदरींत जंगलीच आहे. जरी तेथें तत्त्वज्ञानाचे विचार व सुंदर सुंदर वाक्यें ऐकावयाला आलीं, तरी सूडभावना हेंच परमोच्च नीतितत्त्व म्हणून तेथें पूजिलें जात आहेसें दिसतें. हॅम्लेट नाटकांतलें सारें काव्य दूर केल्यास तें अत्यंत विद्रूप वाटेल; त्यांत थोडीहि उदात्तता आढळणार नाहीं. हॅम्लेट हा एक तरुण व सुंदर राजपुत्र असतो. त्याची बुद्धि चौरचौघांच्या बुद्धीसारखीच असते. भुतांवर विश्वास असल्यामुळें तो आपली बुद्धि गमावून बसतो. पित्याचें भूत आपणास खुनाचा सूड घेण्यास सांगत आहे असें त्याला वाटतें व त्याचें डोकें फिरतें. तो मातेची निंदा करतो व ज्या मुलीशीं तो लग्न करणार असतो तिला दूर लोटून देतो. ती निराश होऊन आत्महत्या करते. तो तिच्या भावाला व बापाला ठार मारतो. नंतर आईला मारून तो स्वतःहि मरतो. आणि हें सर्व कशासाठीं? तर भुताला दिलेल्या सूड घेण्याच्या वचनाच्या पूर्ततेसाठीं! सुडाच्या एका गोष्टीसाठीं ही सारी दुःखपरम्परा ओढवून आणणें वेडेपणाचें वाटतें. एका सुडासाठीं केवढी जबर ही किंमत! या नाटकाचें 'दारू प्यालेल्या रानवटानें लिहिलेलें नाटक' असें वर्णन व्हॉल्टेअरनें केलें आहे तें बरोबर वाटूं लागतें. सारें मानवी जीवन— मानवी जीवनाचें हें सारें नाटक सुद्धां—एका दारुड्यानेंच लिहिलें आहे असेंच जणूं आपणांसहि वाटूं लागतें. पण शेक्स्पिअर जीवनाकडे फार संकुचित दृष्टीनें पाहतो असें म्हणणाऱ्या संकुचित दृष्टीच्या टीकाकारांचें हें मत आहे. शेक्स्पिअरच्या प्रज्ञेचा व प्रतिभेचा केवळ एक किरण हॅम्लेटमध्यें दिसतो. मानवी जीवनांतल्या अनंत गोष्टींतील सूड ही केवळ एक गोष्ट आहे, त्याप्रमाणेंच हॅम्लेटमध्यें शेक्स्पिअरच्या अनंत विचारसृष्टींतील एकच गोष्ट दिसते. तें त्याचें वा जगाचें संपूर्ण दर्शन नव्हे. शेक्स्पिअर हा जादूगार आहे. तो निसर्गाचें पूर्णपणें अनुकरण करूं शकतो. त्यानें हॅम्लेटला स्वतःच्या संपूर्ण तत्त्वज्ञानाची मूर्ति बनविलें नाहीं. हॅम्लेटच्याद्वारां स्वतःच्या बुद्धीचा फक्त एक भाग त्यानें दाखविला. अनंत पात्रांच्याद्वारां त्यानें आपलें तत्त्वज्ञान मांडलें आहे. सृष्टि आपलें स्वरूप विविधतेनें प्रकट करते: कोठें एक रंग, कोठें दुसरा; कोठें हा गंध, कोठें तो. तसेंच या कविकुलगुरूचें आहे. त्याच्या नाटकी पोतडींत हॅम्लेटमधल्या विचारांपेक्षां अधिक उदात्त विचार भरलेले आहेत. निसर्ग कन्फ्यूशियसला प्रकट करतो, तद्वतच हॅम्लेटलाहि

निर्मितो. पण जगाचें पृथक्करण करतां करतां, प्रयोग करतां करतां, निसर्गाला व शेक्स्पिअरला सुडापेक्षां अधिक उदात्त व सुंदर असें कांहीं तरी दाखवावयाचें असतें. हें जें कांहीं तरी अधिक सुंदर व अधिक उदात्त आहे, ते आपणांस 'टेंपेस्ट'मध्यें पाहण्यास मिळेल.

'अथेन्सचा नागरिक टिमॉन' या नाटकांत शेक्स्पिअर जगांतील अन्यायाला उपहासानें उत्तर देतो. हॅम्लेटमध्यें जगांतील अन्यायाची परतफेड सुडानें करण्यात आली आहे, पण टेंपेस्टमध्यें अन्यायाची परतफेड क्षमेनें करण्यात आली आहे. टिमॉन व हॅम्लेट यांच्याप्रमाणेंच प्रॉस्पेरोहि दुःखातून व वेदनांतून गेलेला आहे. पण दुःखानें तो संतापत नाहीं, तर उलट अधिकच प्रेमळ होतो. त्याच्या हृदयांत अधिकच सहानुभूति उत्पन्न होते. ज्यांनीं त्याच्यावर आपत्ति आणलेली असते त्यांच्याबद्दलहि त्याला प्रेम व सहानुभूति वाटतात. तो जगाला शिव्याशाप देत नाहीं, जगाचा उपहासहि करीत नाहीं, तर आपल्या मुलांच्या खोड्या पाहून बाप जसा लाडिकपणानें हंसतो, तसा प्रॉस्पेरो हंसतो. टेंपेस्टमध्ये उपहास व तिरस्कार याचा त्याग करून जरा अधिक उदात्त वातावरणांत शेक्स्पिअर गेला आहे, खऱ्या तत्त्वज्ञानांत गेला आहे. इतर बऱ्याच नाटकामध्यें शेक्स्पिअर एकाद्या हृदयशून्य देवाप्रमाणें मानवांची क्षुद्रता आणि संकुचितता पाहून मिस्कीलपणानें हंसतो. तो एकाद्या राजाला सिंहासनावरून खालीं खेंचतो व 'हा तुझा डामडौल, ही तुझी ऐट सर्व नष्ट होऊन किडे तुला खाऊन टाकणार आहेत; त्या किड्यांना मासे खातील व ते मासे एकाद्या भिकाऱ्याच्या पोटांत जातील.' असें त्याला सांगतो. पण टेंपेस्टमध्यें जरा रागवावयाचें झालें तरी तो रागहि सौम्य व सुंदर आहे. या नाटकांत कडवट व विषमय उपहासाचें करुण करुणेंत पर्यवसान झालें आहे. आतां आपण टेंपेस्टमधील कथा जरा पाहूं या. प्रॉस्पेरो हा मिलनचा ड्यूक. तो हद्दपार केला जातो. तो आपल्या मुलीसह एका जादूच्या बेटावर राहतो; तिचें नांव मिरान्दा. त्याच्या भावानेंच त्याला मिलनमधून घालवून दिलेलें असतें. भावाचें नांव ॲन्टोनिओ. नेपल्सचा राजा अलोन्सो याच्या मदतीनें तो भावाला हांकून देतो. प्रॉस्पेरो व त्याची तीन वर्षांची मुलगी यांना गलबतांत बसवून तो तें समुद्रांत सोडून देतो. हें गलबत सुदैवानें या मंतरलेल्या बेटाला येऊन लागतें. तेथें प्रॉस्पेरो मुलीला शिकाविण्यांत व

मंत्रतंत्रांचा अभ्यास करण्यांत वेळ घालवितो. एरियल नामक एक विद्याधर असतो व कॅलिबन नामक एक राक्षस असतो. त्या दोघांना वश करून तो त्यांना आपली सेवा करावयास लावतो.

एके दिवशीं एक गलबत त्या बेटाच्या बाजूनें जात असतें. गलबतांत एक लग्नसमारंभाची मंडळी असते. टयूनिसहून ही मंडळी इटलीस परत येत होती. या मंडळींत राजा अलोन्सो व ॲन्टोनिओ हे असतात. यांनींच प्रॉस्पेरोला हद्दपार केलेलें असतें. राजाचा भाऊ सेबॅस्टियन व मुलगा फर्डिनंड हेहि त्यांच्याबरोबर असतात.

प्रॉस्पेरो आपल्या मंत्रसामर्थ्यानें समुद्रावर एक वादळ उठवितो. तें गलबत वादळांतून जात असतां या मंतरलेल्या बेटाला येऊन लागतें. प्रॉस्पेरो एरियलला सर्व उतारूंना वांचवावयास सांगतो, पण वांचविल्यावर त्यांना बेटावर चारी दिशांस अलग अलग करावयाची सूचना देतो. फर्डिनंड बापापासून वियुक्त होतो व बाप मेला असें वाटून शून्य मनानें भटकत भटकत प्रॉस्पेरोच्या गुहेकडे येतो. वस्तुतः तो तिकडे जादूमुळें खेंचला गेलेला असतो. मिरान्दाची व त्याची तेथें दृष्टिभेट होऊन दोघांचें परस्परांवर प्रेम जडतें. एक शब्दहि उच्चारला जाण्यापूर्वी हृदयें दिलीं-घेतलीं जातात.

पण बेटाच्या दुसऱ्या एका भागावर सेबॅस्टियन व ॲन्टोनिओ राजाचा खून करण्याचें कारस्थान करीत असतात; तर कॅलिबन व गलबतातून आलेले कांहीं दारुडे खलाशी प्रॉस्पेरोचा खून करूं पाहतात; हें बेट मंतरलेलें असल्याचें त्यांना माहीत नसतें. हे पाहुणे ज्या जगांतून आलेले असतात त्या जगांतील अनीतिविषयक प्रचार व मूर्खपणा येथेंहि करूं लागतात, तेव्हां सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् प्रॉस्पेरो त्यांचे सारे रानवट बेत हाणून पाडतो. राजाला व त्याच्याबरोबरच्या लोकांना त्यांनीं केलेल्या अन्यायांबद्दल शासन करावें असें प्रॉस्पेरोला प्रथम वाटतें; पण एरियल दैवी विचारांचा असल्यामुळें तो प्रॉस्पेरोस अधिक थोर दृष्टि देतो व सांगतो, "राजा, त्याचा भाऊ आणि तुझा भाऊ सारेच दुःखी व त्रस्त आहेत. त्यांच्या दुःखाचा पेला कांठोकांठ भरलेला आहे. त्यांना काय करावें हें समजेनासें झालें आहे. तुझ्या जादूचा त्यांच्यावर फार परिणाम झाला आहे. तूं त्यांना पाहशील तर तुझेंहि हृदय

विरघळेल, तुझ्या भावना अधिक कोमल होतील." यावर प्रॉस्पेरो विचारतो, "विद्याधरा, तुला खरेंच का असें वाटतें?" एरियल उत्तर देतो, "मी मनुष्य असतों तर माझें हृदय विरघळलें असतें, माझ्या भावना कोमल झाल्या असत्या." तेव्हां प्रॉस्पेरो म्हणतो, "तूं अतिमानुष आहेस, जणूं वायुरूप आहेस, तरीहि जर तुला त्यांच्याविषयीं इतकी सहानुभूति वाटते, तर मग मी मानव असल्यामुळें, त्यांच्याच जातीचा असल्यामुळें, मला कां बरें वाटणार नाहीं? त्यांच्याप्रमाणेंच मीहि सुखदुःखें भोगतों, मलाहि वासना-विकार आहेत. मग मला माझ्या मानवबंधूंविषयीं तुला वाटतात त्यापेक्षां अधिक प्रेम व दया नकोत का वाटावयाला? त्यांनीं केलेले दुष्ट अन्याय आठवून माझें हृदय जरी प्रक्षुब्ध होतें, तरी माझ्यांतल्या दैवी भागानें, उदात्त भावनेनें मी आपला क्रोध जिंकीन व दैवी भागाशींच एकरूप होईन. एरियल, जा. त्यांना मुक्त कर."

टिमॉननें सीनेटरांजवळ काढलेले उद्गार व प्रॉस्पेरोचे हे एरियलजवळचे उद्गार यांची तुलना करा, म्हणजे मानवी अन्यायाकडे मानवी दृष्टीने पाहणें व अतिमानुष दृष्टीनें पाहणें यांतील फरक लक्षांत येईल.

प्रॉस्पेरो अतिमानुष आहे. शेक्स्पिअरनें किंवा सृष्टीनें निर्मिलेला अत्यंत निर्दोष व सर्वांगपरिपूर्ण असा मानवी स्वभावाचा नमुना म्हणजे प्रॉस्पेरो. हा शेक्स्पिअरच्या सृष्टींतील कन्फ्यूशियस होय. हृदयांत अपरंपार करुणा व सहानुभूति असल्यामुळें नव्हे तर त्याची बुद्धि त्याला 'क्षमा करणें चांगलें' असें सांगते म्हणून तो क्षमा करतो. ज्या जगांत राहणें प्रॉस्पेरोस प्राप्त होतें, त्या जगांत भांडणें व द्वेषमत्सर, महत्त्वाकांक्षा व वासना-विकार, फसवणुकी व अन्याय, वंचना व स्पर्धा, पश्चात्ताप व सूड, यांचा सर्वत्र सुळसुळाट आहे! पण प्रॉस्पेरोचें मन या जगांतून अधिक उंच पातळीवर जाऊन, या क्षुद्र धुळीपलीकडे जाऊन, विचार करूं लागतें. तो जीवनाची कठोरपणें निंदा करीत नाहीं. तो स्मित करतो व जरासा दुःखी असा साक्षी होऊनच जणूं राहतो! त्या मंतरलेल्या बेटावर मिरांदाला आपल्या पित्याहून वेगळीं आणखी माणसें दिसतात तेव्हां ती आश्चर्यचकित होते. पिता वगळल्यास अन्य मानवप्राणी तिनें आतांपर्यंत पाहिला नव्हता. नवीन माणसें दिसतांच

ती एकदम उद्गारते, "काय आनंद ! अहो, केवढें आश्चर्य ! किती सुंदर ही मानवजात ! किती सुंदर व उमदें हें जग, ज्यांत अशीं सुंदर माणसें राहतात !" पण प्रॉस्पेरो मुलीचा उत्साह व आनंद पाहून उत्तर देतो, "तुला हें जग नवीन दिसत असल्यामुळें असें वाटत आहे !" अनुभवानें त्याला माहीत झालेलें असतें कीं, या जगांतील प्रत्येक प्राणी जन्मजात सैतान आहे. या सैतानांना कितीहि उपदेश केला तरी तो 'पालथ्या घड्यावर पाणी' या न्यायानें फुकटच जातो. त्याचा कोणाहि माणसावर विश्वास नसतो, तरी तो सर्वांवर प्रेम करतो.

शेक्स्पिअरनें निर्मिलेल्या पात्रांपैकीं प्रॉस्पेरो हें सर्वोत्कृष्ट आहे येवढेंच नव्हे, तर खुद्द शेक्स्पिअरच जणूं परमोच्च स्थितींतील प्रॉस्पेरोच्या रूपानें अवतरला आहेसें वाटतें. प्रॉस्पेरोप्रमाणेंच खुद्द शेक्स्पिअरहि एक जादूगारच आहे. त्यानें आपल्या जादूनें या जगांत पऱ्या, यक्ष, गंधर्व, किन्नर इ० नाना प्रकार निर्मिले आहेत; भुतेखेतें, माणसें वगैरे सर्व कांहीं त्यानें निर्मिलें आहे. त्यानें आपल्या जादूनें मध्यान्हींच्या सूर्याला मंद केलें आहे, तुफानी वाऱ्यांना हांक मारली आहे, खालचा निळा समुद्र व वरचें निळें आकाश यांच्या दरम्यान महायुद्ध पेटवून ठेवलें आहे; पृथ्वीपासून स्वर्गापर्यंत सर्वत्र रणांगण पेटवून ठेवलें आहे. शेक्स्पिअरचा हुकूम होतांच आत्मे जागृत होऊन थडग्यांतून बाहेर पडतात, थडग्यांचीं दारें उघडतात ! महान् जादूगार !

सर्जनाची परमोच्च स्थिति अनुभवून प्रॉस्पेरोप्रमाणेंच शेक्स्पिअरहि मग आपली जादू गुंडाळून ठेवतो; टेंपेस्टमध्यें परमोच्च कला प्रकटवून तो आपली जादूची कांडी मोडून टाकतो व आपली जादूची पोतडी गुंडाळून ठेवून नाट्यसृष्टीची रजा घेतो. मठ्ठ डोक्यांच्या मानवांना उपदेश पाजून, त्यांची टिंगल करून, त्यांचा उपहास करून दमल्यावर आतां तो केवळ कौतुकापुरता साक्षी म्हणून दुरून गंमत पाहत राहतो.

शेक्स्पिअर अज्ञातच मेला ! त्याची अगाध बुद्धिमत्ता, त्याची अद्वितीय प्रतिभा जगाला कळल्या नाहींत; पण जगाच्या स्तुतीची त्याला तरी कोठें पर्वा होती ?

प्रकरण ४ थें

# फ्रेंच राजांपैकीं अति प्रसिद्ध राजा चौदावा लुई

— १ —

पुनः एकदां कवींच्या वातावरणातून खालीं उतरून राजांकडे वळूं या. सतराव्या शतकांत युरोपांतील राज्यकर्त्यांच्या महत्त्वाकांक्षा व घोडचुका यांमुळें युरोपीय संस्कृति जणूं नष्टप्राय झाली! शेक्स्पिअरनंतरच्या पिढीनें अत्यंत रक्तपाती असें धार्मिक युद्ध पाहिलें. प्रॉटेस्टंट आणि कॅथॉलिक राजे आपापल्या प्रजेची तीस वर्षें कत्तल करीत होते. 'ईश्वराच्या अतिथोर वैभवासाठीं' आपापले देश या राजांनीं उजाड व उध्वस्त केले! हें तीस वर्षें चाललेलें युद्ध १६४८ सालीं संपलें. सारें मध्ययुरोप जणूं ओसाड झालें होतें! भुकेलेलीं माणसें व भुकेलेले लांडगे मेलेल्या घोड्यांच्या प्रेतांसाठीं परस्परांशीं लढत होतीं. जर्मनीची लोकसंख्या एक कोटि साठ लक्ष होती ती साठ लक्षांवर आली. पश्चिम जर्मनींतील पॅलेटिनेट स्टेट अठ्ठावीस वेळां लुटलें गेलें! बोहेमियांतील तीस हजार गांवें भस्मीभूत झालीं!

वेस्टफॅलिया येथील तहानें तीस वर्षांचें युद्ध संपलें. पण या युद्धानें कशाचा-हि निर्णय झाला नाहीं. कॅथॉलिक पोपशीं निष्ठावंत राहिले; प्रॉटेस्टंट ल्यूथरची पूजा करीत राहिले. मध्ययुरोपांतील राजे खाटीकखाना चालवीत असतां इकडे इंग्लंडांत पहिला जेम्स मॅकिआव्हिलीच्या शिकवणीप्रमाणें अनियंत्रित सत्ता स्थापूं पाहत होता, प्रजेच्या हक्कांपेक्षा राजाची सत्ता अधिक असते असें दाखवूं पाहत होता. तो म्हणे, "ईश्वर काय करूं शकेल हें विचारणें जसें निंद्य, अधार्मिक आणि नास्तिकपणाचें, तद्वतच राजा काय करूं शकेल हें विचारणेंहि प्रजेला शोभत नाहीं. तें 'लहान तोंडीं मोठा घांस' घेण्यासारखें होय." जेम्सचा मुलगा पहिला चार्लस गादीवर आला तेव्हां त्यानें पित्याच्या उपदेशानुसार वागण्याचें नक्की ठरविलें. इंग्लंडचा अनियंत्रित राजा होणें हें त्याचें ध्येय होतें. सर्व सत्ता आपल्या हातीं असावी असें त्याला वाटत होतें. त्यानें पार्लमेंट बरखास्त केलें. जमीनदार व व्यापारी राजाचा उद्धटपणा व अनियंत्रित हडेलहप्पीपणा पाहून संतापले. अनियंत्रित राजाची सत्ता सहन करावयाला ते

बिलकुल तयार नव्हते. राज्यकारभारांत आपणांस सत्ता असलीच पाहिजे असा हट्ट त्यांनीं धरला. राजा ऐकेना; तेव्हां या अतिरेकी राजाविरुद्ध त्यांनीं बंड केलें व त्याला कैद करून शेवटीं त्याचें डोकें उडविलें!

पण इंग्रजांना जुन्या संवयी टाकून देणें कठिण होतें. ऑलिव्हर क्रॉम्वेलच्या नेतृत्वाखालीं रिपब्लिक स्थापण्याचे थोडेफार यत्न झाले; पण इंग्रज जनतेलाच राजा असावा असें पुनः वाटूं लागलें. नवा राजा आला; पण त्याची सत्ता अनियंत्रित राहिली नाहीं. राजे लोक धडा शिकले होते. पार्लमेंटशीं शत्रुत्व करण्याचें धाडस त्यांनीं पुनः केलें नाहीं. त्या वेळेपासून इंग्लंड राजशाही रिपब्लिक झालें. राजाचा मुकुट केवळ एक निरुपद्रवी अलंकार म्हणून राहिला. वास्तविक त्याची अवश्यकताहि नव्हती.

पण फ्रान्समध्यें अनियंत्रित राजसत्तेची कल्पनाच अधिक दृढावली. फ्रेंच राजांनीं पौर्वात्य सम्राटांप्रमाणें हुकूमशाही सुरू केली. ते प्रजेचे अनिर्बन्ध स्वामी होते. सारी प्रजा जणूं गुलाम! प्रजेंतील गुलामीची विषमताच जणूं त्यांनीं नष्ट केली. सारे दुबळ व अगतिक प्रजाजन! या अनियंत्रित फ्रेंच राजांपैकीं सर्वांत जास्त दिमाखखोर चौदावा लुई हा होता.

— २ —

चौदावा लुई हा एकंदरींत कार्यक्षम व लायक राजा होता. आपल्याजवळ दैवी सामर्थ्य आहे असें त्याला वाटे. त्याला आपण पृथ्वीवरचे देवच आहों असा भास होई. तो आपणांस सूर्यदेव म्हणवी. सूर्यदेव अपोलो याच्याप्रमाणें आपण या मर्त्यलोकीं प्रकाश, वैभव व आनंद आणणारे आहों असें तो म्हणे. त्याला वाटे कीं, ईश्वरानें हें जग जें निर्मिलें आहे तें त्यांत आपण आपल्या वैभवानें व दिमाखानें मिरवावें म्हणूनच होय.

त्याचे पुष्कळसे समकालीन लोक त्याच्या दिमाखानें दिपून जात व त्याला खरोखरच अवतारी मानीत. आजहि त्याच्या नांवाभोंवतीं तेजोवलय आहे. त्याचा एक अगदीं अर्वाचीन चरित्रकार लुई बरट्रांड लिहितो, "चौदावा लुई हा सर्वांहून थोर फ्रेंच मनुष्य होऊन गेला. तो सर्वश्रेष्ठ फ्रेंचमन होय." लुई बरट्रांडचें मन मध्ययुगीन आहे. घमेंडेनंदन व आदळआपट करणारे लोक त्याला आवडतात. हा चरित्रकार एके ठिकाणीं लिहितो, "ग्रीसचा

होमर, रोमचा व्हर्जिल, इंग्लंडचा शेक्स्‌पिअर, इटलीचा डांटे, जर्मनीचा गटे, तसा फ्रान्सचा चौदावा लुई." अशा प्रकारें लुईची अत्यंत स्तुति करून फ्रान्समधील थोर थोर कवी, शास्त्रज्ञ व तत्त्वज्ञ यांपेक्षांहि आपण चौदाव्या लुईला कां श्रेष्ठ मानतों याचीं कारणें तो देतो. तो म्हणतो, "चौदावा लुई हा दैवी राजा होता. फ्रान्समध्यें त्याच्यासारखा दैवी मनुष्य जन्मला नाहीं. त्यानें सारें आयुष्य युद्धांत घालविलें. त्याचें युद्धावर जितकें प्रेम होतें, तितकें कोणाचेंहि नव्हतें."

चौदावा लुई युद्धाच्या वातावरणांत वाढला. तीस वर्षांचें युद्ध संपण्यापूर्वी आठ वर्षें म्हणजे १६३८ सालीं तो जन्मला. युद्धांतील विजय म्हणजे परमैश्वर्य असें त्याला शिकविण्यांत आलें होतें. युद्धप्रिय राष्ट्रांतील विकृत व विपरीत नीति त्याच्या बालमनावर ठसविण्यांत आली होती. गुप्त कारस्थानें, खोटें बोलणें, फसवणूक, स्वार्थ, हांव, इत्यादि ध्येयें त्याच्यासमोर ठेवण्यांत आलीं होतीं. या विचारांवर तो पोसला गेला होता. त्याचा चरित्रकार बरट्रांड लिहितो, "लहानपणापासूनच आपले विचार व आपल्या भावना लपविण्याची आनुवंशिक कला त्याला साधली होती. आपलें स्वरूप लपवून ठेवण्याची गोष्ट अत्यंत फायदेशीर व अवश्यक असते. राजामधला सर्वांत मोठा गुण म्हणजे आपलें स्वरूप समजूं न देणें हा होय."

आपण मोठें झालें पाहिजे असें लहानपणासूनच त्याला वाटूं लागलें होतें. 'तूं कोणी तरी मोठा आहेस' असें त्याला लहानपणापासून शिकविण्यात येत होतें. त्याची जीवनांतील सर्वांत मोठी महत्त्वाकांक्षा हुषार धटिंगण होणें ही होती. त्याच्या शिक्षकांनीं त्याच्यासाठीं नाना प्रकारचे लढाऊ खेळ शोधून काढले होते. त्याचें सारें बालपण भांडणांत व मारामाऱ्यात गेलें. त्याचा स्वभाव वाघासारखा होता. ला पोर्टे नांवाचा त्याचा एक नोकर होता. वयाच्या तेराव्या वर्षीं हे लुई महाशय कसे होते, याचें गमतीदार शब्द-चित्र त्यानें रंगाविलें आहे. ला पोर्टे लिहितो, "आम्ही मॉंटेरोहून कॉर्बील येथें गेलों. तेथें लुईनें आपल्या धाकट्या भावास आपल्याच शय्यागारांत निजण्यास सांगितलें. सकाळीं दोघे भाऊ जागे झाले. चौदावा लुई आपल्या भावाच्या अंथरुणावर थुंकला; तोहि लुईच्या अंथरुणावर थुंकला. लुई रागावून भावाच्या तोंडावर थुंकला, तेव्हां तो धाकटा भाऊ उडी मारून लुईच्या अंथरुणावर

गेला व त्यानें तेथें लघुशंका केली! लुईनेंहि तोच प्रकार भावाच्या अंथरुणावर केला!..." असा हा तेरा वर्षांचा लुई होता.

आणि त्या वेळेस लुई राजा झाला होता. पांचव्या वर्षींच तो गादीवर बसला होता. पण चौदा वर्षांचा होईपर्यंत त्याला राज्याभिषेक करण्यांत आला नव्हता. त्याला राज्याभिषेक होईपर्यंत राज्यकारभार त्याची आईच पाहत होती. कार्डिनल माझारिन त्याला शिकवीत होता. हा इटॅलियन कार्डिनल लुईच्या आईचा प्रियकर होता. कार्डिनल माझारिन मोठा साहसी व नास्तिक होता. त्याची महत्त्वाकांक्षा पोप होण्याची होती. तो स्वतः अति हुषार, लफंग्या व दांभिक होता. त्यानें तरुण लुईला दंभाचें परिपूर्ण शिक्षण दिलें. तो लुईला सांगे, "मोठमोठ्या सरदार-घराण्यांतल्या लोकांना कस्पटासमान, पायावरील धुळीप्रमाणें मान. दरबारांतील सरदार-दरकदारांशीं कधींहि अधिक परिचय ठेवूं नको. लोक कृपेची याचना करतील तेव्हां चेहरा कठोर कर. मनांतील भाव कधींहि प्रकट न करतां जणूं अनाकलनीय गूढ बन. यातच खरा राजेपणा आहे. सर्व कारभार गुप्तपणें हांक. कोणालाहि कसलीहि दाद लागूं देऊं नको. शाब्दिक वचनें भरपूर द्यावीं; तीं पूर्ण मात्र कधींहि करूं नये. 'वचने किं दरिद्रता!'"

हा कार्डिनल माझारिन मॅकिआव्हिलीच्या राजनीतीवर पूर्ण विश्वास ठेवणारा होता. त्यानें आपल्या या छात्राला या सैतानी विद्येंत तरबेज केलें. मॅकिआव्हिलीच्या वचनांनीं भरलेली एक वहीच्या वही त्याच्याजवळ होती. तींतील सर्वांत प्रमुख वचन हें होतें:—"राजांची पूजा केली पाहिजे. त्यांची इच्छा म्हणजेच कायदा!" शुद्धलेखन लिहावयास शिकविणाऱ्या त्याच्या पंतोजींनीं हें वाक्य त्याच्याकडून पुनः पुनः घोटून घेतलें होतें.

बाळपणीं लुईची बुद्धिमत्ता सामान्य मुलाच्या बुद्धिमत्तेहून कमी दर्जाची होती. पण माझारिननें लुईच्या हृदयांत सुंदर वस्तूंविषयींची प्रीति निर्मिली. माझारिन हा इटॅलियन होता. त्याचें शिक्षण स्पेनमध्यें झालें होतें आणि आतां तो फ्रेंच संस्कृतीहि आत्मसात् करूं पाहत होता. तो सौंदर्योपासक होता. संगीत व मूर्तिकला यांच्यावर त्याची भक्ति होती. रेशीम व फिती, आरसे व रत्नें, चित्रें व पुस्तकें या सर्वांचा तो षोकी होता. तो जरा डँडी

म्हणजे नबाबी वृत्तीचा होता. इटॅलियन भिक्षुणींना तो स्वतःसाठीं नाना सुगंधी उटणीं व तेलें तयार करावयास लावी. या सुगंधी उटण्यांचा व तेलांचा उपयोग तो केवळ स्वतःसाठींच नव्हे तर आपल्या दोन आवडत्या माकडांसाठींहि करी. पण त्याच्यामध्यें असला नबाबीपणा असला, तरी एकंदरींत तो सौंदर्याचा प्रेमी होता यांत शंकाच नाहीं. सौंदर्योपासना हा त्याचा जणूं धर्म होता! जगांतील अत्यंत सुंदर असा कला-संग्रह त्याच्याजवळ होता. मरतांना 'हा सारा कला-संग्रह सोडून जाण्याची पाळी आपणावर येणार' हें एकच दुःख त्याला वाटत होतें.

माझारिन मेला तेव्हां राजा लुई तेवीस वर्षांचा होता. तो या कार्डिनलजवळच सौंदर्य-प्रेम शिकला होता. सारा फ्रान्स देश त्यानें जणूं म्यूझियम बनविला! ठायीं ठायीं त्यानें बागा, राजवाडे व सन्त-मंदिरें निर्माण केलीं. देशभर एक प्रकारचें कृत्रिम सौंदर्य दरवळूं लागलें! राजदरबारांत स्त्री-पुरुष पॉवडरी फांसून, रंग लावून, उंची पोषाख घालून, आढ्यतेनें व आदबीनें हिंडत, खातांपितांना अत्यंत नाजूक हावभाव करीत, साधें वाक्य बोलावयाचें असलें तरी त्यांत मोठमोठे शब्द योजीत. साधेपणा जणूं संपला व कृत्रिमता म्हणजेच जणूं कला व जीवन असें झालें! राजानें उत्तमोत्तम कवी व नाटककार, तत्त्वज्ञानी व शास्त्रज्ञ, तसेंच उत्कृष्ट आचारी आपल्या दरबारीं बोलावले. एकादा प्रेमळ धनी आपल्या कुत्र्यांशीं वागतो तसा तो सर्वांशीं वागे. आपल्या भोजनाच्या टेबलावरील तुकडे तो त्यांना प्रेमानें देई व त्यांचा कंटाळा आला म्हणजे कचरा फेंकावा त्याप्रमाणें त्यांना दूर फेंकी.

ज्याप्रमाणें पंडितांना व कलावंतांना त्याचप्रमाणें राजशाही वारांगनांनाहि तो वागवी. त्याच्या पुष्कळच वारांगना होत्या. क्षणभर तो त्यांना चढवी आणि मग लाथ मारी. लुईला देव मानणारे त्याचे कांहीं चरित्रकार तो स्त्रियांच्या बाबतींत असा बेछूट वागणारा नव्हता असें दाखविण्याची खटपट करीत असतात व त्याचीं प्रेमप्रकरणें पुष्कळ असलीं तरीहि तो विवेकी पति होता असें सांगत असतात. त्याचा चरित्रकार बरट्राड लिहितो, "अगदीं खासगी बाबतींतील बारीकसारीक गोष्टींबद्दल वाचक क्षमा करणार असतील तर मी सांगतों कीं, आपल्या एकाद्या प्रिय पात्राजवळ अत्यंत कामासक्तीनें रंगलेला असतांहि तो आपल्या पत्नीपासून सर्व रात्र कांहीं दूर राहत नसे.

त्या रमणीला सोडून शेवटीं संयमानें तो पत्नीकडे येईच." केवढा उदार व उदात्त राजा !

"मला आपले विकार आंवरवत नाहींत" असें तो पुष्कळदां आपल्या आईला सांगे व म्हणे, "मला याची लाज वाटते!" पण हे विचार व या वासना आंवरण्याचा यत्नच त्यानें कधीं केला नाहीं. व्हर्सायलिस येथील तो प्रसिद्ध आरसे-महाल—तो भव्य प्रासाद त्यानें बांधला. येथेंच तो आपल्या प्रियकरिणींची करमणूक करी, त्यांच्याबरोबर कामक्रीडा करी, नाचरंग खेळे, मेजवान्या देई. या त्याच्या विषयोपभोगांतील वैभव प्राचीन रोमन सम्राटांच्या वैभवापेक्षांहि अधिक असे. एकदां एका मेजवानीच्या प्रसंगीं त्याच्याजवळच्या तरवारीचें मॅन इतक्या हिऱ्यांनीं भरलेलें होते कीं, ज्या सोन्यांत ते हिरे बसविलेले होते तें सोनें दिसणेंहि मुश्कील झाले होतें !

ही सौंदर्योपासना, हीं सुखें, हे विलास, या सर्वांसाठीं लुईला अपरंपार खर्च करावा लागे. शेतकऱ्यांची दैना करून त्यानें फ्रान्सचें वैभव वाढविलें. अधिक उदात्त जगाचा पैगंबर जो डिडरो त्यानें एक सुंदर प्रसंग रेखाटला आहे. आपल्या आजोबांना—चौथ्या हेनरीला—चौदावा लुई आपला व्हर्सायलिसचा प्रासाद दाखवीत आहे. चौदावा लुईहि मेलेला असून त्याचें भूत तो राजवाडा आजोबांना दाखवीत असतां तो वृद्ध राजा राजवाड्याकडे बघतो व तदनंतर चुक्चुक् करून नापसंतीदर्शक मान हालवून म्हणतो, "बाळ, राजवाडा छान आहे, सुंदर आहे, यात शंकाच नाहीं. पण गोनेसी येथील शेतकऱ्यांची घरें कशीं आहेत तें पहावेंसें वाटतें." त्या भव्य राजवाड्याच्या आसपास राहणारे शेतकरी पेंढ्यांवर निजत, त्यांना राहण्याला घर नसे, त्यांच्या पोटांत भाकर नसे, हें लुईला व हेनरीला कळतें तर त्याना काय वाटलें असतें ?

— ३ —

आपल्या या भरमसाट खर्चाच्या विलासोपभोगांसाठीं लागणाऱ्या पैशांकरितां लुई सर्वांवर कर बसवी ; मोठमोठ्या सरदारांपासून तों किसानकामगारांपर्यंत सर्वांवर तो करांचा बोजा लादी. पण सरदार बिथरले तेव्हां त्यानें सारा बोजा सामान्य रयतेवरच टाकला ! आपल्या सार्वजनिक भाषणांतून व घोषणांतून

तो गरिबांबद्दल अपार सहानुभूति दाखवी. तो एकदां म्हणाला, 'शिपायांपेक्षां मजुरांचा उपयोग अधिक असतो.' तो दुसऱ्या एका प्रसंगीं म्हणाला, 'किसान व कामगार यांच्यावर माझें फार प्रेम आहे.' तो त्यांच्यावर प्रेम करी व त्यांना चिरडून टाकण्यासाठींहि शक्य तें सर्व करी. त्यानें शेतकऱ्यांची इतकी पिळणूक केली कीं, "शेवटीं शेतकरी गुरांढोरांप्रमाणें गवत खाऊं लागले!"

दुसऱ्यांबद्दल त्याला यत्किंचितहि सहानुभूति वाटत नसे. राजानें आपल्या हृदयांत दयेला थारा देतां कामा नये असें त्याचें मॅकिआव्हिली मत होतें. धनी गुलामावर चालवितो तशी राजानें प्रजेवर हुकुमत चालवावी असें तो म्हणे. प्रजेबद्दल तो फक्त तिरस्कारच व्यक्त करी. जणूं खालच्या योनींतील पशू समजूनच तो त्यांना वागवी. शौचाला बसल्या बसल्या तो मुलाखती देई व उघड्यावर एनिमा घेई. "आजूबाजूचीं माणसें म्हणजे कावळे, चिमण्या वा पशुपक्षी! त्यांची कदर कशाला? त्यांची कशाची लाज?" असेंच जणूं त्याला वाटे. एकादा सामान्य मनुष्य कुत्रा समोर असतां जसे हे विधी बिनदक्कत करील तसें माणसें समोर असलीं तरी लुई करी. त्याचीं स्तुतिस्तोत्रें गाणारा चरित्रकार बरट्रांड म्हणतो, "त्याचें हरएक कृत्य राजाला शोभेसें असे. कांहींहि करतांना आपण मोठा भूपाल आहों, थोर राजा आहों, हें तो कधींहि विसरत नसे."

— ४ —

तो स्वतःला दैवी समजे, अर्थात् परिणामतः दुसऱ्यांस तुच्छ मानी; तो स्वतःस अधिक चाहत असे, म्हणून दुसऱ्यांचा तिरस्कार करी. दुसऱ्यांचा तिरस्कार ही आत्मस्तुतीची निषेधक बाजू होती. तो स्वतःच्या मोठेपणाचा पुजारी होता. स्वतःला देव समजून तो आपला मानसन्मान करून घेई. प्राचीन जगज्जेत्या सम्राटांच्या पावलांवर पावलें टाकून जाण्यास तो उत्सुक होता. प्राचीन रोमन साम्राज्याचें पुनरुज्जीवन करून पोप व आपण अशीं ईश्वराचीं दोन रूपें कल्पून आपण दोघांनीं राज्य करावें असें त्याचें स्वप्न होतें. स्पेन व नेदर्लंड दोहोंविरुद्ध त्यानें सारखेंच आक्रमक युद्ध चालविलें होतें. चाळीस वर्षें चाललेल्या या युद्धानें त्यानें स्वतःसाठीं वैभव मिळविलें, पण राष्ट्राला मात्र भिकारी केलें. फ्रान्सची विपन्नावस्था झाली.

प्रजेनें भावना पेटून लढण्यासाठीं उठावें म्हणून प्रचार करण्याला तो धर्मोपदेशक पाठवी. हे धर्मोपदेशक प्रवचनें देत व सांगत, "राजांसाठीं मरणें हें शेतकऱ्याचें कर्तव्य होय, प्रजेचा हा धर्म होय." ॲबे थेसॉ नामक एक धर्मोपदेशक लिहितो, "तरुणांना कांहीं तरी करावयाला हवें असतें; म्हणून फ्रान्सला युद्धाची जरूरी आहे." फ्रान्समधले तरुण मरण–मारणांहून अन्य कांहीं करूं इच्छीत असले तरी त्यांना तसें कोण करूं देणार? बिशप बोसो याची घोषणा होती कीं, "राजाला युद्ध करावेंच लागलें तर तें त्यानें पूर्ण शक्तीनें करावें, सारी शक्ति एकवटून करावें. ...... राजाचें वैभव व यश म्हणजेच देशाचें भूषण!"

पण या राजानें किंवा या ॲबट–बिशपांनीं शत्रूंच्या गोळ्यांसमोर आपलीं शरीरें उभीं केल्याचा पुरावा मात्र आम्हांस तरी माहीत नाहीं. चौदावा लुई आपल्या देशांत तर आपला मोठेपणा वाढवीत होताच, तेथील कवी, लेखक, धर्मोपदेशक या साऱ्यांना तर त्यानें आपले भाट बनविले होतेच, पण इतर तटस्थ राष्ट्रांतील हुषार लेखकांनाहि लांच वगैरे देऊन त्यानें त्यांना स्वतःचीं स्तुतिस्तोत्रें गावयास लावलें. "चौदावा लुई हा अत्यंत थोर रोमन कॅथॉलिक ख्रिश्चन राजा आहे, सर्व मोठ्या उत्सवप्रसंगीं त्याचें स्मरण करा, त्याचें भलें चिंता," असें इतर देशांतील लेखकहि सांगत. लुई लढाईवर विश्वास ठेवी, तितकाच लांचलुचपतीवरहि. तो इतर देश लढाईनें जिंकूं पाही, तद्वतच पैशानेंहि; आणि त्याच्या या द्विविध प्रचारांपायीं शेतकऱ्यांना मात्र भिकारी व्हावें लागे.

लष्करी वैभवासाठीं हीं जीं पशुत्व, मूर्खत्व व कापट्य दाखविलीं जात, त्यांविरुद्ध क्वचित् कोठें आवाज निघतच नसे असें नाहीं. १६७५ सालीं मार्चच्या पांचव्या तारखेस राजा व त्याचे सारे दरबारी बसले असतां पाद्री मास्कारॉन यानें सर्वांसमोर युद्धविरोधी प्रवचन दिले. तो म्हणाला, "एकादा सामान्य चोर एकटा करतो तीच गोष्ट एकादा मोठा योद्धा सैन्य घेऊन करतो! चोराहून वेगळें त्याच्यामध्यें काय आहे? एक लहान चोर, दुसरा मोठा चोर!"

पण तेवीसशें वर्षांपूर्वीं जेरुसलेमच्या राजानें जेरेमियाच्या असल्याच शब्दांकडे दुर्लक्ष केलें, तसेंच चौदाव्या लुईनेंहि या शब्दांकडे दुर्लक्ष केलें.

लढवय्ये वीर अजून शान्तिदूतांची भाषा ऐकण्यास उत्सुक नव्हते. चौदाव्या लुईनें १७०७ पर्यंत आपलीं विजययुद्धें चालविलीं होतीं. त्यानें थोडासा नवीन प्रदेश मिळविला, पण त्यासाठीं स्वतःचे लाखों लोक बळी दिले!

चौदावा लुई मोठा श्रद्धाळू कॅथॉलिक होता. तो प्रॉटेस्टंटांना छळी. त्यानें कितीकांना हद्दपार केलें. दरसाल गुडफ्रायडेच्या दिवशीं बारा दरिद्री लोकांना बोलावून तो त्यांचे चरण प्रक्षाली व मग वर्षाचे उरलेले ३६४ दिवस तो त्यांना उपाशी मरूं देई.

बाहत्तर वर्षें राज्य करून लुई १ सप्टेंबर १७१५ रोजीं मेला. क्षुद्र व साध्या गोष्टींतहि कृत्रिमतेनें कसें वागावें हें त्यानें दरबारी लोकांस शिकविलें होतें. त्यानें दरबारी लोकांत कृत्रिमतेची कलावृत्ति निर्मिली, तर प्रजेंत अनियंत्रित राज्यसत्तेविरुद्ध चीड उत्पन्न केली. तिचेंच पुढें पाऊणशें वर्षांच्या अल्पावधींत फ्रेंच राज्यक्रान्तीमध्यें पर्यवसान झालें.

## प्रकरण ५ वें

# अहिंसक, युद्ध-प्रतिकारी जॉर्ज फॉक्स

— १ —

इंग्लंडमधील लीस्टरशायर परगण्यातल्या एका खेडेगांवांत तो वेडा माणूस राहत असे. तो एका चांभाराजवळ उमेदवार म्हणून होता. पण १६४३ च्या जुलै महिन्यात मूसा, येशू, बुद्ध, यांच्याप्रमाणें तो फकीर होऊन सत्यशोधार्थ बाहेर पडला. या साहसी सत्यशोधकाचें नांव जॉर्ज फॉक्स. त्याची जीवनांत निराशा झाली होती. सभोंवतालचें जीवन पाहून तो दुःखी होई. आपण या जगांतले नाहीं असेंच जणूं त्याला पदोपदीं वाटे. या जगांतील पशुता व हालअपेष्टा तो समजूं शकत नसे. त्या वेळीं युरोपांत त्रिंशद्वार्षिक युद्ध जोरात चालू होतें. इंग्लंडांत पहिला चार्लस शत्रूंचीं मुंडकीं उडवून तीं कुंपणावर लावून ठेवीत होता. अखेर पार्लमेंट संतापून राजाच्या मुंडक्याची मागणी करूं लागलें. राजकारणाची वा लढाईची यत्किंचितहि आवड नसणारांना घरांतून ओढून आणून सक्तीनें लढावयाला लावण्यांत येई. घरीं असणारांवर अपरंपार कर बसवून त्यांना भिकारी करण्यांत येई. वेळच्या वेळीं कर न देणाऱ्यांना

तुरुंगांत डांबण्यांत येई व त्यांच्या घरांतलें सामान जप्त करण्यांत येई. एकदां तर राजाचे हे दूत एका घरांत घुसून लहान मुलाचें दूध ठेवलेलें भांडें, त्यांतील दूध ओतून, घेऊन गेले. राजे व सेनापती यांच्यापुढें मानवजात मेटाकुटीस आली होती. रोगग्रस्त शरीर हळूहळू मरणाकडे जातें तद्वत् मानवसमाज मरणाकडे जात होता.

वीस वर्षांचा तरुण जॉर्ज जगातल्या या दुःखांवर कांहीं उपाय सांपडतो का, हें पाहण्यासाठीं आपला धंदा सोडून बाहेर पडला. ईश्वराच्या इच्छेचें ज्ञान आपणांस आहे, मानवांना कशाची जरुरी आहे हें आपणांस कळतें असा आव आणणाऱ्या धर्मोपदेशकांकडे तो गेला व 'माझ्या सत्यशोधनांत मला मदत करा' असें त्यांस म्हणाला. पण त्यांनीं त्याची टिंगल उडविली! एक म्हणाला, 'लग्न कर म्हणजे सारे समजेल.' दुसऱ्यानें उपदेशिलें, 'युद्धांत जा व युद्धाच्या रणधुमाळींत मनाचा सारा गोंधळ विसरून जा.' तिसरा म्हणाला, 'मानवजातीच्या चिंतेचा हा तुम्हांला जडलेला रोग बरा होण्यासाठीं कांहीं औषध वगैरे घ्या.' कोणीं सुचविलें, 'तंबाकू ओढूं लागा!' कोणीं म्हटलें, 'धार्मिक स्तोत्रें वगैरे म्हणत जा.' जॉर्ज सांगतो, "देवाचे हे जे पाईक, त्यांतील एकानेंहि माझें मन कां अशान्त आहे तें समजून घेण्याची खटपट केली नाहीं; मानवजातीचीं दुःखें काय आहेत तें एकानेंहि समजून घेतलें नाहीं. ते सारे पोकळ पिशव्या होते." फॉक्सच्या अनुभवास आलें कीं, सुशिक्षित मनुष्य विचार करणारा असतोच असें नाहीं. त्या वेळेपासून त्याला नाना भाषा बोलणाऱ्या सुशिक्षित पढतमूर्खांबद्दल व पोकळ धर्मप्रचारकांबद्दल सदैव तिरस्कार वाटे.

चार वर्षें तो स्वतःच्याच मनांत विचार करीत होता. आणि स्वतःच्या मनाला त्रास देणाऱ्या प्रश्नाचें उत्तर त्याला मिळालें. जगांतील दुखांचीं मुख्यतः तीन कारणें आहेत असें त्याला दिसलें :—

१. खिश्चन राष्ट्रांना खिश्चन धर्माविषयीं कांहीं कळत नव्हतें.

२. स्वतःला पुढारी म्हणविणारे फार अहंमन्य असतात व या पुढाऱ्यांच्या पाठोपाठ जाणारे फारच नेभळट असतात.

३. जगांतील निर्दय युद्धांमुळें मानवजात जणूं मरण-पंथास लागली आहे.

हीं तीन कारणें शोधून या जगांत प्रचार करण्यासाठीं, युद्धप्रिय जगाला शांतीचे मार्ग दाखविण्यासाठीं, तो बाहेर पडला. त्याची आमरण प्रचारयात्रा सुरू झाली. त्यानें पाऊस, बर्फ व वारा यांपासून स्वतःचा बचाव करून घेण्यासाठीं कातड्याची एक कोट-पाटलोण शिवली व रुंद कडांची एक टोपी तयार करून घेतली आणि निघाला हा यात्रेकरू ! सार्टर रिसार्टस या ग्रंथांत कार्लाईल म्हणतो, " अर्वाचीन इतिहासांतील अत्यंत प्रसिद्ध व लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे वॉटर्लूची, पेटर्लूची, ऑस्टरलिट्झची किंवा आणखी कोठली लढाई नव्हे, तर पुष्कळशा इतिहासकारांनीं उल्लेखहि न केलेली आणि टिंगल करण्यासाठींच कांहींनीं उल्लेख केलेली गोष्ट होय. सर्वांनीं ती लक्षांत ठेवण्यासारखी आहे : ती म्हणजे जॉर्ज फॉक्सनें आपल्या यात्रेसाठीं शिवलेला कातडी सूट. तो क्वेकर पंथाचा आद्य संस्थापक होता. त्याचा धंदा चाभाराचा होता. या विश्वाची दैवी कल्पना ज्यांना आविर्भूत होते अशांपैकीं तो एक होता. कांहींना या विश्वाची दिव्यता अधिक उदात्त स्वरूपात दिसते, कांहींना जरा कमी उदात्त स्वरूपांत दिसते, तर कोणाकोणाला अधिक विशुद्ध स्वरूपांत दिसते. तें कांहींहि असो, जॉर्ज त्यांपैकीं एक होता. ज्यांच्यासमोर विश्वाचें सत्यस्वरूप आविर्भूत होतें, त्यांना प्रॉफेट्स्, पैगंबर वा ईश्वरी वृत्तीनें रंगलेले अवलिये असें म्हणतात. जॉर्ज फॉक्सचें लीस्टरशायरमधलें चांभाराचें दुकान पोपाच्या प्रासादांपेक्षांहि अधिक पवित्र होतें. " हे थोर जॉर्ज फॉक्स, शीव, तुझा तो कातड्याचा सूट शीव. त्या कोटाला जो जो टांका तूं घालीत जाशील, तो तो गुलामगिरीच्या हृदयालाच जाऊन बोंचेल, धनपूजा व ऐहिकाची पूजा यांच्या हृदयांत घुसेल. तुझें हें काम संपलें म्हणजे युरोपांत एक मुक्त पुरुष दिसेल, एक खरा स्वतंत्र पुरुष दिसेल आणि तो म्हणजे तूंच. "

कातड्याच्या सुटांतील या शांतिदूताला कधीं कधीं शेतांतील गवताच्या गंजीजवळ निजावें लागे. तुरुंगांतल्या थंडगार जमिनीवर, दमट व ओलसर जागेंत कित्येक वर्षें त्याला सक्तीनें निजावयाला लावण्यांत आलें ! असा हा जॉर्ज फॉक्स जगांतील अत्यंत आश्चर्यकारक अशा सैन्याचा सेनापति होता. शांतीसाठीं झगडणारी—अहिंसेनें लढणारी—सेना !

जॉर्ज फॉक्सच्या काळांतले क्वेकर म्हणजे स्वातंत्र्यार्थ लढणारे वीर-शिरोमणी होत. हे सर्वांत शूर असे स्वातंत्र्य-सैनिक धर्म-प्रांतांतले अराजकवादी होते—धर्मांच्या बाबतींत ते कोणाचीहि सत्ता मानीत नसत. सतराव्या शतकांतल्या या अहिंसक प्रतिकारकांनीं शत्रूच्या रक्ताचा एकहि थेंब न सांडतां दीर्घकालपर्यंत लढाई चालविली व अखेर या शांततावीरांनीं विजय मिळविला.

— २ —

जॉर्ज फॉक्स प्रचारार्थ बाहेर पडल्याला आता सहा वर्षें झालीं होतीं. या सहा वर्षांत त्याला साठ निष्ठावंत स्त्री-पुरुष अनुयायी मिळाले. ख्रिश्चनांना खरा ख्रिश्चन धर्म देण्यासाठीं त्याचा प्रचार सारखा सुरू होता. दोनच वर्षांत साठांचे पन्नास हजार अनुयायी झाले. ते आपणांस 'प्रकाशवाळे' किंवा 'मित्रसंघ' म्हणवीत; पण पुढें त्याना क्वेकर हें नांव मिळालें. एका विरोधकानें म्हटलें, "प्रभूचें नांव उच्चारतांच कांपू लागावें असें हा आपल्या अनुयायांना सांगतो." क्वेक होतो अर्थात् कांपतो तो क्वेकर.

लोकांची अशी समजूत आहे कीं, क्वेकर भितुरडे असतात. शांतीचा प्रचार करणाऱ्या दुबळ्याचा हा संघ. झगडण्याची भीति वाटत असल्यामुळें हे जीवनांत प्रत्यक्ष भाग घेण्याला भितात; पण वस्तुस्थिति अगदीं वेगळी आहे. क्वेकरांचा इतिहास हा जगांतील अत्यंत रोमहर्षण इतिहास होय. जॉर्ज फॉक्स व कायदा न मानणारे त्याचे सैनिक प्रत्यक्ष—क्रियात्मक प्रतिकाराचे पुरस्कर्ते होते. ते मवाळ किंवा क्रियाशून्य प्रतिकाराचे पुरस्कर्ते नव्हते. सर्व प्रकारच्या अन्यायांशीं—वाईट गोष्टींशीं—झगडण्याचा उपदेश ते निर्भयपणें करीत. ते प्रथम चढाई करीत व शत्रूच्या गोटाला जाऊन भिडत. उपवास, कैद, अत्याचार, मरण, कशाचीहि त्याना भीति वाटत नसे—ते राजासमोरहि कधीं टोपी काढीत नसत. राजांच्या डामडौलाचा त्यांना तिटकारा वाटे. सर्व गुलामांना मुक्त करा असें ते जगांतल्या गुलामांच्या धन्याना सांगत, धर्मोपदेशकांच्या उद्धटपणाबद्दल त्यांची हजेरी घेत, अन्याय करणाऱ्या न्यायाधीशांची कानउघडणी करीत. युद्ध सुरू असतांहि सैनिकास शस्त्रें खालीं ठेवावयास सांगण्याला ते कचरत नसत.

तो एकदां " तुम्ही माणुसकी दाखवा, दया व प्रेम दाखवा, माणसांसारखे वागा " असा उपदेश करीत असतां एकानें त्याच्या तोंडावर ठोसा मारला, तरी रक्त पुसून फॉक्सनें आपलें प्रवचन पुढें चालू केलें. त्यानें उलट कधींहि मारलें नाहीं. स्वतःच्या लढाया लढण्याचें त्याच्याजवळचें अधिक प्रभावी हत्यार म्हणजे बुद्धि. न्याय्य गोष्ट पटवून देण्याची तो पराकाष्ठा करी. एकदां तर त्याला गुंडांनीं खालीं पाडून लाथांखालीं इतकें तुडविलें कीं, शेवटीं तो मूर्छित झाला. पण शुद्धीवर येतांच उभा राहून व हात पसरून तो म्हणाला, " या, मारा. हे बघा माझे हात, हें माझें डोकें, हे माझे गाल. हाणा, मारा. " तेव्हां एका धर्मोळू गवंड्यानें आपल्या हातांतल्या फिरावयाच्या वेळीं नेण्याच्या काठीनें खरोखरच त्याला चांगलें झोडपून काढलें! या गुंडांवर कायदेशीर इलाज करण्याचा त्याला देण्यांत आलेला सल्ला त्यानें मानला नाहीं. तो म्हणे, " माझें काय त्यांच्याशीं भांडण आहे, का वैयक्तिक हेवा-देवा आहे? मी सर्वांच्या स्वातंत्र्यासाठीं लढत आहें. जगाच्या स्वातंत्र्याच्या या विश्वव्यापी लढाईत माझ्या जीवनाची काय मातब्बरी! प्रभूनें माझ्यावर हल्ला करणाऱ्यांस क्षमा केली असतां मी त्यांच्या बाबतींत कां त्रास द्यावा? "

आणि यानंतर तो शांतीचा—युद्धविरोधाचा—प्रचार सर्वत्र करूं लागल्यामुळें त्याला तुरुंगांत घालण्यांत आलें. तेव्हांपासून त्याचें सारें आयुष्य तुरुंग व प्रचार यांतच विभागलें गेलें. तुरुंगांतून सुटतांच प्रचार, कीं पुनः तुरुंगवास, असें सारखें सुरू होतें. मानवांवर प्रेम करण्याच्या गुन्ह्यासाठीं त्याला तुरुंग-वासाची शिक्षा मिळाली. तो ज्या कोठडींत होता, तिचें वर्णन त्यानें पुढील-प्रमाणें केलें आहे:—

" मला उंच टॉवरमध्यें ठेवण्यांत आलें होतें. दुसऱ्या कैद्यांच्या कोठड्यां-तला सारा धूर तेथें येई. धुक्याप्रमाणें दाट येणारा तो धूर जणूं भिंतींवर चिकटून बसे. तीन कुलुपांच्या आंत मला कोंडण्यांत येत असे. धूर फार झाला तरी वरचा एकादा दरवाजा उघडण्यासाठींहि दुय्यम जेलर येत नसे. आपण धुरांत गुदमरून जाऊं असेंच जणूं त्याला वाटत असावें! शिवाय माझ्या अंथरुणावर गळतहि असे. कधीं बाहेर थंडी असे, कधीं पाऊस पडत असे. गळूं नये म्हणून व्यवस्था करावयाला मी गेलों कीं माझा सदरा भिजून

ओलाचिंब होऊन जाई. सर्व हिंवाळा पडून राहण्यांत गेला. थंडीनें मी गारठून जात असें; माझी उपासमारहि होत असे. माझ्या शरीराला सूज आली, अवयव बधिर होऊन गेले!"

आयुष्याचा बराचसा भाग जॉर्ज फॉक्सला अशा प्रकारच्या तुरुंगांत काढावा लागला. पापभीरु व ईश्वरभीरु इंग्रज लोक कैद्यांपेक्षां आपल्या कुत्र्यांचीच काळजी अधिक घेत. जॉर्ज फॉक्सची मुक्तता होणें शक्य असल्यास त्याच्याऐवजीं तुरुंगात पडण्यास—स्वातंत्र्य गमावण्यास—किती तरी क्वेकर-बंधू तयार होते.

पण मॅजिस्ट्रेट व जेलर जॉर्जला भयंकर माणूस मानीत. जगांत शांति असावी असें तो म्हणे, म्हणूनच शांतीला त्याचा धोका होता असें मानून ते त्याला तुरुंगांत ठेवू इच्छीत. त्याला नास्तिक, पाखंडी, शठ, देशद्रोही म्हणण्यांत येई. दंडे मारून त्याच्या डोक्यांतले शांतीचे विचार ते काढून टाकूं पाहत. त्याचा शांतीचा रोग गेला असें वाटून त्याला मुक्त करण्यांत आलें कीं लगेच त्याचा शांततेचा प्रचार पूर्ववत् पुनः सुरू होई. माणसें वाईट नसतात, तीं स्वभावतः चांगलीं असतात, इ० कल्पनांचा प्रचार त्यानें सुरू केला कीं पुनः त्याला तुरुंगांत अडकवीत. असा हा घरसोडीचा खेळ सारखा चालला होता.

जॉर्जचें शरीर दणकट होतें; तरीहि त्याची प्रकृति शेवटीं तुरुंगांत बिघडलीच. पण तुरुंगाधिकाऱ्यांनीं त्याचें शरीर मारलें तरी त्यांना त्याचें मन मारतां आलें नाहीं. इंग्लंडमधील कारागृहाच्या घाणींत व अंधारांत मानवी स्वातंत्र्याच्या ध्येयाचें बीं फुललें.

— ३ —

ऑलिव्हर क्रॉम्वेल इंग्लंडचा हुकूमशहा होता, तेव्हां सरकारविरुद्ध कट केल्याच्या आरोपावरून फॉक्सला पकडण्यांत आलें. या आरोपाला उत्तर म्हणून फॉक्सनें क्रॉम्वेलला एक पत्र पाठविलें. त्यांत तो लिहितो, "ईश्वरसाक्ष मीं अशी घोषणा केली आहे कीं, मी कोणाहि मानवाविरुद्ध कधींहि शस्त्र उचलणार नाहीं. तुमच्याविरुद्ध किंवा कोणाच्याहि विरुद्ध कोणतेंहि पाशवी शस्त्र मी उचलणार नाहीं. ईश्वरानें सर्व हिंसेच्याविरुद्ध

साक्षी म्हणून मला पाठविलें आहे; लोकांना अंधारांतून प्रकाशाकडे आणण्यासाठीं मला पाठविण्यांत आलें आहे; लढाया व लढायांचीं कारणें यांपासून मानवांना परावृत्त करून त्यांना शांततेच्या मार्गावर आणणें हें माझें जीवितकार्य आहे."

या विक्षिप्त व्यक्तीविषयीं क्रॉम्वेलला कुतूहल वाटलें; त्याची जिज्ञासा जागृत झाली. त्यानें फॉक्सला बोलावलें. सकाळीं सहाच्या सुमारास क्रॉम्वेलच्यासमोर त्याला आणण्यांत आलें. क्रॉम्वेल अंथरुणांत होता. त्याचा पोषाख अर्धवट होता. क्वेकर जॉर्ज फॉक्स आपल्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें म्हणाला, "या घराला शांति लाभो!" क्रॉम्वेलनें प्रत्यभिवादन केलें. पण तसें करतांना त्यानें जरा स्मित केलें.

ते दोघे धर्म, राजकारण, लढाया, यांवर बोलले. प्रत्येकाला दुसऱ्याच्या सहानुभूतीविषयीं, सूक्ष्मदृष्टीविषयीं व विचारशक्तीविषयीं आदर वाटत होता, आश्चर्यहि वाटत होतें. दोघेहि क्रान्तिकारक होते. मानवांमानवांत अधिक मोकळेपणाचे, शहाणपणाचे आणि मित्रभावाचे संबंध असावे असें दोघांनाहि मनापासून वाटत होतें. दोघांचेंहि ध्येय एकच होतें; पण दोघांच्या कार्य-पद्धतींत व साधनांत दोन ध्रुवांचा फरक होता. जगांत न्यायबुद्धि यावी म्हणून क्रॉम्वेल डोकीं उडवीत होता, तर सर्वांच्या हृदयांत करुणा व भूतदया यांचा उद्भव व्हावा म्हणून फॉक्स धडपडत होता. क्वेकर-पंथाचा पुढारी जॉर्ज फॉक्स हा सुद्धां एक क्रॉम्वेलच होता; पण आपल्याच देशबांधवांचें रक्त सांडण्याचा गुन्हा त्यानें कधींहि केला नाहीं.

फॉक्स जाण्यास निघाला तेव्हां क्रॉम्वेलनें त्याचा हात धरून सजल दृष्टीनें त्याच्याकडे पाहून म्हटलें, "पुनः एकदां माझ्या घरीं ये. आपण रोज तासभर एकत्र बसल्यास दोघेहि परस्परांच्या अधिक जवळ येऊं. मी आपल्या स्वतःच्या आत्म्याचें वाईट चिंतणार नाहीं तद्वतच तुमचेंहि वाईट चिंतणार नाहीं." तेव्हां फॉक्स शून्यपणें येवढेंच म्हणाला, "तूं माझें अशुभ चिंति-शील तर तूं स्वतःच्या आत्म्याचीच हानि करून घेशील" आणि पुनः शेवटीं म्हणाला, "तूं आपलें हृदय कठोर होऊं देऊं नको. मी गेल्यावर पुनः तुझें हृदय निर्भय होईल, जप." आणि तो चांभार ऋषि त्या हुकूम-शहाला सोडून गेला.

क्रॉम्वेल क्वेकरचा उपदेश विसरला. त्याच्या घरांत तर कधीं शांति नांदलीच नाहीं, पण त्याचीं हाडेंहि थडग्यांत सुखानें राहूं दिलीं गेलीं नाहींत! त्याच्या मृत्यूनंतर पुनः राजशाही सुरू झाल्यावर वेस्ट मिन्स्टर अॅबेमधून त्याचें थडगें उकरून त्याचा देह बाहेर काढण्यांत आला व त्याला फांशीं देण्यांत आलें. नंतर छिन्नविच्छिन्न करून तो देह एका कुंभाराच्या शेतांत फेंकून देण्यांत आला.

जो क्रॉम्वेल तरवारीच्या जोरावर स्वतःला कीर्ति व स्वतःच्या राष्ट्राला स्वातंत्र्य आणूं पाहत होता, त्याच्या जीवनाची शेवटची इतिश्री अशा प्रकारें लिहिली गेली! त्याची क्रान्ति त्याच्या मृत्यूबरोबरच अस्तास गेली. पण जॉर्ज फॉक्सनें सुरू केलेली अहिंसक क्रान्ति अद्यापि आहे, येवढेंच नव्हे, तर ती जगभर अधिकाधिक दृढतेनें व तेजानें पसरत आहे.

— ४ —

दुसरा चार्लस गादीवर आला. क्रॉम्वेलच्या कारकीर्दीत क्वेकरमंडळींवर रिपब्लिकविरुद्ध कट केल्याचा आरोप करण्यांत आला होता, आतां त्यांच्यावर राजाविरुद्ध कट केल्याचा आरोप करण्यांत आला. विद्यार्थी, धर्मोपदेशक, मेरी, इंग्लंडचे मॅजिस्ट्रेट, साऱ्यांनाच क्वेकरांचा छळ म्हणजे गंमत, असें वाटत असे. एकदां तर पंधरा हजार क्वेकर तुरुंगात होते. त्यांतले पुष्कळ जण तुरुंगांतच मेले. तथापि त्यांचे छळकहि त्यांना जरा भीत असत. क्वेकरांविषयीं त्यांना जरा कांहीं तरी गूढ वाटे. क्वेकर अत्याचाराची परतफेड मधुर वाणीनें करीत, अपमानाला स्मिताने उत्तर देत. त्यामुळें हे श्रेष्ठ अशा जगांत राहणारे जादूगार आहेत असें केव्हां केव्हा वाटे. एकदां फॉक्सला अटक झाली तेव्हां तो उडून जाऊं नये म्हणून चिमणीच्या धुराड्याजवळहि एक रखवालदार ठेवण्यांत आला होता!

फॉक्सवर देखरेख करणारे सैनिक त्याचें धैर्य, त्याचें व्यक्तिमत्त्व व त्याचें विभूतिमत्त्व पाहून दिपून जात. ते त्याला म्हणत, "तुम्ही आमच्या पलटणींत सामील व्हाल तर आम्ही तुम्हाला कॅप्टन करूं." फॉक्सनें शिपाई व्हावें म्हणून त्या शिपायांनीं पराकाष्ठा केली; पण त्यांना यश येण्याऐवजीं त्यांच्यांतल्याच पुष्कळांवर त्याच्या पंथाचे अहिंसक सैनिक बनण्याची पाळी आली.

— ५ —

१६६९ सालच्या ऑक्टोबरच्या अठराव्या तारखेस त्यानें स्वार्थमूर हॉल येथील न्यायाधीश फेल याच्या विधवेशीं लग्न केलें. तिचें नांव मार्गारेट फेल; ती आठ मुलांची आई होती. फेल-घराण्याशीं फॉक्सचा सतरा वर्षांचा संबंध होता. मार्गारेट मित्रसंघाची सभासद होती. क्वेकर लोकाच्या बैठकींसाठीं तिनें आपलें ऐसपैस व प्रचंड घर दिलें होतें. क्वेकर लोक तुरुंगांत होते तेव्हां ती त्याच्यासाठीं रदबदली करी. एकदोनदा तर ती स्वतः त्याच्यासाठीं तुरुंगांत गेली होती. ती उच्च कुळात जन्मली होती. ती सुंदर व सुसंस्कृत होती. जें जें काम ती हातीं घेई त्यात त्यांत तिला यशच येई. ती मनात आणती तर समाजांत श्रेष्ठ पदवी व राजदरबारात सत्कार मिळवूं शकली असती. पण बहिष्कृत जॉर्ज फॉक्सची संगति लाभावी म्हणून तिनें या सर्व गोष्टींवर लाथ मारली. क्वेकर लोकांसाठीं तिनें मानसन्मान व सुखोपभोग दूर लोटले! फॉक्सशीं लग्न करते वेळीं तिचें वय पंचावन वर्षांचें होतें. फॉक्स शेहेचाळीस वर्षांचा होता. हें दांपत्य तुरुंगांत नसे तेव्हा दोघेहि शांततेचा संदेश देत पृथक्पणें हिंडत असत. एकमेकांना एकमेकांच्या संगतींत फारसे राहतां येत नसे. त्यांच्या बावीस वर्षांच्या वैवाहिक जीवनांत फार फार तर पांच वर्षें तीं दोघें एकत्र राहिलीं असतील.

पण दोघामध्यें कोमल व गाढ प्रेम होतें. त्यांचा पत्रव्यवहार प्रसिद्ध आहे. दोघेंहि परस्परांना पत्रांत प्रथम परस्परांचें कुशल विचारतात. फॉक्सनें स्वतः-साठीं एक गरम कोट विकत घ्यावा म्हणून त्याच्या पत्नीनें पाठविलेले पैसे एके दिवशीं त्याला मिळाले. पण त्या पैशाचें त्यानें एक नारिंगी रंगाचें कापड खरेदी करून त्याचा मार्गारेटकरतां एक लांब झगा शिवविला व म्हटलें, "मला कोटाची जरुरी आहे, पण मार्गारेटला झग्याची अधिक जरुरी आहे." कधीं कधीं तो थकल्यासारखा दिसे तेव्हां ती त्याला म्हणावयाची, "पुरे आतां हिंडणें–फिरणें. स्वार्थमूरला घरीं येऊन राहा. विश्रांति घे." पण दूर करावयाला अन्याय शिल्लक असेपर्यंत फॉक्सला विसांवा कोठला? अमेरिकेंत क्वेकराचा छळ होत असल्याचें फॉक्सच्या कानांवर येताच इंडस्ट्री नांवाच्या एका फुटक्या जहाजांत बसून तो अमेरिकेंत जावयास निघाला. खलाशी व

उतारू गलबतांतील पाणी पंप करून सारखें बाहेर काढीत होते. गलबत बुडूं नये म्हणून हा जलोत्सर्गप्रकार रात्रंदिवस सुरू असे.

वारा व पाणी यांपासून धोका होता तसाच समुद्रावरच्या चांच्यांपासूनहि होता. पुष्कळ दिवस बार्बरी येथील चांचे त्याच्या गलबताचा पाठलाग करीत होते. पण इंडस्ट्री कशी तरी निभावली व साठ दिवसानंतर ब्रिटिश वेस्ट इंडीजमधील बारबुडा येथें येऊन लागली.

प्रवासांत फॉक्सला संधिवात व ताप यांचा आजार जडला. अमेरिकेंत उतरल्यावरहि या रोगानें तो आजारी होताच; पण तो शारीरिक दुःखांकडे लक्ष देत नसे. आजारीपण त्याला एक किरकोळ बाब वाटत असे तो आपलें काम सारखें करी, पण शेवटीं गळून जाई. गलबतांतून उतरतांच त्यानें वेस्ट इंडीजमधल्या क्वेकर-संस्थेंत व्यवस्थितपणा आणला. त्यानें नीग्रो गुलामांना स्वातंत्र्य दिल्याचें जाहीर केलें. १६७१ मध्यें जॉर्ज फॉक्सचें म्हणणें जर अमेरिका ऐकती तर अमेरिकेंत १८६१ सालीं अमेरिकेमधील आपसांतील गुलामगिरी नष्ट करण्यासाठीं जें युद्ध झालें तें झालेंच नसतें. वेस्ट इंडीज बेटांतून तो अमेरिकेंत गेला.

अमेरिकन वसाहतींत त्याच्या येण्याची फार अवश्यकता होती. ह्या नवीन खंडांत जणूं प्रॉटेस्टंटांचीच सत्ता होती. हें खंड प्रॉटेस्टंटांना निर्धोक करता करतां क्वेकरांना मात्र तें धोक्याचें झालें. मॅसाच्युसेट्स् वसाहतीचा गव्हर्नर एन्डिकॉट याच्या परवानगीशिवाय चार क्वेकरांनीं बोस्टन येथें पाऊल टाकलें म्हणून त्यांना फांशीं देण्यांत आलें. त्याचीं नांवें वुइल्यम रॉबिन्सन, मार्मड्यूक रॉबिन्सन, वुइल्यम लेड्रा व मेरी डायर. याच बोस्टन शहरांत क्वेकरांना दूध देणाऱ्यांना तुरुंगांत टाकण्यांत आलें होतें. डोव्हर गांवीं तीन क्वेकर बायांना गाडीपाठीमागें बांधून बर्फांतून ओढीत—फरफटत नेण्याची सजा देण्यांत आली होती. आणखी नऊ गावांनाहि अशीच शिक्षा फर्मावण्यांत आली होती. "या भटक्या क्वेकरांना पकडा. ......त्यांच्या पाठीवर दहादहा फटके मारा" असे हुकूम त्या शहराच्या कॉन्स्टेबलांना सुटले होते. या हुकुमांवर राइट ऑनरेबल रिचर्ड वाल्डेन याची सही होती. अमलबजावणी करण्याचें काम रेव्हरेंड रेनॉर याच्याकडे होतें. एका गांवच्या पोलिसांनीं फटके मारून त्यांना पुढच्या गांवच्या पोलिसांच्या ताब्यांत द्यावयाचें व आपल्या वसाहतींतून त्यांची पीडा घालवून द्यावयाची.

अमेरिकनांतील प्युरिटनांची हृदये विरघळविण्याचे कामी फॉक्सला फारसें यश आलें नाहीं; पण क्वेकरांची हृदयें मजबूत व अविकंप करण्यांत त्याला यश लाभलें. ‘ बलवंतांसमोर निर्भय राहा व दुबळ्यांबरोबर दयेनें वागा ’ असें त्यानें आपल्या अनुयायांच्या मनांवर अत्यंत उत्कृष्टपणें बिंबविलें. क्वेकर शरण गेल्याचें उदाहरण इतिहासांत नाहीं. त्याचप्रमाणें शरण येण्यासाठीं त्यांनींहि कोणावर कधीं सक्ती केली नाहीं. पेनसिल्व्हानियात क्वेकरांचें प्रभुत्व पाऊणशें वर्षे होतें, पण तेवढ्या काळांत क्वेकरांकडून एकहि इंडियन कधीं फसविला गेला नाहीं की कत्तल केला गेला नाहीं.

— ६ —

फॉक्स अमेरिकेंतून परत आल्यावर धार्मिक सहिष्णुतेचा संदेश देत इंग्लंडमध्यें फिरत राहिला. जगांत सर्वत्र शांतीचें साम्राज्य स्थापा असें तो शिकवीत असे. मरणाआधीं चार वर्षें म्हणजे १६८७ सालीं त्याच्या प्रयत्नांस निम्में यश आलें. दुसऱ्या जेम्सनें धर्माच्या बाबतींत भाषण–स्वातंत्र्य व विचार–स्वातंत्र्य देणारा कायदा पास केला. पण जागतिक शांततेची उरलेली निम्मी लढाई हळूहळू तथापि निश्चितपणें जिंकली जात होती. इतिहासांत आपणांस प्रथमच युद्धांची जरा लाज वाटूं लागली आहे—लष्करी हडेलहप्पांवरची श्रद्धा कमी होत चालली आहे.

लवकरच एक दिवस असा उजाडेल कीं जेव्हा लीस्टरशायरमधील हा अशिक्षित चर्मकार मानवजातीच्या थोर शिक्षकांपैकीं एक म्हणून सर्वत्र गौरविला जाईल.

## प्रकरण ६ वें

# ॲमस्टरडॅम येथील शांतमना स्पायनोझा

— १ —

स्वतःविषयीं युरोपीय पंडितांनीं चांगलें लिहावें–बोलावें यासाठीं चौदावा लुई लांचलुचपती देत होता. पण स्पायनोझाला तो पेन्शन द्यावयास तयार होता. अट एकच होती : या ज्यू तत्त्वज्ञान्यानें आपलें पुढचें पुस्तक लुईला अर्पण केलें पाहिजे. पण ज्याच्याविषयीं स्पायनोझाला आदर वाटत नसे त्याची खुशामत करण्याइतका क्षुद्रमति तो नव्हता; तो प्रामाणिक होता. त्याला

आत्मवंचना करावयाची नसल्यामुळें त्याने लुईचें म्हणणें नम्रपणें पण निश्चितपणें नाकबूल केलें.

याच सुमारास जर्मनींतील एक राजा कार्ल लुडविग यानें स्पायनोझाला हीडलबर्ग येथील विद्यापीठांत तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापकाची जागा देऊं केली. पण एका अटीवर : स्टेटच्या प्रस्थापित धर्मावर त्यानें कधीं टीका करतां कामा नये. स्पायनोझानें ती जागा साभार नाकारली. उपाशीं राहावें लागलें तरी हरकत नाहीं, पण सत्य च बोलावयाचें असें त्यानें ठरविलें.

त्याच्यासमोर असल्या सुवर्णसंध्या नाचत असता त्याला खरोखरच अर्धपोटीं राहावें लागत होतें. पैसे समोर खुळखुळत होते तरी त्यानें ते नाकारले. कधीं कधीं तो गव्हाच्या अगर दुसऱ्या कसल्या पिठाची नुसती कांजी पिऊनच दिवस काढी; चव यावी म्हणून तो तींत थोडे बेदाणे व थोड्या मनुका टाकी. अजीबात उपाशीं राहण्याचा प्रसंग येऊं नये यासाठीं त्याला पै न पै जपून खर्चावी लागे.

चांगलें व पोटभर अन्न तर मिळत नव्हतेंच; पण बौद्धिक श्रम मात्र भरपूर होत असल्यामुळें त्याला क्षय होणार असें दिसूं लागलें. पण ईश्वर-प्रेमानें मस्त असणारा हा निग्रही तत्त्वज्ञानी राजांचें साह्य नाकारीत होता, तशीच निकटवर्ती मित्रांचीहि मदत स्वीकारीत नव्हता. दुसऱ्यांची श्रद्धा व दुसऱ्याचे पैसे घेणें म्हणजे जणूं अधर्म असें त्याला वाटे. पोटासाठीं तो चष्म्याच्या कांचा घांसून देई व मिळणाऱ्या फुरसतीच्या वेळांत आपले विचार अधिक स्वच्छ व सतेज करी. कसें जगावें हें दुसऱ्यांना शिकविण्यासाठीं तो आपले विचार घाशी व स्वतःला जगतां येण्यासाठीं चष्म्यांच्या कांचा घांशी.

अशा अभंग व अविचल चारित्र्याचे लोक इतिहासांत फार विरळा! त्याचा आत्मा अत्यंत बलवान् होता. तो अगदीं एकाकी असा राहत होता. त्याच्या वयाच्या चोविसाव्या वर्षीं त्याच्या धर्मबांधवांनीं त्याला बहिष्कृत केलें होतें. त्यानें कोणताहि पंथ ( वा चर्च ) न पत्करतां स्वतःचा, सर्व चर्चें व सायनागॉग ज्याच्या पोटांत, येऊं शकतील असा स्वतंत्र विश्वव्यापक धर्म निर्माण केला. त्याला सर्व विश्वांत विश्वंभर भासत होता.

तो बंडखोर होता; पण त्याचें बंड विशिष्ट प्रकारचें होतें. त्याच्या बहिणीनें त्याचा वारसा लुबाडला होता. त्यानें तिला कोर्टांत खेंचलें व खटला जिंकला. पण पुनः सारी इस्टेट त्यानें तिलाच परत दिली.

कन्फ्यूशिअसप्रमाणें त्यालाहि अपकारावर वा अपायावर रागावण्याला मुळींच वेळ नव्हता. अपकार वा अपाय करणाऱ्यांवर रागावण्याइतका क्षुद्र तो नव्हता. तो स्वतःचा इतका अधःपात होऊं देत नसे. दुसऱ्यांवर रागावण्याइतका खालीं तो कधींहि येत नसे. ॲमस्टरडॅम येथील ज्यू धर्मोपदेशकांनीं त्याच्यावर बहिष्कार घातला व ' याच्याशीं संबंध ठेवूं नका, याला एकाद्या कुत्र्याप्रमाणें वागवा ' असें त्यांनीं सर्व ज्यूंना आज्ञापिलें, तरी त्याच्यावर न रागावतां स्पायनोझा त्यांना सोडून—आपली जात सोडून—निघून गेला. ' ज्यू राबींना जें मोलवान् वाटत आहे त्याचें ते रक्षण करीत आहेत. मला ते बहिष्कृत न करतील तरच स्वतःच्या धर्माशीं प्रतारणा केल्याचें पाप त्यांना लागेल. पण ज्यू धर्मोपदेशकांचें वर्तन त्यांच्या धर्मकल्पनेनुसार योग्य असलें तरी माझें वर्तनहि माझ्या विचारसरणीनुसार योग्यच आहे व मी वागलों तसा न वागतों तर माझ्या हातून माझ्या आत्म्याची फसवणूक झाली असती ' अशी त्याची विचारसरणी असल्यामुळें ज्यूंनीं त्याची ताबडतोब केलेली हकालपट्टी त्याच्या मतें तर्कदृष्ट्या योग्यच होती. तो आता एकटाच राहिला, धर्महीन लोकांत फेंकला गेला. त्याचा ज्यूंच्या धर्मावरचा विश्वास साफ उडाला होता !

ज्यूंनीं बहिष्कृत केल्यावर त्यानें आपलें मूळचें बरुच नाव बदलून बेनेडिक्ट केलें. स्पायनोझाचें तत्त्वज्ञान कब्बालाच्या गूढवादावर उभारलेलें आहे व त्याचें नीतिशास्त्र जगांतील प्रॉफेट्सच्या लिखाणांपासून मिळालेल्या स्फूर्तींतून जन्माला आलें आहे.

धर्माभ्यासांत तो ग्रॅज्युएट झाला; पण पास होतांना जास्तींत जास्त अपमान त्याच्या वांट्यास आला. धर्माभ्यासानंतर त्यानें लॅटिनचा व इतर धर्मोपदेशकांच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास आरंभिला. व्हॅन डेन एन्डे नामक डच पंडित त्याला लॅटिन शिकवीत असे. एन्डे भाषाकोविद् व व्युत्पत्तिशास्त्रज्ञ होता. धर्माच्या बाबतींत तो नास्तिक होता. पुढें कांहीं वर्षांनीं चौदाव्या लुईची त्याच्यावर अवकृपा झाली व त्याला सार्वजनिक रीत्या फाशीं जाण्याचा मान लाभला !

व्हॅन डेन एन्डेची मुलगी स्पायनोझाला शिकण्यांत मदत करीत असे. स्पायनोझा तिच्या मार्गदर्शनानें लॅटिनच नव्हे तर प्रेमहि शिकला. आपण ज्यू आहों हें विसरून त्यानें तिला लग्न करण्याची विनंति केली, तेव्हां तिनें त्याचें ज्यूपण त्याच्या ध्यानीं आणून दिलें व स्वतःच्या कर्केरिंग नामक दुसऱ्या एका

विद्यार्थ्याशीं लग्न केलें. तो तिच्याच धर्माचा असून हॅंबुर्ग येथें त्याचा फायदेशीर धंदा होता.

प्रेमाचा हा असा अनुभव आला, त्यामुळें तो शहाणा झाला व आपल्या विफल प्रेमापासून अमूर्तांच्या प्रेमाकडे वळला. त्यानें प्लेटो, स्टोइक व एपिक्युरियन पंथाचे तत्त्वज्ञानी, त्याचप्रमाणें त्याच्या वेळेपर्यंत झालेले सर्व तत्त्वज्ञानी वाचून काढले. गिऑर्डानो ब्रूनो हा विश्वीं विश्वंभर मानणारा होता; त्याच्या तत्त्वज्ञानाचा स्पायनोझावर बराच परिणाम झाला. ब्रूनोला नवीन विचार करणारा म्हणून जाळण्यांत आलें. तसेंच डेकार्टस्‌च्या गणितांतील अमूर्त तत्त्वांनींहि तो आकृष्ट केला गेला. सनातनी विचार प्रकट करण्याबद्दल डेकार्टस्‌ला राजांमहाराजांकडून मानसन्मान मिळाले होते. स्पायनोझाचें मन अतिशय विशाल होतें. तो जे जें वाची तें सर्व स्वतः पचवून टाकी. शेवटीं त्याचें तत्त्वज्ञान एक प्रकारचा ज्यू गूढवादच झालें. त्याला प्लेटोच्या विचारांचाहि रंग होता, एपिक्युरसच्या संशयवादाचीहि थोडीशी छटा होती व इटॅलियन हुतात्मा ब्रूनो याच्या अद्वैत तत्त्वज्ञानानेंहि त्याला थोडा आकार दिला होता. फ्रेंच तत्त्वज्ञानी डेकार्टस् याच्या गणिती परिभाषेंतून स्पायनोझाचें तत्त्वज्ञान जगासमोर मांडलें गेलें. स्पायनोझानें आपलीं सारीं पुस्तकें सिसरोनियन लॅटिनमध्यें लिहिलीं. त्याच्या बुद्धीइतकी विशाल व व्यापक बुद्धि इतिहासांत फारच क्वचित् दिसते. पण स्पायनोझाचें नीतिशास्त्र वर लिहिल्याप्रमाणें इसापचें नीतिशास्त्र होतें.

वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षी आपलें जन्मगांव ॲमस्टरडॅम सोडून तो लंडन शहराजवळच्या ऱ्हिन्स्बर्ग उपनगरांत येऊन राहिला. येथें प्राचीन इस्राईल ऋषींप्रमाणें तो शारीरश्रमानें पोटाला मिळवी व उरलेला वेळ जीवनाचें, तसेंच ईश्वराचें कोडें उलगडण्यांत घालवी. जीवनाचा अर्थ काय याचा विचार करीत तो बसे. करमणूक म्हणून तो कोळ्याच्या हालचाली बघत बसे. एकादा देवदूत मानवांच्या लीला पाहत असेल त्याप्रमाणें तो कोळ्यांच्या गंमती बघत बसे. आपसांत लढणाऱ्या कोळ्यांचीं भांडणें पाहून त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागत, गाल ओले होत. होतां होईतों तो कधीं प्रक्षुब्ध होत नसे. पण मालकिणीनें त्याच्या खोलींतील कोळिष्टकें झाडून टाकलीं तर मात्र त्याला जरासा राग येई.

कोळयांच्या जाळयांकडे पाहत असता तो मनांत आपल्या तत्त्वज्ञानाचें चिंतन करीत बसे. त्याचें पहिलें पुस्तक धर्मावर होतें. त्याचें नांव A Treatise on Religion & Politics. त्यांत त्यानें बायबलवर टीका केली होती. जुन्या करारांतील ईश्वराला रजा देऊन त्यानें स्वतःच्या नव्या करारांत अधिक दयाळू प्रभु निर्माण केला. स्पायनोझाचें हें नवे पुस्तक, हा त्याचा नवा करार म्हणजेच त्याचें सुप्रसिद्ध नीतिशास्त्र होय. भूमितीच्या पद्धतीनें स्पायनोझानें लिहिलेलें हें बायबल आहे; अध्यात्म गणितात बसविण्याचा त्याचा हा प्रयत्न आहे. हा अदृश्य जगाचा फोटो आहे. हें शाश्वततेच्या सांगाडयांत बसविलेलें जीवनाचे चित्र आहे.

कोणीं तरी म्हटलें आहे कीं, अध्यात्मशास्त्राचा अभ्यास म्हणजे अंधाऱ्या खोलींत तेथें नसलेलें मांजर शोधीत बसण्यासारखें आहे. पण दुसरे कांहीं म्हणतात कीं, ज्ञात जगाच्या अभ्यासाइतकाच अज्ञात जगाचा अभ्यासहि महत्त्वाचा आहे आणि आजचें अध्यात्मच उद्यांचें सृष्टिशास्त्र होईल. शास्त्रज्ञ पाऊल टाकण्यास भितात तेथें आपण वारंवार घुसूं पाहत असतों हें तत्त्वज्ञानी कबूल करतात. पण त्यांचें म्हणणें असें असतें कीं, तत्त्वज्ञान्यांनीं ज्या अंधारांत उडया मारल्या त्यांचेंच फळ विज्ञानांतील मोठमोठे शोध! अंधारांतील त्या उडयांतूनच विज्ञान जन्मलें आहे.

तत्त्वज्ञानाची प्रत्यक्ष उपयुक्तता किती आहे या वादांत न शिरतां स्पायनोझाच्या अध्यात्मसिंधूंत आपण बुडी घेऊं या. पण आपण फार पुढें मात्र जावयाचें नहीं. बुडणार नाहीं इतपतच खोल पाण्यांत आपण जावयाचें, प्रत्यक्ष सृष्टीच्या किनाऱ्यापासून फार दूर जावयाचें नाहीं, किनारा डोळ्यांसमोर ठेवावयाचा, असें ठरवून या समुद्रांत शिरूं या, बुडी घेऊं या.

— २ —

आपणां सर्वांस नेहमीं सोडवावेसे वाटणारे दोन प्रश्न स्पायनोझासमोरहि होते. कोणते बरें ते प्रश्न?

१. या जगांत आपणांस कोणीं जन्माला घातलें?

२. येथें आपण काय करावयाचें?

या प्रश्नांचीं उत्तरें मिळावीं म्हणून तो ईश्वराचें स्वरूप तपासूं लागला. ईश्वराचे स्वरूप, विश्वाची रचना, मानवाचें मन या तिहींचें पर्यालोचन त्यानें सुरू केलें.

तो अशा निर्णयाला आला कीं, ईश्वरांत सारें आहे व ईश्वर सारें व्यापून आहे. ईश्वर म्हणजे सृष्टि निर्माण करणारें परम ज्ञान; त्या ज्ञानानें उत्पन्न होणारें हें जगहि तोच आहे. परमेश्वर म्हणजे सनातन स्रष्टा, चिरंजीव व अमर कलावान्. काळाच्या खटक खटक करणाऱ्या भव्य मागावर सृष्टिचंद्रसूर्य-ताऱ्यांचें व नाना ज्योतिर्गोलांचें तेजस्वी वस्त्र तो विणीत असतो व स्वतःच तें पांघरतो. हें दृश्य विश्व म्हणजे प्रभूचें शरीर आहे. आणि विश्वाला चालना देणारी प्रेरणा, अंतःशक्ति व अंतःस्फूर्ति म्हणजे त्या प्रभूचें मन. पण शास्त्रज्ञ 'वस्तू व वस्तूंतील शक्ति एकरूप आहेत' असें म्हणतो, त्याप्रमाणेंच प्रभूचें हें शरीर व त्याचें मन एकरूप आहेत.' दुसऱ्या शब्दांत हेंच सांगावयाचें झालें तर ईश्वर म्हणजेच हें अनंत विश्व व अनंत ज्ञान. ईश्वर म्हणजेच विश्व. प्रत्येक पर्णांत, मातीच्या प्रत्येक कणांत, प्रत्येक प्राणिमात्रांत—मग तो कितीहि क्षुद्र असो—व सर्व चराचरांत परमात्मतत्त्व आहे. ईश्वराची दिव्यता चराचरांतील अणुरेणूंत आहे. आकाशांतील अत्यंत तेजोमय गोल व पृथ्वीवरील एकादा भिकारी दोघांचीहि या सृष्टीच्या महाकाव्यांत सारखीच जरुरी आहे. सृष्टीच्या महाकाव्यांत हीं दोन्ही अक्षरें सारखींच महत्त्वाचीं आहेत.

हें विश्वाचें महाकाव्य त्या अनंत ज्ञानाचें फळ आहे. मानवाच्या क्षुद्र इच्छा व त्याचे क्षुद्र कायदे यांना अनुसरून हें विश्वकाव्य रचण्यांत येत नसतें. ईश्वरी मनोबुद्धि व मानवी मनोबुद्धि यांत बिलकुल साम्य नाहीं. जीवनाच्या नाटकांत प्रभूनें जें संविधानक योजिलेलें असेल तें आपल्या बुद्धीच्या कक्षेच्या पलीकडचें आहे. तें केवळ मानवाची दृष्टि ठेवून निर्मिलेलें नाहीं. मानवानें त्यावर बरें कीं वाईट हा निर्णय देत बसूं नये. नाक चष्मा ठेवण्यासाठीं आहे असें म्हणणें अगर डासांनीं चावावें म्हणून हातपाय आहेत असें म्हणणें जितकें वेडेपणाचें, तितकेंच हें विश्व आमच्यासाठीं निर्मिलेलें आहे असें म्हणणे हेंहि वेडेपणाचें आहे. मानवांनीं आपल्या मर्यादित ज्ञानानें ईश्वराच्या अनंत ज्ञानावर आक्षेप घेऊं नये.

स्पायनोझाच्या मतें ईश्वर हा एकादा लहरीनुसार वागणारा सृष्टीचा हुकूमशहा नसून तो जणूं दैवी चित्कळा आहे. स्पायनोझाचा ईश्वर कोठें स्वर्गात बसलेला नाहीं. तो आमच्या प्रार्थनांमुळें जय किंवा आमच्या शत्रूंच्या प्रार्थनांमुळे अपजय देत नसतो. आपणांस जें सत् वा असत् वाटतें त्याच्याशीं त्या परमात्म्याला कांहीं एक करावयाचें नाहीं. जें निर्माण केलेंच पाहिजे असें परमेश्वराला वाटतें तें तो आपल्या अनंत बुद्धीला योग्य वाटणाऱ्या नियमानुसार निर्माण करतो. या विश्वाला गतिमान् ठेवणारें शाश्वत व सनातन यंत्र म्हणजे ईश्वर; पण या यंत्राला प्रेरणा देणाराहि तोच व या यंत्राचें नियमन करणारी चिच्छक्तीहि तोच. आणि शाश्वत गतिमान् व शाश्वत प्राणमय अशा या शक्तियंत्रांतले आपण सारे अवश्यक असे भाग आहो. आणि त्या अनत शक्तिमान् यंत्रालाच आपण अधिक सुटसुटीत नांव न सांपडल्यामुळें ईश्वर म्हणून संबोधितों.

ईश्वरी इच्छा म्हणजेच निसर्गाचा कायदा. प्रकाश ताऱ्यांताऱ्यांपर्यंत सारखा फिरत आहे; मनुष्याची जाणीव–शक्ति सारखी काम करीत आहे. कारण तीं सर्व ईश्वरी इच्छेचा कायदा मानतात. प्रकाश प्रकाशाचा अवश्यक कायदा मानतो. मनुष्याची जाणीव जीवनाचा कायदा मानते. आपली मानवी इच्छाशक्तीहि अवश्यक अशा नियमांचें पालन करते. जगांत फ्री वुइल किंवा इच्छा–स्वातंत्र्य अशी चीज नाहींच.

आपण परिस्थितीचीं बाळें आहों. परिस्थिति आपणांस बनविते. स्पायनोझा लिहितो, " आपल्या मनांत केवळ सर्वतंत्रस्वतंत्र असें कांहींच नाहीं; आपणांस इच्छास्वातंत्र्य नाहीं. आपण जी कांहीं इच्छा मनांत करतों ती कोणत्या तरी कारणामुळें असते; त्या कारणाला दुसरें कारण असतें, त्या दुसऱ्या कारणाला तिसरें कारण असतें; अशा प्रकारें कार्यकारणपरम्परा अनंत असते." दुसऱ्या शब्दांत हेंच सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, आपल्या तोंडावरचे भाव किंवा शरीराचे स्नायू यांच्याप्रमाणेंच आपलीं सारीं कर्मेंहि नैसर्गिक शक्तींवरच अवलंबून असतात. या नैसर्गिक शक्ती आपली कल्पनाशक्ति भूतकाळांत मागें पाहूं शकेल तेथपासून सारख्या चालूच आहेत. अनंत काळापासूनच म्हणा ना ! निसर्गाच्या नियत नियमाप्रमाणें असें कायमचेंच ठरलेलें आहे कीं, दैवी संगीत लिहिण्याला बीथोव्हेन जन्मावा, लाखों लोकांना हिंसक मरणाकडे नेण्याला नेपोलियन निर्माण व्हावा. आकाशांतून खालीं

पडणाऱ्या पावसाला स्वातंत्र्य नाहीं अगर धनुष्यापासून सुटलेल्या बाणाची दिशा बदलतां येत नाहीं, त्याचप्रमाणें आपलीं कर्मेंहि नियतच आहेत. आपली इच्छा असो, नसो, तीं तशीं हातून घडावयाचींच. बाणाची गति व मानवाचें कर्म यांत फरक इतकाच कीं, मानवाला आपल्या कर्माची जाणीव असते, स्वकर्माचें भान असतें. आणि या केवळ जाणिवेलाच तो चुकून आपली इच्छाशक्ति मानतो.

आपण काय करतों तें आपणांस माहीत असतें; पण तें करणें भागच असतें; तद्विपरीत वागण्याचें सामर्थ्य वा स्वातंत्र्य आपणांस नसतें. आपण आपल्या नियतीशीं निबद्ध आहों. आपल्या जीवनाच्या या छोट्या नाटकांत केवळ प्रेक्षक म्हणून राहण्यास आपणांस परवानगी आहे. पण त्यांत ढवळाढवळ करावयाला, तेथें लुडबूड करावयास आपली इच्छा सोडण्याला आपणांस परवानगी नाहीं. आपल्या कर्मांकडे पाहण्याची आपणांस पूर्ण मुभा आहे; पण आपलीं कर्में आपणच ठरवितो असें जें आपणांस वाटतें तें मात्र चूक आहे. आपण जे कांहीं निर्णय घेतों ते केवळ आपल्याच भूतकाळाचे, गत जन्मींचे परिणाम नसून आपल्या सर्व पूर्वजांच्या मागील जन्मांचा तो परिणाम असतो.

म्हणून स्पायनोझा शेक्सपिअरच्या अपूर्व बुद्धिमत्तेबद्दल त्याची स्तुति करीत नाहीं किंवा खुनी माणसानें केलेल्या गुन्ह्यासाठीं त्याच्यावर रागावत नाहीं. तो लिहितो, " आपणाकडून दुसऱ्यांचा उपहास होऊं नये, तसेंच स्वतःला कधींहि दुःख होऊं नये, आपणाकडून कोणीहि तिरस्कारिला जाऊं नये म्हणून मी फार जपतों. मानवी—मनुष्यांच्या हांतून होणारीं नानाविध कर्में समजून घेण्याचा प्रयत्न मीं काळजीपूर्वक केला आहे." तो गुन्हेगाराला शासन करील, पण सूडबुद्धीनें मात्र नव्हे. तर त्याच्यापासून समाजाचें रक्षण व्हावें म्हणून. थंडगार वाऱ्यामुळें पडसें आलें म्हणून काय आपण वाऱ्यावर रागावतों ? त्या वाऱ्याविषयीं आपली जी उदासीन, अनासक्त भावना असते, तीच स्पायनोझा आपल्या निंदकांविषयीं व अपायकर्त्यांविषयीं ठेवी. त्याची एक प्रकारची शास्त्रीय अनासक्ति असे. कार्यकारणभावाच्या अनंत सांखळींतील प्रत्येक वस्तु अपरिहार्य असा दुवा आहे हें त्यानें जाणलें होतें. तो प्रत्येक नैसर्गिक कर्म वा मानवी कर्म शाश्वततेच्या प्रकाशांत पाहतो व अविचल राहतो.

— ३ —

अशा प्रकारें शाश्वततेच्या आरशांत पाहिल्यावर स्पायनोझा आपणांस जसें पाहतो त्याप्रमाणें आपण आपणांस पाहण्याची खटपट करूं या. प्रत्येक सजीव वस्तु ईश्वराचाच अंश आहे. काळाच्या पृष्ठावर साकार रूपानें, मूर्त रूपानें, प्रकट झालेला ईश्वराच्या अमर महाकाव्यांतील विचार म्हणजे प्रत्येक जीव. पृष्ठ नष्ट झालें कीं काव्याचें मूर्त स्वरूप नष्ट होतें, अदृश्य होतें. पण तो विचार अदृश्य झाला तरी मरत नाहीं. होमरची कविता असलेलें पुस्तक फाटलें म्हणजे होमरची कविता नष्ट झाली असें होत नाहीं, त्या कवितेचें केवळ तें मुद्रण नष्ट होतें. होमरचे विचार अनेक पृष्ठांवर छापलेले आहेत. तीं पृष्ठें नष्ट करतां आलीं तरी ते विचार नष्ट करतां येणार नाहींत. शरीर मरतें, पण आत्मा राहतोच. रूपक बदलून असें म्हणतां येईल कीं, प्रत्येक जीव म्हणजे जीवनाच्या कॅलेडोस्कोपमधील रंगीत कांचेचा एक तुकडा आहे. पुनः रूपक बदलून असेंहि म्हणतां येईल कीं, ईश्वराचा आत्मा, तो परमात्मा किंवा ईश्वरी योजना म्हणजे एक सूर्य आहे व मानवी शरीर म्हणजे पंकिल पल्वल आहे. तें तळें आटलें—म्हणजेच हें शरीर मेलें—कीं सूर्याचें प्रतिबिंब नाहींसें होतें, पण सूर्य पाहिल्याप्रमाणेंच तेजानें तळपत असतो.

दुसऱ्या शब्दांत बोलावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, प्रत्येक मानवी प्राणी म्हणजे दैवी ब्रह्माचा अंश आहे. व्यक्ति मरते म्हणजे बिंदु सिंधूंत मिळून जावा त्याप्रमाणें आत्मा परमात्म्यांत विलीन होतो. एकादी तान महासंगीतांत विलीन व्हावी तसा आत्मा परमात्म्यात मिळून जातो. क्षणभर दिक्कालांत आलेला—स्थानबद्ध झालेला तो भव्य, दिव्य विचार पुनः शाश्वततेच्या योजनेंत जाऊन बसतो. "शरीरनाशाबरोबर मानवी मनाचा संपूर्ण नाश होणें शक्य नाहीं. ...... सद्गुणी आत्मे ईश्वरी अंशाचे असल्या-मुळें—दैवी ज्ञानाचे अंशभाक् असल्यामुळें—चिरंजीवच आहेत."

मानवी प्राणी म्हणजे इतस्ततः विखुरलेले पृथक् व अलग जीव नव्हेत. प्रत्येक केवळ स्वतःसाठीं धडपडणारा व स्वतःपुरता जगणारा नाहीं. आपण सारे त्या दैवी ब्रह्माचे संबद्ध भाग आहों. आपणांस माहीत असो वा नसो,

आपण सारे एकाच ध्येयासाठीं धडपडत आहों. आपण सर्व एकाच कुटुंबाचे घटक आहों; येवढेंच नव्हे तर आपण एकाच विराट् शरीराचे अणू आहों. अगदीं क्षुद्रतम माणसावर केलेला प्रहारहि साऱ्या मानवजातीच्या शरीरावरील आघात होय. एकाद्या क्षुद्र व्यक्तीविरुद्ध केलेला अन्याय साऱ्या मानवजातीवरीलच अन्याय होय. जो आपल्या सर्व मानवबंधूंना सहानुभूति दाखवितो, जो सर्वांवर प्रेम करतो, तो जीवनाच्या स्वरूपाशीं सुसंवादी आहे असें म्हणावें. स्पायनोझाच्या मताचा वॉल्ट व्हिटमन् लिहितो, "सहानुभूतिशून्य हृदयानें तुम्ही एक फर्लांग चाललां, तर आपलेंच कफन पांघरून तुम्हीं आपलीच प्रेतयात्रा काढली असें म्हणण्यास हरकत नाहीं."

दुसऱ्यांचें सुख वाढवून त्यायोगें स्वतः सुख मिळविणे हें मानवी जीवनाचें साध्य आहे. "शहाणा माणूस जी गोष्ट दुसऱ्यासाठीं इच्छीत नाहीं ती तो स्वतःसाठींहि इच्छीत नाहीं." अल्पसंतुष्ट असणें, द्वेषाची परतफेड प्रेमानें करणें, दैवानें जें जें भोगावें लागेल तें तें आनंदानें व धैर्यानें हंसत हंसत सहन करणें म्हणजेच भलें जीवन, अर्थात् स्पायनोझाच्या मतें प्रज्ञावंतांचा संपूर्ण मार्ग अगर श्रेष्ठांचा निर्दोष मार्ग होय. मुख्य गोष्ट ही कीं, सर्व जगाशीं एकरूप होऊन राहण्यांत आनंद मानावयास शिका. तुमचें तसेंच तुमच्या शेजाऱ्याचें जीवन कितीहि क्षुद्र असले तरी, या विश्वाच्या विराट् वस्त्रांतील ते अवश्यक असे धागे आहेत हें कधींहि विसरूं नका. "आपल्या मनाचें सर्व निसर्गाशीं ऐक्य आहे याची जाणीव वा याचें ज्ञान असणें ही परम मंगल व कल्याणप्रद गोष्ट होय." हें जग तुमच्यासाठीं केलेलें नसलें तरी निदान तुम्ही तरी या जगासाठीं केले गेले आहां. तुम्ही या जीवनाच्या ग्रंथांतलें एक महत्त्वाचें पृष्ठ आहां. तुम्ही नसाल तर तो अपूर्ण व अपुरा राहील हें विसरूं नका.

स्पायनोझाचें जीवन अति सुंदर व रमणीय, पण फारच अल्प होतें. एका जागेहून दुसऱ्या जागीं असा तो सारखा फिरत होता. शेवटीं हेग येथें एका मित्राच्या घरीं तो राहिला. त्याच्या हयातींतच हें घर यात्रेचें ठिकाण झालें. स्पायनोझाच्या दर्शनाला त्याच्या काळांतले सारे महाबुद्धिमान्, प्रज्ञावंत व प्रतिभाशाली लोक येत. तो आपल्या काळांतील महर्षि होता, बुद्धिमंतांचा राणा होता. या घरांतच तो बसे. आजूबाजूला शारीरिक व्यवसायाचीं हत्यारें पडलेलीं

असत. त्याच्या अंगावर साधे कपडे असत. कपड्यांबाबत तो एकदां म्हणाला, "शरीर ही काय फार मोलाची वस्तु आहे? ही साधी वस्तु फार मोलवान् कपड्यांत कशाला गुंडाळावयाची?" येथें बसून तो मित्रांचें स्वागत करी. येथेंच बसल्या बसल्या त्यानें तें अमर नीतिशास्त्र लिहिलें. हा ग्रंथ—त्याचें हस्तलिखित त्याच्या मित्रांनीं वाचलें होतें व समक्ष तोंडीं तशीच पत्रांनीं त्यांनीं त्यावर चर्चा केली होती. हा ग्रंथ त्याच्या मरणोत्तर छापला गेला. फ्रान्स व हॉलंड यांचें युद्ध या वेळीं चाललें होतें. राज्यकर्त्यांच्या महत्त्वाकांक्षा व सेनापतींच्या हालचाली व हुलकावण्या यांकडे त्याचें लक्ष नसे. त्याला त्यांची गोडी नव्हती. त्याला शत्रूंविषयींहि देशबांधवांइतकाच आदर वाटे. त्याचा आनंद एकच होता; तो म्हणजे तत्त्वज्ञानविषयक. एकदां तर एकाद्या निष्पाप मुलाप्रमाणें, एकाद्या विश्वप्रेमी सन्ताप्रमाणें तो शत्रुसैन्याच्या सेनापतीनें बोलावल्यावरून शत्रूच्या गोटांत गेला. सेनापति प्रिन्स कोंडे याला स्पायनोझाशीं थोडी तात्त्विक चर्चा करावयाची होती, थोड्या तात्त्विक गप्पा मारावयाच्या होत्या. त्या वेळीं तो चुकून शत्रूचा हेर म्हणून फांशींच दिला जाणार होता.

आपण देशद्रोही नाहीं अशी आपल्या देशबांधवांची खात्री पटविण्याचे कामीं सुदैवानें त्याला यश आलें म्हणून बरें. आपण निरुपद्रवी ज्ञानोपासक आहों हे त्यानें पटवून दिलें म्हणूनच त्याचे प्राण वांचले. पण त्याचे प्राण फार दिवस वांचावयाचे नव्हते. त्याची प्रकृति क्षयाच्यानें खालावत होती. १६७७ सालच्या हिंवाळ्यांत त्याची खालावलेली प्रकृति अधिकच खंगली व फेब्रुवारीच्या बाविसाव्या तारखेस तो मरण पावला. त्याच्या घराचा मालक व त्याच्या घराची मालकीण चर्चमध्यें गेलीं होतीं. त्याचा वैद्य तेवढा त्याच्याजवळ होता, त्यानें टेबलावर असलेले सर्व पैसे लांबविले, चांदीच्या मुठीचा एक चाकूहि गिळंकृत केला आणि मृत देह तसाच टाकून तो निघून गेला. स्पायनोझा हें पाहावयाला असता तर पोट धरून हंसला असता.

मरणसमयीं त्याचें वय फक्त चव्वेचाळीस वर्षांचें होतें. त्याच्या मनोबुद्धीचा पूर्ण विकास होण्याची वेळ येत होती. तो परिणतप्रज्ञ होत होता. अशा वेळीं घाला आला आणि तो गेला. पण रेननच्या शब्दात म्हणू या कीं, "ईश्वराची अत्यंत सत्यमय दृष्टि आजपर्यंत जर कोणीं दिली असेल तर ती स्पायनोझानें. ती दृष्टि देऊन तो गेला." शोर मॅचर लिहितो, "विचाराच्या

क्षेत्रांत स्पायनोझा अद्वितीय आहे. त्याच्याजवळ कोणीहि जाऊं शकत नाहीं. तो आपल्या कलेचा स्वामी आहे. या क्षुद्र जगाच्या फार वर तो आहे; या क्षुद्र जगांत त्याला अनुयायी नाहींत व कोठेंहि नागरिकत्व नाहीं! तो जणूं या जगाचा नाहींच!"

असें म्हणतात कीं, इतिहासांत खरे निर्दोष ख्रिश्चन दोनच होऊन गेले: येशू व स्पायनोझा. आणि दोघेहि ज्यूच होते.

## प्रकरण ७ वें

# रशियावर सुधारणा लादणारा पीटर दि ग्रेट

— १ —

सतराव्या शतकांत रशिया अत्यंत मागसलेला देश होता. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, वगैरे पश्चिमेकडील देश सुसंस्कृत रानटीपणाच्या दशेला जाऊन पोंचले होते. पण रशियाचा रानटीपणा मात्र अजूनहि ओबडधोबडच होता; त्याला पॉलिश मिळालें नव्हतें. रशियांतील स्लाव्ह लोक मूळचे मध्य आशियांतले. ते तेथून युरोपांत आले. चेंगीझखानानें त्यांना एकदां जिकले होतें. कॉन्स्टँटिनोपलच्या मिशनऱ्यांनीं त्याना रोमन कॅथॉलिक बनविलें होतें. असे हे स्लाव्ह लोक शेंकडों वर्षे अज्ञानी, दुबळे व दंतकथा आणि नाना रूढी यांनीं भारलेले होते. १४६३ सालीं तार्तर रशियांतून घालविले गेले; पण त्यामुळें रशियनांची स्थिति सुधारली असें नाहीं. तार्तर हुकूमशहाच्या जागीं स्लाव्ह हुकूमशहा आला. मॉस्काव्हाचा ग्रँड डयूक तिसरा इव्हान आपणास रशियाचा उद्धारकर्ता म्हणवीत असे. पण रशियनांना आगींतून निघून फुफाट्यांत पडल्याप्रमाणें झालें. त्याच्या नातवानें प्रथम सीझर—झार—ही पदवी घेतली. त्याचेंहि नांव इव्हानच होतें. त्याला 'भयंकर'—इव्हान दि टेरिबल—म्हणत. त्यानें तर अधिकच जुलूम केला व प्रजेला केवळ गुलाम केलें. तार्तरांची हुकुमत होती तोंपर्यंत शेतकऱ्यांना थोडें तरी स्वातंत्र्य होतें; पण झारांच्या सुलतानशाहींत त्यांची स्थिति केवळ गुरांढोरांप्रमाणें झाली! डुकरें, गाई, बैल शेतावर असतात तद्वत् हे शेतकरीहि तेथें राहत व राबत. त्यांना कशाचीहि सत्ता नव्हती.

रशिया आतां जणूं एक जंगी वसाहतच बनला—लाखों मजूर व एकच धनी ! झार जमीनदारांना व सरदारांना फटके मारीत, जमीनदार व सरदार शेतकऱ्यांवर कोरडे उडवीत आणि सर्वांच्या वर आकाशांत भीषण असा परमेश्वर होता. झारविरुद्ध बंड करणाऱ्यांना व चर्चची अवज्ञा करणाऱ्यांना गांठाळ चाबकानें फोडून काढावयाला तो परमेश्वर बसलेला होता. जणूं भीषण अशी कोसॅकचीच मूर्ति !

झारांच्या अहंकाराची बरोबरी त्यांचें अज्ञानच करूं शके. अहंकार भरपूर व अज्ञानहि भरपूर ! ते केवळ निरक्षर टोणप्पे होते. ते व्यसनी, व्यभिचारी, विलासी होते. ते आपल्या प्रजेसमोर आपल्या वैभवाचे प्रदर्शन करीत, राजवाड्यात डुकरें पाळीत, मोठमोठ्या मेजवान्यांच्या वेळीं ते खुशाल टेबलावरील कपड्यावर नाक शिंकरीत व आपल्या पाटलोणींस बोटें पुशीत ! ते गणवेष करीत तेव्हां त्यावर शेंकडों पदकें लावीत. पण त्यांच्या शरीरांना कित्येक दिवसांत स्नान माहीत नसे. प्रवासांत असत तेव्हां ते एकाद्या खाणावळींत उतरत व एकाद्या मोलकरणीजवळ चारचौघांत खुशाल झोंपत ! ते दैवी सामर्थ्याचा आव आणीत व भुतांची भाषा वापरीत. नवीनच मिळालेल्या सत्तेनें ते जणूं मस्त झाले होते ! ते दारू प्यालेल्या जंगली माणसांप्रमाणें वागत. त्यांना चालरीत माहीत नसे, सदभिरुचि ठाऊक नसे.

रशियाची राजधानी मॉस्को येथें होती. झारमध्यें वैभव व वेडेपणा, सत्ता व पशुता यांचें मिश्रण होतें. त्याचप्रमाणें मॉस्को राजधानी सौंदर्य व चिखल यांनीं युक्त होती. मास्कोकडे येणारे रस्ते फक्त हिंवाळ्यांत जरा बरे असत. कारण, त्या वेळीं चिखल गोठून घट्ट होत असे. मॉस्कोभोंवतीं दुर्गम जंगलें होतीं. तें दुरून अरबी भाषेंतील गोष्टींमधल्या एकाद्या शहराप्रमाणें दिसे. दुरून होन हजार घुमट व क्रॉस दिसत. ते तांब्यानें मढविलेले असत व सूर्यप्रकाशांत लखलखत. लाल, हिरव्या व पाढऱ्या इमारतींच्या मस्तकांवर दोन हजार घुमटांचा व क्रॉसाचा जणूं काय भव्य मुकुटच आहे असें दुरून भासे; पण राजधनींत पाऊल टाकतांच ही माया नष्ट होई व मॉस्को एक प्रचंड व अस्ताव्यस्त वसलेलें खेडेगांवच आहे असें वाटे. रस्ते रुंद होते; पण त्यांवरून जाणाऱ्यांस ढोंपर-ढोंपर चिखलांतून जावें लागे. दारुडे व भिकारी याची सर्वत्र मुंग्यांप्रमाणें गर्दी असे, बुजबुजाट असे. सार्वजानिक

स्नानगृहांपाशीं दिगंबर स्त्रीपुरुषांची ही गर्दी असे! येवढेंच नव्हे तर तेथें येणारे आपले गुह्य अवयव मुद्दाम दाखवीत व वासनाविकारांना उत्तेजक अशा गलिच्छ गोष्टी बोलत. या राजधानींतील हवा जणूं गुदमरवून सोडी. धूर, दारूचा वास, घाणीची दुर्गंधी, खाद्यपेयांचा घमघमाट, अशा संमिश्र वासानें भरलेली हवा नाकानें हुंगणें, आंत घेणें हें मोठें दिव्यच असे! भटकणारीं डुकरें आपलीं विष्टेनें भरलेलीं तोंडें येणाऱ्याजाणाऱ्यांच्या कपड्यांना पुशीत. झिंगलेले शिपाई रस्त्यांतून लोळतांना दिसत व त्यांना जरा कोणाचा अडथळा होतांच ते तावडतोब ठोसे द्यावयास तयार असत.

आरंभींच्या झारांच्या काळांत रशियाची अशी दुर्दशा होती. पण सतराव्या शतकाच्या अखेरीस झार पीटर अलेक्झीविच यानें या प्रचंडकाय रशियन राक्षसाला आपल्या मजबूत हातांनीं झोंपेंतून जागें केलें व त्याला पश्चिम युरोपच्या सुधारणेकडे किलकिल्या डोळ्यांनीं पहावयास लाविलें.

— २ —

झार फिओडोर हा पीटरचा भाऊ. तो स्पायनोझाच्या मरणानंतर पांच वर्षांनीं म्हणजे १६८२ सालीं मरण पावला. तेव्हां पीटर दहा वर्षांचा होता. पीटरचा सोळा वर्षांचा इव्हान नांवाचा एक दुबळा भाऊ होता. पीटर व इव्हान हे दोघे संयुक्त राजे निवडले गेले. पण दोघेहि लहान असल्यामुळें त्यांची बहीण सोफिया राज्यकारभार पाही. ती महत्त्वाकांक्षी असल्यामुळें तिनें पीटरला मॉस्कोच्या उपनगरांत पाठविलें व सिंहासनाचा कबजा घेतला. तिच्या मनांत त्याला आपल्या मार्गांतून अजी दूर करावयाचें होतें; पण तिनें त्याला तूर्त तात्पुरतें दूर केलें.

पीटर पंधरा वर्षांचा होईतों त्याला लिहावाचावयासहि येत नव्हतें व बोटें मोडूनहि दहांपर्यंत आंकडे मोजतां येत नव्हते; पण त्याला मोडतोड करण्याचा नाद मात्र फार होता. हातानीं नेहमीं कांहीं तरी करीत राहण्याची व खेळांतील गलबतें बांधण्याची त्याला आवड होती. बालवीर जमवून तो लुटूपुटीच्या लढायाहि खेळे. हेच बालवीर पुढें रशियन सैन्याचा कणा बनले. यांतनच रशियन सेना उभी राहिली

आरंभीच्या झारांच्या काळांत परकीयांना मॉस्कोत राहण्यास बंदी होती. त्यांना मॉस्कोच्या उपनगरांत रहावें लागे. पीटरची व या परकीयांची गांठ पडे व त्यांच्याविषयीं त्याला प्रेम वाटे. त्याला त्या परकीयानीं जीवनाची एक नवीनच तऱ्हा दाखविली. ती त्याला अधिक रसमय वाटल्यामुळें त्याचें मन तिच्याकडे ओढलें गेलें. डच गलबतें बांधणारे, साहसी इंग्रज प्रवासी, इटॅलियन न्हावी, स्कॉच व्यापारी, पॅरिसमधील नबाब, जर्मन पंतोजी, डॅनिश वेश्या, या सर्वांशीं तो परिचय करून घेऊं लागला. पीटर सुशिक्षित नव्हता; पण या सर्वसंग्राहक वातावरणांत त्याची दृष्टि मोठी होऊं लागली. तो जणूं जगाचा नागरिक बनूं लागला. त्याचें जिज्ञासु मन जें जें मिळे तें तें घेई. त्याच्याशीं संबंध आलेल्या परकीय स्त्री-पुरुषांचे कांहीं गुण व बरेचसे दुर्गणहि त्यानें घेतले. पश्चिम युरोपांतील मोठमोठ्या राजांविषयीं अनेक कथा त्याच्या कानीं आल्या व आपणहि त्यांच्याप्रमाणें व्हावें असें त्याला वाटूं लागलें.

सतराव्या वर्षी त्यानें दोन गोष्टी केल्या : स्वतःचें लग्न व बहीण सोफिया हिची हकालपट्टी. एवढ्याशा वयांत आपण होऊन मुलें या गोष्टी करीत नाहींत. त्याचा अर्धवट भाऊ इव्हान पुढें लवकरच मेला व पीटर रशियाचा एकमेव सत्ताधीश झाला. उपनगरांतील वास्तव्य सोडून तो राजधानींत राजवाड्यात रहावयाला आला. पण राणीच्या संगतींत किंवा दरबारांतील सुखांत त्याचें मन रमेना, रंगेना. परकीय व्यापारी, सुतार, वेश्या वगैरेंचीच संगत त्याला अधिक आवडे. म्हणून साधे कपडे घालून तो पुनः उपनगरांतील विदेशी मित्रमंडळींच्या संगतींत राहण्यास गेला, तेव्हा सरदारांनीं व दरबारी लोकांनीं नाकें मुरडलीं.

पीटर धष्टपुष्ट, रानवट व दांडगट होता. त्याचें शरीर खूप विकसित झालें होतें, पण मन अविकसितच राहिलें. तो रंगानें काळसर असून सहा फूट साडेसहा इंच उंच होता. त्याचे ओंठ जाड होते. अशा या अगडबंब व धिप्पाड माणसाची वृत्ति उत्कट होती. त्याला स्वतःचें कांहींहि सोडूं नये असें वाटे. जीवनांत त्याला कांहींच गंभीर वाटत नसे. सारें जग जणूं त्याचें खेळणें होतें.

त्याला गलबतें बांधण्याची फार हौस होती. तो सांगे, "मला पीटर दि कार्पेंटर म्हणा." राजदंड हातीं मिरविण्यापेक्षां घण हातीं घेऊन काम करणें

त्याला अधिक आवडे. लहानपणीं त्यानें अल्प प्रमाणावर सैन्य उभारलें होतें. आतां गलबतें बांधून आरमाराचाहि पाया घालावा असें त्याच्या मनांत आलें.

त्याची बालवृत्ति जन्मभर टिकली. आरमार बांधण्यास प्रारंभ करते वेळीं त्याच्याजवळ फार मोठ्या योजना होत्या असें नाहीं. त्याचीं तीं गलबतें म्हणजे त्याची करमणूक होती. आपल्या बालवीरांना नकली बंदुकी देऊन त्यानें खेळांतील शिपाई बनविले होतें तद्वतच हेंहि. पण गलबतें हवीं असतील तर समुद्र हवा हें लवकरच त्याच्या लक्षांत आलें. लहान मुलगा मनांत येईल ते करूं पाहतो तद्वत् पीटर लगेच काळ्या समुद्राकडे आपले बुभुक्षित डोळे फेंकूं लागला. दक्षिणेकडे काळा समुद्र होता व पश्चिमेकडे बाल्टिक समुद्र होता.

काळ्या समुद्रांत प्रवेश मिळावा म्हणून सैन्य घेऊन त्यानें तुर्कांवर स्वारी केली; पण अझोव्ह येथें त्याचा पराजय झाला. तरी मॉस्कोला परत येऊन आपण मोठा जय मिळविला अशी बढाई तो प्रजेपुढें मारूं लागला. त्यानें दारूकाम सोडून विजयोत्सव केला. दारूकाम त्याला फार आवडे. त्याच्या करमणुकींचे प्रकार मुलांच्या करमणुकींच्या प्रकारांसारखेच असत. बाल्टिक किनारा मिळविण्यासाठीं त्यानें स्वीडनच्या बाराव्या चार्लस राजाशीं लढाई सुरू केली. ती बरीच वर्षें चालली. त्याच्या आयुष्याचा बराचसा भाग तींत गेला. पण दारूकाम सोडणें व इतर करमणुकी यांच्या आड हें युद्ध येत नव्हतें. आणि तिकडे रणांगणावर शिपाई मेले म्हणून त्याला त्याचें काय वाटणार होतें? मरणाऱ्यांची जागा घेण्यास दुसरे भरपूर होते. पण लढाईचें कांहीं झालें तरी, एक दिवसहि दारूकाम सुटलें नाहीं किंवा इतर करमणुकी झाल्या नाहींत तर मात्र तो दिवस फुकट गेला असें त्याला वाटे.

चार्लसशीं युद्ध चालू असतां त्याचें लक्ष दुसऱ्या एका गमतीकडे गेलें. आरमार व लष्कर निर्माण केल्यावर नवीन रशिया निर्माण करण्याचें त्याच्या मनानें घेतलें. तो आपलीं निरनिराळीं खेळणीं घेई व पुनः पुनः वेगवेगळ्या रीतींनीं रची व मोडी. वस्तू असतील तशाच ठेवणें त्याला आवडत नसे. त्यानें इतर खेळण्यांत फेरबदल केला तद्वत् रशियालाहि नवा आकार, नवें रंगरूप

देण्याचें त्याच्या मनानें घेतलें. मॉस्कोच्या उपनगरांतील परकीयांविषयीं त्याला आदर वाटे. म्हणून त्यानें सारा रशिया परकीयांनीं भरून टाकण्याचें ठरविलें.

रशियाला युरोपच्या पातळीवर आणण्याच्या कामीं पश्चिम युरोपचा अभ्यास करणें अवश्य होतें. म्हणून तो हॉलंड, फ्रान्स, जर्मनी, इंग्लंड वगैरे देशांत गेला व पश्चिमेकडील संस्कृतीचे कांहीं कपटे घेऊन आला. नवीन कपड्यांनीं भरलेलें एक कपाटहि त्यानें बरोबर आणलें. आपण आणलेल्या कपड्यांसारखेच कपडे प्रजेनें वापरावे, आपण शिकून आलेल्या चालीरीतीं-सारख्याच चालीरीती प्रजेनें सुरू कराव्या अशा उद्योगाला तो लागला. शिपायांना कात्र्या देऊन रस्त्यांवरून जाणाऱ्या दाढाळ शेतकऱ्यांच्या दाढ्या त्यानें कापावयाला अगर उपटावयाला सांगितलें. त्यानें स्वतः सरदारांचे व दरबारी लोकांचे कपडे फाडून टाकले व पश्चिमेकडचे फॅशनेबल कपडे त्यांनीं वापरावे असा अट्टाहास चालविला.

झारनें चालविलेल्या या सुधारणा पाहून रशियन पोप रागावला. रशियांतील धर्मगुरु स्वतःला जनतेचा बाप म्हणवीत असे. त्याच्या मताप्रमाणें मानव ईश्वराची प्रतिकृति असल्यामुळें त्यांनीं ईश्वराप्रमाणें लांब दाढ्या ठेवल्याच पाहिजेत व लांब चुण्यांचे झगे घातलेच पाहिजेत. रशियन धर्मगुरूनें त्यामुळें असें फर्मान काढलें कीं, सर्व धार्मिक लोकांनीं राजाचा हुकूम अमान्य करून दाढ्या, निदान हनुवटीवर तरी, ठेवाव्या; नाहीं तर एकाद्या पेटींत तरी आपली दाढी राखून ठेवावी, म्हणजे मरतांना ती आपल्या बरोबर नेतां येईल. दाढीवरील या धार्मिक चर्चेला गंभीर स्वरूप आलें. पीटरनें पोपाविरुद्ध बंड केलें व तो स्वतःच धर्माचा मुख्य झाला. पण पीटरच्या इतर सुधारणा कांहीं इतक्या पोरकट नव्हत्या; कांहीं तर खरोखरच महत्त्वाच्या होत्या. त्यानें सीनेट नेमलें, राज्याचे आठ भाग केले, रस्ते बांधले, कालवे खणले, शाळा काढल्या, विद्यापीठें स्थापिलीं, दवाखाने काढले, नाटकगृहें बांधलीं, नवीन धंदे निर्मिले; नाटकगृहें तयार झालीं कीं नाटकेंहि निर्माण होऊं लागतील असें त्याला वाटलें. ज्या नाटकांत त्याची स्तुति असे त्या नाटकांसाठीं हीं नाट्यगृहें होतीं. हें सारें अंतःस्फूर्तीनें त्याच्या मनांत येई म्हणून तो करीत असे. जीवनाशीं त्याच्या चाललेल्या खेळांतलाच

तो एक भाग होता. तो जें कांहीं करी, त्यांत योजना नसे, पद्धत नसे, विचार नसे. योजनेशिवाय काम करणें हीच त्याची योजना. दुसऱ्या देशांत पाहिलेलें जें जें त्याला आवडे, तें तें तो ताबडतोब आपल्या देशांत आणी. त्याचें अशिक्षित पण जिज्ञासु मन सारखें प्रयोग करीत असे. हॉलंडमध्यें एक दन्तवैद्य दांत काढीत आहे असें आढळलें, तेव्हां पीटरनें रशियांत परत येतांच स्वतः दांत काढण्यास सुरुवात केली. एका शस्त्रक्रियातज्ज्ञानें केलेलें ऑपरेशन त्यानें पाहिलें व लगेच स्वतःहि तसेंच एक ऑपरेशन करण्याची लहर त्याला आली; अर्थातच त्याचा रोगी मेला हें काय सांगावयासच पाहिजे! कुटुंबियांची नुकसानभरपाई त्या रोग्याच्या प्रेतयात्रेस स्वतः हजर राहून त्यानें केली.

त्याला गलबतांचा नाद नित्य असल्यामुळें शेवटीं त्यानें बाल्टिक समुद्राकांठच्या दलदलीच्या प्रदेशांत एक शहर वसविलें व त्याला सेंटपीटर्सबर्ग असें जर्मन नांव दिलें. आपल्या परसांत असल्याप्रमाणें येथें आरमार राहील असें त्याला वाटलें. हें शहर सुंदर करण्यासाठीं त्यानें चौदाव्या लुईच्या दरबारांतून कांहीं कलावन्त व कारागीर मागवून घेतले. पण हें शहर बांधतां बांधतां एक लक्ष तीस हजार लोक मेले.

– ३ –

आपला देश सुसंस्कृत करण्यासाठीं तो जन्मभर धडपडला, पण स्वतः मात्र रानटीच राहिला. फ्रेंच दरबारांतले रीतिरिवाज रशियांत सुरू करावे असा त्याचा हट्ट होता. त्यानें आपल्या गुरुजींची पाठ वेतानें फोडली. तो तत्त्वज्ञानी लोकांशीं चर्चा करी व शेतकऱ्यांच्या अंगांवर दारू ओतून त्यांना काडी लावून देई! त्यानें अनाथांसाठीं अनाथालयें स्थापिलीं, पण स्वतःचा मुलगा अलेक्सिस याला आज्ञाभंगासाठीं मरेपर्यंत झोडपलें! शरीररचनाशास्त्राचा तो अभ्यासी असल्यामुळें त्यानें पुढील विक्षिप्त प्रकार केला: त्याच्या एका वेश्येनें झारिनाची निंदा केल्याबद्दल त्यानें तिला शिरच्छेदाची शिक्षा दिली, तिचा वध झाल्यावर तिचें डोकें मागून घेऊन तिच्या थंडगार ओंठांचें चुंबन घेतलें आणि जमलेल्या लोकांना मानेमधील स्नायु व शिरा दाखवून त्यानें शरीररचनेवर एक व्याख्यान झोडलें!

त्याला आपल्या प्रजेच्या मुंडक्यांशीं खेळण्याचें वेडच होतें. एकदां त्यानें एकाच वेळेस बारा हजार बंडखोर सैनिकांचीं घडें शिरापासून वेगळीं केलीं! झारीना व्यभिचारिणी आहे हे कळल्यावर त्यानें तिच्या प्रियकराचें डोकें कापलें व तें अल्कोहॉलमध्यें बुडवून तिच्या टेबलावर जणूं फ्लॉवरपॉट म्हणून ठेवलें ! तो झारिनाचाहि शिरच्छेद करणार होता; पण इतक्यांत स्वतःच आजारी पडून तो त्रेपन्नाव्या वर्षी ( १७२५ सालीं ) मेला. तेव्हां रस्त्यातील लोक एकमेकांस म्हणूं लागले, " मांजर मेलें ; आता उंदीर त्याला पुरतील." फ्रेडरिक दि ग्रेट लिहितो, " हा पीटर म्हणजे एक शौर्यधैर्यसंपन्न पिशाचच होतें. मानवजातीचे सारे दोष त्याच्या अंगीं होते, पण गुण मात्र फारच थोडे होते. शांतताकालीं दुष्ट, युद्धकालीं दुबळा, परकीयांनीं प्रशंसिलेला, प्रजेनें तिरस्कारिलेला हा राजा मूर्ख पण दैवशाली होता. सम्राटाला आपली अनियंत्रित सत्ता जितकी चालविता येणें शक्य होतें तितकी त्यानें चालविली."

मानवजातीची त्याला पर्वा नसे. तो जें कांहीं करी तें स्वतःच्या सुखासाठीं म्हणून करी. पण त्यानें केलेल्या अनेक खेळांत प्रजा साक्षर करणें हाहि एक होता व त्यामुळें न कळत का होईना त्यानें स्वतःचें जणूं डेथ-वॉरंटच लिहिलें ! कारण, ज्ञानाचा आरंभ म्हणजेच अनियंत्रित सत्तेचा अंत. सेंटपीटर्सबर्गचा हा हडेलहप्प हुकूमशहाच पुढील रशियन राज्यक्रांतीचा आजोबा होय.

## प्रकरण ८ वें

## व्हॉल्टेअर

— १ —

आपल्याच हातानें मानेला फांस लावून घेऊन आत्महत्या करण्याची पाळी येऊं नये म्हणून हंसणारा व्हॉल्टेअर हा ॲरिस्टोफेन्स व रॅबेलस, ल्यूथर व सैतान या सर्वांचें अजब मिश्रण होता. त्याची प्रतिभा व त्याची बुद्धि या परस्परविरोधी गुणांनीं बनल्या होत्या. तो मानवजातीचा तिरस्कार करी, पण मानवांवर त्याचें प्रेमहि असे. तो धर्मोपदेशकांची टर उडवी; तरी पण त्यानें आपलें एक पुस्तक पोपला अर्पण केलें आहे. राजामहाराजांची तो हुर्रेवडी उडवी, तरी पण त्यानें फ्रेडरिक दि ग्रेटनें दिलेलें पेन्शन स्वीकारलें. त्याला धर्मांधपणाची चीड असे

पण ज्यूंच्या बाबतींत तो अनुदार होता. संपत्तिजन्य ऐटीचा तो उपहास करी; तरी त्यानें स्वतः मात्र पुष्कळ धनदौलत मिळविली व तीहि सगळीच कांहीं प्रामाणिकपणें मिळविली नाहीं. ईश्वरावर त्याचा विश्वास नव्हता, तरी तो जन्मभर ईश्वराचा शोध करीतच होता. त्याला धर्माबद्दल आदर नसे, पण त्यानें हास्याच्या आनंदाचा नवाच धर्म निर्मिला.

जगांतल्या थट्टा व टिंगल करणाऱ्यांचा तो राजा होता. हें जीवन म्हणजे एक मोठें हास्यरसोत्पादक नाटक आहे असें तो मानी. तो लोकांना म्हणे, "जीवन हा एक फार्स समजा आणि मिळवितां येईल तितकी गंमत मिळवा." जीवन चांगल्या रीतीनें जगतां यावें, अनुभवितां यावें, त्यांतील गंमत मिळवितां यावी म्हणून अज्ञान, अन्याय, रूढी व युद्धे हीं सर्व नष्ट करून टाकलीं पाहिजेत. या दुष्ट वस्तू जीवनाची ट्रॅजेडी करून टाकीत असतात. या दूर केल्या तरच जीवन हें एक कॉमेडी होईल.

दुसऱ्या शब्दांत हेंच सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, व्हॉल्टेअरनें लोकांना विचार कसा करावा हें शिकविलें. तो म्हणे, "राष्ट्र एकदां विचार करायला लागलें म्हणजे मग त्याला थांबविणें अशक्य होईल." तो स्पायनोझापेक्षां कमी चारित्र्यवान् होता, तरी त्यानेंच जगावर त्या ज्यू तत्त्वज्ञान्यापेक्षां अधिक परिणाम—सुपरिणाम केला. तो व्यवहार्य गोष्टींवरच लिही व तेंहि लहान मुलांना सुद्धां समजावें अशा भाषेंत. त्याच्या संशयवादी तत्त्वज्ञानामुळें डायनॅमिटवर ठिणगी पडली व असा प्रचंड भडका उडला कीं, राजांचे दंभ व धर्मांतील भोळसट रूढी यांचें भस्म झालें. जुन्या जगाचा पाया त्यानें उडवून टाकला व नव्या जगाचा पाया घालण्यासाठीं वाव करून दिला.

त्याचें सारें जीवन म्हणजे विरोधाभास होता. तो जन्मतांच त्याची आई मेली. २१ नोव्हेंबर १६९४ रोजीं तोहि मरणार असें वाटलें, पण तो वांचला. त्याची प्रकृति नेहमीं मरतुकडी होती. तरीहि तो ऱ्यायशीं वर्षांचा होईतों वांचला. जेसुइट स्कूलमध्यें शिकून तो ग्रॅज्युएट झाला. त्यानें जेसुइटांचें सारें वर्चस्व झुगारून दिलें. त्याच्या हाडांचा नुसता सांगाडा होता, त्याचें नाक लांब होतें, त्याचे डोळे बारीक पण तेजस्वी होते. तो पॅरिसमधला सर्वांत कुरूप तरुण होता, तरीहि तो साऱ्या स्त्रियांचा लाडका होता. त्या त्याला जणूं देव मानीत!

तो कपटी व उपहास करणारा होता. त्याचें खरें नांव फ्रँकॉइस मेरी अरोट असें होतें. पंधराव्या लुईच्या रीजंटचा अपमान केल्याबद्दल बॅस्टिलच्या तुरुंगांत शिक्षा भोगीत असतां त्यानें नाव बदलून व्हॉल्टेअर हें नांव घेतलें. अकरा महिन्यांचा तुरुंगवास त्यानें नाव्हेरचा राजा हेन्री याच्यावर महाकाव्य लिहिण्यांत खर्चिला. तुरुंगांतून सुटला तेव्हां तो तेवीस वर्षांचा होता. त्याचा बाप व्यवहारचतुर होता. त्यानें त्याला तीन गोष्टींबाबत सावध राहण्यास सांगितलें : वाङ्मय, स्त्रिया व जुगार. शाळेंत असतां तो जेसुइटांचें मनापासून ऐके, त्याचप्रमाणें त्यानें बापाचा हा उपदेश लक्षपूर्वक ऐकला. पण जेसुइटांच्या शिकवणीप्रमाणेंच बापाचीहि शिकवण तो पुढें विसरला.

त्यानें कांहीं नाटकें लिहिलीं व तीं यशस्वी ठरलीं. त्याला पैसेहि बरे मिळाले. वॉलस्ट्रीटमधील एकाद्या ब्रोकरप्रमाणें त्यानें आपले पैसे मोठ्या हुषारीनें गुंतविले. फ्रेंच सरकारनें काढलेलीं लॉटरीचीं सारीं तिकिटें एकदां व्हॉल्टेअरनें घाऊक रीत्या खरेदी केलीं. मॅनेजरांच्या हें लक्षांतच न आल्यामुळें सारीं बक्षिसें व्हॉल्टेअरला मिळालीं !

तो तत्त्वज्ञानी तसाच व्यवहारज्ञहि होता. सूक्ष्म विचार करणारा व धंद्यांत हुषार असा पुरुष क्वचितच आढळतो. व्हॉल्टेअरची बुद्धि मोठी विलक्षण होती. तत्त्वज्ञानांतील अमूर्त व सूक्ष्म विचार तो प्रत्यक्ष व्यवहाराशीं बेमालूम मिसळी. मूर्त-अमूर्त दोहोंतहि त्याची बुद्धि सारखी खेळे. व्यवहार्यता व सूक्ष्म अमूर्तता दोन्ही त्याच्या ठायीं होत्या. इतर नाना उलाढाली करूनहि त्याला पॅरिसमधील प्रतिष्ठित व रुबाबदार मंडळींत मिसळण्यास भरपूर वेळ असे. पॅरिसमधील बेछूट, स्वछंदी व विलासी जीवनाचा तो मध्यबिंदु होता; त्याच्याभोंवतीं पॅरिसमधील प्रतिष्ठित नबाब व पंडित जमत. तत्त्वज्ञान, व्यवहार व या बैठकी अशा त्रिविध चळवळींचा त्याच्या बुद्धीवर ताण पडे व त्यामुळें त्याचें दुबळें शरीर थके. एकदां त्याला देवी आल्या. डॉक्टरांना तो मरणार असें वाटलें; पण तो नेहमींप्रमाणें बरा झाला व अधिकच उत्साहानें जीवनाच्या आनंददायी गोंधळांत सामील झाला—पुनः या सुखी व विनोदी संसारांत बुडी घेता झाला.

त्याची प्रकृति यथातथाच होती. दुबळ्या प्रकृतीच्या जोडीला तिखट जिभेची आणखी एक अडचण असल्यामुळें त्याला नेहमीं त्रास होई. एकदां

तो म्हणाला, "जें वाटतें तें स्पष्टपणें बोलणें हा माझा धंदा आहे." तत्त्वज्ञान-क्षेत्रांतच त्याचे विचार होते तोंपर्यंत सारें ठीक होतें; पण माणसांविषयीं आपणास काय वाटतें हें तो सांगूं लागला व विशेषतः सरदार-जमीनदारांविषयीं लिहूं लागला तेव्हां भानगडी सुरू झाल्या, त्रास होऊं लागला. एकदां त्यानें लिहिलेलें एक तिखट व झणझणीत वाक्य चेव्हेलियर डी रोहन याला झोंबलें; त्याचा अहंकार दुखावला गेला. त्यानें कांहीं गुंडांना व्हॉल्टेअरला चांगलें चोपून काढावयास सांगितलें. दुसऱ्या दिवशीं व्हॉल्टेअरनें त्या सरदाराला द्वंद्वयुद्धाचें आव्हान दिलें. व्हॉल्टेअरची तलवारहि त्याच्या जिभेप्रमाणेंच तिखट असेल असें त्या बड्या सरदाराला वाटलें, म्हणून त्यानें पोलिसांच्या मुख्याकडे संरक्षण मागितलें. पोलिस-अधिकारी त्याचा चुलतभाऊ होता. व्हॉल्टेअर याला पुन: बॅस्टिलच्या तुरुंगांत अडकविण्यांत आलें. त्याची मुक्तता होतांच त्याला फ्रान्समधून निर्वासित करण्यांत आलें.

तो इंग्लंडमध्यें गेला. या वेळीं त्याचें वय बत्तीस वर्षांचें होतें. तो तेथें तीन वर्षें राहिला. त्याचें मन देशकालातीत होतें. इंग्लंडमध्येंहि त्याला घरच्यासारखेंच वाटलें. तो इंग्रजी भाषा चांगलीच शिकला. एका वर्षांत त्यानें शेक्स्पिअरखेरीज बाकी सारें साहित्य आत्मसात् केलें. पण शेक्स्पिअर हें इंग्लंडचें सर्वोत्कृष्ट फळ होतें. शेक्स्पिअरची मनोबुद्धि हा आनंदी तत्त्वज्ञानी समजूं शकला नाहीं. इंग्लंडांतल्याहि मोठमोठ्या तत्त्वज्ञान्यांना उत्कृष्ट फ्रेंच मनोबुद्धि समजूं शकत नसे. व्हॉल्टेअर शेक्स्पिअरला जंगली म्हणत असे आणि पुढें शंभर वर्षांनीं कार्लाइलनें व्हॉल्टेअरला जंगली म्हणून त्याचा सूड घेतला. पण भूतकाळांतला महाबुद्धिमान् शेक्स्पिअर जरी व्हॉल्टेअरला जाणतां आला नाहीं तरी समकालीन इंग्रजांत त्याला बरेचसे अनुकूल मनोबुद्धीचे लोक भेटले. इंग्रजांचें विचारधैर्य पाहून त्याला आश्चर्य वाटे. इंग्रज लोक आपले विचार धैर्यानें मांडतात हें पाहून तो त्यांचें कौतुक करी. क्वेकरांशीं त्याचा चांगला परिचय झाला. त्यांचीं शांतिमय मतें त्याला लगेच पटलीं. तोहि म्हणाला कीं, समुद्र ओलांडून आपल्याच बंधूंचे गळे कापावयाला जाणें हा केवळ मूर्खपणा होय. "गाढवाच्या कातड्यावर दोन काठ्या मारून आवाज होतो" आणि सारे मारामारीला धांवतात. स्विफ्टची व त्याची भेट झाली. त्या शतकांतले सर्वांत मोठे असे दोन उपहासलेखक

एकत्र बसले, बोलले. खरोखरच तो प्रसंग देवांना सुद्धां मोठ्या मेजवानीचा वाटला असता. व्हॉल्टेअरची "छोटामोठा" ही मनोरम कथा 'गलिव्हर्स ट्रॅव्हल्स'पासूनच स्फूर्ति मिळून लिहिली गेली असावी. स्विफ्टच्या उपहासांतील तिखटपणाइतका तिखटपणा व्हॉल्टेअरमध्यें नसे. व्हॉल्टेअरची लेखणी गुदगुल्या करी, स्विफ्टची लेखणी भोंसकी. पण व्हॉल्टेअरची प्रतिभा अधिक समृद्ध व श्रीमंत होती. छोटामोठा—मायग्नोमेगस हा सिरियस बेटाचा रहिवासी होता. तो पांच लक्ष फूट उंच होता. त्याला शनीवरचा एक अंगदींच लहान, केवळ पंधराच हजार फूट उंच गृहस्थ भेटतो. उभयता अनंत अवकाशांतून भ्रमन्ती करण्यासाठीं बाहेर पडतात. सॅटर्नियनचें (शनीवरील गृहस्थाचें) लग्न नुकतेंच झालेलें असतें. त्याची पत्नी त्याला जाऊं देत नाहीं. कारण त्यांनीं केवळ दोनशेंच वर्षें मधुचंद्र भोगलेला होता! इतक्या लवकर ताटातूट! पण सॅटर्नियन तिचें समाधान करतो व म्हणतो, "रडूं नको. मी लवकरच परत येईन." दोघे मित्र धूमकेतूच्या शेपटीवर बसून विश्वसंचारास निघतात. ते ताऱ्यांमधून जात असतात. संचार करतां करतां ते पृथ्वी नांवाच्या एका लहानशा ढिपळावर उतरतात. भूमध्यसमुद्र म्हणजे त्यांना गंमत वाटते. ते त्यांतून गप्पा मारीत मारीत चालत जातात. त्यांना वाटेंत एक गलबत भेटतें. त्या गलबतावर ध्रुवाची सफर करून आलेले कांहीं तत्त्वज्ञानी असतात. सिरियनला तें गलबत इतकें लहान वाटतें कीं, दुर्बिणीशिवाय तें त्याला दिसत नाहीं. तो तें गलबत उचलून आपल्या बोटाच्या नखावर त्याचें नीट परीक्षण करण्यासाठीं ठेवतो; पण त्या गलबतांत सजीव अणूपरमाणू पाहून त्याला आश्चर्य वाटतें. हे अणू त्याच्याशीं बोलतात व त्याला म्हणतात, "आम्ही लहान असलों तरी आमच्यांत अमर आत्मा आहे." हें ऐकून त्या पांच लक्ष फूट उंच माणसास व त्याच्या मित्रास अधिकच आश्चर्य वाटतें. ते सजीव अणू आणखी सांगतात, "आम्ही ईश्वराची प्रतिकृति आहों, विश्वाचे मध्यबिंदू आहों." ते अधिकच आश्चर्यचकित होतात.

ते दोघे या मानवी अणूंना विचारतात, "तुम्ही कसे जगतां? वेळ कसा घालवितां?" ते मानवी अणू सांगतात, "आमचा पृथ्वीवरचा बराचसा वेळ एकमेकांना मारण्यांतच जातो." एक तत्त्वज्ञानी त्यांना सांगतो, "या क्षणीं

आमच्या जातीचे एक लाख जंतू डोक्यांवर टोप्या घालून डोक्यांवर पागोटीं घालणाऱ्या दुसऱ्या एका लाखांस मारीत आहेत." तो मानवी अणू पाहुण्यास पुनः सांगतो, "ही मारामारी पॅलेस्टाइन नावाच्या एका वारुळा-साठीं चालली आहे." पुनः तो सांगतो, "जे लाखों लोक एकमेकांचे गळे कापीत आहेत त्यांना त्या पॅलेस्टाइनच्या ढिपळावर सत्ता नाहींच मिळवावयाची. तें पॅलेस्टाइन सुलतानाच्या ताब्यांत असावें कीं युरोपीय राजाच्या ताब्यांत असावें यासाठीं ही मारामारी, ही खुनी कत्तल! आणि अशा कत्तली अनादि कालापासून पृथ्वीवर सारख्या चालू आहेत." पृथ्वी नांवाचा हा ग्रह म्हणजे वेड्यांचें घर आहे असें या पाहुण्यांना वाटतें व त्या मानवी अणुपरमाणूंना सोडून ते आपल्या विचारवंत लोकीं त्वरेनें प्रयाण करतात.

— २ —

व्हॉल्टेअरच्या इंग्लंडच्या भेटींतून मायक्रोमिडास हें एकच पुस्तक जन्मलें नाहीं, तर 'इंग्रजांसंबंधीं पत्रें' हें त्याहूनहि अधिक महत्त्वाचें पुस्तकहि निर्माण झालें. अर्थातच तें तितकें मनोरंजक नव्हतें हें खरें. या पत्रांमध्यें त्यानें फ्रेंचांच्या गुलामीची इंग्रजांच्या स्वतंत्र वृत्तीशीं तुलना केली आहे, इंग्लंडच्या नियंत्रित राजशाहीचा गौरव केला आहे व तसलेंच सरकार फ्रेंचांनीं फ्रान्समध्यें स्थापावें असें प्रतिपादन केलें आहे. त्यानें जवळजवळ 'आपला राजा फेंकून द्या' असेंच लिहिलें आहे. 'तत्त्वज्ञानाची कथा' या आपल्या पुस्तकांत डॉ० ड्यूरांट लिहितो, "व्हॉल्टेअरला माहीत असो वा नसो, त्याचा हेतु असो वा नसो; त्याचीं पत्रें म्हणजे फ्रेंच राज्यक्रांतीच्या कोंबड्याचें पाहिलें आरवणें होतें." व्हॉल्टेअरला हद्दपारींतून परत बोलावण्यांत आलें. हीं पत्रें प्रसिद्ध व्हावीं अशी त्याची इच्छा मुळींच नव्हती; खासगी रीत्या प्रचार व्हावा म्हणूनच त्याने तीं लिहिलीं होतीं. पण एका अप्रामाणिक प्रकाशकाच्या हातीं तीं पडलीं व त्यानें व्हॉल्टेअरची परवानगी न घेतांच तीं छापून टाकलीं! एका सरकारी अधिकाऱ्याच्या हातीं एक प्रत आली. त्यानें लगेच तें पुस्तक राजद्रोही, अधार्मिक आणि अनीतिमय आहे असें जाहीर केलें. तें पुस्तक जाहीर रीत्या जाळण्यांत आलें व त्याला पकडण्यासाठीं पुनः वॉरंट निघालें.

बॅस्टिलच्या तुरुंगांत पुनः जाऊन बसण्याची व्हॉल्टेअरची इच्छा नव्हती. बॅस्टिलच्या तुरुंगाचें शिल्पकाम, त्याचा नकाशा, त्याचा आंतर भाग यांची आता त्याला पुरेपूर माहिती असल्यामुळें तो पोलिसाच्या हातून निसटून पळून गेला व आपल्या प्रियकरिणीच्या बाहुपाशांत जाऊन विसांवला.

या त्याच्या प्रेयसीचें नांव मार्किसे डु चॅटेलेट. ती विवाहित होती. तिचा नवरा म्हातारा व सैन्याबरोबर दूर होता. त्याच्या गैरहजेरीचा व्हॉल्टेअरनें पुरा-पुरा फायदा घेतला तो त्याची पत्नी व त्याचा किल्ला यांचा जणूं धनीच बनला. मार्किसे सुंदर तशीच चतुर होती. सिरे येथें तिचा बंगला होता. ही जागा यात्रेचें, विलासाचें, आनंदाचें व मेजवानीचें स्थान बनली. येथें तत्त्वज्ञानाच्या चर्चा चालत, खानपानहि चाले. प्राचीन ग्रीक लोकांचें वैभव जणूं पुनः सजीव झालें ! प्लेटोच्या काळापासून अशीं भोजनें झालीं नव्हतीं, कीं अशा चर्चाहि झाल्या नव्हत्या. सिरे येथील हें स्थान युरोपभर विख्यात झालें. फ्रान्समधील नामांकित विद्वान् व उत्तमोत्तम बुद्धिमान् लोक व्हॉल्टेअरनें येथें गोळा केले. तो त्यांना सर्वोत्कृष्ट मद्य देई, त्यांच्यासाठीं आपलीं नाटकें करून दाखवी व आपल्या विनोदी टीकांनीं त्यांना पोट धरधरून हंसावयाला लावी. सिरे येथेंच त्यानें आपल्या अत्युत्तम Cynical कथा लिहिल्या. कॅन्डिडे, The World As It Goes, Zadig, The Pupil of Nature, The Princess of Balaglon वगैरे मनोरम कथा त्यानें लिहिल्या.

या गोष्टींतील प्रमुख पात्रें म्हणजे रक्तामांसाचीं माणसें नाहींत. आपल्या मनांतल्या कल्पनांनाच मानवी पोषाख देऊन त्यानें उभें केलें आहे. हीं सारीं पात्रें म्हणजे कल्पनांचीं प्रतीकें आहेत, रूपकें आहेत. किती रसभरित व भव्य–दिव्य कल्पना ! आणि त्याना दिलेले पोषाखहि किती कल्पनारम्य ! या अद्‌भुत गोष्टींपैकीं कॅन्डिडे ही गोष्ट सर्वांत छान आहे. ही त्यानें तीन दिवसांत लिहिली. ही लिहितांना त्याची लेखणी जणूं अक्षरशः हंसत होती ! या पुस्तकांत त्यानें असें सिद्ध केलें आहे कीं, या जगाहून अधिक वाईट जग असणें शक्य नाहीं. आपण राहतों तें जग शक्य तितकें वाईट आहे. या गोष्टीसाठीं त्यानें घेतलेल्या विषयाहून अधिक खेदोत्पादक व उदास करणारा विषय सांपडणें विरळा ! पण व्हॉल्टेअरच्या जादूच्या स्पर्शानें निराशाहि हंसूं लागते.

निराशाहि अत्यंत विनोदी वस्तु म्हणून गौरवावी, पूजावी असें वाटतें. कॅन्डिडे ही गोष्ट म्हणजे निराशेचें बायबल; पण वाङ्मयाच्या इतिहासांतील हें अत्यंत आनंददायक पुस्तक आहे.

त्याच्या इतर अद्भुत कथाहि सर्वांना 'हंसा' म्हणून सांगत आहेत. स्वतःचीं दुःखें व स्वतःचा मूर्खपणा पाहून हंसा, असें तो लोकांना सांगत आहे. 'निसर्गाचा विद्यार्थी' (The Pupil of Nature) या पुस्तकांत अशिक्षित व जंगली मनुष्याच्या निरोगी मनाची सुधारलेल्या माणसाच्या विकृत व गुंतागुंतीच्या मनाशीं तुलना केली आहे. एक हुरॉन इंडियन फ्रान्समध्यें आला आहे. त्याच्या आत्म्याचा उद्धार व्हावा म्हणून मिशनरी त्याला ख्रिश्चन करूं पाहतात. तो नव्या कराराचा अभ्यास करून म्हणतो, "माझी सुंताहि करा व मला बाप्तिस्माहि द्या. बायबलांतील सर्वांची सुंता केली आहे. ख्रिश्चन होण्याआधीं प्रत्येकानें ज्यू झालें पाहिजे!"

त्याला सर्व उलगडा करण्यात येतो व तो पुढचें पाऊल टाकण्यास तयार होतो. बाप्तिस्म्यासाठीं तो मानेपर्यंत नदीच्या पाण्यांत शिरतो. ख्रिश्चनाना अशा रीतीनें बाप्तिस्मा द्यावयाचा नसतो असें जेव्हां त्याला सांगण्यांत येते तेव्हां तो आपले खांदे उडवितो व पुनः कपडे घालून पापांची कबुली देण्यासाठीं धर्मोपदेशकाकडे जातो. पापांचा पाढा वाचून झाल्यावर तो त्या धर्मोपदेशकास खुर्चीवरून खालीं ओढतो व आपण त्याच्या जागीं बसून त्याला स्वतःचीं पापें कबूल करावयास सांगतो. तो इंडियन त्या धर्मोपदेशकाला आग्रहपूर्वक म्हणतो, "बायबलात असें सांगितलें आहे कीं, एकमेकांनीं एकमेकांजवळ आपापलीं पापें कबूल करावीं."

पुनः गोंधळांत पाडणारीं विवरणें त्या इंडियनास सांगण्यांत येताच तो तुच्छतापूर्वक म्हणतो: "बायबलांत न सांगितलेल्या अनंत गोष्टी तुम्ही येथें करीत आहां; आणि त्यांत जें करा म्हणून सांगितलें आहे तेंच नेमकें तुम्ही करीत नाहीं. मला हें कबूल केलेंच पाहिजे कीं, हें सारें पाहून मला आश्चर्य वाटतें व रागहि येतो."

गोष्ट पुढें चालू राहते. हुरॉनचा संस्कृतीशीं संबंध आल्यामुळें कोणकोणत्या संकटांतून व आपत्तींतून त्याला जावें लागतें याची सारी हकीकत सांगण्यात आली आहे. नाना साहसाच्या गोष्टी हुरॉनला कराव्या लागतात. तो शेवटीं

अशा निर्णयाला येतो कीं, सैतानाची इच्छा होती म्हणून त्यानें आपणास सुसंस्कृत ख्रिश्चन केलें. तो म्हणतो, "या सुसंस्कृत ख्रिश्चनांनीं मला ज्या रानटी पद्धतीनें वागविलें त्या पद्धतीनें माझ्या अमेरिकन बंधूंनीं मला कधींहि वागविलें नसतें. इंडियन रानवट असतील, सुधारलेले नसतील; पण या गोऱ्यांच्या देशांतील लोक तर सुधारलेले पशू आहेत!"

व्हॉल्टेअरच्या सर्व गोष्टींतून हे असेच प्रकार आहेत. या गोष्टींशीं तुलना करण्यासारखें वाङ्मयांत दुसरें नाहीं. या गोष्टींना संविधानकच नाहीं. व्हॉल्टेअरच्या तत्त्वज्ञानाच्या धाग्याभोंवतीं गुंफिलेली, नाना असंबद्ध संविधानकांची ही एक मालिका आहे. त्याच्या गोष्टींतील नायक शेतकऱ्यांच्या मुलींशीं, राण्यांशीं, मोठमोठ्या इस्टेटींच्या वारसदारणींशीं लग्न करतात. त्याचे डोळे जातात तरीहि ते सुखी असतात. ते म्हणतात, "डोळे गेले तरी आम्ही तत्त्वचिंतन करीत बसूं, अंतर्मुख होऊं. त्यांचा प्रेमभंग होतो. त्यांना दुःख इतकेंच कीं, या बाबतींत ते तत्त्वचिंतन करूं शकत नाहींत. संकटांत सांपडलेल्यांस ते साह्य करतात; पण त्यांच्यावर संकट आलें असतां त्याना लाथा मिळतात. पण त्यांनीं गुन्हे केले म्हणजे त्यांना संपत्ति मिळते, मानसन्मान लाभतात. थोडक्यांत सांगावयाचें तर मानवी जीवनाच्या या सर्व लुटूपुटीच्या नाटकांतलीं हीं पात्रें व्हॉल्टेअरबरोबर हिंडतात; व्हॉल्टेअर दोऱ्या ओढून त्यांना आपल्या अतिचपल बोटांनीं नाचवील तशीं तीं नाचतात. व्हॉल्टेअरचा विनोद म्हणजे अखंड वाहणारी विहीर आहे. त्या विनोदाच्या विहिरीला अंतच नाहीं. पण या विनोदाच्या विहिरींत पाणी नसून मद्य आहे. त्याला जीवनातील विनोदाचा कैफ चढतो. तो आपल्या तेजस्वी विचारांनीं साऱ्या जगाला गुंगवून टाकतो, दिपवून सोडतो.

पण व्हॉल्टेअरची सर्वोत्तम बुद्धि तशीच प्रतिभा पाहूं इच्छिणारास अन्यत्र जावें लागेल. या गोष्टींमधील त्याची जीवनाविषयींची दृष्टि आनंददायक असली तरी खोल नाहीं. जरा पोरकटपणाच वाटतो. त्याची लोकप्रियता फार होती म्हणून तो दुःखी असूं शकत नव्हता. त्याची चलती होती म्हणून तो फार प्रखर व तिखट होऊं शकत नव्हता. जीवनाचा अर्थ नीट समजण्याइतपत यथार्थ व पुरेसें जीवन तो अद्यापि जगला नव्हता. तो अठराव्या शतकांतील विनोदी पात्र आहे. तो युरोपचा खेळाडू आहे. पण

त्याचें मन अद्यापि अपरिपक्व आहे. त्यानें अद्यापि फारसें दुःख भोगलेलें नसतें; मोठ्या मनुष्याच्या उंचीला तो अजून गेला नव्हता. विचारांची व भावनाची उच्चता तशीच गंभीरता त्याला अद्यापि आली नव्हती. मानव-जातीला मार्ग दाखविणाऱ्या थोर पुढाऱ्यांपैकीं एक होण्यासाठीं दुःखाच्या सद्गुरुजवळ त्यानें अजून कष्ट सोसणें जरूर होतें.

१७४९ सालीं मॅडम डु चॅटेलेट मरण पावली. जीवनांत प्रथमच दुःख पाहून तो हंसण्याचें विसरला. त्याची प्रकृतीहि ढांसळूं लागली व कडेलोट म्हणजे त्याला पुनः फ्रान्समधून हद्दपार करण्यांत आलें. १७५५ सालीं लिस्बन येथें भूकंप झाला. या अपघातांत तीस हजार लोक गडप झाले! त्या दिवशीं सर्व सन्तांचा स्मृतिदिन होता. पुष्कळ लोक प्रार्थना करीत असतांनाच ठार झाले. चर्च प्रार्थना करणाऱ्यांनीं भरून गेलें होतें. आणि भूकंप आला व सारे गडप झाले!

व्हॉल्टेअर आतां जगाकडे निराळया प्रकाशांत पाहूं लागला. त्याचें लेखन अधिक गंभीर होऊं लागलें. त्याचें भव्य मन शेवटीं एकदांचें परिपक्क झालें. त्यानें एक भावनोत्कट प्रखर कविता लिहिली. ईश्वराची करुणा व त्याचें ज्ञान यांबद्दल त्यानें शंका घेतली. आपल्या लेकरांना दुःखांत लोटणारा हा कसला परमेश्वर! आरोळया ठोकून प्रार्थना करणाऱ्या साऱ्या भक्तांना त्या निष्ठुराचें मौन हेंच उत्तर! अखेर व्हॉल्टेअरच्या लक्षांत आलें कीं, सुटसुटीत, अर्थसुंदर नर्मवचनें किंवा निश्चित हास्य यांपेक्षां जीवन कांहीं तरी अधिक आहे.

"मी हंसत हंसत विनोदानें जगांतील सुखाचीं गीतें, सूर्यप्रकाशाचीं गीतें गात होतों; पण आतां काळ बदलला आहे. माझ्या वाढत्या वयानेंहि मला नवीन दृष्टि दिली आहे. मानवजातीची क्षणभंगुरता मीहि अनुभवीत आहें. सभोंवतीं अंधार वाढत आहे. मीहि प्रकाश शोधीत आहें. अशा वेळीं मीं दुःखीकष्टी होऊं नये तर काय करावें?"

लिस्बन येथील भूकंपाच्या बाबतींत प्रस्थापित चर्चची बेफिकीर वृत्ति पाहून तर व्हॉल्टेअरला धक्काच बसला! या घोर आपत्तींतहि त्या फादरांना ईश्वराचे हेतु दिसत होते! त्यांनीं पापें केलीं म्हणून प्रभूनें त्यांना मारून टाकलें, असें हे धर्मोपदेशक खुशाल प्रतिपादीत! छिन्नविच्छिन्न झालेल्या लोकांच्या वेदनांवर या धर्मांतील भोळसट कल्पना आणखी मीठ चोळीत

आहेत असें पाहून या चर्चची व्हॉल्टेअरला चीड आली. चर्चबद्दलचा तिरस्कार त्याच्या मनात मरेपर्यंत होता.

स्वित्झर्लंडमध्यें फर्ने येथें त्यानें इस्टेट विकत घेतली. फ्रान्सच्या सरहद्दीच्या जरा बाहेर ही इस्टेट होती. येथें बसून त्यानें संघटित धर्मविरुद्ध जोरदार लढाई सुरू केली. तो सांगूं लागला कीं, जगांतील साऱ्या दुःखांचें मूळ म्हणजे चर्च. चर्चची धर्मान्धता तशीच असहिष्णुता, तीं इन्क्विझिशन्स, ते बहिष्कार, त्या शिक्षा, तीं युद्धें—सारा फापटपसारा आहे. असें हे चर्च म्हणजे मानवजातीला शाप आहे. अतःपर चर्चची सत्ता चालू ठेवणें म्हणजे सुधारणेला कलंक लावणें होय. "चर्चला लागलेला हा कलंक धुऊन काढा" अशी घोषणा त्यानें केली. "या निंद्य गोष्टी चिरडून टाका" हें त्याचें ब्रीदवाक्य झालें. त्यानें मित्रांना लिहिलेल्या प्रत्येक पत्राच्या शेवटीं "चर्च चिरडून टाका" हें वाक्य लिहिलेलें असे.

पुस्तकाचा व पत्रकांचा त्यानें नुसता पाऊस पाडला! अत्यंत भावनोत्कटतेनें त्यानें हें सारें लिखाण लिहिलेलें आहे. त्याचें लिहिणें जळजळीत निखाऱ्यासारखें आहे. या लिखाणांत उदात्त भावनेची कळकळ आहे. हें सारे लिखाण केवळ मनुष्यांच्या अंधश्रद्धेविरुद्धच होतें असें नव्हे, तर त्यांच्या धार्मिक आचारांविरुद्धहि होतें. बहुजनसमाजानें "ईश्वर आहे" असें मानणें ठीक आहे. "ईश्वर नसेल तर एकादा शोधून काढावा लागेल. एपिक्यूरसचें ईश्वराशिवाय चालत असे; पण व्हॉल्टेअरला ईश्वर अजीबात रद्द करणें बरें वाटेना. ईश्वर म्हणून कोणी मानला म्हणजे बहुजनसमाज जरा बरा वागतो असें त्याचें मत होतें. ईश्वर असणें जरूर आहे असें त्याला वाटे. इतर कोणत्याहि कारणासाठीं नसेना का, पण निदान आपणास त्याच्याशीं भांडतां यावें म्हणून तरी तो त्याला हवा असतो. ईश्वर म्हणजे जगांचें परमोच्च ज्ञान, अनंतपट कार्यक्षम असा विश्वकर्मा. पण धर्मोपदेशक या ईश्वराला इन्क्विझिटर करतात. लष्करी अधिकारी त्याला शिक्षाप्रिय सार्जंट बनवितात व अशा रीतीनें श्रद्धेचें भीतींत व धर्माचें भोळसटपणांत रूपांतर करतात. व्हॉल्टेअर म्हणतो, "या रूढि–राक्षसीला आपण नष्ट करूं या. ही रूढि धर्मांतूनच जन्मते पण धर्मालाच छिन्नविच्छिन्न करते. रूढीविरुद्ध बंडाचा झेंडा हातीं घेऊन उभे राहतील ते सारे मानवजातीचे उपकारकर्ते होत."

व्हॉल्टेअरनें आपलें उर्वरित जीवन धार्मिक रूढी व अंधळेपणा यांशीं दोन हात करण्यांत दवडिलें. या रूढींतून निर्माण होणाऱ्या द्वेष, मत्सर, असहिष्णुता, संकुचितपणा, अन्याय व युद्ध यांच्याविरुद्धहि तो बंड करीत राहिला. युद्ध म्हणजे मोठ्यांतला मोठा गुन्हा असें तो म्हणे. तो म्हणतो, "हा गुन्हा अधिकच लज्जास्पद व चीड आणणारा वाटतो; कारण, सेनाधिपति होणारा प्रत्येक डाकू धर्माच्या नांवानें जाहीरनामा काढून चोरी करावयास निघतो व युद्धप्रिय देवांना आपल्या बाजूनें लढावयास बोलावतो." जो आपल्या विशिष्ट धार्मिक समजुतीसाठीं मारावयास उठतो तो खरा धार्मिक नव्हे. शास्त्रज्ञाचें म्हणणें कोणीं न मानलें तर काय तो मारावयाला उठतो? भूमितींतील सिद्धान्तासाठीं का कधीं युद्ध झालें आहे? पण हे धर्मोपदेशक कांहीं धार्मिक गोष्टींसाठीं खुशाल खाटिकखाना सुरू करतात! त्यांच्या धार्मिक गोष्टी म्हणजे केवळ मृगजळ असतें. तो मिथ्या काथ्याकूट असतो. त्यांचे धार्मिक सिद्धान्त म्हणजे त्यांचीं स्वतःचीं कांहीं विशिष्ट मतें असतात. त्यासाठीं मारामाऱ्या कशाला? व्हॉल्टेअर म्हणतो, "हे असे लोक म्हणजे भयंकर प्रकारचे वेडे होत. कांहींहि किंमत पडो, यांच्या या विषारी चळवळी बंद पडल्याच पाहिजेत."

जगांतील धार्मिक असहिष्णुतेची पुंजी कमी व्हावी म्हणून व्हॉल्टेअरनें भरपूर कामगिरी केली आहे. धार्मिक बाबतींत कोणीं ढवळाढवळ करूं नये, हें तत्त्व त्यानें कायमचें प्रस्थापित केलें व चर्च आणि स्टेट यांची कायमची ताटातूट केली. त्यानें धर्मोपदेशकांच्या हातांतील तलवार काढून घेतली. व्हॉल्टेअरचें जीवनारंभकाळीं 'हंसा व हंसूं द्या' हें ब्रीदवाक्य होतें. पण आतां त्यानें अधिक उच्च ब्रीदवाक्य घेतलें: "तुम्ही विचार करा व इतरांनाहि विचार करूं द्या." एका पत्रांत तो लिहितो, "तुम्ही जें कांहीं म्हणतां त्यांतील एका अवाक्षराशींहि मी सहमत नाहीं. पण तुम्हास जें म्हणावयाचें आहे तें म्हणण्याचा तुम्हांस हक्क आहे आणि या तुमच्या हक्काचें मी मरेतों समर्थन करीन." व्हॉल्टेअरचे हे शब्द म्हणजेच त्यानें मानवी सुधारणेंत घातलेली मूल्यवान् भर होय. अठराव्या शतकाची सुधारणेला मोठी देणगी म्हणजे हे धीरोदात्त शब्द होत.

— ४ —

व्हॉल्टेअरच्या मनांत अशी क्रांति चालू असतां त्याचें बाह्य जीवन नेहमींप्रमाणें अशान्तच होतें. फ्रेडरिक दि ग्रेटचा साहित्यिक चिटणीस म्हणून त्याची नेमणूक झाली होती. तो फ्रेडरिकशीं भांडला व त्याला पुनः फ्रान्समध्यें पाठविण्यांत आलें. फ्रेंच क्रांतीचें वातावरण तयार करणारे डिडरो, ड'अलेंबर्ट, कॉन्डॉर्सेट, वगैरे नास्तिक ज्ञानकोशकारमंडळींना व्हॉल्टेअरहि मिळाला. डिडरो प्रभृति सारे लोक जुन्या विचारांना व जुन्या रूढींना धाब्यावर बसविणारे होते. ते जुन्या मूर्ती फोडून नवीन विचारमूर्ती देणारे होते. व्हॉल्टेअरनें "स्वतंत्र विचाराचा ज्ञानकोश" तयार करण्याच्या कामीं त्याना मदत केली. ज्ञानकोशकार त्याला सनातनी म्हणत, आस्तिक म्हणत आणि सनातनी त्याला नास्तिक म्हणत. आणि या दोघांच्या मध्यें तो उभा होता. त्याचे हात कामानें भरलेले होते. इतिहासाचें तत्त्वज्ञान, तत्त्वज्ञानाचा कोश, वगैरे शेंकडों पुस्तकें लिहिण्यांत तो मग्न होता. तरीहि अन्याय व छळ दिसतील तेथें तेथें लेखणी घेऊन लढावयाला तो सदैव सज्ज असेच. सेंट बूव्हे लिहितो, "प्रत्येकजण व्हॉल्टेअरकडे येई. कोणी त्याचा सल्ला मागत, कोणी त्याला आपल्यावर होणारे अन्याय निवेदीत व त्याचें साह्य मागत. तो कोणासहि नकार देत नसे, निराश करीत नसे."

त्याला मनानें वा शरीरानें बरेच दिवस विश्राति घेणें अशक्य असे. वयाला त्र्याऐंशी वर्षें होत आलीं तरीहि जीवनात प्रत्यक्ष धडपड करावी, स्वस्थ बसूं नये असें त्याला वाटे. आपलें मरण जवळ आलें असें वाटून तो पॅरिसला अखेरची भेट द्यावयाला म्हणून आला. पॅरिसमध्ये त्याचें स्वागत झालें तें जणूं ऐतिहासिकच होतें ! पण हा सारा प्रवास, हें भव्य स्वागत त्याच्या प्रकृतीस झेंपलें नाहीं. त्याच्या स्वागतार्थ रंगभूमीवर केल्या जाणाऱ्या एका नाटकाला डॉक्टर 'जाऊं नका' म्हणून सांगत असतांहि तो गेला. सार्वजनिक रीत्या त्याचें तें शेवटचेंच दर्शन होतें.

तो मृत्युशय्येवर होता. एक धर्मोपदेशक त्याचा कबुलीजबाब घेण्यास आला. पण व्हॉल्टेअर म्हणाला, "रोमन कॅथॉलिक चर्चवर माझी श्रद्धा नाहीं.

मी ईश्वराची प्रार्थना व पूजा करीत मरतों. मित्रांवर प्रेम करीत पण शत्रूंचा द्वेष न करतां रूढींचा तिरस्कार करीत मी देवाकडे जातों."

पॅरिसमध्यें त्याला ख्रिश्चन धर्माप्रमाणें अंत्य संस्कार मिळाला नाहीं.

— ५ —

इंग्रजांवरील पत्रांत तो एके ठिकाणीं लिहितो, " ऐझॅक न्यूटन हा सर्वांत मोठा मनुष्य होय. तो सर्वांत मोठा का? कारण, आपण त्याच्याचबद्दल मनांत पूज्यबुद्धि बाळगतों, जो सत्याच्या जोरावर आपलीं मनें जिंकतो. बळजबरीनें दुसऱ्यांची मनें जिंकू पाहणाराना आपण मान देत नाहीं." न्यूटनबद्दल व्हॉल्टेअरनें लिहिलेले शब्दच व्हॉल्टेअरच्या मृत्युलेखासाठीं उपयोगीं पडण्यासारखे होते.

## प्रकरण ९ वें

# जग जिंकूनहि निर्वासितावस्थेंत मरणारा नेपोलियन

— १ —

अठरावें हें बंडखोरीचें शतक होतें. सर्वत्र राजांचीं फर्मानें व धर्मोपदेशकांचे हट्ट यांविरुद्ध बंडें होत होतीं. राजा व धर्म दोहोंच्याहि कचाट्यांतून जनता मुक्त होऊं पाहत होती. सर्व जगभर क्रान्तिकारक विचारांची विद्युत्संचार करीत होती. व्हॉल्टेअर पॅरिसला शेवटची भेट द्यावयास आल्या वेळीं तेथील विज्ञानमन्दिरांत बेंजामिन फ्रॅंकलिन त्याला भेटला होता. दोघां बंडखोरांनीं परस्परांस मिठ्या मारून चुंबनें घेतलीं. भोवतालचे लोक म्हणाले, " सोलोन व सोफोक्लिस हेच जणूं परस्परांस आलिंगन देत आहेत! किती सुंदर दृश्य हे!"

ज्यानें आकाश फाडून त्यांतून विद्युत् खालीं आणली होती, जो राजाचे राजदंड ओढून घेणार होता, असा तो अमेरिकन छापखानेवाला, विज्ञानवेत्ता व स्वतंत्र-विचार-वादी बेंजामिन या वेळीं अमेरिकन क्रान्तीला सोळाव्या लुईची सहानुभूति मिळविण्यासाठीं आला होता. इंग्रजांच्या सत्तेवर आघात करण्यासाठीं फ्रेंच राजा सदैव टपलेला असे; त्यानें अमेरिकेशीं करार केला.

वस्तुतः त्याला त्या बंडखोरांस मदत देण्याची मनापासून इच्छा नव्हती; पण नाखुषीनें का होईना, इंग्रजांची सत्ता नष्ट करण्यासाठीं म्हणून त्यानें मदत देण्याचें मान्य केलें. अमेरिकेंतील विचार फ्रान्समध्येंहि येणार हें त्याला समजत नव्हतें असें नाहीं. पेन, जेफरसन, फ्रॅंकलिन, वॉशिंग्टन वगैरे अमेरिकन क्रांतीचे पुढारी लुईच्या मतें धोकेबाज होते. ते सारे बंडखोर होते येवढेंच नव्हे, तर देववादी म्हणजे चर्च वगैरेंची जरूर न ठेवतां देवाला मानणारे होते. 'चर्चची अडगळ कशाला !' असें ते म्हणत. नास्तिकतेकडे जाणाराच त्याचाहि रस्ता होता. व्हॉल्टेअरच्या मतांप्रमाणेंच या अमेरिकन क्रांतिकारकांचींहि मतें राजांच्या दैवी हक्कांच्या तत्त्वावर उभारलेल्या सामाजिक रचनेचा पाया उखडून टाकूं पाहणारीं होतीं. लुईनें अमेरिकनांशीं मैत्री जोडण्याचें कारण त्याचें अमेरिकनांवरील प्रेम नसून तो इंग्रजांचा द्वेष करीत असे हें होतें. त्यानें अमेरिकनांस पैसे दिले, फौजा दिल्या; पण अमेरिकेंतील क्रांतीची प्रगति मात्र तो सचिंत होऊन पाहत होता.

लुईला वाटत असलेली भीति खरी ठरली. १७८९ सालच्या वसंत ऋतूंत, अमेरिकेंत वॉशिंग्टनचें इनॉगरेशन होण्याच्या थोडेच दिवस आधीं लुईच्या स्वतःच्या देशांत क्रांतीचा वणवा पेटला. फ्रेंच राज्यक्रांति बरीचशी रशियन राज्यक्रांतीसारखीच होती. प्रथम मिरोबाच्या नेतृत्वाखालीं मध्यम वर्गानें राजाविरुद्ध बंड केलें. रशियांत केरेन्स्कीच्या पक्षानें झारविरुद्ध केलेल्या बंडासारखेंच हें बंड होतें. पण पुढें डान्टन, राब्सोरी, मरात, वगैरे जहाल पुढारी लेनिन, ट्रॉट्स्की, इ० रशियन क्रांतिकारकांप्रमाणें अधीर झाले. त्यांना मवाळ पुढाऱ्यांचा मवाळपणा आवडेना; त्यांनीं त्यांना दूर करून सत्ता स्वतःच्या हातीं घेतली व राजाचा शिरच्छेद केला. सरदारांचे विशिष्ट हक्क त्यांनीं नष्ट केले, त्यांच्या पदव्या रद्द केल्या व अमेरिकेच्या स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्याप्रमाणें मानवी हक्कांचा जाहीरनामा काढला. त्यांनीं चर्चची मालमत्ता जप्त केली व ती सरकारच्या हवालीं केली. ईश्वराच्या पूजेविरुद्ध एक फतवा काढून ईश्वराच्या पूजेऐवजीं त्यांनीं 'बुद्धीची दैवी पूजा' सुरू केली. त्यांनीं बुद्धीला ईश्वराच्या सिंहासनावर बसविलें.

येथपर्यंत क्रांति बरीचशी रक्तहीनच झाली. पण १७९१ सालीं प्राशियाचा राजा व ऑस्ट्रियाचा सम्राट् पिल्निट्झ येथें भेटले. फ्रेंच क्रांतीविरुद्ध

प्रतिक्रांति सुरू करण्यासाठीं ते जमले होते. हद्दपार केलेले फ्रेंच सरदार व इतर राजनिष्ठ लोक यांचें सैन्य त्यांनीं गोळा केलें व सर्व जगाच्या कल्याणासाठीं पुनः राजशाही सुरू झालीच पाहिजे, असें जाहीर केलें. या घोषणेमुळें फ्रेंच क्रान्तिकारकांच्या भावना पेटून उठल्या. ते जणूं चवताळले! घरची राजशाहीची नांवनिशाणी नष्ट करावयाची येवढेंच नाहीं, तर सर्व युरोपमधली राजशाही नष्ट करून साऱ्या युरोपचेंच रिपब्लिक करावयाचें असें त्यांनीं ठरविलें. त्यांनीं तुरुंग फोडले व शेंकडों कैद्यांना ठार केलें. त्यांनीं सर्वत्र 'रेन ऑफ टेरर' सुरू केलें. त्यांनीं सुरू केलेला मरणमारणाचा कारभार अक्षम्य होता. युद्धाचा मार्ग आजपर्यंत कधींहि प्रगतीचा ठरला नाहीं. खुनाखुनी करून मिळविलेला कोणताहि विजय महत्त्वाचा नसतो. लाखोंच्या प्राणांचें मोल देण्याइतका मूल्यवान् विजय कोणताच नसतो. फ्रेंच क्रातिकारकांनीं हिंसेचा अवलंब केला व शेवटीं अपरिहार्य तें झालेंच—ज्याचें परिवर्तन पराजयांत झालें. पण फ्रेंच राज्यक्रांतींतील या दुर्दैवी घटनेला उगीच नांवें ठेवण्यांत अर्थ नाहीं. ही भीषण राजवट सुरू करणारे घाबरून गेले होते. त्यांचीं डोकीं ठिकाणावर नव्हतीं. त्यांनीं हें सर्व आत्मरक्षणासाठीं केलें. नवीनच मिळालेल्या स्वातंत्र्यामुळें ते मस्त झाले होते. पण तें स्वातंत्र्य जाणार कीं काय, अशा भीतीनें ते वेड्यासारखे झाले. आपण काय करीत आहों हें त्यांना कळेना.

एच्. जी. वेल्स लिहितो कीं, 'राजाचा कैवार घेणाऱ्यांनीं क्रांतिकारकांच्या अत्याचारांचीं अतिशयोक्तिपूर्ण वर्णनें केलीं आहेत.' त्याच्या मतें आपण फ्रेंच क्रांतींत मारल्या गेलेल्यांचीं इतकीं वर्णनें ऐकतों याचें कारण ते जरा बडे व प्रतिष्ठित लोक होते. जास्तींत जास्त चार हजार लोक मारले गेले असतील आणि त्यांपैकीं बरेचसे क्रांतीच्या विरुद्ध होते. फ्रेंच रिपब्लिकविरुद्ध सुरू असलेल्या लढाईंत ते खुषीनें सामील झाल्यामुळें त्यांना लढाईचीं फळें भोगावीं लागलीं. एच्. जी. वेल्स म्हणतो, "१९१६ मधील सोम आघाडीवरच्या लढाईच्या वेळीं ब्रिटिश सेनापतींनीं संबंध फ्रेंच राज्यक्रांतीच्या काळांत जितके लोक मारले गेले होते त्यांपेक्षां अधिक एका दिवसांत मारले!" इतिहासाच्या अंगणांत गरिबांच्या विव्हळण्यापेक्षां श्रीमंताच्या रडण्याचेच प्रतिध्वनी अधिक मोठे उमटत असतात.

पण एकानें अन्याय केला म्हणून कांहीं दुसऱ्यानें केलेला अन्याय क्षम्य ठरत नाहीं. फ्रेंच राज्यक्रांतींतील 'रेन ऑफ टेरर' एकंदरींत लज्जास्पदच होतें. येवढेंच नव्हे, तर त्यासाठीं किंमतहि जबर द्यावी लागली. क्रांतिकारकांना स्वतःचें स्वातंत्र्य गमावून बसावें लागलें. त्यानीं रिपब्लिकच्या रक्षणासाठीं टाकलेल्या पावलातून इतिहासांतील एक अत्यंत चढाऊ युद्ध निर्माण झालें. त्यांतच फ्रेंच रिपब्लिक नष्ट होऊन त्यांतून नेपोलियनच्या साम्राज्यशाही तृष्णा जन्माला आल्या.

— २ —

नेपोलियनच्या लढायांचा आरंभ 'रेन ऑफ टेरर' मधून झाला. नेपोलियन मूळचा इटलीमधला. १७६९ सालीं कॉर्सिका बेटावर त्याचा जन्म झाला. फ्रान्समधील लष्करी विद्यालयांत त्याचें शिक्षण झालें. मुसोलिनीप्रमाणें तोहि आरंभीं क्रांतिकारक व जहाल होता. तो गबाळ व केसाळ होता. त्याचे केस कधीं नीटविंचरलेले नसत. पॉवडर वगैरे कोठली तरी, कशी तरी फांसलेली असावयाची! त्याला घरीं नीट शिक्षण मिळालें नाहीं. तो पॅरिसच्या रस्त्यांतून अहंमन्यतेनें भटकत फिरे. क्रान्तीचे शत्रू नष्ट करून क्रान्ति वांचविण्याची जबाबदारी त्यानें स्वतःच्या शिरावर घेतली. आपणच हें काम करूं शकूं असें तो म्हणे.

त्या वेळीं त्याचें वय फक्त सत्तावीस वर्षांचें होतें. पण लढवय्या म्हणून त्यानें आपली योग्यता आधींच दाखविली होती. ती म्हणजे १७९५ सालीं राजाची बाजू घेणाऱ्यांचें बंड मोडून त्यानें रिपब्लिकविषयीं आपली निष्ठा दाखविली होती तेव्हां होय. क्रान्तीच्या नेत्यांनीं नेपोलियनला सैन्य देऊन सांगितलें, "ही सेना घे व साऱ्या जगाला जिंकून त्याची फ्रेंच रिपब्लिकच्या धर्तीवर पुनर्रचना कर. पण हातांत तलवार घेणारे आजपर्यंत कधींच जगाचे उद्धारक ठरले नाहींत, जगाला वांचवूं शकले नाहींत. नेपोलियन आणि त्याच्या फौजा यानीं जगाचा धुव्वा उडविला! आपले मनोरथ पूर्ण करून घेण्यासाठीं नेपोलियननें क्रान्तीचा साधन म्हणून उपयोग करून घेतला. त्यानें पहिली स्वारी इटॅलियनांविरुद्ध केली. आपण त्यांचीं बंधनें तोडण्यासाठीं जात आहों असें त्यानें जाहीर केलें; पण इटलीवर तुटून

पडणाऱ्या आपल्या शिपायांना तो म्हणाला, " आपण या देशावर दोन कोटी फ्रँक खंडणी लादूं ( म्हणजेच तितकी संपत्ति लुटून नेऊं ). जगांतील अत्यंत समृद्ध मैदानांत मी तुम्हाला नेत आहें ; तुम्हांला तेथें गेल्यावर यश, संपत्ति मानसन्मान, सारें कांहीं मिळेल." तदनुसार नेपोलियनला वरील सर्व मिळालें पण त्याच्या शिपायांना मात्र मरणच लाभलें !

इटलींतील विजयामुळें नेपोलियन फुगला. तो आपणास ज्यूलियस सीझरच्या प्रमाणांत पाहूं लागला. पूर्वेकडील देशांत आपणहि आपलें वैभव दाखविलें पाहिजे, आपला दरारा तिकडील राष्ट्रांवरहि बसविला पाहिजे असें त्याला वाटलें. म्हणून त्यानें ईजिप्तमधील लोकांना आतां मुक्त केलें पाहिजे हें आपल्या देशबांधवास पटवून दिलें व आपल्या आज्ञाधारक क्रान्तिकारक कोंकरांस ईजिप्तमध्यें नेऊन त्यांना तेथले उंच पिरॅमिड्स् दाखविले. त्यांच्या भावना पेटाव्या, त्यांनीं मरावयास तयार व्हावें, म्हणून तो म्हणाला, " तीस शतकें त्या पिरॅमिड्स्‌वरून तुमच्याकडे पाहत आहेत !" इतिहासांतील अति प्रसिद्ध व अत्यंत मूर्खपणाचें हें वाक्य आहे. या वाक्यांत लष्करशाहीचें स्वरूप प्रतीत होत आहे. लष्करशाही जिवंत व प्रगतिपर वर्तमानकाळाला भूतकाळाशीं जखडून टाकून प्रगति होऊंच देत नाहीं. लष्करशाही आम्हांला आपलें जीवनाचें नाटक जणूं भुतांसमोर करावयास लावते ; चार हजार वर्षें—मृतांचीं चार हजार वर्षें—तुमच्याकडे पाहत आहेत म्हणून मारा व मरा असें ही सांगत असते. एका वेडपटाचा मूर्खांच्या पिढीला हा उपदेश आहे ; तो मूर्खांनीं ऐकला, मानला व ते मेले ; त्या वेडपटाचें वैभव व त्याची कीर्ति वाढविण्यासाठीं ते मूर्ख मातींत पडले !

नेपोलियन फक्त स्वतःची पूजा करी व बाकी साऱ्या दुनियेला तुच्छ मानी. कृतज्ञतेशीं त्याचा परिचय नव्हता. मानवी दुःखांविषयीं त्याला सहानुभूति नसे. ईजिप्तमधील जखमी शिपायांना परत स्वदेशीं आणणें फार त्रासाचें होतें, म्हणून त्यांना क्लोरोफॉर्म देऊन त्यानें ठार मारलें ! नेपोलियन वंचक व असत्यवादी होता ; त्याला सत्य ठाऊक नव्हतें. तो दंभाचा पुतळा होता. फसवणूक करणें हा तर त्याचा धर्म होता ! ज्या ध्येयांवर त्याची श्रद्धा नव्हती तींहि आपलीं आहेत असें तो खुशाल सांगे ! पाळावयाचीं नसलेलीं वचनेंहि तो खुशाल देई ! चढाऊ वीराचा तो आदर्श नमुना होता. जगावर सत्ता गाजवूं

पाहणारे तलवारबहाद्दर असेच असतात. मानवप्राणी म्हणजे मातीचीं डिखळें असें तो मानी व आपली लहर तृप्त करण्यासाठीं या मातीला मन मानेल तसा आकार देई वा फोडून टाकी.

आपल्या कारकीर्दीच्या आरंभीं त्यानें आपण मानवजातीचे मित्र आहों असें ढोंग केलें. युरोपभर अनेक रिपब्लिकें स्थापून त्यानें तीं स्वतःच लुटलीं ! क्रांतीच्या नांवानें लढत असतां तो स्वतःचेंच घोडें कसें पुढें दामटतां येईल हेंच खरो-खरीं पाहत असे. सैन्यावर आपला पूर्ण ताबा बसला आहे असें दिसल्यावर त्यानें १८०४ सालीं पोपला बोलावून आणून त्याच्याकडून 'फ्रान्सचा ईश्वरनियोजित सम्राट्' असा अभिषेक आपणांस करून घेतला. कार्लाइल म्हणतो, "त्या राज्याभिषेकांत कशाचीहि वाण नव्हती; पांच लाख लोक त्यासाठीं मेले नव्हते का? मग आणखी कोणतें भाग्य हवें?" आतांपर्यंत तो पददलितांचा कैवारी म्हणून मिरविला; पण आतां तो अत्यंत रानटी व जुलुमी हडेलहप्प बनला. युरोपांतील साऱ्या रिपब्लिकांच्या पुनः राजेशाह्या करून स्वतःच्या भावांत व आप्तेष्टांत त्यानें सारें युरोप जणूं वांटून टाकलें ! पण हें भावांवर व आप्तेष्टांवर त्याचें प्रेम होतें म्हणून नव्हे, तर राज बनविणें व नष्ट करणें हा आपला खेळ आहे, आपल्या तळहातचा मळ आहे असें त्यांना दाखवून दिपवून टाकण्यासाठीं. आपण 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं' असे सत्ताधारी आहों हें तो दाखवूं इच्छीत होता. एकाद्या उकिरड्यावर ऐटीनें बसणाऱ्या कोंबडयाप्रमाणें उध्वस्त जगाच्या विनाश–राशीवर तो बसला होता. आणि अद्यापहि या कोंबडयाचें कुकूऽकूऽ सर्व राष्ट्रांतील मुलांच्या वर्गांतून शिकविण्यांत येत असतें व या नवयुवकांतून पुढच्या लढाईचे शिपाई तयार करण्यांत येत असतात.

जीवनाच्या सुरुवातीला नेपोलियन नास्तिकवादाकडे झुकत होता; पण आतां तो धार्मिक झाला. धर्माशिवाय दुसऱ्या कोणत्या युक्तिवादानें 'आपल्या दारिद्र्यांतच समाधान माना' हें गरिबांना पटवून देतां येईल बरें ?" असें तो म्हणे. एक अपचनाने आजारी आहे, तर एक भुकेनें मरत आहे, हा जगांतील भेद, ही जगांत दिसणारी विषमता मनुष्यांनीं सहन करावयास पाहिजे असेल तर, कोणी तरी असें सांगणारा हवाच कीं, 'ईश्वराचीच तशी इच्छा आहे. जगांत गरीब व श्रीमंत हे भेद असावे असा ईश्वरी संकेतच आहे !' असें सांगितलें तरच लोक गप्प बसतील. नेपोलियन ईश्वराचा भूतकावरील

अधिकृत प्रतिनिधि बनला. ‘ दरिद्री व पददलित असूनहि प्रजेनें शांत राहावें, समाधान मानावें,’ यासाठींच जणूं नेपोलियनचा अवतार होता.

इतर सर्व गोष्टींप्रमाणें त्यानें धर्मांचेंहि प्रबळ लष्करी शास्त्र बनविलें व परकीयांवर हेरगिरी करण्यासाठीं परदेशांत मिशनरी पाठविले. तो म्हणे, “ आशिया, आफ्रिका, अमेरिका, इत्यादि ठिकाणीं या मिशनऱ्यांचा मला खूप उपयोग होईल; त्या त्या देशांची हकीकत मला या मिशनऱ्यांतर्फे मिळेल, त्या पाद्र्यांचा धार्मिक पोषाख त्यांचें रक्षण करील व त्यायोगें त्यांचे व्यापारी व राजकीय हेतू कोणास कळणार नाहींत.” त्याला आतां एकाच ध्येयाचा—स्वतःच्या सत्तेचा–ध्यास लागला होता. सत्ता कोणत्या मार्गांनीं मिळवावयाची याचा विधि–निषेध त्याला नसे. मार्ग कोणताहि असो, सत्ता हातीं राहिली म्हणजे झालें असें तो म्हणे. जुन्या क्रांतिकारक सहकाऱ्याची ‘ कल्पनावादी ’ अशी टिंगल करून ते स्वातंत्र्य व सुधारणा या ध्येयांचा पुरस्कार करीत म्हणून त्यानें त्यांना दूर केलें. स्वातंत्र्याचा हट्टच धरून बसणाऱ्यांना तो तुरुंगांत टाकी. त्याला टीकेची भीति वाटे, म्हणून तो टीकाकारांना दया दाखवीत नसे. ‘ साऱ्या जगाला थक्क करणें, दिपवून टाकणें ’ हें त्याचें ध्येय असल्यामुळें तत्सिद्ध्यर्थ त्यानें प्रत्येक विरोधी आवाज दडपून टाकण्याचें ठरविलें. आपण वर्तमानपत्रांना स्वातंत्र्य दिल्यास आपली सत्ता तीन दिवसहि टिकणार नाहीं असें त्याला वाटे.

नेपोलियन एक क्षुद्र वृत्तीचा जाहिरातबाज होता. त्यानें केलेल्या युद्धांचा हेतु जगाला गुलाम करणें येवढाच नसून जगाला दिपविणें, थक्क करणें, हाहि होता. जय कोणी का मिळवीना, टाळ्या व श्रेय मात्र नेहमीं तोच घेई. तो स्वतःची स्तुति करणारा कुत्रा होता. त्याला मोठा आवाज करणें आवडे. तो म्हणतो, ‘ कीर्ति व प्रसिद्धि म्हणजे काय ? जो जास्त आवाज करतो, तोच प्रसिद्ध होतो. जितका अधिक मोठा आवाज केला जाईल तितका अधिक दूर तो ऐकूं जातो. कायदे, संस्था, स्मारकें, राष्ट्रें, सर्व नष्ट होतात; पण आवाज मात्र टिकतो—पुढच्या काळांत, पुढच्या युगांतहि टिकतो.”

आणि म्हणून नेपोलियन जगासमोर मोराप्रमाणें नाचत होता. तो दरोडे घालीत. निंदा करीत, फसवीत, खून करीत, वल्गना करीत व पराक्रम

दाखवीत होता. स्वतःच्या मोठेपणाचीं स्तुतिस्तोत्रें तो स्वतःच गाई. व्हिक्टर ह्यूगो म्हणतो, "देवालाहि जणूं त्याचा कंटाळाच आला!" तो आणखी म्हणतो, "पुरे झाला नेपोलियन. फार झाली त्याची चव. विटलों, विटलों आतां!"

आणि नंतर त्याचा अधःपात झाला; स्वतःच्या फाजील महत्त्वाकांक्षेमुळेंच त्याचा निःपात झाला. आपल्या साम्राज्यांत रशिया व इंग्लंड यांचाहि समावेश करावयाला तो उत्सुक होता; म्हणून सहा लाख सैन्य घेऊन तो मॉस्कोवर स्वारी करण्यास निघाला, पण पुढें कित्येक महिन्यांनंतर कांहीं हजार दरिद्री, भिकार, मरतुकड्या, निःसत्त्व व निरुत्साही शिपायांसह पराभूत होऊन परत आला. त्याला जय मिळत होते तोंपर्यंत त्याच्या यशोज्योतीभोंवतीं पतंगाप्रमाणें मरण्यास ते तयार होते. पण मॉस्कोहून ही जी अनर्थकारक पिछे-हाट झाली तिनें फ्रेंचांचे डोळे उघडले. नेपोलियन हा जगाला दिपवूं पाहणारा एक शुद्ध वेडपट आहे हें त्यांनीं ओळखलें. त्याच्या महत्त्वाकांक्षेच्या रोगानें लाखों तरुण शिपायांना नाहक मृत्युमुखांत लोटलें होतें. नेपोलियननें पुनः असला कांहीं खोडसाळपणा करूं नये म्हणून त्याचे देशबांधव व्यवस्था करूं लागले. या मूर्खपणाला आळा बसला पाहिजे असें त्यांना वाटूं लागलें. म्हणून त्यांनीं त्याला एल्बा बेटावर हद्दपार केलें. पण तो अकरा महिन्यांनीं तेथून निसटला व स्वतःच्या वेड्या व चढाऊ लष्करशाहीनें पुनः एकदां जगांत दरारा बसविण्याची खटपट करूं लागला. तथापि सुदैवानें या वेळचें त्याचें हत्याकांड अल्पायुषी ठरलें. ही खुनाखुनी, ही लूटमार, फार दिवस चालली नाहीं. पळून आल्यापासून नव्वदच दिवसांनीं वॉटर्लू येथें त्याचा पराभव झाला. त्यानें गलबतांतून अमेरिकेंत जाण्याचा प्रयत्न केला; पण इंग्रजांनीं त्याला पकडून सेंट हेलेना बेटाच्या निर्जन किनाऱ्यावर स्वतःच्या गुन्हेगार वृत्ती—भोगेच्छा व आकांक्षा—मनांत खेळवीत बसावयाला पाठवून दिलें. आयुष्याचीं शेवटचीं सात वर्षें त्यानें येथें आपल्या आठवणी लिहिण्यांत घालविलीं. या स्मृतींत त्यानें स्वतःला जवळजवळ महादेव बनविलें आहे. १८२१ सालीं तो कॅन्सरनें मरण पावला व जगाला थोडासा विसांवा मिळाला.

— ३ —

फ्रेंच राज्यक्रान्ति करणाऱ्या पुढाऱ्यांनीं एक फार मोठी चूक केली: त्यांनीं तलवारीच्या जोरावर आपल्या कल्पनांचा प्रसार करण्याचा प्रयत्न केला. जगाला मुक्त करण्यासाठीं त्यांनीं सैन्य उभें केलें. पण हेंच साधन हातीं घेऊन नेपोलियननें स्वतःच्याच देशाला गुलाम केलें. यशासाठीं हिंसेवर विसंबून राहणाऱ्या फ्रेंच क्रान्तीचा गळा शेवटीं हिंसेनेंच दाबला जाणें अपरिहार्य होतें व तें नेपोलियननें केलें.

नेपोलियननें फ्रान्सची मर्यादा तीच युरोपची मर्यादा करण्याची खटपट केली. कारण, त्याला स्वतःच्या क्षुद्र दिमाखासाठीं सारें युरोप रंगभूमि म्हणून हवें होतें. पण सारें करून तो सेंट हेलेना बेटावर जाऊन बसला, तेव्हां युरोपचें स्मशान झालें होतें ! फ्रान्स पूर्वीपेक्षां लहान झाला. नेपोलियनवर स्वतःच्या जीवननाटकांतील शेवटचा प्रवेश उष्ण कटिबंधांतील एका अज्ञात आणि निर्जन बेटावर करावा लागला. अनंत आकाश व अफाट सागर हेच तेवढे प्रेक्षक होते.

अलेक्झांडर खूप दारूची मेजवानी झोडून मेला, हॅनिबॉलनें शत्रू सारखे पाठीस लागले म्हणून आत्महत्या केली, सीझरला सर्वांत मोठा विजय मिळावयाचा होता त्याच दिवशीं तो मारला गेला आणि नेपोलियनला एखाद्या क्रूर, वन्य श्वापदाप्रमाणें कैद करून मरण्यासाठीं दूर ठेवण्यांत आलें. इतिहासांतल्या या सर्वांत मोठ्या चार सेनापतींपैकीं एकाच्याहि हातून जगाच्या सुखांत किंवा संस्कृतींत तिळभरहि भर पडली नाहीं व खुद्द त्यांनाहि सुख लाभलें नाहीं. अशा या हडेलहप्पांशिवायच जगाचें नीट चालेल.



## प्रकरण १ लें

# गटे : हा पाहा खरा मनुष्य !

## – १ –

आठव्या शतकांतील तरुण स्त्री–पुरुष अर्वाचीन होते. आजच्या तरुण स्त्रीपुरुषांप्रमाणेंच तेहि जगाविषयीं असंतुष्ट होते. ज्या जगांत ते वावरत, तें त्यांना समाधानकारक वाटत नसे. स्वतःच्या आशा–आकांक्षांना साजेल, आपल्या हृदयाच्या भुकांना व वृत्तींना संतोषवील, असे नवें जग निर्मिण्याची त्यांनीं पराकाष्ठा केली. फ्रान्स व अमेरिका या देशांतील बंडांनीं राजकीय स्वरूप घेतलें. दुसऱ्या देशांत—विशेषतः जर्मनींत–परंपरेविरुद्ध सुरू झालेला झगडा विशेषतः बौद्धिक स्वरूपाचा होता. जर्मन क्रांति–वीरांनीं आपल्या देशांतील जुनाट कल्पना फेंकून दिल्या; पण शासनपद्धति मात्र जुनाटच ठेवली. त्यांनीं फक्त रूढींवर हल्ला चढविला; ते राजसत्तेच्या वाटेला गेले नाहींत. जर्मन क्रांति लेखणीची होती, तलवारीची नव्हती. त्यांनीं आपल्या देशबांधवांचीं मनें मुक्त केलीं, त्यांच्या शरीरांकडे फारसें लक्ष दिलेंच नाहीं; तीं परतंत्रच राहिलीं. स्वतंत्र विचाराला ते मान देत; पण स्वतंत्र कृतीवर त्यांचा विश्वास नव्हता. देवाला त्यांनीं उडवून दिलें, तरी राजासमोर मात्र ते वांकले, नमले.

जोहान वुल्फगँग गटे हा या बौद्धिक क्रांतिकारकांचा पुढारी होता. वयाच्या सहाव्या वर्षीच त्यानें ईश्वराविरुद्ध बंड केलें, सातव्या वर्षी माणसांनीं चालविलेल्या अन्यायांविरुद्ध तक्रार केली, आठव्या वर्षी लॅटिन भाषेंत एक निबंध लिहून त्यानें प्राचीन ग्रीकांच्या व ख्रिश्चनांच्या ज्ञानांची तुलना केली, अकराव्या वर्षी एक कॉस्मॉपॉलिटन कादंबरी सात भाषांत लिहिली, बाराव्या वर्षीं द्वंद्वयुद्ध केलें, चौदाव्या वर्षी उत्कटपणें स्वतःला प्रेमपाशांत अडकवून घेतलें, चौऱ्याहत्तराव्या वर्षींहि पुनः एकदां उत्कट प्रेमपाशात मान गुंतविली व वयाच्या ब्यायशींव्या वर्षी 'फॉस्ट' महाकाव्याचे दोन भाग पूर्ण केले.

ट्यूटॉनिक वंशांत जन्मलेला हा गटे एक अत्यंत आश्चर्यकारक विभूति होता. त्याचें जीवन व त्याचें कार्य आतां आपण पाहूं या.

— २ —

गटेचा जन्म १७४९ सालीं झाला. त्याचे आजोबा शिंपी होते, पणजोबा लोहार होते. शिंप्यानें आपल्या मुलाला प्रतिष्ठित मनुष्य बनविलें. गटेचा बाप जोहान्स कॅस्पर हा फ्रँकफुर्ट येथील शाही सल्लागार झाला व आपण गरीब कुलांत जन्मलों हें लवकरच विसरून गेला. आपल्या पूर्वजांपैकीं एक लोहार होता व एक शिंपी होता हें त्यानें कधींहि सांगितलें नाहीं. व्हॉल्टेअर-प्रमाणेंच तोहि जन्मतः मरणोन्मुख होता व त्याची प्रकृति ठीक नव्हती; पण पुढें ती चांगली झाली. व्हॉल्टेअर नेहमीं शरीर–प्रकृतीच्या बाबतींत रडत असे, तसें फारसें रडण्याची पाळी गटेवर आली नाहीं. ब्यायशीं वर्षांच्या दीर्घ जीवनांत तो फक्त तीनदांच आजारी पडला. निरोगी शरीर व निरोगी मन यांच्यास येणाऱ्या फारच थोड्या लोकांपैकीं गटे एक होता.

तो घरींच शिकला. त्याचा बाप ग्रीक व लॅटिन या भाषाचा पंडित व शिस्तीचा मोठा भोक्ता होता. पित्यानें एक अभ्यासक्रम आंखला व तो मुला-कडून पुरा करून घेतला; पण या अभ्यासानें त्याची बुद्धि प्रगल्भ झाली तरी कल्पना–शक्ति मात्र वाढली नाहीं. गटेची आई साधी, सरळ, सुंदर, आनंदी, बहुश्रुत व मनमोकळी होती. तिनें बरेंच वाचलें होतें. गटे जन्मला तेव्हां ती फक्त अठरा वर्षांची होती. ती स्वतःच रचलेल्या गोष्टी मुलास सांगे व त्यांतील पात्रें निर्माण करण्यांत तद्वतच त्यांचीं संविधानकें तयार करण्यांत त्याची मदत घेई. उत्तेजन देऊन तिनें गटेच्या ठायीं काव्यात्मक शक्ति जागृत केली. गटे म्हणतो, “ जीवनाची गंभीर दृष्टि मीं पित्याजवळून घेतली व गोष्टी सांगण्याचें प्रेम मातेजवळून घेतलें. ”

गटेनें कायद्याचा अभ्यास करावा अगर प्राध्यापक व्हावें असें त्याच्या पित्यास वाटे; पण गटेला कायद्याची वा अध्यापनाची आवड नव्हती. वडील नाखुष होऊं नयेत म्हणून तो १७६५ सालीं लीपझिग–विद्यापीठांत दाखल झाला; पण स्वतःला राजी राखण्यासाठीं, पुस्तकांचा विद्यार्थी होण्याऐवजीं तो जीवनाचा विद्यार्थी झाला. त्याचा बाप सुखवस्तु होता; तो त्याला भरपूर पैसे पाठवून देई. त्यामुळें त्याला विवंचना माहीत नव्हती. गटे घरच्या रूढिमय जीवनाचीं बंधनें तोडून उड्डाण करूं इच्छीत होता. जगांतील जीवनाच्या बेछूट वाटांनीं तो जाऊं लागला व प्रयोग करूं लागला. त्याला गुरुजनांविषयीं

यत्किंचित् सुद्धां आदर वाटत नसे. आपल्या प्राध्यापकांच्या इतकेंच आपणालाहि देवाविषयीं व जगाविषयीं ज्ञान आहे असें गटेला वाटे. वर्गाची खोली सोडून लोकांच्या घरीं गेल्यास अधिक ज्ञान व अनुभव मिळवितां येतील अशी त्याची समजूत होती. " लोकांच्या संगतींत, बैठकींत, नाचगानांत, नाटकें पाहण्यांत, मेजवान्यात व रस्त्यातून ऐटीनें हिंडण्यांत वेळ कसा छान जातो ! वेळ किती पटकन् निघून जातो हें समजतहि नाहीं ! खरेंच, किती सुंदर काळ जातो हा ! पण खर्चहि फार होतो. माझ्या पिशवीवर किती ताण पडतो हे सैतानालाच माहीत ! " असें गटे म्हणे.

या वेळच्या गटेच्या असंयमी व उच्छृंखल जीवनाविषयीं त्याचा एक विद्यार्थी बंधु लिहितो, " झाडावर अगर दगडांधोंड्यांवरहि एक वेळ परिणाम करतां येईल ; पण गटेला शुद्धीवर आणणें कठिण आहे. " पण तो आपण होऊन शुद्धीवर आला. तो जन्मभर मदिरा व मदिराक्षी यांच्या बाबतींत प्रयोग करीत होता. जे अनुभव येत त्यांचें तो काव्यांत रूपांतर करी व ते अमर करी. लीपझिग येथील समाजाविषयीं जें कांहीं शिकण्याची जरुरी होती तें सारें शिकून त्यानें लीपझिग सोडलें व तो एकान्तासाठीं खेड्यांत गेला. तेथें तो दूरवर फिरावयास जाई, शेक्स्पिअर व होमर वाची आणि स्वतःचीं काव्यमय स्वप्नें मनांत खेळवी.

गटेचें जीवन–ध्येय एकच होतें. काव्य हा त्याचा आत्मा होता ; त्यासाठींच त्याचें जीवन होतें. त्यानें अगदीं बालपणातच वाङ्मयीन कार्याला सुरुवात केली होती. वयाच्या सतराव्या वर्षी त्याचें पहिलें नाटक प्रसिद्ध झालें. या सतरा वर्षांच्या मुलानें कोणत्या विषयावर नाटक लिहिले असेल ? ' विवाहितांचे व्यभिचार व दुष्ट प्रकार ' यावर ! नाटकाचें नांव ' पाप–बंधु.' या नाटकांतील चर्चा, प्रश्नोत्तरें, वादविवाद, वगैरे सतरा वर्षांच्या तरुणानें लिहिणें आश्चर्यकारक वाटतें. तारुण्यांत लिहिलेल्या कोणत्याहि पुस्तकांत शिकवण असते, तशी यांतहि आहे. जन्मभर पापें केलेल्या व तदर्थ फळें भोगणाऱ्या वृद्ध, दुःखीकष्टी, उदासीन लोकांचें शहाणपण हें या नाटकाचें थोडक्यांत सार अगर तात्पर्य आहे. लीपझिगचा हा तरुण तत्त्वज्ञानी मोठ्या दुढ्ढाचार्याचा आव आणून म्हणतो, " बहुधा आपण सारेच अपराधी आहों. आपण सारेच चुकतों, पापें करतों. म्हणून सर्वोत्कृष्ट गोष्ट म्हणजे सर्वांनीं एकमेकांस क्षमा करणें व सर्वांनीं एकमेकांचें विसरणें. "

— ३ —

लीपझिग येथें गटे अगदीं स्वच्छंदपणें वागत होता. तेथें रात्रंदिवस चाल-लेल्या विषयोपभोगांमुळें गटे जवळजवळ मरणार असें वाटलें. १७६८ सालच्या उन्हाळ्यांत तो रक्तस्रावानें बराच आजारी पडला. तो बरा होणार कीं नाहीं याची शंका वाटत होती; पण तो बरा झाला व अंथरूण सोडून हिंडूंफिरूं लागला. आपल्या बाबतींत निराश झालेल्या पित्याला व आपणावर खूप प्रेम करणाऱ्या मातेला भेटावयासाठीं तो घरीं गेला. पुत्र वकील व्हावा अशी पित्याची इच्छा होती; पण तो झाला कवि !

पित्यानें पुत्राला योग्य मार्गावर आणण्याची पुनः एकदां खटपट केली. त्याला स्ट्रासबर्ग येथें पाठवितांना बाप म्हणाला, " आतां पुनः वेळ गमावूं नको. पुरे झाल्या माकडचेष्टा ! मूर्खपणा सोड. डॉक्टर ही कायद्याची पदवी घे." पण येथेंहि लीपझिग येथल्याप्रमाणेंच त्याचें जीवन सुरू झालें. अभ्यास— पुस्तकी अभ्यास—दूर ठेवून तो जीवनाचा अभ्यास करूं लागला. कलेंत लुडबूड करण्यास त्यानें सुरुवात केली. तो स्टेलो खेळावयास व सतार वाजवावयास शिकला. तो वैद्यकहि शिकूं लागला. त्याचा काळ कधीं तत्त्वज्ञानांत कधीं सुखविलासांत तर कधीं खान—पान—गानांत जाई. तो स्ट्रासबर्ग येथील बुद्धिमंतांचा नेता झाला. त्याची प्रकृति आतां चांगली बरी झाली. तेथील रस्त्यांतून तो एकाद्या ग्रीक देवाप्रमाणें हिंडे. एकदां तो एका उपाहारगृहांत गेला. तो आत जातांच त्या भव्य, दिव्य व तेजस्वी पुरुषास पाहून सारे चकित झाले ! चिमटे व काटे बाजूस ठेवून ते त्याच्याकडे बघत राहिले ! तो एके ठिकाणीं म्हणतो, " मी यौवनानें जणूं मत्त होऊन गेलों होतों ! " त्याच्या नसांनसांतून तारुण्य भरले होतें. ज्याचा ज्यांचा त्याच्याशीं परिचय होई ते ते त्याची स्फूर्ति घेऊन जात. त्यांनाहि जणूं नवचैतन्याचा लाभ होई.

तो उत्कृष्ट तलवारबहाद्दर होता. तो घोड्यावरहि छान बसे. जर्मनीनें कधींहि ऐकलीं नव्हतीं अशीं अत्यंत सुंदर गीतें तो जर्मन भाषेंत रचूं लागला व गाऊंहि लागला. स्ट्रासबर्गमधील सर्व बुद्धिमंतांचीं डोकीं त्यानें फिरवून टाकलीं ! त्याचें स्वतःचें डोकें तर नेहमींच फिरत असे. तें स्वस्थ नसे. भावना

व विकार यांची त्यांत गर्दी असे. तो चट्कन् प्रेम करी व तितक्याच चट्कन् तें विसरेहि. त्याला कोणी मोह पाडो अथवा तो कोणाला मोहित करो, त्यात मिळणाऱ्या अनुभवाचें तो सोनें करी, त्यावर अमर काव्य रची व तो अनुभव गीतांत ओतून पुनः नव्या साहसाकडे वळे. त्याला जीवनाचा प्रत्येक दृष्टीनें अभ्यास करण्याची उत्कंठा असल्यामुळें तो सर्व प्रकारच्या लोकांशीं मिसळे. खानावळवाले, त्यांच्या मुली, धर्मोपदेशक, आस्तिक, नास्तिक, गूढवादी, पंडित, विद्वान् लोक, उडाणटप्पू, नाटकमंडळयातील लोक, ज्यू, नाच शिकविणारे वगैरे सर्व प्रकारचे लोक त्यानें पाहिले. स्पायनोझाप्रमाणें त्याला प्रत्येकांत कांहीं ना कांहीं दिव्य व रमणीय दिसेच. रंगभूमीची तर त्याला विशेषच आवड होती. तो शेक्स्पिअरचा मोठा भक्त होता. जर्मन रंगभूमि निःसत्त्व होती, नाटकांत जणूं जीवच नव्हता ! एलिझाबेथकालीन इंग्रजी नाटकांतील जोर, उत्साह, तीव्रता व उत्कटता गटेनें जर्मन नाटकांत आणण्याचा यत्न केला. तारुण्यांतील अपरंपार उत्साह त्याच्या जीवनांत उसळत होता ! त्यानें त्या उत्साहाच्या योगानें केवळ जर्मन कलाच नव्हेत तर सारें राष्ट्रीय जीवनच संस्फूर्त करण्याचें ठरविलें. जर्मनीचा सारा इतिहास त्यानें नाट्यप्रसंग शोधून काढण्यासाठीं धुंडाळला ! आपल्या स्वच्छंद प्रतिभेला भरपूर वाव मिळावा म्हणून त्यानें एवढा खटाटोप केला. जर्मन वीरपुरुष गॉट्झ व्हॉन बर्लिचिन् जेन याच्यामध्यें त्याला नाट्यविषय आढळला. गॉट्झ हा जणूं जर्मन रॉबिनहुडच होता ! गरिबांना मदत करण्यासाठीं तो श्रीमंतांना लुटी. तो धर्मोपदेशक व सरदार यांच्याविरुद्ध होता. त्यानें अनेक पराक्रम केले, अनेक साहसें केलीं. शेतकऱ्यांच्या बाजूनें तो लढे, झगडे, धडपडे. गटेची प्रतिभा जागी झाली, परिणामतः एक अति भव्य व प्रक्षोभकारी नाटक निर्माण झालें. कांहीं दिवस तें तरुणांचें जणूं बायबलच होतें ! बेछूटपणाच्या जीवनाचा व स्वच्छंदीपणाच्या नवधर्माचा गटे जणूं प्रेषितच बनला !

आणि या सर्व गोष्टी संभाळून त्यानें वडिलांच्या समाधानार्थ एकदांची कायद्यांतील डॉक्टर पदवी घेतली. वडिलांनीं त्याला पुढील अभ्यासासाठीं वेट्झलर येथील सुप्रीम कोर्टाकडे पाठविलें. पण तेथें गेल्यावर गटेला काय दिसलें ? तेथील शाही न्यायाधीशासमोर चालावयाचे वीस हजार खटले

शिल्लक पडले होते. त्यांना तीनशें तेहतीस वर्षें लागतील असा गटेचा अंदाज होता. त्यांचा निकाल लागेल तेव्हां लागो, स्वतःच्या केसचा निकाल त्यानें तावडतोब लावला. त्याला कायद्याविषयीं अतःपर मुळींच आदर राहिला नाहीं. त्यानें ‘ वाङ्मय हेंच आपलें जीवनकार्य ’ असें निश्चित केलें.

वेट्झलर येथें जरी तो थोडेच दिवस होता, तरी तो तेवढ्या अल्प मुदतींतहि फारच वादळी व उत्कट प्रेमांत सांपडला. पण त्याची प्रेमदेवता लॉट्चेन हिचें आधींच एकाशीं लग्न ठरलेलें होतें. त्यामुळें प्रश्न जरा गुंतागुंतीचा होऊन आत्महत्या करावी असें त्याच्या मनांत येऊं लागलें. पुष्कळ दिवस तो उशाशीं खंजीर घेऊनच झोंपे. तो रोज रात्रीं खंजीर छातींत खुपसण्याचें धैर्य यावें म्हणून खटपट करी; अखेर या दुर्दैवी प्रेमप्रकारावर एक कादंबरी लिहून, स्वतःला ठार मारून घेण्याऐवजीं—आत्महत्या करण्याऐवजीं—कादंबरींतील नायकालाच आत्महत्या करावयास लावण्याचें त्यानें ठरविलें. ‘ तरुण वर्थरचीं दुःखें ’ ही ती भावनोत्कट कादंबरी. हींत अद्भुत मूर्खपणा आहे, उदात्त सौंदर्यहि आहे. जीवनांत कोठेंच नीट न बसणाऱ्या दुर्दैवी माणसाची ही आत्मकथा आहे. वर्थर हा आजूबाजूच्या जगांत मुळींच गोडी न वाटणारा, हळुवार हृदयाचा व भावनोत्कट वृत्तीचा कलावंत आहे. वनांत, निसर्गांत व शेतांत त्याला आनंद होतो. तेथील एकांतांत त्याला जणूं सोबती मिळतो ! एकान्त हाच त्याचा मित्र. ही कादंबरी म्हणजे जीवनांतील दुःखाचें शोकगीत आहे. मरणांतील सुखाचें व आनंदाचें हे उपनिषद् अगर स्तोत्र आहे. जर्मन बहुजनसमाजावर या पुस्तकाचा अपार परिणाम झाला. वर्थरचा निळा कोट व त्याचें पिवळें जाकीट यांचें अनुकरण सारे जर्मन तरुण करूं लागले आणि लॉट्चेनचा पांढरा पोषाख व पिंक बो यांचें अनुकरण मुली करूं लागल्या. हें पुस्तक जर्मनींत वर्तमानपत्राप्रमाणें रस्त्यारस्त्याच्या कोंपऱ्यावर विकलें जात होतें. तिकडे चीनमध्यें चिनी मातीच्या भांड्यांवर वर्थर व लॉट्चेन हें प्रेमी जोडपें चितारलें गेलें. कांहीं कांहीं अत्युत्सुक व भावनोत्कट तरुणांनीं तर आत्महत्या-क्लबच स्थापन केले ! जीवन समाप्त करण्यासाठीं वर्थर-सोसायट्या सुरू करण्यात आल्या. युरोपभर आत्महत्येची साथच पसरली ! गटेच्या अलौकिक प्रतिभेचें हें केवढें पूजन ! हा त्याचा केवढा सत्कार !

पण गटेला मात्र आपलें स्वतःचें जीवन समाप्त करण्याची इच्छा आता राहिली नाहीं. आपलें प्रेम, हे पुस्तक व आपली स्तुति करणारे या साऱ्यांना मागें सोडून तो पुढें चालला—नवीन क्षेत्रांत व नवीन साहसकर्मांत तो शिरला.

— ४ —

तो जरी रूढींचा द्वेष्टा होता तरी त्याला अधिकाऱ्यांविषयीं आदर वाटे. त्याच्या जीवनांत ही वृत्ति खोल मुळें धरून बसलेली होती. तो आपल्या एका मित्रास लिहितो, "ज्यांच्या हातीं सत्ता आहे, ज्यांचें वर्चस्व आहे, ज्यांचें प्रभुत्व आहे, अशाशीं परिचय करून घेण्याबद्दल मी तुला दोष देणार नाहीं. या जगांत राहणाऱ्याला असें करावेंच लागतें. त्यांचा उपयोग कसा करून घ्यावा हें नीट माहीत असणाऱ्यानें मोठ्या लोकांशीं, बड्या अधिकाऱ्यांशीं खुशाल संबंध ठेवावे." जेव्हां राजा कार्ल ऑगस्ट यानें गटेला वायमार येथें आपल्या दरबारीं बोलावलें, तेव्हां तो तें राजशाही आमंत्रण आनंदानें स्वीकारून लगेच तिकडे गेला.

१७७५ सालीं तो वायमार येथें गेला तेव्हां तो फक्त सव्वीस वर्षांचा होता. त्यानें आपलें उर्वरित आयुष्य तेथेंच घालविलें. राजवाड्याजवळच्या उपवनांतील एका भवनांत तो राहूं लागला. काव्य व राजकारण या दोहोंत त्याचा वेळ जाई. तो 'अपॉलो'—काव्यदेवतेचाच नव्हे, तर कार्ल ऑगस्ट याचाहि एकनिष्ठ भक्त व सेवक बनला. राज्य कसें करावें हें जर्मन राजाला शिकविणारा तो कन्फ्यूशियस होता. पण असें केल्यामुळें त्याला आपलें स्वातंत्र्य गमावावें लागलें. स्वतःची बंडखोर वृत्ति त्यानें आपल्या पुस्तकांपुरती ठेवली; पण खासगी जीवनात तो अत्यंत आज्ञाधारक असा दरबारी बनला. राजाविरुद्ध तो ब्रहि काढीत नसे. एकदां तो बीथोव्हेनबरोबर फिरत असतां राजाचा लवाजमा त्याच्या बाजूनें जवळून गेला. बीथोव्हेन स्वतःची कला पूजिण्यापलीकडे कशाचीच पर्वा करीत नसे. तो आपली छाती तशीच रुंद ठेवून त्या लवाजम्यामधून बेदरकारपणें निघून गेला! पण गटे कलेपेक्षां राजाचा अधिक पूजक असल्यामुळें त्यानें बाजूला होऊन व आपली टोपी काढून अत्यंत गंभीरपणें व नम्रपणें त्याला लवून प्रणाम केला. तो जर्मनीचा

खरा सत्पुत्र होता. जगांतील कवींचा सम्राट् ही पदवी त्याला प्रिय नव्हती असें नव्हे. त्याला या पदवीचा अभिमान तर होताच, पण कविकुलगुरुत्वाहूनहि जर्मनींतल्या एका तुटपुंज्या राजाचा खासगी चिटणीस म्हणून राहणें त्याला अधिक अभिमानास्पद वाटे.

कार्ल ऑगस्ट राज्य करी त्या प्रदेशाचें नांव सॅक्सेवायमार. त्याचें फक्त सहाशें शिपायांचें सैन्य होतें. पण त्या काळांत सैनिक प्रत्यक्ष कार्यापेक्षां शोभेसाठींच अधिक पाळले जात. कितीहि लहान राजा असला तरी आपण प्रजेला भव्य, दिव्य दिसावें म्हणून तो सैन्य वगैरे लवाजमा ठेवी. प्रजेच्या राजाविषयीं कांहीं कल्पना असतात त्या तृप्त करण्यासाठीं सैन्य ठेवावें लागतें. दुसरा एक राजा होता, त्याच्या सैन्यात तर सात ऑफिसर व दोन प्रायव्हेट होते! अठराव्या शतकांतील जर्मनीचा हा असा पोकळ डामडौल तसाच भपका होता. गटे अपूर्व प्रातिभेचा पुरुष असला तरी जर्मन राष्ट्राचा उपरिनिर्दिष्ट दुबळेपणा त्याच्याहि अंगीं होताच. वायमारच्या दरबारात फार काम नसे; त्याचे खांदे वांकण्याची पाळी कधींच येत नसे. दरबारचें वातावरण आनंदी असे. शिकार व बर्फावरून घसरत जाणें या गोष्टी त्यानें लोकप्रिय केल्या. प्रेमप्रकाराला अत्यंत फॅशनेबल करमणुकीचें स्वरूप देणारा गटे एका पत्रांत लिहितो, "आम्ही येथें जवळजवळ वेडे झालों आहों व सैतानी लीला करीत आहों." कार्ल ऑगस्टच्या सेवेंत त्यानें स्वातंत्र्य गमावलें; पण मोठ्या लोकास क्वचितच लाभणारें विश्रांतीचें, प्रेमाचें, विश्वासाचें व फुरसतीचें जीवन त्याला लाभलें. त्याचें घर होतें, त्याची बाग होती. त्याला कशाचीहि कमतरता नव्हती. तो कलोपासक होता, पण सुखासीनहि होता. तो कांहीं 'सत्यासाठीं मरणाला मिठी मारणारा महात्मा अगर संत' नव्हता, तो सौंदर्यासाठीं जगण्याची चिंता करणारा कवि होता.

— ५ —

गटेनें वायमार हें पन्नास वर्षेंपर्यंत जागतिक साहित्याचें केंद्र बनविलें. त्यानें तेथें बुद्धिमान् स्त्रीपुरुष जमवून त्यांच्या नेतृत्वाखालीं तत्त्वज्ञानाच्या चर्चा व वाङ्मयसेवा करण्याचा उपक्रम केला. तेथें ते प्रेमाशीं खेळत. तेथें बांधलेल्या एका छोट्या नाट्यगृहाचा गटे व्यवस्थापक होता. येथेंच त्यानें

त्या शतकांतलीं काहीं सर्वोत्कृष्ट नाटकें लिहिलीं. तारुण्य होतें तोंपर्यंत त्याचें लिखाण वासनोत्कट व क्षोभकारक होतें. कधीं कधीं तें छचोर व छिनालहि वाटे. 'स्टेला' नामक नाटकांत नायक आपली पत्नी व आपलें प्रेमपात्र दोघांशींहि नीट राहतो व तिघेंहि सुखी आहेत असें दाखवून त्यानें बहुपत्नीकत्वाची तरफदारी केल्याबद्दल बहुजनसमाजानें खूप कावकाव केली; तेव्हा घाबरून गटेनें नाटकाचा शेवटचा भाग बदलून पुनः लिहिला. पत्नी व प्रेयसी दोघींशींहि नीट कसें राहावें हें कळेनासे झाल्यामुळें नायक डोक्यांत पिस्तूल मारून घेऊन--आत्महत्या करून हा प्रश्न सोडवितो अशी कलाटणी गटेनें संविधानकाला दिली.

पण हळूहळू गटेच्या वाङ्मयांतील यौवनसहज उन्माद, मादकता, निश्चिंत बेदरकारपणा व सुखविलास-लोलुपता कमी कमी होत जातात. त्याचा तारुण्यांतील जोम ओसरतो. तो अतःपर जगाला नष्ट करूं पाहणारा बंडखोर राहत नाहीं तर जगाचें स्वरूप समजून घेणारा तत्त्वज्ञानी बनतो. अतःपर त्याचें ध्येय एकच. मरेपर्यंत एकच ध्यास : अधिक प्रकाश, अधिक सौंदर्य. तो कुरूपतेंतहि सुंदरता व नम्रतेंतहि प्रतिष्ठा पाही. वॉल्ट व्हिटमनप्रमाणें मानव कितीहि खालच्या वर्गांतील असोत, त्याला त्यांच्याविषयीं उत्कट प्रेम वाटे. तो राजासमोर तर लवेच, पण अत्यंत दीनदरिद्री माणसें भेटलीं तर त्यांनाहि प्रणाम करी. खाटीक, भटारखानेवाले, मेणबत्त्या करणारे, वगैरे लोकांशीं मरेपर्यंत त्याची दोस्ती असे. तो म्हणतो, " या लोकांबद्दल मला किती प्रेम वाटतें! माझें प्रेम या खालच्या वर्गांतील लोकांसाठीं परत आलें आहे." खाणींतील लोकांना भेटून आल्यावर तो म्हणाला, " ज्यांना आपण खालच्या वर्गांचे समजतों, तेच देवाच्या दृष्टीनें परमोच्च वर्गांचे आहेत."

पददलितांसाठीं त्याला वाटणारी सहानुभूति केवळ शाब्दिक अगर आलंकारिक नव्हती. त्याला दरसाल एक हजार डॉलर पगार मिळे. या पगारांतून तो दोन अनोळखी लोकांसहि पोशी. ते मदत मागत व तो नेहमीं देई. त्याला स्वतःला कधींहि हालअपेष्टा भोगाव्या लागल्या नाहींत. पण तो दुसऱ्यांच्या दुःखाशीं सहानुभूति दाखवी. स्वतःच्या जीवनापलीकडे पाहण्याचें कवीचें क्रांतदर्शित्व त्याच्या ठायीं होतें. एका लॅटिन कवीनें म्हटलें

आहे, " मानवांचीं दुःखें पाहून देव रडतात." त्याप्रमाणें गटे हे अश्रू मानीत होता. त्याचें दैवी मन गरिबांचें दुःख पाहून रडे. बुद्धि व्यापक असेल त्यालाच गरिबांचीं दुःखें जाणतां येतात.

गटेची मनोबुद्धि अठराव्या शतकांत अत्यंत सर्वगामी व सर्वसंचारी होती. तो कवि, चित्रकार व संगीतज्ञ होता येवढेंच नव्हे तर वरच्या दर्जाचा शास्त्रज्ञहि होता. जगांतल्या बाह्य विविधतेच्या मुळाशीं एकताच आहे हें त्यानें कवीच्या प्रतिभेच्या योगें ओळखलें व विज्ञानवेत्ता या नात्यानें ही एकता सिद्ध करण्याची खटपट केली. वनस्पतिशास्त्र, शारीरशास्त्र व रंगप्राक्रिया यांचा पुरेपूर अभ्यास करून त्यानें 'वनस्पतींचीं स्थित्यन्तरें' हा ग्रंथ लिहिला व दाखविलें कीं, वैभवशील पानें म्हणजेच फुलें, फुलें म्हणजेच पूर्ण विकसित पानें! पानांचें काव्यांत परिणमन म्हणजेच फुलें. फुलें म्हणजे पानांचें काव्य! मानवी कवटीचें बारकाईनें निरीक्षण करून त्यानें मनुष्य व खालचे प्राणी यांतील दुवा जोडणाऱ्या एका हाडाचा शोध लावला.

मानवजातीशीं संबद्ध अशा प्रत्येक विषयाची टेरेन्सप्रमाणें त्यालाहि आवड होती. त्याला फक्त युद्धाची आवड मात्र नव्हती. गटे हा शांतात्मा, शांततेचा उपासक होता. कार्ल ऑगस्ट फ्रेंचांशीं झगडत होता तेव्हां त्यानें गटेला सैन्यांत बोलावून लष्करी हालचाली पाहण्यास सांगितलें. सैन्याची छावणी होती तेथें गटे गेला, पण तेथील लढायांत त्याला रस नव्हता. त्यानें छावणीच्या आसपासच्या फुलांचा व दगडांचा अभ्यास केला. त्याला आपल्या राष्ट्राविषयीं अत्यंत प्रीति होती, नितांत भक्ति होती. पण तो संकुचित दृष्टीनें देशभक्त नव्हता. तो देशभक्तीनें भरलेलीं युद्धगीतें रचीना म्हणून त्याला कोणीं बुळा, नेभळा म्हटलें, तेव्हां त्यानें उत्तर दिलें, " मला ज्याचा अनुभव आला नाहीं असें कांहींहि मीं कधींच उच्चारिलें नाहीं. ...स्वतः प्रेम केल्यावरच मीं प्रेमगीतें लिहिलीं. कोणाचाहि द्वेष न करतां मी द्वेषगीतें कशीं लिहूं?"

आयुष्याच्या मध्यमार्गी त्याला तीन सुंदर व रमणीय वस्तू मिळाल्या-- प्रेमळ पत्नी, गोजिरवाणा पुत्र व निष्ठावंत मित्र. तीन दैवी देणग्या! वयाच्या एकोणचाळिसाव्या वर्षीं म्ह० १७८८ सालीं ख्रिस्टियेन व्हल्पियसशीं त्याची गांठ पडली. प्रथम ती त्याची रखेली होती. पण पुढें दोघांनीं कायदेशीररीत्या

लग्न केलें. १७८९ सालीं त्याला मुलगा झाला. १७९४ सालीं प्रख्यात नाटककार शिलर याच्याशीं त्याचा दाट परिचय झाला. त्या वेळीं गटे पंचेचाळीस वर्षांचा होता व शिलर पस्तीस वर्षांचा होता.

गटे व शिलर यांच्या कोणत्याहि उत्कृष्ट काव्यापेक्षां त्यांची मैत्री ही अधिक सुंदर कविता होती. त्यांची मैत्री म्हणजे एक देवसदृश मानव व एक मरणोन्मुख माणूस यांची मैत्री होती. शिलर आजारी होता; त्याचें एक फुफ्फुस गेलें होतें. गटे ग्रीक वृत्तीचा होता; त्याला निसर्गाविषयीं परमादर होता. शिलर ख्रिश्चन होता; त्याला न्यायाची तहान होती. दोघांनींहि बंडखोरीपासून प्रारंभ केला; पण दोघेहि शेवटीं शांत वृत्तीचे झाले. गटेची बंडखोरी त्याच्या सुखासीनतेनें मारली, शिलरची बंडखोर वृत्ति त्याच्या दारिद्र्यामुळें गारठली. पण दोघांचाहि कलेच्या बंडखोरीवर अद्यापहि विश्वास होता. सामान्य माणसांचे श्रेष्ठ मानव बनविण्याचें साधन म्हणजे काव्य असें त्यांना वाटे. काव्य हें मानवांना अतिमानव करणारें पवित्र माध्यम आहे या विश्वासानें दोघेहि सहकार्यानें काम करूं लागले. सौंदर्योपासना हा त्यांचा धर्म होता. सौंदर्योपासनेच्या साधनानें ते जगाचा व आपलाहि उद्धार करूं पाहत होते. दोघेहि परस्परांच्या प्रतिभेचे पूरक होते. दोघांचें हें सुंदर व मंगल मैत्रीचें प्रेम अकरा वर्षें टिकलें व शिलर मरण पावला. गटेनें दार लावून घेतलें व तो आपल्या खोलींत एकाद्या लहान मुलाप्रमाणें ओक्साबोक्शीं रडला. एका मित्राला तो लिहितो, " माझें अर्धें अस्तित्वच जणूं संपलें! माझा अर्धा प्राणच जणूं गेला! या काळांतील माझी रोजनिशी कोरी आहे. माझें जीवन जणूं शून्य, रिक्त झालें होतें, असें तीं कोरीं पृष्ठें दाखवीत आहेत!"

गटे म्हातारा होईतों जगला; पण दीर्घ जीवनासाठीं त्याला एकाकीपणा भोगावा लागला. ज्यांच्या ज्यांच्यावर त्याचें प्रेम होतें तीं सारी मंडळी एकामागोमाग एक गेलीं. त्याचे प्रियतम मित्र, त्याची पत्नी, त्याची बहीण व अखेर त्याचा एकुलता एक मुलगा, सारीं सोडून गेलीं, तरी तो शूरासारखा सतत पुढें पुढेंच जात होता. आपले आनंद व आपल्या वेदना यांना तो अमर गीतांचें स्वरूप देत होता. त्यानें एकूण साठ पुस्तकें लिहिलीं. भावगीतें, शोकगीतें, उपहासगीतें, महाकाव्यें, निबंध, कादंबऱ्या, नाटकें,

भुतांखेतांच्या व पऱ्यांच्या अद्‌भुत गोष्टी, देव, दानव व मानव यांच्या सात्त्विक कथा, दंतकथांवर उभारलेल्या तात्त्विक कथा, सारे प्रकार त्यानें अमर कलावंताच्या हातानें हाताळले व शेवटीं आपली सारी प्रतिभा केंद्रीभूत करून त्यानें आपलें अमर महाकाव्य लिहिलें व जगाला दिलें, तेंच फॉस्ट होय. याचा पूर्वार्ध तो तीस वर्षे लिहीत होता. उत्तरार्धाला आणखी पंचवीस वर्षे लागलीं.

फॉस्ट या महाकाव्याचा अर्थ काय हें आतां पाहूं या.

— ६ —

फॉस्ट लिहितांना मानवजात समजून घेणें हा गटेचा उद्देश होता. मानवजातीच्या शक्तींचें मोजमाप करून मानवांचीं कर्तव्यें काय हें त्याला सांगावयाचें होतें. नाटकाची प्राणभूत कल्पना आरंभींच्या काव्यमय प्रस्तावांत आहे. मानवी आत्म्याविषयीं देव व सैतान यांच्यांत पैज लागते. सैतानाला मर्त्य मानवांविषयीं मुळींच आदर नसतो. सैतान म्हणजे शाश्वत संशयात्मा, 'कांहीं नाहीं, सारें निःसार आहे,' असें म्हणणारा. 'असण्यापेक्षां नसणें व जीवनापेक्षां मरण अधिक श्रेयस्कर' अशी सैतानाची श्रद्धा होती. नियतीचा जो अनंत खेळ चाललेला आहे, त्यांत सैतानाला सार वाटत नसे. ती माणसांना मातींत मिळविण्यासाठीं त्यांना निर्मिते. ज्या शाश्वत शून्यांतून हा दिक्कालात चाललणारा निरुपयोगी खेळ सुरू झाला, ज्यांतून हें विश्व यात्रेला निघालें, त्या पोकळ शून्यांत असणेंच बरें असें सैतानाला वाटे. सैतानाचें ध्येय एकच: सर्जनाला विरोध, सृष्टीचा खेळ अगर विकास चालू न देणें, मानवांचा व देवाचा सद्भाव नाकारणें. सैतान म्हणतो, "म्हातारा डॉ० फॉस्ट—महापंडित व मानवांतला अत्यंत सरळ व न्यायी पुरुष—सुद्धां, जर मी त्याला मोहांत पाडीन तर, अधःपाताच्या अन्तिम टोंकाला पोंचेल."

पण ईश्वर अधिक जाणतो व म्हणतो, "मनुष्य अपूर्ण आहे व अंधारांतून धडपडत जात असतो, जीवनांत सतत पापें करीत असतो, हें खरें; पण आपल्या पापांतूनच तो अन्तःप्रेरणेनें जणूं प्रकाशाकडे जात असतो. देवाचा व सैतानाचा करार होतो व सैतानानें फॉस्टला मोह पाडून त्याच्या अमर आत्म्याचा नाश करता येतो का पाहावें असें ठरतें. जर एखाद्या जाणाऱ्या

क्षणाला ' हे क्षणा, तूं थांब. किती सुंदर आहेस तूं ! " असें म्हणावें लागून फॉस्ट पुढें जावयाचें नाकारील तर सैतान विजयी असें ठरावयाचें होतें.

फॉस्टचा पूर्वार्ध सर्वांस माहीतच आहे. सैतान फॉस्टला नवतारुण्य व जगांतील नाना स्वार्थी सुखें देऊन मोह पाडूं पाहतो. सौंदर्य, संपत्ति, विषयसुखें, बेछूटपणा, प्रेमाच्या जबाबदाऱ्या न पत्करतां त्याचीं सुखें तेवढीं भोगणें, सारें सैतान फॉस्टला देत असतो. सैतानानें सांगितल्याप्रमाणें फॉस्ट मार्गरेटला प्रेमपाशांत अडकवितो व स्वतःचीं पापें व दुःखें भोगावयाला तिला सोडून जातो. कथेच्या या पहिल्या भागांत त्याची सर्वत्र चुका करण्याकडे प्रवृत्ति आहे. तो वासनाविकारांकडे एकदम वळतो; पण या सर्व कुमार्गांत असा प्रसंग केव्हांच येत नाहीं कीं, जेव्हां एकाद्या क्षणाला ' तूं किती सुंदर आहेस ! थांब ' असें म्हणण्याचा मोह त्याला पडावा.

मार्गरेटच्या मरणानंतर सैतान त्याला निराळ्याच प्रकारच्या मोहांत पाडूं पाहतो. फॉस्ट मानवजातीचें प्रतीक आहे. आपणाला जीवनांतील प्रत्येक अनुभव यावा असें त्याला वाटतें. मानवांबरोबर राहावें, श्रमावें, त्यांच्याबरोबरच मानवजातीचें गलबत फुटेल तेव्हांचीं संकटें भोगावीं, त्या विपत्तींत त्याचे भागीदार व्हावें असें त्याला उत्कटपणें वाटतें. 'प्रत्येक वेदनेसाठीं हृदय उघडें करून मानवांचे सारे आनंद व त्यांचीं सारीं दुःखें अनुभवण्याची ' त्याला तळमळ लागलेली असते. सैतान फॉस्टला एका राजाच्या दरबारचा सल्लागार करतो. तो तेथें गटेप्रमाणें आपल्या कर्तबगारीनें व योग्य सेवेनें मानसन्मान मिळवितो. राजा कृतज्ञता दाखवितो. पण त्याला सुख मिळत नाहीं व वर्तमानकाळातील जीवनामुळें तो निराश होतो. भूतकाळांतील सारें जीवन—सारें मानवी जीवन-तो डोळ्यासमोर आणूं पाहतो. प्राचीन काळांतील हेलेनला तो जणूं पुनः सजीव करतो व तिजशीं लग्न लावूं पाहतो (जसें गटेनें ग्रीक कवींच्या विचारांशीं लग्न लावलें होतें ). पण हेलेनला आलिंगन देताच ती अदृश्य होते व तिचा फक्त झगा उरतो. प्राचीन ग्रीसचें जीवन समजून घेणें फॉस्टला व गटेलाहि जमत नाहीं. त्यांनीं कितीहि प्रयत्न केले तरी प्राचीनाचा तो सुंदर आत्मा त्यांच्या हातीं सांपडत नाहीं. फक्त बाहेरचें कवचच त्यांच्या हातीं येतें.

फॉस्ट अशा प्रकारें एका अनुभवांतून दुसऱ्या अनुभवांत जातो. पण त्याला कशांतहि सुख वाटत नाहीं. "त्याचें साधें चालणें म्हणजेहि सतरादां

ठेंचाळणें व पडणें होतें." तो जें जें हातीं घेतो त्यांत त्यात त्याला अपयशच येतें. कधीं काळीं विजय मिळालाच तरी तो पोकळ असतो व त्यामुळें त्याची अधिकच निराशा होते. युद्धांतील विजय म्हणजे मरणच होय. दोन्ही बाजूंचा विनाश झालेला असतो. सैतान त्याला मोठमोठीं शहरें व राज्यें, किल्ले सुंदर स्त्रिया, वैभवशाली कृत्ये, शाश्वत यशःश्री, सारें कांहीं देतो. पण फॉस्ट शेवटीं या सर्व गोष्टींना विटतो. त्याच्या जीवनाची कमान आतां पूर्ण होऊन खालीं उतरूं लागते. तारुण्यांतील सुखें, मध्यमावस्थेंतील महत्कृत्यें यातून त्याला सारभूत असें कांहींच मिळत नाहीं. त्याच्या डोळ्यांवरची झांपड उडते, त्याची भ्रांति नष्ट होते, चिंता त्याच्या घराचा कबजा घेते. तारुण्यांतील वासनांच्या निखाऱ्यांची जळून राख झालेली असते. तो अंध होतो व जीवनावधि चाललेला सुखाचा उद्योग आतां पुरे असें त्याला वाटूं लागतें.

पण आश्चर्य हें कीं, ज्या क्षणीं तो सुखाचा नाद सोडतो, त्याच क्षणीं तें त्याला लाभतें. समुद्राजवळची अफाट दलदल दूर करून ती जागा मानवी निवासाला योग्य अशी बनविण्याची एक विशाल कल्पना त्याला सुचते. तो म्हणतो, "येथें मी घरें बाधीन; त्यांत लाखों लोक स्वातंत्र्यांत नांदतील व रोज काम करून अधिकाधिक स्वतंत्र होतील." हा विचार मनात येऊन त्याचें हृदय आनंदानें भरून जातें. तो आयुष्यभर याच आत्मविस्मृतीच्या ध्येयाकडे नकळत जात होता. हाच तो शेवटचा मंगल क्षण, सोन्याचा क्षण! याला तो म्हणूं शकतो, "क्षणा, थांब. किती रे सुंदर तूं!" अखेर त्याच्या जीवनांतील परमोच्च क्षण येतो व त्याचें जीवन समाप्त होतें. सैतानाचा जय झाला असें बाह्यतः तरी दिसतें. विजयाचें बक्षीस म्हणून सैतान फॉस्टचा आत्मा नेऊं इच्छितो. पण गुलाबपुष्पवृष्टींत देवदूत फॉस्टचा आत्मा स्वर्गांत नेतात. कारण, फॉस्टनें खूप चुका केल्या, खूप पापें केलीं, तरी या साऱ्या धडपडींतून व चुकांतून तो नकळत प्रकाशाकडेच जात होता.

स्वर्गांत सर्वांआधीं त्याला कोण बरें अभिवादन करतें? मार्गारेटच. तिनें पाप केलेलें असतें व फॉस्टच्या पापामुळें तिला मरावें लागलेलें असतें. पण सारें विसरलें जातें, साऱ्याची क्षमा करण्यांत येते. ती आता त्याला सन्मार्ग दाखविते. पुरुषाची शाश्वत उद्धारकर्त्री स्त्रीच होय.

— ७ —

आपल्या जीवनाचें परमोच्च कार्य पुरें करून फॉस्टप्रमाणें आतां गटेहि अनंतशयनीं पहुडावयाला तयार असतो. गटेचे चहाते त्याचा ब्यायशीवा वाढदिवस मोठ्या थाटमाटानें साजरा करणार होते; पण या उत्सव-समारंभाच्या गोंधळातून व गडबडींतून निसटण्यासाठीं तो इल्मेनोच्या डोंगरात पळून गेला. तेथें एक पर्णकुटि होती. कार्ल आयस्ट व तो त्या पर्णकुटींत कितीदां तरी बसले होते! कित्येक वर्षांपूर्वी त्यानें पेन्सिलीनें लिहिलेल्या ओळी अद्यापि तेथें होत्या. कोणत्या बरें त्या?

"या सर्व डोंगराशिखरावर निःसीम शांति आहे, झाडांच्या टोंकांवरहि गंभीर शांतता आहे. जराहि वारा, थोडाहि श्वास तेथें आढळणार नाहीं. वनांतील लहान लहान पांखरांनींहि आपले सारे आवाज बंद केले आहेत. आतां अधीर नको होऊं; शांत हो. लवकरच तुलाहि चिर विश्रांति लाभेल."

पर्णकुटींत बसून पूर्वी लिहिलेल्या त्या ओळी त्यानें पुनः वाचल्या. त्याच्या डोळ्यांत पाणी आलें. त्यानें तें पुसून टाकलें व 'होय, तुलाहि लवकरच चिर विश्रांति लाभेल.' हे शेवटचे शब्द पुनः पुनः मनातल्या मनांत उच्चारले. तो घरीं परतला. त्यानें थोडे दिवस आणखी कांहीं मंत्रमुग्ध करणारीं गाणीं निर्मिलीं. अत्यंत सुंदर गीतें. हीन म्हणतो, "त्या गीतांतील शब्द आपणास जणूं मिठी मारतात व त्यांतील विचार व त्यांचा अर्थ आपलें चुंबन घेतात." आणि शेवटचा क्षण आला. १६ मार्च १८३२ रोजीं त्याला अंथरुणांतून उठवेना; सहा दिवसांनीं त्यानें आपले डोळे शांतपणें मिटले. कुटुंबांतील मंडळी निःस्तब्ध शांतपणें सभोंवतीं बसली होती. त्याच्या जीवनाचें गान अनंत निःस्तब्धतेंत—अत्यंत शांतींत विलीन झालें!

त्याच्या तोंडचे ऐकूं आलेले शेवटचे शब्द 'अधिक प्रकाश' हे होते.

प्रकरण २ रें

# संयुक्त युरोपचें स्वप्न खेळविणारा इटॅलियन नेता : मॅझिनी

— १ —

आपणांस या प्रकरणांत एका उदात्त ध्येयाचा जन्म, त्याचा विकास व त्याचा नाश दिसणार आहेत. कोणतें हें ध्येय ? कोणता हा महाविचार ? युरोपांतील राष्ट्रांनीं एका कुटुंबांतील भावांप्रमाणें गुण्यागोविंदानें राहावें, युरोपचें एक संयुक्त राष्ट्र बनवावें, हा तो विचार. ज्याच्या मोठ्या मनांत हें महोच्च ध्येय जन्मलें त्या पुरुषाचें नांव गायसेपे मॅझिनी. मॅझिनीची कारकीर्द समजण्यासाठीं एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांतील युरोपियन राजकारणाची सर्कस आपण थोडक्यात पाहूं या—तिच्याकडे जरा डोकावूं या. १८१५ सालीं नेपोलियनचा पाडाव झाल्यावर व्हिएन्ना येथें युरोपांतील राष्ट्रांचे शांति-प्रतिनिधी जमले होते. १९१४ सालच्या महायुद्धाच्या वेळीं ज्याप्रमाणें शातता-स्थापक मुत्सद्दी जमले व जखमी जगाला पुनः आपल्या पायांवर उभें करण्यास झटले पण अयशस्वी झाले, तसेंच व्हिएन्ना येथें शंभर वर्षांपूर्वी घडलें. व्हिएन्नाच्या काँग्रेसमध्यें प्रामाणिक पण प्रतिगामी मुत्सद्दी मेटरनिक होता, हुषार पण दुष्ट टॅलिरँड होता आणि मानवांवर मनांतून प्रेम करणारा पण प्रत्यक्ष व्यवहारांत अनियंत्रित सत्ता गाजविण्याची चटक लागलेला, अर्धवट भला व अर्धवट बुरा; गूढवादी झार अलेक्झांडरहि होता. अलेक्झांडरची धार्मिक प्रेरणा तेथें प्रभावी होती. मेटरनिक व टॅलिरँड यांना व्यवहारबुद्धि अधिक होती. या तिघांच्या संमिश्र सूचनानुसार तेथें जमलेल्या प्रतिनिधींनीं एक शांततेचा करार केला. त्याला 'पवित्र करार' म्हणतात. या पवित्र करारानुसार युरोपांतील राष्ट्रांनीं बायबलच्या पायावर मानवांचें बंधुत्व उभारावयाचें ठरविलें. त्याचबरोबर प्रबळ राष्ट्रांनीं दुबळ्या राष्ट्रांचें स्वातंत्र्य दडपून टाकण्याचाहि निश्चय केला.

युरोपांतील सत्ताधाऱ्यांना जुलुमाची सनदच मिळाली. ही सनद उद्घोषितांना कांहीं हेतू उदात्त होते, पण पुष्कळसे मुत्सद्देगिरीचे, स्वार्थाचे व मूर्खपणाचे होते. मॅटरनिक, टॅलिरँड व अलेक्झांडर जगाला गुलाम

करावयाला निघाले व त्या कामीं त्यांनीं पवित्र धर्मग्रंथांचा आधार घेतला. युरोपची विभागणी केली गेली. हांवऱ्या साम्राज्यशाही लांडग्यांना युरोपचे तुकडे चारण्यांत आले. डच रिपब्लिकचें रूपांतर पुनः राजशाहींत करण्यांत आलें. पोलंड रशियाला देण्यांत आला. क्रांतिकारक वृत्तीचा सर्वत्र बीमोड करण्यांत आला. स्पेनमध्यें पुनः इन्क्विझिशन व छळमंदिरें स्थापिलीं गेलीं. गुप्त पोलिसाना लोकांच्या घरांत जाऊन त्यांचीं भाषणें ऐकण्याची परवानगी देण्यांत आली. लोकांचीं मोहोरबंद पत्रेंहि ते पाहत. उदार मतांचा पुरस्कार करणारे विद्यार्थी वा प्राध्यापक यांना हद्दपार करण्यात येई किंवा कारागृहात कोंबण्यांत येई. आतां राष्ट्रांराष्ट्रांचें युद्ध नव्हतें हें खरें; पण 'मानवजातीचा इतिहास' या पुस्तकाचा कर्ता हेंड्रिग व्हॅन लून लिहितो, "युरोपांतील ही शांतता केवळ स्मशानशांतता होती."

पवित्र करार आपलें अपवित्र वर्चस्व युरोपवरच नव्हे तर अमेरिकेवरहि गाजवूं लागला. ज्या वेळीं सायमन बोलिव्हरनें वेनेझ्वालाचें स्वातंत्र्य जाहीर केलें, त्या वेळीं दक्षिण अमेरिकेतलें हें रिपब्लिक चिरडून टाकण्यासाठीं पवित्र करारवाले उभे राहिले. पण अमेरिकेचे अध्यक्ष मन्रो यांनीं जाहीर केलें कीं, "युरोपांतील दोस्त आपली साम्राज्यशाही वृत्ति जर या बाजूला आणूं पाहतील तर अमेरिकेच्या शांततेस व सुरक्षिततेस ही गोष्ट धोक्याची आहे असें आमचें मत आहे. अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांच्या बाबतींत हें धोरण मैत्रीचें द्योतक नाहीं असें वाटतें."

पवित्र कराराच्या दोस्तांनीं मन्रोच्या घोषणेचा नीट विचार केला व आपली दडपशाही युरोपांतील असंरक्षित राष्ट्रांपुरती ठेवली. पवित्र करारवाल्यांचा मुख्य हेतु अनियंत्रित सत्तेला जगांत धोका असूं नये हा होता. 'फोडा व झोडा' हें त्यांचें ब्रीदवाक्य होतें. 'युरोपचे उद्धारकर्ते', 'युरोपला वांचविणारे', असें स्वतःलाच संबोधणारीं युरोपचीं डाकू राष्ट्रें सर्व युरोपला 'त्राहि भगवन्!' करीत होतीं. पण सर्वांहून अधिक त्रास कोणाला झाला असेल तर तो इटलीला. इटलीचे शतखंड करण्यांत आले होते. ऑस्ट्रियन राजघराण्यातील अनेकांना हे तुकडे वांटून देण्यांत आले होते.

पण पागलेलें पाणी ज्याप्रमाणें एका प्रवाहांत येऊं पाहतें, त्याप्रमाणें एकाच रक्ताचे इटॅलियन लोक जरी विखुरलेले होते, तरी ते अधिकच उत्साहानें व

उत्कंठेनें एकत्र येऊं पाहत होते. त्यांच्यावर जितका जितका अधिक जुलूम होई, जितकी जितकी त्यांची पांगापांग करण्यांत येई, तितकी तितकी त्यांच्या ऐक्यभावनेची तीव्रता अधिकाधिक प्रखर होई. युरोपच्या व्यवहारी मुत्सद्द्यांना इटलीचें एकीकरण हे एक अशक्य स्वप्न वाटत होतें, पण मॅझिनीला मात्र तसें वाटत नव्हतें. त्याचें रक्त जणूं प्रेषितांचें होतें ! इटलीचें एकीकरण ही अतःपर एक कल्पना न राहतां ती मॅझिनीचा धर्म झाली. त्याच्या मनश्चक्षूसमोर केवळ इटलीचेंच एकीकरण नव्हतें, तर सारें जगच एका कुटुंबाप्रमाणें वागत असावें असें ध्येय खेळत होतें. एकाच ईश्वराची पूजा करणारे, मोकळेपणानें एकत्र राहणारे व प्रेमस्वरूप परमेश्वराची उपासना करणारे एकत्र नांदत आहेत असें तो आपल्या मनःसृष्टींत पाहत होता.

तो १८०५ सालीं जन्मला. वयाच्या बाराव्या वर्षींच तो राजकारणांत रस घेऊं लागला. आईबरोबर जिनेव्हाच्या नव्या राजमार्गानें तो जात होता. एका क्रांतिकारक उठावांत पराभूत झालेल्यांचा एक निराधार जथा त्याला भेटला. ते निराधार क्रान्तिकारक स्पेनमध्यें जाऊं इच्छीत होते. त्यांस मदत हवी होती. मॅझिनी लिहितो, "त्या दिवशीं एक अस्पष्ट व संमिश्र विचार माझ्या मनांत आला. तो माझ्या देशाबाबत होता कीं स्वातंत्र्याबाबत होता हें मला सांगतां येत नाहीं. पण त्या विचारांत येवढा भाग होता कीं, इटॅलियनांनीं स्वतःच्या स्वातंत्र्यासाठीं लढलें पाहिजे; व ते लढूंहि शकतील. माझे आईबाप लोकशाही तत्त्वांचे पुजारी होते. त्यांच्या शिकवणींत मी वाढलेला. नकळतच मी समानतेच्या भक्तगणांत सामील झालों होतों. मी समतेचा उपासक झालों होतों. माझे आईबाप उच्चनीचभेद मानीत नसत. ते रावांस व रंकांस समान लेखीत. व्यक्ति कोणत्या वर्गाची हें ते पाहत नसत. ते व्यक्तींतील मानव्य व प्रामाणिकपणा पाहत."

विद्यापीठांत असतांना तो विद्यार्थ्यांच्या खेळात फारसा सामील होत नसे. तो सदैव तन्मय व गंभीर असे व एकदम पोक्त झाल्याप्रमाणें दिसे. या वेळेस तो सदैव काळा पोषाख करी. आपल्या दुःखी देशासाठीं तो जणूं सुतकी होता! त्यानें आपल्याभोंवतीं समविचाराचे स्नेही जमविले. जप्त झालेलीं पुस्तकें तो चोरून आणी. ज्या गोष्टींची चर्चा करण्यासहि परवानगी नसे त्या गोष्टींची तो चर्चा करी. परंतु अजून स्वातंत्र्याच्या बाबतींतील त्याची भक्ति

तशीच त्याची उत्कटता शाब्दिक होती, चर्चात्मक होती, ॲकॅडेमिक होती. अजून तो गटेसारखा वाङ्मयीन बंडखोरच होता, राजकीय बंडखोर झाला नव्हता. त्यानें एक जहाल व क्रांतिकारक पत्र सुरू केलें. डान्टेवर त्यानें एक नवविचारप्रवर्तक निबंध लिहिला. त्यानें इटलींत वैचारिक क्रांति सुरू केली व बौद्धिक खळबळ माजविली.

पण तो आपल्या मायभूमीची दना पाहून केवळ मनांत हळहळणारा नव्हता. अन्याय व दुःखें यांनीं त्याच्या हृदयांत खोल घर केलें होतें. अन्यायाविरुद्ध केवळ शब्दांची तलवार परजीतच राहणें त्याला शक्य नव्हतें. कोळसे जाळणाराची कार्बोनरी नामक एक गुप्त संघटना होती. पदवीधर झाल्यावर तो तिचा सभासद झाला. त्या संस्थेचे सभासद ऑस्ट्रियाच्या जुलुमाविरुद्ध इटलींत क्रान्ति करण्याची खटपट करीत होते. मॅझिनी फार दिवस या संस्थेचा सभासद राहिला नाहीं. संस्थेचे सभासद मूर्खपणाच्या गोष्टी बोलत. ते खऱ्या कामाविषयीं फारसा विचार करीत नसत. देशाच्या स्वातंत्र्याचा प्रश्न मुख्य; पण तो जणूं मागें पडला होता. त्या संस्थेच्या नाना विधींत व समारंभांत त्याला गोडी वाटत नसे. त्यांनीं आपल्या निरनिराळ्या चळवळींत सामील होण्यास मॅझिनीला बोलावलें नाहीं. १८३० सालीं त्याला संशयावरून पकडण्यांत आलें. जिनेव्हाचा गव्हर्नर लिहितो, "तो बुद्धिमान् तरुण होता. रात्रीं एकटेंच फिरण्याची त्याला फार आवड होती. तो कशाचें चिंतन करी? तो आपल्या विचाराची दुसऱ्या कोणाला फारशी कल्पना देत नसे. सरकारला असे बुद्धिमान् लोक फारसे आवडत नाहींत. ज्या बुद्धिमंतांचे विचार सरकारला समजत नाहींत ते सरकारला नको असतात."

मॅझिनी मानवजातीवर प्रेम करणारा होता. त्या प्रेमासाठीं त्याला भोगाव्या लागलेल्या हालांचा हा आरंभ होता. या वेळेपासून पन्नास वर्षेपर्यंत मॅझिनीला कैद, हद्दपारी व इतर कष्ट सतत भोगावे लागले. त्याला एका किल्ल्यांत ठेवण्यांत आलें. तेथून समोर महासागर दिसे. महासागराचें भव्य दर्शन हा त्याला मोठा आधार होता. तो लिहितो, "मी जेव्हां जेव्हां गजांच्या खिडकीपाशीं जाई, तेव्हां तेव्हा अनंत अंबर व अगाध सिंधु हीं अनन्ततेचीं दोन प्रतीकें सदैव माझ्या डोळ्यांसमोर असत. सृष्टींतील तिसरी भव्य व उदात्त वस्तु म्हणजे आल्प्स पर्वत. त्याचें दर्शन मात्र मला येथून होत

नसे." त्याच्या शांत व निस्तब्ध एकांतवासांतील चिंतनाला येथें त्याला भरपूर वेळ होता. मुक्त अशा संयुक्त युरोपच्या योजनेचा त्यानें येथें खूप विचार केला. त्याच्या लक्षांत आलें कीं, या ध्येयासाठीं कार्बोनरी संस्था निरुपयोगी होती. त्याला या संस्थेंतील गुप्तता व विधिसमारम्भ मुळींच आवडत नसत. मुक्त होताच एक नवीन संस्था काढण्याचें त्यानें ठरविलें. पोकळ बाह्य विधींपेक्षां प्रत्यक्ष क्रियात्मक चळवळींवर जोर देणाऱ्यांची ती संस्था व्हावयाची होती. 'तरुण इटली' असें तिचें नाव ठेवण्यांत यावयाचें होतें. या संस्थेचे त्रिविध उद्देश होते : इटलीचें एकीकरण, इटलींत रिपब्लिकची स्थापना व सर्व युरोपचें—युरोपांतील सर्व स्वतंत्र व समान राष्ट्रांचें—फेडरेशन करणें.

१८३१ सालच्या फेब्रुवारींत तो मुक्त झाला; पण मुक्त होतांच 'देश सोडून जा' असें त्याला बजावण्यांत आलें. तो फ्रान्समध्यें गेला; पण तेथेंहि स्वातंत्र्यवीरांना थारा नव्हता, त्याची जरुरी नव्हती, असें त्याला आढळून आलें. त्याला फ्रान्समधून हांकून देण्यांत आलें. तेथून तो स्विट्झर्लंडमध्यें गेला. त्याची आमरण क्लेशयात्रा सुरू झाली.

स्विट्झर्लंडमधून तो कॉर्सिकाला गेला. तेथें त्यानें पवित्र कराराच्या संघाविरुद्ध बंड करण्याची खटपट केली. तो स्वभावानें सौम्य होता. रक्तपातानें त्याच्या अंगावर कांटा उभा राही. हिंसा त्याला तिरस्करणीय वाटे. 'यंग इटली' या संस्थेच्या जाहीरनाम्यांत तो लिहितो, "मोठमोठ्या क्रांत्या बागनेटांपेक्षां तत्त्वांनींच अधिक यशस्वी होत असतात. ... अंध पाशवी बळानें विजयी वीर, हुतात्मे व ठार मरणारे मिळतील; पण अशा विजयांतून पुढें जुलूमशाहीच उत्पन्न होते." पण गांधी ज्याप्रमाणें केवळ सत्याच्या व अहिंसेच्या शस्त्रांवर विसंबून होते त्याप्रमाणें मॅझिनी नव्हता. अजिंक्य अशा ध्येयरूपी तलवारीवर सर्वस्वीं विसंबून राहण्याइतका आत्मविश्वास अगर धीर मॅझिनीच्या ठायीं नव्हता. त्यानें भौतिक शास्त्रांचा आधार घेतला व मग अधिक प्रभावी भौतिक शस्त्रांनीं त्याचा पराजय केला. इटलीचें एकीकरण करण्यांत त्याला यश आलें; पण इटलींत रिपब्लिक येण्याऐवजीं इटलींत—संयुक्त इटलींत—राजशाही आली.

— २ —

इटलींत राजशाही आली या गोष्टीला मॅझिनीनें मोठ्या दुःखानें मान्यता दिली; पण त्यास ध्येय म्हणून ही गोष्ट पसंत नव्हती. तो लिहितो, "मी मोठ्या दुःखानें राष्ट्राच्या इच्छेपुढें मान नमवीत आहें. पण राजशाहीच्या अनुयायांत वा सेवकांत मात्र माझी गणना करतां येणार नाहीं." आपल्या ध्येयाचा शेवटीं विजय होईल अशी त्याची श्रद्धा होती. तो म्हणतो, "भविष्यकाळच माझी श्रद्धा सत्यावर आधारलेली होती कीं नव्हती हें ठरवील." त्याच्या महत्त्वाकांक्षेचा निम्मा भाग पूर्ण झाला होता. इटलीचें एकीकरण झालें होतें. पण इटलीचें हें शरीर अद्यापि बंधनांतच होतें. मॅझिनीचें इटलीवर प्रेम होतें; पण देशापेक्षां त्याला स्वातंत्र्य अधिक प्रिय होतें. स्वतःच्या देशांतून त्याला हद्दपार करण्यांत आलें होतें. तो जगाचा नागरिक झाला होता. त्याची राष्ट्रीयता म्हणजे आंतरराष्ट्रीयतेचा आरंभ होता. त्याची राष्ट्रीयता त्याला आतरराष्ट्रीयतेकडे नेणारी होती. वुइल्यम लॉइड गॅरिझन लिहितो, "त्याच्या आत्म्याचा पूर्ण विकास झाला होता. त्याचें स्वातंत्र्यप्रेम जाति वा देश यांनीं मर्यादित नव्हतें. रक्ताचे, रंगाचे किंवा भौगोलिक भेद त्याच्या स्वातंत्र्यप्रेमास शिवले नव्हते. मॅझिनीच्या ठायीं अहंकाराचा लवलेशहि नव्हता, ऐहिक आकांक्षेचा अणुरेणूहि नव्हता. कोणत्याहि देशाविषयीं संकुचितपणाची थोडीहि जाणीव त्याच्या ठायीं नव्हती. स्वतःच्या मायभूमीचें प्रेम त्याच्या मनांत एकाद्या ज्वालेप्रमाणें पेटत होतें; पण दुसऱ्या राष्ट्राच्या द्वेषांत पर्यवसान पावणारी देशभक्ति मात्र त्याच्या ठायीं नव्हती. कार्लाइलचें बौद्धिक क्षितिज फार संकुचित असल्याबद्दल मॅझिनीनें टीका केली आहे. जो केवळ आपल्या देशापुरताच जगतो, तो त्याच्या मतें मानवजातीचा द्रोही होय. तो म्हणतो, "जगाच्या ऐक्याचा खरा भाव कार्लाइलला कळलाच नाहीं. सर्व मानवांचें एक कुटुंब करण्यासाठीं आपण प्रयत्न केला पाहिजे." या तत्त्वावर 'तरुण इटली' या पक्षाची संघटना करून पुढें तींतूनच 'तरुण युरोप' ही संघटना त्यानें काढली. राजशाही व आंतरराष्ट्रीय झगडे नष्ट करण्यासाठीं सदैव व सर्वत्र धडपडणें हें एकच ध्येय या दोन्ही संस्थांनीं आपल्यापुढें ठेवलें होतें. त्याचे सभासद युरोपातील सर्व देशात स्वातंत्र्य, समता व बंधुता

स्थापण्याच्या ध्येयाला स्वतःस वाहून घेत. “ समान व मुक्त लोकांतच खरी मैत्री होऊं शकते.” विशिष्ट वतनदारी हक्क, जुलूम व आक्रमणशील स्वार्थ या सर्व गोष्टी भूतकालीनच करून टाकावयाच्या. “ विशिष्ट हक्क म्हणजे समानतेचा भंग, जुलूम म्हणजे स्वातंत्र्याचा भंग व स्वार्थाचें प्रत्येक काम म्हणजे बंधुतेचा भंग होय.” प्रत्येक राष्ट्रानें आपआपल्या विशिष्ट गुणांचा विकास करून मानवी प्रगतीच्या सागरांत आपला विशिष्ट सुंदर प्रवाह घेऊन यावें. यासाठींच राष्ट्रें असावीं. वैचित्र्यांतहि आनंद असतो ; मात्र तें वैचित्र्य अविरोधी असावें. तो लिहितो, “ त्या त्या लोकांचें विशिष्ट कार्य आहे. मानवजातीच्या सर्वसामान्य ध्येयाच्या पूर्ततेसाठीं तें तें राष्ट्र सहकार्य करील. त्या त्या राष्ट्राचें विशिष्ट ध्येय म्हणजेच त्या त्या राष्ट्राची राष्ट्रीयता. राष्ट्रीयता पवित्र आहे.” पण राष्ट्रीयतेचें ध्येय मोठ्या संयुक्त मानवतेच्या ध्येयाला पूरक मात्र असलें पाहिजे. मोठ्या ध्येयाच्या पूर्ततेसाठीं छोटें ध्येय. शांततामय जगाच्या प्रेमसंगीतांत स्वतंत्र असणाऱ्या त्या त्या राष्ट्राची विशिष्ट तान सुसंवादीपणानें मिसळेल व मधुर असें महासंगीत निर्माण होईल. “ ज्या वेळेस सर्व लोक व सर्व राष्ट्रें—ज्याची ही मानवजात बनली आहे—स्वतंत्र होतील, त्यांच्या देशांत जनतेची खरी सत्ता स्थापन होईल, तेव्हाच अशा या स्वतंत्र व मुक्त राष्ट्रांचें एक मोठें रिपब्लिकन कॉन्फेडरेशन करणें शक्य होईल. सर्वांना समान अशा तत्त्वांच्या घोषणेप्रमाणें हें जागतिक फेडरेशन चालेल. सर्वसंमत असा एक करार असेल, तदनुसार सर्व जण वागतील. सारे एका ध्येयाची पूजा करतील. कोणतें ते ध्येय ?—विश्वव्यापक अशा नैतिक कायद्याचें संशोधन व तदनुसार सतत वर्तन.”

‘ सर्व मानवजातीचें संयुक्त रिपब्लिक ’ हें मॅझिनीचें ध्येय होतें. हें स्वप्न प्रत्यक्षांत यावें म्हणून तो फ्रान्समध्यें गेला. त्या काळीं फ्रान्स हें सर्वांत जास्त स्वतंत्र राष्ट्र होतें. पण जगातील इतर राष्ट्राना स्वातंत्र्याचा, समतेचा व बंधुतेचा हात द्यावयास फ्रेंच लोक अद्यापि तयार नव्हते. जागतिक सहानुभूतीचा मॅझिनीसारखा विश्वात्मक पुरुष अद्यापि धोक्याचा समजला जाई. त्याला पुनः एकदा फ्रान्स सोडून जाण्याबद्दल बजावण्यांत आलें. पण त्यानें आज्ञा मोडली ; जाण्याऐवजीं तो मार्सेलसमध्यें एका अज्ञात कोंपऱ्यांत लपून राहिला. वीस वर्षें एका लहानशा खोलींत त्यानें स्वेच्छेचा बंदिवास काढला. पवित्र राष्ट्रांचे

दूत व गुप्त पोलिस त्याचा जगभर शोध करीत होते, तरी तो या लहानशा खोलींत निर्वेधपणें राहून व मित्रांची आणि समविचाराच्या सहकारी बंधूंची भेट घेऊन दुसऱ्या शहरांतील सहकाऱ्यांना सूचना पाठवी व सल्ला देई. येथेंच तो अधिक चांगल्या जगाची आपली योजना पूर्ण करीत होता.

१८४८–४९ हें वर्ष युरोपभर क्रान्तीचें साल मानलें जातें. आपलें स्वप्न सत्यसृष्टींत येणार असें मॅझिनीला क्षणभर वाटलें. क्रान्तीची प्रचंड लाट युरोपभर उठली. राजे इटलींतून हद्दपार केले गेले. रोममध्यें रिपब्लिक स्थापलें गेलें. मॅझिनीस हद्दपारींतून परत बोलावण्यांत आलें. नव्या रिपब्लिकचे तीन गव्हर्नर निवडण्यांत आले, त्यांत तोहि एक होता. इटली देश आता खऱ्या अर्थानें स्वतंत्र झाला. साऱ्या जगाला आतां इटली स्वातंत्र्याचा खरा मार्ग दाखवील असें त्याला वाटलें.

पण हें इटॅलियन रिपब्लिक अल्पजीवी ठरलें. पवित्र कराराच्या फौजा इटलीवर चालून आल्या. राजेरजवाड्यांचा जुलूम पुनः सुरू झाला. राजशाही पुनः घोड्यावर स्वार झाली. मॅझिनी पुनः दुःखदायी व उदास एकान्तवासांत गेला. विचारांच्या हुतात्म्याभोंवतीं शेवटीं उदास एकान्तता असतेच.

मॅझिनीनें आपल्या हद्दपारीचीं बरींच वर्षे इंग्लंडमध्यें काढलीं. इंग्लंडचें सरकारहि मॅझिनीचा पत्रव्यवहार तपासी. पण येथें त्याला बरेच मित्र मिळाले. बहुजनसमाजांत त्याच्या विचारांना पाठिंबा देणारे बरेच अनुयायी त्याला लाभले. तो युरोप व इंग्लंड याच्यामध्यें सारख्या येरझारा करीत होता. युरोपांतील राजांनीं रिपब्लिकला ठार केलें होतें. पण मॅझिनी त्यांना जणूं रिपब्लिकचें भूतच वाटे. त्यांना मॅझिनीची भीति वाटे. तो आपल्या काळांतील अत्यंत विख्यात पुरुष होता. त्याची कीर्ति सर्वत्र होती व त्याची भीति सुद्धां सर्वांना वाटे. पण कीर्तीविषयीं तो अगदीं बेफिकीर होता. तो नेहमीं आपल्या ध्येयाविषयीं बोले, स्वतःविषयीं कधींहि बोलत नसे. तो आपल्या जर्नलमध्यें लिहितो, " प्रत्येक मोठ्या युगांत, उगवत्या सूर्यप्रकाशासमोर जशी मेणबत्ती क्षुद्र, त्याप्रमाणें वैयक्तिक चरित्र यःकश्चित् दिसतें."

लंडनमधील त्याचें निवासस्थान अत्यंत परिचित मित्रांसच माहीत असे. त्याची एक लहान खोली होती, ती पुस्तकांनीं भरलेली असे. तींत तंबाखूचा

धूर सदैव भरलेला असे. या खोलींत तो मित्रांना भेटे, पाहुण्यांच्या मुलाखती घेई. खुर्चीवर शांतपणें बसून सारखी सिगर ओढीत तो विचारात रमे. तो धुक्यांत वा मेघवलयांत आच्छादिलेल्या एकाद्या गंभीर दैवी विभूतीप्रमाणें दिसे. सभोंवतालच्या मर्त्य जनांच्या गोष्टी ऐकणारा, अति दूरच्या व वरच्या प्रदेशांतील उच्च वातावरणांतला तो अतिमानवी मानव वाटे. त्यांच्या संभाषणांत तो नेहमींच भाग घेई असें नाहीं. पण त्याच्या विचारांना पेटविणारा एकादा शब्द जेव्हां कोणी बोले, तेव्हां त्याचे काळेभोर इटालियन डोळे लगेच चमकून उठत व त्याची वाग्गंगा सुरू होई. पण वाग्गंगा म्हणण्यापेक्षां त्याच्या शब्दांना रसरशीत निखारे म्हणणेंच अधिक बरें. कारण, त्याचे शब्द ऐकतांच " श्रोत्यांना व्हेसुव्हियसमधून बाहेर पडणाऱ्या लाव्हाच्या तेजाळ प्रवाहांची आठवण होई." त्याच्याभोंवतीं नेहमीं पक्षी असत; पिंजऱ्यांत कोंडलेले नव्हेत, तर त्याच्या खोलींत मोकळेपणानें उडणारे—बागडणारे ते पक्षी म्हणजे त्याच्या संपूर्ण तत्त्वज्ञानाचीं जणूं प्रतीकेंच होते.

स्वातंत्र्याची प्रगतिपर चळवळ कोठेंहि सुरू असो, तिला त्याचा सदैव पाठिंबा असे. अमेरिकेंतील काळ्यांवरील गुलामगिरी व युरोपांतील गोऱ्यांची गोऱ्यांवरील गुलामगिरी, दोहोंचाहि तो कट्टा वैरी होता. स्त्रियांना मत असावें असें म्हणणारा तो स्त्रियांच्या हक्कांचा पहिला पुरस्कर्ता होय. आपल्या एका निबंधांत तो लिहितो, " स्त्रीजातीवर प्रेम करा; त्यांच्याविषयीं आदर बाळगा. स्त्रियांवरील प्रभुत्वाची प्रत्येक कल्पना मनांतून काढून टाका. तुम्ही स्त्रियांहून कशांतहि थोर नाहीं, श्रेष्ठ नाहीं." तो स्त्री—पुरुषांच्या समान हक्कांचा व समान कर्तव्यांचा पुरस्कर्ता होता. " नागरिक व राजकीय क्षेत्रांत स्त्रीला समान माना. ज्या ध्येयाला आपण एक दिवस नक्की जाऊन पोंचणार आहों, त्या ध्येयाकडे मानवी आत्मा स्त्री—पुरुषांच्या दोन पंखांनीं उड्डाण करीत जाऊं दे."

एकोणिसाव्या शतकांत अत्यंत छळली गेलेली व सत्ताधाऱ्यांच्या शिकारी कुत्र्यांकडून सारखा पाठलाग केली गेलेली व्यक्ति मॅझिनी होय. त्याच्या फोटोची प्रत युरोपांतील प्रत्येक पोलिसाजवळ होती. मॅझिनी दृष्टीस पडताच त्याला अटक करण्याचा हुकूम प्रत्येक शिपायाला दिलेला होता. तो सारखा येथून तेथें हांकलला जात होता. तो कोणत्याहि देशाचा नागरिक नव्हता.

तो मानवांवर फार प्रेम करी म्हणूनच ते त्याचा द्वेष करीत. मेल्यावर मात्र त्याला मोठ्या थाटामाटानें मूठमाती मिळाली. त्याला ही एक प्रकारें मरणोत्तर नुकसानभरपाईच होती म्हणाना ! १८७२ सालीं तो मरण पावला. त्याच्या शवपेटीबरोबर सत्तर हजार लोक कबरस्तानांत गेले. प्रथम प्रेषितांना ठार मारावयाचें आणि मग त्यांचीं प्रेतें पुजावयाचीं ही मानवांची नेहमींचीच युक्ति आहे.

मॅझिनीच्या मृत्यूबरोबरच राष्ट्रांराष्ट्रांमध्यें प्रेमाचें व मोकळेपणाचें बंधुत्व निर्मिण्याची त्याची कल्पनाहि विरून गेली. मॅझिनीला अपयश आलें. कारण, तो पाशवी बलावर विसंबून होता. राष्ट्रांचे खून करून का त्यांना परस्परांवर प्रेम करावयाला लावतां येईल ? जगाला मॅझिनी जरूर पाहिजे; पण तो तलवार धारण न करणारा असला पाहिजे. आणि कधीं ना कधीं तो मिळेलहि. कारण, खरी गरज असली कीं ती पुरी होतेच होते.

### प्रकरण ३ रें

# समाजवादाचा जनक कार्ल मार्क्स

— १ —

अठरावें शतक हें बुद्धीच्या महिम्याचें म्हणजे बुद्धिवादाचें शतक होतें, तर एकोणिसावें शतक हें क्रान्तीचें शतक होतें. अगदींच शास्त्रीय दृष्टया पाहिल्यास वरील विधानें अक्षरशः खरीं आहेत असें म्हणतां येणार नाहीं. इतिहासाचे असे अगदीं अलग अलग कालखंड पाडून विशिष्ट कालखंडात विशिष्ट स्थिति होती असें म्हणतां येणार नाहीं. बुद्धियुग व्हॉल्टेअरबरोबर अठराव्या शतकांतच अगर क्रान्तियुग मार्क्सबरोबर एकोणिसाव्या शतकांतच सुरू झालें असें नव्हे. शिवाय, अठरावें शतक केवळ बौद्धिक विचारसरणीचें होतें अगर एकोणिसावें केवळ क्रांतिकारक अशा आकांक्षांचें होतें असेंहि नव्हे. व्हॉल्टेअरच्या काळींहि रूढीचे सनातनी उपासक थोडेथोडके नव्हते. कार्ल मार्क्सच्या काळींहि प्रतिगामी वृत्तीचे लोक भरपूर होते ! इतिहासाचा प्रवाह अखंड चालला आहे. प्रत्येक युग म्हणजे परस्परविरोधी प्रवाहांची संमिश्र धारा होय.

पण हा इतिहासाचा संमिश्र प्रवाह आपण सोयीसाठीं मधूत मधून मोजून रा अलग करून पाहतों व त्याचे सारख्या लांबीचे तुकडे करून प्रत्येक तकाच्या अखेरीस एकेक पूल बांधतों. यामुळें शंभर शंभर वर्षांच्या स्तारावर आपण नीट नजर टाकूं शकतों; एका कटाक्षांत आपणांस सारें तक पाहून टाकतां येतें--त्याचें स्वरूप समजून घेतां येतें व या विशिष्ट तकाला—कालखंडाला–बाकीच्या काळापासून अलग करणाऱ्या विशिष्ट गोष्टी आपल्या लक्षात भरतात. अशा दृष्टीनें पाहिल्यास अठराव्या व एकोणिसाव्या तकाचीं डोळयांत भरण्यासारखीं वैशिष्टयें अनुक्रमें बुद्धिवाद व क्रांतिकारकत्व ीं होत. एकोणिसाव्या शतकांतील क्रांति–प्रवाहाचे दोन पोटभाग दिसतात : ॅझिनीसारख्या भावनाप्रधान क्रांतिकारकाचा एक व कार्ल मार्क्स यांच्या-ारख्या शास्त्रीय क्रांति–वाद्यांचा दुसरा. मॅझिनी व कार्ल मार्क्स दोघेहि जगाला मानवाना ) मुक्त करूं पाहत होते. पण दोघांना यासाठीं प्रवृत्त करणारीं कारणें ात्र भिन्नभिन्न होतीं. मॅझिनीला मानवजात मुक्त झालीच पाहिजे असें वाटे, र कार्ल मार्क्स याला मानवजात मुक्त होणारच अशी ज्ञानजन्य खात्री वाटत से. मानवजातीचें अन्तिम सुख ही मॅझिनीची उदार भावना होती, सर्वांनीं ुखी झालेंच पाहिजे असें त्याला वाटे; पण कार्ल मार्क्सला ती शास्त्रीय सत्यता ाटे. कारण, कार्ल मार्क्स हा आधीं शास्त्रज्ञ व मग क्रांतिकारक होता. त्यानें ार्व इतिहासाची प्रयोगशाळा करून काळजीपूर्वक संशोधन केलें. त्याचें मन ृथक्करणशील होतें. साऱ्या मानवजातीला त्यानें जणूं आपल्या टेस्ट–टयूबमध्यें ातलें ! सरंजामशाहींतून भांडवलशाही कशी उदयास आली व भांडवल-ाहींतून समाजवाद उदयास येणें कसें अपरिहार्य आहे हें त्यानें एकाद्या ास्त्रज्ञाप्रमाणें पद्धतशीरपणें दाखविलें आहे. एकादा भौतिक शास्त्रज्ञ प्रकाश, ेद्युत् वा उष्णता यांवर प्रयोग करून त्यांतील सर्व गोष्टी क्रमशः मांडतो, याप्रमाणें मार्क्स यानें केलें. अर्थशास्त्रहि सृष्टिशास्त्र व रसायनशास्त्र यांच्या-तकेंच बिनचूक शास्त्र—Exact Science आहे असें त्यानें दाखविलें. ाडवलशाहींतून सहकारी समाजवाद निघणें हें बीजांतून फुलें फुलण्याइतकेंच वाभाविक व नैसर्गिक आहे असें त्यानें प्रतिपादिलें. आणि आश्चर्य हें कीं, ामाजसत्तावाद शास्त्रीय आहे असें त्यानें दाखविलें मात्र, लगेच त्याचा धर्म ाला. जगांतील कामगारांना कार्ल मार्क्स याचा ‘ कॅपिटल ’ हा भौतिक ग्रंथ

बायबलइतकाच पवित्र वाटूं लागला. या ग्रंथामुळे एक नवीनच युग निर्माण झालें असें कामगारांना वाटलें. मार्क्सचें तत्त्वज्ञान मानणारे सर्व जण ऐतिहासिक काळाचे मार्क्सपूर्व व मार्क्सोत्तर असे दोन विभाग करतात.

— २ —

१८१८ सालच्या मेच्या पांचव्या तारखेस ट्रीव्हज येथें मार्क्सचा जन्म झाला. आईकडून तसाच बापाकडूनहि तो ज्यूच होता. ज्यू धर्मोपाध्यायांचें रक्त दोन्ही बाजूंनीं त्याच्या रक्तांत आलें होतें. मार्क्स सहा वर्षांचा होता तेव्हां त्याचा बाप प्रॉटेस्टंट झाला. त्यानें सर्व कुटुंबीयांसहि बॅप्तिस्मा दिला. मार्क्सचा बाप वकील होता. त्यानें असें कां केलें हें कोणासच माहीत नव्हतें. ज्यूंचा सर्वत्र छळ होई. आपल्या मुलांचा पुढें असा छळ होऊं नये म्हणून का त्यानें ख्रिश्चन धर्म स्वीकारला ? पण तसें असेल तर त्याचा तो हेतु सिद्धीस गेला नाहीं. कारण मार्क्सचें जीवन हें इतिहासांतील अत्यंत दुःखीकष्टी जीवन आहे.

कार्ल अत्यंत बुद्धिमान् विद्यार्थी होता. वयाच्या सतराव्या वर्षी त्यानें विद्यापीठांत प्रवेश केला व तेथें वाङ्मय, तत्त्वज्ञान, कायदा व प्रेम यांचा अभ्यास केला. गटेनें अनेक वेळां हृदय दिलें, मार्क्सनें एकदांच दिलें. मार्क्सची प्रेयसी वरिष्ठ वर्गातील होती; तिचें नांव जेनी व्हॉन वेस्टफॅलन. त्यांचें प्रेम सात वर्षें फुलत होतें. सात वर्षांच्या प्रेमाराधनेनंतर दोघें विवाहबद्ध झालीं. जेनी मरेपर्यंत, अडतीस वर्षें दोघें दुःखक्लेशांची भाकरी एकत्र खात होतीं. कधीं कधीं तर घरात भाकरहि नसे. ती कोरडी भाकर अमर प्रेमाच्या दैवी मद्यासह ते खात. हालअपेष्टा भोगीत असूनहि दोघांचें परस्परांवर अतिशय प्रेम होते व तें शेवटपर्यंत होतें.

वयाच्या तेविसाव्या वर्षी म्हणजे १८४१ सालीं त्यानें डेमॉक्रिटस व एपिक्यूरस यांच्या भौतिक तत्त्वज्ञानावर निबंध लिहिला. त्या निबंधामुळें त्याला तत्त्वज्ञानांतील डॉक्टर ही पदवी मिळाली; पण त्याला प्राध्यापकाची जागा मात्र मिळवितां आली नाहीं. कारण तो क्रांतिकारक विचारांचा होता. त्याची बुद्धि अत्यंत कुशाग्र होती. त्याची लेखनशैली विजेप्रमाणें प्रहार करीत

जाई, जणूं फटके मारीत जाई ! तो त्या काळांतील क्रान्तिकारक चळवळींत तनमनधनेंकरून सामील झाला. गटेच्या पिढींतील सौंदर्यात्मक, कलात्मक बंडाचा काळ मागें गेला. आतांची पिढी त्याच्या पुढें गेली. आपल्या काळांतील छंदांत क्रान्ति करून किंवा नाटकांच्या संविधानकांत क्रान्ति करून त्यांना समाधान नव्हतें. अतःपर जीवनाच्या संविधानकांतच क्रान्ति करावयाची त्यांना इच्छा होती. हीन, गुट्झ, हार्टमन, बोर्ने वगैरे बुद्धिवादी तरुण जीवनांतच बदल करूं पाहत होते. गटेचें वाङ्मयीन बंड आतां एकोणिसाव्या शतकांत सामाजिक बंडांत परिणत झालें. या नवीन बंडाला मार्गदर्शक हवा होता. म्हणून कार्ल मार्क्स इतर अनेक बंडखोरांच्या सहकार्यानें नवीन सामाजिक जागृतीवर लेखमाला लिहूं लागला.

ज्या वृत्तपत्रांत हे लेख येत, तें वृत्तपत्र बंद पाडण्यांत आलें; पण मार्क्स हताश झाला नाहीं. तो पॅरिसला गेला व तेथून त्यानें अनियंत्रित सत्तेवर कोरडे उडविण्याचें काम सुरू ठेवलें. त्याची सरबत्ती सुरूच राहिली. तो निबंध, पत्रकें वगैरे भराभरा लिहीत होता. त्यानें जें तत्त्वज्ञान पुढें जगाला संपूर्ण स्वरूपांत दिलें त्याचीं बीजें या पहिल्या लिखाणांतहि दिसून येतात. " धर्म म्हणजे लोकांची अफू आहे " अशासारख्या वाक्यातून खरा मार्क्सचा नादच ऐकूं येतो. " जेथें राजशाहीच्या मताला आधिक्य आहे तेथें मानवांचें अल्पमत असणार ", " जेथें राजशाही तत्त्वाला कोणीच विरोध करीत नाहींत तेथें माणसेंच नाहींत असें समजावें ", अगर " तत्त्वज्ञान्यांनीं आतापर्यंत जगाचें विवरण करण्यापेक्षां—जगाचा अर्थ सांगण्यापेक्षा अधिक कांहीं केलें नाहीं.... पण आम्ही जग बदलूं इच्छितों; जगाला बदलणें हें आमचें काम आहे. " असल्या वाक्यांतून मार्क्सचें खरें अंतरंग आपण पाहूं शकतों व मार्क्सचाच हा आवाज असें ओळखूं शकतों. मार्क्स जगाला बदलूं इच्छीत होता; पण वरिष्ठ वर्गाचे लोक जगाला त्याच जुन्या अनियंत्रित सत्तेच्या व जुन्या धार्मिक समजुतींच्या चाकोरींतून नेऊं इच्छीत होते. त्यामुळें मार्क्सचा व या सनातनीबुवांचा झगडा सुरू झाला. जर्मन सरकारनें त्याच्यावर राजद्रोहाचा गंभीर आरोप ठेवला. जन्मभूमीचा व त्याचा संबंध संपला. जन्मग्रामीं—ट्रीव्हजमध्यें अगर जन्मभूमींत—जर्मनींत कोठेंहि जाणें हें अटक करून घेण्यासारखें होतें, कदाचित् मृत्युमुखांत शिरणेंच होतें. त्याला

जर्मनींतून हद्दपार करण्यात आलें म्हणून तो पॅरिस येथें गेला; पण फ्रेंच सरकारनेंहि 'पॅरिस सोडून जा' असा हुकूम त्याच्यावर बजावला तेव्हां तो ब्रुसेल्स येथें जाऊन तेथील कामगारांना शिकवूं लागला. त्यांचे हक्क काय व ते कोणत्या रीतीनें नीट मिळवितां येतील हें तो त्यांना समजावून देऊं लागला. तो म्हणे, " मनुष्य परिस्थितीनुसार बनत असला, बदलत असला, तरी तो परिस्थितीचा निर्माताहि असतो, " हें नीट विचार केल्यास माणसाला कळून येईल. परिस्थिति मानवाला आकार देते, मानवहि परिस्थितीला आकार देत असतो; इतिहास मनुष्याला बनवितो व मनुष्यहि इतिहास निर्माण करतो. हेंच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, आपण उत्क्रांतीचे निर्माते आहों तितकींच उत्क्रांतीचीं संतानेंहि आहों.

इतिहासाचें आधिभौतिक पर्यालोचन करण्याच्या त्यांच्या तत्त्वज्ञानातील प्राणभूत गोष्ट म्हणजे त्याची इतिहासाकडे पाहण्याची दृष्टि. मनुष्य उत्क्रांतीच्या गतीचा निर्माताहि आहे व तो बनविलाहि जात असतो. उत्क्रांतीच्या गतीचें तो एक निष्क्रिय साधनहि आहे आणि प्रत्यक्ष चळवळ करणारा, क्रियात्मक भाग घेणाराहि आहे या कल्पनेप्रमाणें अगर या तत्त्वाप्रमाणें आपण अधिक झपाट्यानें उत्क्रांतीचें जरूर तेव्हां क्रांतींत परिणमन करून जगाची प्रगति करूं शकूं. मार्क्सच्या मते सामाजिक क्रांति ही सर्वांत महत्त्वाची. सामाजिक क्रांति म्हणजेच कामगारांचा उठाव. ज्या कामगारांवर समाजाचीं सारीं ओझीं असतात. ज्यांना समाजाचा सारा भार सहन करावा लागतो, पण सुख वा समाधान मात्र यत्किंचित् देखील भोगतां येत नाहीं अशा कामगारांचा उठाव ही मार्क्सच्या मतें अत्यंत महत्त्वाची क्रांति होय.

पूर्वीच्या सर्व तत्त्वज्ञान्यांनीं ईश्वराचा जो अंतिम प्रश्न त्याचा खूप ऊहापोह केला. देवाचा दूरचा प्रश्न दूर ठेवून जवळचा प्रॉलेटरियन प्रश्न कार्ल मार्क्स यानें हातीं घेतला. प्रॉलेटरियन या शब्दाचा अक्षरशः अर्थ 'खूप मुलें असणारा' असा आहे. कामगाराचा प्रश्न हातीं घेऊन त्यांत तो मग्न झाला. सारा इतिहास म्हणजे सकिंचन व अकिंचन यांच्यांतील झगडा. पिळणूक करणारे व श्रम करणारे किंवा धनिक व दास यांच्यांतील संघर्ष व झगडे म्हणजेच मानवी इतिहास. " त्या त्या प्रसंगीं कामगार पुनः पुनः

यशस्वी होत असतात; पण त्यांना मिळालेला विजय टिकत नाहीं; तो पळून जातो." पण कामगार-संघटना दिवसेंदिवस अधिकाधिक मजबूत होत आहे, वाढत आहे. जगांतील सर्वच राष्ट्रांचे हितसंबंध एकच असल्यामुळें चळवळीची राष्ट्रीयता नष्ट होऊन ती आंतरराष्ट्रीय होते. " समाजवादी जेथें जेथें क्रांतिकारक चळवळ होईल तेथें तेथें तिला पाठिंबा देतात. रूढ सामाजिक व राजकीय परिस्थितीविरुद्ध जेथें जेथें क्रांतिकारक उठाव दिसेल तेथें तेथें त्याला ते मदत करतात. कम्यूनिस्ट कधींहि स्वतःचे विचार, अगर स्वतःचीं ध्येये व उद्दिष्टें लपवीत नाहीं; अशा लपवालपवीचा तो तिटकारा करतो. रूढ सामाजिक रचना बळजबरीनें उलथून टाकली पाहिजे हें आपलें ध्येय तो निर्भयपणें उद्घोषीत असतो. समाजवादी क्रांति होणार या भीतिनें सत्ताधारी वर्गांना थरथर कापूं दे. कामगारांना भीति वाटण्याची गरज नाहीं. त्यांचें शृंखलांशिवाय दुसरें काय जाणार आहे! पण ते सारें जग जिंकून घेतील. " जगांतील कामगारांनो. एक व्हा."

— ३ —

कार्ल मार्क्सच्या विचारसरणींत व मॅझिनीच्या विचारसरणींत येथवर साम्य आहे. बहुजनसमाजाला मुक्त करण्यासाठीं जागतिक क्रांति व्हावी असें दोघेहि म्हणत. ज्या कम्यूनिस्ट-मॅनिफेस्टोंत मार्क्सचे विचार अत्यंत स्पष्टपणें व अत्यंत जोरदारपणें मांडले गेले आहेत, तो मॅनिफेस्टो मॅझिनीच्या यंग इटली व यंग युरोप या संघटनांनींहि एकत्र येण्याला घेतला असता. मॅझिनी व मार्क्स यांच्यांतील मुख्य फरक हा कीं, मॅझिनी ईश्वरी इच्छेला अनुरूप असें स्वातंत्र्याचें उपनिषद् देत होता. 'सर्वांनीं मुक्त व्हावें अशी दैवी—ईश्वराचीच-इच्छा आहे' असें तो प्रतिपादी; तर 'भवितव्यतेच्या—नियतीच्या-अभंग कायद्याप्रमाणें सर्व मानव मुक्त होणारच.' असें मार्क्स म्हणे. भवितव्यतेला म्हणजेच नियतीला शास्त्रीय सांचांत बसविलें कीं तिला उत्क्रांति म्हणतात.

पण या वेळेस मार्क्स अधिक क्रांतिकारी होता. तो अजून संपूर्णपणें विज्ञानवेत्ता म्हणजे शास्त्रीय दृष्टीचा झाला नव्हता. त्याचा कम्यूनिस्ट—मॅनिफेस्टो १८४८ सालीं लिहिला गेला. त्या वेळीं सारें युरोप उठावाच्या प्रक्षोभांत होतें.

ती वेळ निःपक्षपाती, तात्त्विक निबंध लिहिण्याची नव्हती, तर हातीं शस्त्र घेण्यासाठीं जळजळीत हांक मारण्याची होती. त्यानें आपलें ऐतिहासिक तत्त्वज्ञान अद्यापि अर्थशास्त्राच्या पायावर उभारलें नव्हतें. जगातील कामगारांना शिक्षणाचे पाठ देण्याऐवजीं त्यांना तो या वेळीं बंड करण्यासाठीं चेतवीत होता—उठवीत होता.

पण युरोपांतील सत्ताधारी कामगाराना दडपून टाकूं इच्छीत होते. मॅझिनी व मार्क्स यांसारखे युरोपांतील शांततेचे विघातक लोक एका देशातून दुसऱ्या देशात सारखे फेंकले जात होते. शेवटीं मार्क्सहि हद्दपार होऊन मॅझिनीप्रमाणेंच इंग्लंडांत येऊन राहिला. या कालीं ( १८४९ ) इंग्लंड हा युरोपांतील सर्वांत उदार देश होता. त्याला 'निर्वासितांची माता' असें म्हणत. अनियंत्रित सत्तेपासून मुक्त असल्यामुळें क्रान्तीच्या भीतीपासून इंग्लंड मुक्त होतें. तें दुसऱ्या देशांतील घरदारहीन परित्यक्त क्रांतिकारकांना आश्रय देऊं शके. एकोणिसाव्या शतकांतील ही इंग्लंडची पक्षपाती सज्जनता, येणाऱ्या क्रांतिकारक पाहुण्यांना भेदाभेद न करतां अभय देण्याचें इंग्लंडमधील राजसत्तेचें हें धोरण निःसंशय अत्यंत स्तुत्य होतें. मार्क्स इंग्लंडला आला तेव्हा त्याच्याजवळ एक दिडकीहि नव्हती. श्रमजीवी कामगारांची बाजू घेऊन व त्यांचा कैवारी बनून तो लढला तेव्हा तो स्वतःहि एक मजूर झाला. त्याचें पोट भरण्याचीहि पंचाईत होती. त्यांतच त्याला तीन मुलें होती व थोड्याच दिवसांत चौथें होणार होतें.

कामगारांचा हा महर्षि— श्रमजीवी लोकांचा हा प्रेषित— गलबतांतून इंग्लंडच्या भूमीवर पाऊल ठेवण्याच्या वेळीं कसा होता हें क्षणभर पाहूं या. आतां पुढील कष्टाचें जीवन त्याला इंग्लंडमध्येंच कंठावयाचें होतें. या वेळीं त्याचें वय एकतीस वर्षांचें होतें. " त्याच्या डोक्यावर काळ्या केंसांचें जंगल होतें. त्याची दाढी भव्य व वाटोळी होती. त्याचे हात केंसाळ होते. त्याच्या अंगावरच्या ओव्हरकोटाचीं बटणें चुकून खालींवर लागलेलीं होतीं. पण त्याला पाहतांच एकदम मान लववावीसें वाटे. दुसऱ्यांपासून मान मागण्याचा या पुरुषास हक्क आहे, दुसऱ्यानीं मान द्यावा अशी शक्ति त्याच्या ठायीं आहे, असें वाटे. हा पुरुष कसाहि दिसो वा कांहींहि करो, तो जगापासून मान

घेतल्याशिवाय राहणार नाहीं, असें वाटे. त्याची चालरीत जरा चमत्कारिक वाटत असली तरी तींत निर्भयपणा व आत्मविश्वास प्रतीत होत होते. त्याची वागणूक सामाजिक जीवनाच्या ठरीव रूढींशीं विरोधक होती. तो स्वाभिमानी दिसे; आसपासच्या प्रतिष्ठित जगाविषयीं तो तुच्छता दाखविणारा होता. त्याचा आवाज कठोर व कर्कश वाटे; त्यांत एक प्रकारचें नाद–गांभीर्यहि असे. व्यक्ती व वस्तू यांविषयींच्या त्याच्या क्रांतिकारक मताना अनुरूपच तो दिसत होता."

तो जरा अहंमन्य, चिडखोर व अभिमानी होता. स्वतःच्या मतांपेक्षा वेगळीं मतें असणाऱ्यांकडे तो उपहासात्मक असहिष्णुतेनें पाही, त्यांना तुच्छतेनें वागवी. तो नेहमीं जणूं तापलेला असे, प्रक्षुब्ध असे! वाद करावयासाठीं त्याच्या अस्तन्या जणूं सरसावलेल्या असत! तो जणूं लढाईच्या पवित्र्यांत उभा असे! पण विसांवा घेण्याच्या वृत्तींत असतां, वादळ शमलेलें असतां, तो अत्यंत प्रेमळ, शांत, कोमल, गोड, स्वागत करणारा, दयाळू, निःस्वार्थी व दंभहीन दिसे.

घरांत नेहमींच चणचण असल्यामुळें तो चिडखोर बनला होता. ऑटो रूहल 'कार्ल मार्क्स' या पुस्तकांत लिहितो, "सहा जणांचें तें कुटुंब लहानशा दोन खोल्यांत खुराड्यांत राहावें तसें राहत असे. उद्यां पोटाला मिळेल कीं नाहीं, याची रोज विवंचना असे. कपडे, बूट, हे सुद्धां गहाण पडले! बाहेर जाऊन यावयास कोटहि नसल्यामुळें मार्क्सला घरांतच बसून राहावें लागे.

१८५२ चा ईस्टरचा दिवस. त्या दिवशीं त्याची एक मुलगी देवाघरीं गेली. मुलीची आई लिहिते, "लहानगी फ्रॅन्सिस्का आजारी पडली. खोकला व ताप यांचा खूप जोर होता. ती तीन दिवस मृत्यूशीं झगडत होती. गरीब बिचारी! तिला किती तरी कष्ट होत होते, वेदना होत होत्या! आणि पुढें सारें संपलें! तिचें तें चिमणें शरीर पाठीमागच्या लहानशा खोलींत होतें. आम्ही सर्व पुढच्या खोलींत आलों. रात्रीं सर्व जण खालीं फरशीवरच झोंपलों होतों.... आम्ही अत्यंत विवंचनेंत असल्या वेळीं हें लाडकें बाळ आजारी पडलें व गेलें. ... एका फ्रेंच निर्वासितानें मला दोन पौंड दिले त्यांतून मीं शवपेटी विकत घेतली व त्या पेटींत आतां बाळ शांतपणें विश्रांति घेत आहे. ही मुलगी यां

जगांत आली तेव्हां तिला पाळणाहि नव्हता आणि ती जगांतून निघाली तेव्हां तिच्यासाठीं शवपेटीहि मिळणें कठिण होतें."

कार्ल मार्क्सच्या घरीं दारिद्य, भूक, उपासमार, रोग, ही मंडळी वरचेवर येऊं लागली. तो त्या शतकांतील मोठ्यांतल्या मोठ्या लेखकांपैकीं एक होता. पण त्याला लेखणीनें उपजीविका करणें अशक्य झालें. कारण, तो एक नवीन धर्म देत होता, नवीन धर्माचें तेजस्वी वाङ्मय विकूं इच्छीत होता. तें कोण घेणार? नवीन धर्माचा शोध करणाऱ्याचें काम मोठें कठिण असतें; त्याला मोबदला मिळत नसतो, कृतज्ञता मिळत नसते. मार्क्सचे जुन्या मूर्ती फोडून टाकणारे क्रान्तिकारक विचार वाचावयाला क्वचितच कोणी तयार असत. आणि पैसे देऊन ते विकत घ्यावयाला तर जवळजवळ कोणीच तयार नसे.

नवधर्म देणाऱ्या प्रेषितानें कधींहि लग्न करूं नये. ज्याला हातांत क्रॉस घ्यावयाचा आहे, ज्याला हौतात्म्य पसंत करावयाचें आहे, त्यानें आपल्या आपत्तींचें ओझें आपल्या लहान मुलांच्या लहान खांद्यांवर देणें बरें नव्हे. फ्रेडरिक एंजल्सची कायमची मधुर व निरपेक्ष उदारता न मिळती तर मार्क्सचें सारें कुटुंब मातींत गेलें असतें. एंजल्स हा आपल्या बापाच्याच कारखान्यांत बुक-कीपर होता. तो स्वतः फारसें मिळवीत नव्हता, तरीहि मार्क्सच्या अत्यंत निकडीच्या गरजा भागविण्यासाठीं तो पुनः पुनः पैसे देई. पण मार्क्सची गरज कधींच पुरी होण्यासारखी नव्हती. जेवढें येई तेवढें हवेंच असे. मार्क्स व त्याचें कुटुंब यांसाठीं एंजल्सनें मनापासून केलेला त्याग ही मानवजातीच्या इतिहासांतील सोन्याच्या अक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखी गोष्ट आहे. त्यांची आमरण मैत्री होती. मार्क्स एंजल्सकडे पुनः पुनः मागे व एंजल्सच्या मदतीचा प्रवाहहि सारखा अखंड त्याच्याकडे वाहत राही. एंजल्स कधीं रागावला नाहीं कीं त्यानें कधीं 'नाहीं' म्हटलें नाहीं. एका पत्रांत मार्क्स लिहितो, "पुनः तुमच्याजवळ मदत मागण्यापेक्षां माझा अंगठा मी तोडून टाकीन." आणि त्या पत्राचें उत्तर म्हणून एंजल्सनें दहा पौंडांचा चेक पाठविला; दुसरा एक पंधरा पौंडांचा चेक त्यानें पुनः पाठविला; नंतर पुनः नाताळची भेट म्हणून त्यानें पंचवीस पौंडांचा चेक पाठविला; आणि हें असें सारखें चालू असे.

एंजल्सच्या मार्क्सबरोबर असलेल्या मैत्रीकडे एंजल्स कोणत्या दृष्टीनें पाही? मानवजातीच्या मुक्ततेसाठीं केलेली ती जणूं धंद्यांतली भागीदारी होती! एंजल्सनें मार्क्स जिवंत राहावा म्हणून मदत केली आणि मार्क्स 'श्रमजीवी लोकांचें तें बायबल'—'कॅपिटल'—लिहीत राहिला.

आर्थिक प्रश्नांच्या रूढ विचार-प्रक्रियेंत ज्या महाग्रंथानें बॉंब टाकला, त्या ग्रंथांतील मुख्य गाभा आपण थोडक्यांत पाहूं या.

— ४ —

यंत्रांचा शोध लागल्यामुळें जगांत औद्योगिक युग सुरू झालें होतें. पैसा आतां राजा झाला होता. बँकर्स, कारखानदार, दुकानदार, यांचा एक नवीनच प्रतिष्ठित वर्ग—पुंजीपतींचा वर्ग—निर्माण झाला. स्टेटमध्यें, शासनसंस्थेंत त्यांचें वर्चस्व असे. जुना जमीनदारांचा वर्ग लोपला, नवीन भांडवलशाही जन्माला आली. सरंजामशाहींतील कुळांची जागा आता मजुरीनें काम करणाऱ्यांनीं घेतली. मार्क्सच्या पूर्वी रिकॉर्डोनें दाखविलें होतें कीं, भांडवलशाही कामगारांच्या पिळणुकीवर आधारलेली आहे. पण या पिळणुकीचें कारण काय, ही पिळणूक कशी होते, हें त्यानें सांगितलें नाहीं कीं ही पिळणूक कशी दूर करतां येईल याचा उपायहि त्यानें दाखविला नाहीं. मार्क्सनें या दोन्ही गोष्टी केल्या.

मार्क्स म्हणतो, "श्रम ही देखील एक विक्रेय वस्तु आहे. श्रमाचा विक्रेता म्हणजेच मालक इतर विक्रीच्या वस्तूंप्रमाणेंच स्वस्त मिळेल तेवढें पाहतो. एकाद्या वस्तूची किंमत तिच्या उत्पादनाला येणाऱ्या खर्चावरून ठरत असते. श्रमाची किंमत काय? श्रमणारा मजूर काम करण्यासाठीं जिवंत राहील इतकी मजुरी त्याला देणें म्हणजे त्याच्या श्रमाची किंमत. भांडवलदाराचा नफा त्याला श्रम कमीत कमी पैशांत मिळण्यावर अवलंबून असतो. कामगाराला जी मजुरी मिळते व तो प्रत्यक्ष जितकें पैदा करतो त्या दोहोंतील अंतरालाच अतिरिक्त मूल्य म्हणतात; मालकाचा नफा तो हाच. भांडवलदारांस श्रम ही एक निर्जीव वस्तु वाटते. कामगार हा मानवप्राणी नसून जणं एक हात आहे असी त्यांनी [illegible] विकत

घेऊन त्यांतून निर्माण होणारें जास्तींत जास्त किंमतीस विकणें असा भांडवल शाहीचा व्यवहार असतो. पण यांत भांडवलदारास दोष देतां येणार नाहीं. कामगारांचा तर दोष नसतोच. अर्थशास्त्राच्या कायद्याप्रमाणें दोघेहि वागतात. अर्थशास्त्राच्या कायद्यांवर कोणाची सत्ता चालणार?

कामगाराला मिळतें त्याच्या किती तरी पट तो देत असतो. तो स्वतः खर्चे करतो त्यापेक्षां किती तरी जास्त पैदा करतो. यामुळें एक विशिष्ट अशी गोष्ट घडते. वस्तू करणारे वस्तू विकत घेतल्या जाण्याच्या शक्यतेपेक्षां त्यांची शंभर पट जास्त पैदास करीत असतात. त्यामुळें कारखान्यांतील मालाचा उठाव होत नाहीं, वर्षानुवर्ष माल साचूं लागतो व शेवटीं पैदास बंद करण्याची पाळी येते. शिल्लक पडलेला माल खपेपर्यंत कारखाने बंद ठेवणें भाग पडतें; व कांहीं काळ कारखांने बंद ठेवणें भाग पडलें कीं कामगार बेकार होतात. त्याची क्रयशक्ति अधिकच खालावते. सांचलेल्या मालाचा उठाव होत नाहीं. तुडुंब शिगोशीग भरलेल्या वखारी रित्या होत नाहींत. आणि जगांत भरपूर खावयाला असूनहि कामगारांवर उपाशी मरण्याची पाळी येते! भांडवल-शाहीमुळें आपण अशा दुःखद स्थितीप्रत येऊन पोंचतों. मार्क्स म्हणतो, "जर ही पद्धति बदलली गेली नाहीं, तर दर दहा वर्षांनीं असे आर्थिक हलाखीचे व आर्थिक अरिष्टाचे फेरे येतच राहतील." आणि मार्क्सचें हें भविष्य १९३५ च्या आर्थिक अरिष्टाच्या प्रसंगापर्यंत बिनचूक—बरोबर—लागू पडलेलें पाहून खिन्नता वाटली तरी गंमतहि वाटते.

पण मार्क्स म्हणतो कीं, सुदैवानें रोगावरचा उपाय रोगाच्या स्वरूपांतच आहे. दिवसेंदिवस अधिकाअधिक मोठीं यंत्रें कारखान्यांत येऊं लागतात, त्यामुळें हळूहळू देशातील सारी संपत्ति कांहीं थोड्यांच्याच हातीं जमा होते. कामगारांनीं कारखाने ताब्यांत घेऊन स्वतःसाठीं चालविले, तरच मूठभर लोकांसाठीं त्यांना सोसाव्या लागणाऱ्या मोटभर हालअपेष्टा टळतील. मार्क्स म्हणतो, "तुम्हाला आवडो वा न आवडो, एक गोष्ट अटळ आहे कीं, भांडवलाच्या एकीकरणांतूनच समाजसत्तावाद निश्चित येणार. भूतकालीन सरंजामशाहींतून संक्रमण करीत आपण भांडवलशाहींत आलों व आतां त्या भांडवलशाहींतूनच त्या त्या देशांतील क्रान्तिकारक उठावांमुळें भावी सहकारात्मक समाजसत्तावाद दृढमूल होईल.

आजच्या आर्थिक परिस्थितींतल्या रुग्ण भागावर मार्क्सनें बिनचूक बोट ठेवलें ही गोष्ट कोणीच नाकारीत नाहीं; पण त्यानें सुचविलेला उपाय खरा कीं खोटा हें आज काय सांगतां येणार ?

— ५ —

कॅपिटल या महाग्रंथाचा पहिला भाग मार्क्सच्या हयातींतच प्रसिद्ध झाला. पण दुसरा व तिसरा हे भाग छापण्यास जाण्यापूर्वींच मृत्यूनें त्याच्या हातांतील लेखणीवर आघात केला ! काले मार्क्स किती तरी वर्षें क्लेश भोगीत होता. शरीरावर सर्वत्र गळवें असत, त्यांच्या सारख्या वेदना होत. त्यांतच आयुष्याच्या शेवटीं शेवटीं डोकेंदुखीची—मस्तकशूळाची—आणखी भर पडली. १८८१ सालीं त्याला प्ल्यूरसी झाली. त्याची पत्नीहि त्याच्या शेजारच्या खोलींत कॅन्सरनें मृत्युशय्येवर पडली होती. मार्क्स मोठ्या कष्टानें उठून पत्नीची शेवटची भेट घेण्यासाठीं गेला. पतिपत्नींच्या या अंतिम भेटीविषयीं त्यांची मुलगी लिहिते, ' आई पुढल्या मोठया खोलींतील बिछान्यावर होती व मोहर ( मार्क्स ) मागच्या खोलींत होता. ज्यांचीं जीवनें परस्परांत इतकीं मिसळून गेलीं होतीं ते दोन जीव आतां वियुक्त होणार होते. मोहर बरा झाला. त्या दिवशीं त्याला जरा बरें वाटत होतें. सकाळची वेळ होती. मी तो दिवस कधींहि विसरणार नाहीं. बाबांना आईच्या खोलींत जाण्याइतकी शक्ति वाटत होती. पुनः उभयता जणूं तारुण्यांत आलीं होतीं. आई प्रेमळ तरुणी दिसत होती ; बाबा प्रेमळ नवयुवक दिसत होते. उभयतां नव्यानें जीवनयात्रा सुरू करीत आहेत असें वाटत होतें. आजारानें भग्न—शीर्ण—झालेल्या वृद्धाऐवजीं आणि मरणोन्मुख वृद्धेऐवजीं दोघें जणूं उत्साहपूर्ण व यौवनसंपन्न वाटत होतीं! दोघें परस्परांचा कायमचा—शेवटचा—निरोप घेत होतीं; १८८१ सालच्या डिसेंबरच्या दुसऱ्या तारखेस फ्रॉ मार्क्स मरण पावली व पुढें पंधरा महिन्यांनीं मार्क्सहि तिला भेटावयास गेला.

प्रकरण ४ थें

# प्रशियाचा प्रतिगामी चॅन्सेलर बिस्मार्क

— १ —

मॅझिनी व मार्क्स जगाची पुनर्रचना न्यायाच्या पायावर करण्यासाठीं खटपट करीत असतां जुन्या संप्रदायाचे राजकारणी व मुत्सद्दी आपापले राज्यकारभार स्वार्थांच्याच पायावर चालवीत होते. ते मॅकिऑव्हिलियन तत्त्वांवर निष्ठा ठेवून वागत होते, एकमेकांचे प्रदेश लुबाडूं इच्छीत होते. मुत्सद्देगिरीच्या फसवाफसवीनें ते हळूच मुलूख चोरीत व मुत्सद्देगिरीनें जमलें नाहीं तर फौजा तयार ठेवीत.

प्रिन्स ऑटो व्हॉन बिस्मार्क हा एकोणिसाव्या शतकांतील अत्यंत प्रतिगामी, फसव्या व दुष्ट मुत्सद्दी होता. त्याची मूठ लोखंडाची होती; तो बलाचा उपासक होता. स्वतःच्या महत्त्वाकांक्षेच्या क्षितिजापलीकडे तो पाहत असे. तो म्हणे, "राजकारणांत आपला फायदा असल्याशिवाय केवळ शेजाऱ्यासाठीं आपण कांहीं करीत नसतों." त्यानें जर्मनीचें एकीकरण करून प्रशियन सम्राटाच्या सत्तेखालीं जर्मनी देश दिला. बिस्मार्कनें लष्करी शक्ति उभारून कित्येक पिढ्यांची संस्कृति रक्ताच्या वादळांत नष्ट केली. वस्तुतः तो सतराव्या शतकांत शोभणारा मुत्सद्दी होता; पण तो चुकून एकोणिसाव्या शतकांत जन्माला आला.

त्याचा बाप प्रशियन सैन्यांतील रिटायर्ड कॅप्टन होता; शोनॉसेन येथें त्याची इस्टेट होती, तिची व्यवस्था बापाच्या मरणानंतर बिस्मार्क स्वतः पाहूं लागला. वयाच्या बत्तिसाव्या वर्षी म्हणजे १८४७ सालीं प्रशियातील पहिल्या असेंब्लीच्या निवडणुकीत तो स्वतःच्या जिल्ह्यातर्फे निवडून गेला. या काळात प्रगतिपर वारे सुटले होते; पण बिस्मार्कनें असेंब्लीपुढें केलेलीं सारीं भाषणें प्रतिगामी होतीं. तो अनियंत्रित राजसत्तेच्या दैवी हक्कांचें समर्थन करीत होता, ख्रिश्चन स्टेटचें समर्थन करीत होता. त्या वेळीं फ्रेडरिक वुइल्यम हा राजा होता, त्याचें लक्ष बिस्मार्ककडे गेलें व त्यानें त्याला आपल्या नोकरींत घेतलें.

१८४८ मधलें क्रान्तिकारक बंड मोडणें हें त्याचें पहिलें अधिकृत काम होय. पण या क्रान्तीमुळें एक गोष्ट मात्र झाली व तिच्यासाठीं तरी बिस्मार्कनें या क्रांतीस कृतज्ञ राहणें जरूर होतें. ती म्हणजे ही कीं, या वेळेस जर्मनीचें राजकीय नसलें तरी निदान आर्थिक एकीकरण झालें. वेल्स म्हणतो, " जर्मनीचे भाग विस्कळित होते. हाताच्या पंजाचीं बोटें असतात तशीं जर्मन स्टेट्स् होतीं. बिस्मार्कनें त्यांची एकजूट करून एकमूठ केली व ती मूठ वळून इतर देशांच्या तोंडावर ठोसे देण्यास बिस्मार्क उभा राहिला.

जर्मनीचें साम्राज्य निर्मावयासाठीं त्यानें जाणूनबुजून पद्धतशीर कारवाया सुरू केल्या. त्याला जर्मन साम्राज्यासाठीं वाव पाहिजे होता; अगर त्याच्याच शब्दांत सांगावयाचें तर सूर्यप्रकाशांतील महत्त्वाची जागा त्याला हवी होती, अर्थात् उष्ण कटिबंधांतील वसाहती वगैरे पाहिजे होत्या. प्रशियाचा राजा जगातील सर्वश्रेष्ठ, सर्वसामर्थ्यसंपन्न व केवळ अनियंत्रित सर्वसत्ताधीश व्हावा अशी त्याची मनीषा होती.

प्रथम आसपासचे लहान लहान विस्कळीत प्रदेश घेऊन ते तो खुशाल आपल्या राज्यास जोडीत चालला. जर्मनीच्या उत्तरेस श्लेस्विग व होल्स्टेन हे प्रांत होते. या दोन प्रदेशांतील लोकवस्ती अंशतः डॅनिश व अंशतः जर्मन होती. या दोन्ही प्रदेशावर डेन्मार्कच्या राजाची सत्ता होती; पण प्रशियाच्याच राजाची हुकमत या भागावर असली पाहिजे असें बिस्मार्कनें ठरविलें व तो डेन्मार्कशीं युद्ध करावयास उभा राहिला. ऑस्ट्रियाचा सम्राटच अद्यापि संयुक्त जर्मनीचा अधिराजा मानला जात असे. श्लेस्विग व होल्स्टेन हे आपले गेलेले प्रांत परत मिळविण्यासाठीं ऑस्टियाची मदत घेऊन त्यानें युद्ध पुकारलें. ऑस्ट्रिया व प्रशिया यांच्या संयुक्त सेना डॅनिश हद्दींत शिरल्या. डॅनिश लोकांनीं फ्रान्सचा राजा तिसरा नेपोलियन याच्याशीं करार करण्याचा यत्न केला. पण नेपोलियन निराळ्याच उद्योगात होता. अमेरिकेंत या वेळीं चाललेल्या यादवी युद्धांत तो आपलीं बोटें घुसवूं पाहत होता. अमेरिकेंतील रिपब्लिकच्या जागीं तो पुनः पूर्वीचें जुनें फ्रेंच साम्राज्य स्थापूं पाहत होता. त्यानें आपलें सैन्य व्हेरा क्रूझ येथें पाठविलें. मेक्सिकन लोकांनीं ऑस्ट्रियाच्या मॅक्झिमिलियनला राजा मानावें असा हट्ट त्यानें धरला. पण अमेरिकेंतील यादवी युद्ध संपलें व फ्रान्सनें आपलें सैन्य अमेरिकेंतून काढून घ्यावें असें

वॉशिंग्टन सरकारनें बजावलें. मेक्सिकन लोकांना तो ऑस्ट्रियन राजा नकोच होता. त्याला गोळी घालून ठार मारण्यात आलें. तिसरा नेपोलियन युरोपियन शेजाऱ्यांच्या घाणेरड्या भांडणांत हात घालण्याला पुनः मोकळा झाला.

पण या वेळेपावेतों जर्मन व ऑस्ट्रियन फौजांनीं डेन्मार्कच्या राजाजवळून श्लेज्विग व होल्स्टेन प्रांत घेतले होते. ते दोन्ही प्रदेश जर्मनी व ऑस्ट्रिया यांच्या सयुक्त मालकीचे होते. पण ही मिळालेली सारी लूट केवळ जर्मनीसाठीं राहावी अशी बिस्मार्कची इच्छा होती. तसेंच त्याला ऑस्ट्रियाचे अधिराज्यत्व नष्ट करून स्वतंत्र जर्मन साम्राज्य स्थापावयाचें होतें, म्हणून त्यानें ऑस्ट्रियाशीं कांहीं तरी भाडण उकरून काढलें व संरक्षक युद्ध पुकारलें. वास्तविक प्रत्येक युद्ध दोन्ही बाजूंच्या माडोत्री प्रचारकांकडून संरक्षकच दाखविण्यांत येत असतें. ) ऑस्ट्रियाचें सैन्य दोन शत्रुदेशांत कोंडण्यासाठीं बिस्मार्कनें इटलीशीं करार केला व मुत्सद्देगिरीनें युरोपांतील इतर राष्ट्रांस त्यानें तटस्थ ठेवलें. त्यासाठीं त्यानें कोणाला खोटीं वचनें दिलीं, कोणाला खोटें सांगितलें, कोणाची खुशामत केली, कोणाला दमदाटी दिली, कोणाला धाक घातला आणि आपलें व आपल्या राजाचें हित साधण्यासाठीं मॅकिऑव्हिलियन कोडांतील प्रत्येक मार्गाचा अवलंब केला.

ऑस्ट्रियाविरुद्ध पुकारलेलें हें युद्ध पटकन् संपलें. दोनच महिन्यांत प्रशियन फौजांनीं ऑस्ट्रियन सैन्यास खडे चारले ! ऑस्ट्रियाचा पुरा मोड झाला व युरोपच्या घोड्यावर बिस्मार्क आरूढ झाला. त्यानें उत्तर जर्मनींतील संस्थानांचें फेडरेशन करून तें प्रशियाच्या अधिराज्यत्वाखालीं आणलें. येवढें केल्यानंतर तो आपल्या चढाऊ धोरणाचें पुढचें पाऊल टाकावयास निघाला. प्रशियांतील लष्करी अधिकारी धर्माधिकाऱ्यांप्रमाणें सन्मानिले जाऊं लागले. बिस्मार्कच्या संतत कशाघातानें व त्याच्या अहर्निश चळवळीनें जर्मनीभर लष्करामध्यें नोकरी करणें हें केवळ देशभक्तीचेंच नव्हे तर पवित्र व धार्मिक कर्तव्य मानलें जाऊं लागलें. प्रशियन सेनापति व्हॉ मोल्टके हा बिस्मार्कच्या हाताखालीं होता, त्यानें स्वतःच्या देशबांधवांना व इतर राष्ट्रांनाहि शिकविलें कीं ' युद्ध ही जगाच्या रचनेंत ईश्वरनिर्दिष्ट अशी एक आवश्यक बाब आहे. या वेळचें बिस्मार्कचें चित्र पाहा. डोक्यावर मध्ययुगीन शिरस्त्राण, निष्ठुर दिसणारे डोळे, जाड पापण्या, जबड्याचीं मोठीं हाडें, मोठ्या लष्करी मिशा,

यांमुळें तो जणूं प्राचीन काळांतला युद्धदेवच दिसतो! तो सर्वत्र लाल रक्ताळ मुठीचा कारभार सुरू करूं पाहत होता.

— २ —

नवें जर्मन साम्राज्य नीट सुसंघटित व बलिष्ठ करण्यासाठीं व वाढविण्यासाठीं बिस्मार्कनें फ्रान्सची कुरापत काढली. पण एकटा बिस्मार्कच युद्धप्रिय होता असें नव्हे, तर तिसऱ्या नेपोलियनलाहि युद्धाची खुमखुमी होतीच. भांडणाला नेहमीं दोघांची जरुरी असते. जर्मनीच्या वाढत्या शक्तीचा नेपोलियनला मत्सर वाटत होता. जर्मनीला चिरडून टाकणारा घाव घालावा अशी संधि नेपोलियन पाहत होता, त्याला बिस्मार्कनें संधि दिली व नेपोलियननें खरोखरच चिरडणारा घाव घातला; पण तो जर्मनीवर न पडतां फ्रान्सवरच पडला व फ्रान्स कोलमडला.

जर्मनी व फ्रान्स यांच्यांत आर्थिक तशीच राजकीय स्पर्धा सुरू होती व युद्धाचें हेंच मुख्य कारण होतें. एक क्षुद्रसें तात्कालिक कारणहि होतें; पण तात्कालिक कारणें हीं नेहमींच निमित्तें असतात. चढाऊ राष्ट्र पूर्ण तयारी करून युद्धास सज्ज झालें कीं तें युद्धासाठीं कांहीं तरी निमित्त शोधीतच असतें. १८७० सालीं स्पॅनिश लोकांनीं आपल्या व्यभिचारी राणीला हद्दपार करून लिओपोल्डला गादी दिली. लिओपोल्ड हा जर्मन राजाचा चुलतभाऊ होता. नेपोलियनला कांहीं तरी कलहकारण हवेंच होतें. लिओपोल्ड स्पेनच्या गादीचा वारस व्हावा ही गोष्ट नेपोलियनला मान्य नव्हती. बिस्मार्क युद्धोत्सुक होतांच तो म्हणाला, “ लिओपोल्ड हाच योग्य वारस आहे.” नेपोलियननें जर्मनीचा राजा वुइल्यम याला लिओपोल्डची वारसदारी रद्द करण्यास सांगितलें, तर बिस्मार्कनें “ शक्य तें सर्व करून लिओपोल्डच राजा निवडला जाईल असें करा ”, असें आपल्या राजाला सांगितलें.

जर्मनीचा राजा फारसा युद्धोत्सुक नव्हता. तो नेपोलियन व बिस्मार्क या दोघांनाहि संतुष्ट ठेवूं पाहत होता. खासगी रीतीनें त्यानें लिओपोल्डला स्पॅनिश गादीसाठीं उमेदवार म्हणून उभें न राहण्यास सांगितलें; पण त्यानें जाहीररीत्या मात्र त्याच्यावर कोणत्याहि रीतीनें वजन आणलें नाहीं. येथवर जर्मन राजा व फ्रेंच सम्राट् दोघेहि अत्यंत सभ्यतेनें वागले. पण आतां बिस्मार्कनें

सूत्रें हातीं घेऊन युद्ध भडकेलसें केलें. नेपोलियनच्या एका सभ्य पत्राला वुइल्यम राजानें एक सभ्य भाषेंतील उत्तर तयार करून तें त्याला देण्यासाठीं बिस्मार्ककडे धाडलें. या वेळीं बिस्मार्क एम्स येथें औषधोपचार घेत होता. म्हणून तें उत्तर त्यानें बिस्मार्ककडे तारेनें पाठविलें होतें; पण बिस्मार्कनें त्यांतील कांहीं शब्द गाळून तें उत्तर अशा स्वरूपांत प्रसिद्ध केलें कीं, फ्रेंचाना जर्मन व जर्मनांना फ्रेंच डाकू वाटावे. बिस्मार्कचा हेतु सफल झाला व फ्रेंचांचें आणि जर्मनांचें युद्ध जुंपलें; तें वस्तुतः अनावश्यक अतएव मूर्खपणाचें युद्ध होतें. त्यांत फ्रेंचांचा मोड झाला व नेपोलियन पदच्युत झाला. दोहों बाजूंचे हजारों लोक ठार झाले. फ्रेंचांनीं रिपब्लिक जाहीर केलें. बिस्मार्कचा जय झाला. जर्मनींतील उत्तरेकडचीं व दक्षिणेकडचीं संस्थानें एक करून जर्मन साम्राज्य स्थापण्यांत आलें. वुइल्यम राजा पहिला केसर (सीझर) वुइल्यम झाला; बिस्मार्कचे घोडे गंगेंत न्हाले; त्याची कीर्ति शिगेला पोंचली, त्याचे मनोरथ पूर्ण झाले, त्याच्या वैभवावर कळस चढला: फ्रान्सचे अल्सेस व लॉरेन हे प्रांत बळकावण्यांत आले व १९१४च्या महायुद्धाचें बीजारोपण करण्यांत आलें. १८७०च्या द्वेषात व १८७१च्या तहांत १९१४च्या महायुद्धाचीं बीजें होतीं.

युरोपचें प्रभुत्व लाभल्यावर बिस्मार्क वसाहतींकडे वळला. "वसाहतींचा विस्तार" या नवीन रूढ झालेल्या शब्दांचा अर्थ असा कीं, "आशिया व आफ्रिका या खंडांतील दुबळ्या देशांना प्रबळ युरोपियन राष्ट्रांनीं गुलाम करणें. पौर्वात्यांच्या या लूटमारीची बिस्मार्कला—त्या लुटीच्या पुरस्कर्त्याला—बिलकुल दिक्कत वाटत नसे. साऱ्या हयातींत त्यानें आपलें कुटुंब व आपला राजा यांपलीकडे कोणासहि व कधींहि सहानुभूति दाखविली नाहीं. इंग्लिश ज्ञानकोशांत प्रो० एरिक ब्रँडेनबर्ग लिहितो, "मानवजातीसाठीं बिस्मार्कला कांहींहि वाटत नसे." त्याला नैतिक दृष्टि मुळीं नव्हतीच. स्वतःच्या वैयक्तिक महत्त्वाकांक्षेच्या पूर्ततेसाठीं मानवाना तो प्यांदीं समजत असे. स्वतःचे हेतू पूर्ण करून घेण्यासाठीं तो मानवांच्या आशांची राखरांगोळी करी, त्यांच्या प्राणांचें हत्याकांड मांडी. पण बिस्मार्कनें आपली कीर्ति पाहिली, तशीच ती नष्ट झालेलीहि पाहण्याचें त्याच्या कपाळीं आलें! कैसर दुसरा वुइल्यम यानें राजा होताच बिस्मार्कला रजा दिली: आपण त्या लोखंडी, पोलादी

मदतीशिवायहि मानवजातीची नीट लूटमार करण्यास समर्थ आहों, असा आत्मविश्वास या नवीन तरुण राजाला वाटत असे.

एकाद्या जुनाट हत्याराप्रमाणें बिस्मार्कला फेंकून देण्यांत आल्यामुळें तो सम्राटाविरुद्ध जळफळत होता व आपल्या दुर्दैवाला दोष देत होता. पण त्याचा क्रोध कर्मशून्य व विफल होता. २८ जुलै १८९८ रोजीं मृत्यु येईतों तो गंजलेल्या हत्याराप्रमाणें पडून राहिला. त्याला ब्यायशीं वर्षें आयुष्य लाभलें. रक्ताच्या पायावर त्यानें जर्मन साम्राज्याची उभारणी केली. पण हें सामर्थ्य-संपन्न साम्राज्य पन्नासच वर्षांत पुनः रक्तसागरांत बुडून गेलें! तो अद्वितीय मुत्सद्दी होता; पण मुत्सद्देगिरींतील अगदीं प्राथमिक धडाहि तो शिकला नव्हता. हा धडा कोणता? युद्धप्रिय बनून जग जिंकण्यास निघणें म्हणजे साम्राज्याच्या विनाशाचा खात्रीचा मार्ग.

## प्रकरण ५ वें

# आपल्या पूर्वजांचा परिचय करून देणारा चार्लस डार्विन

— १ —

पास्कल एकदां म्हणाला कीं, क्लिओपाट्रा हिच्या नाकाच्या आकारामुळें साऱ्या जगाचें स्वरूप बदलून गेलें. त्यानंतर जवळजवळ दोन हजार वर्षांनीं इतिहासाचें सारें स्वरूप एका केंसावर आधारलेलें होतें; दुसऱ्या एकाच्या नाकावर—नाकाच्या आकारावर—इतिहास लोंबकळत होता. तो १८३१ मधील मंदीचा काळ होता. बावीस वर्षांचा धर्माभ्यासक चार्लस डार्विन बादशहाच्या गलबतांतून अवैतनिक निसर्गाभ्यासक म्हणून जाणार होता; पण गलबताचा कप्तान फिट्झ्रॉय त्याला घेईना. त्याचें नाक पाहून शास्त्रज्ञ होण्याची पात्रता अगर त्यासाठीं अवश्य तो उत्साह त्याच्या (डार्विनच्या) ठिकाणीं असेल असें कप्तानाला वाटेना.

डार्विन या 'बीगल' नामक जहाजांतून न जाता, तर तो धर्मोपदेशक झाला असता. मानवांच्या उत्क्रांतीवरील त्याच्या युगप्रवर्तक संशोधनाला जग मुकलें असतें व या शोधामुळें इतिहास समृद्ध झाला तसा झाला नसता.

डार्विन वस्तुतः धर्मोपाध्यायच व्हावयाचा; पण थोडक्यांत चुकलें. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं मस्तिष्कशास्त्राचा फार बोलबाला होता; एका मस्तिष्क-शास्त्रज्ञानें डार्विनचें डोकें तपासून सांगितलें कीं, तो धर्माचा मोठा आधारस्तंभ होईल. कारण, त्याला त्याच्या डोक्यांतला धर्मशास्त्रदर्शक भाग चांगलाच वर आलेला दिसला. दहा सामान्य धर्मोपाध्यायांच्या डोक्यांतल्या भागाइतका भाग त्याच्या एकट्याच्या डोक्यांत त्या मस्तिष्कशास्त्र्याला आढळला. डार्विनचें नाक तसेंच त्याचें डोकें त्याला सरळ इंग्लंडमधील चर्चच्या सिंहासनावर नेऊन बसविणार असें दिसत असतां, मानवजातीच्या सुदैवानें कप्तानाचें डार्विनच्या नाकाबद्दलचें मत बदललें व डार्विनला 'बीगल' गलबतावर जागा मिळाली. त्यानें बायबल मिटलें, त्यांतील सृष्टिनिर्मितीच्या कल्पित कथा सोडून दिल्या व सातां समुद्रांत फिरून पशुपक्ष्यात, फुलांफळांत, वृक्षवनस्पतींत जगाचा इतिहास पाहण्यास प्रारंभ केला. जगाच्या इतिहासावरील प्रवचनें दगडांधोंड्यांतून, नद्यांतून, वाळवंटांतून व पर्वतांतून ऐकत तो सर्वत्र हिंडला. किती मनोरंजक व सत्यमय ही जगाची कथा! परत आल्यावर पूर्वी धर्मो-पदेशक होऊं इच्छीत असलेलाच डार्विन ज्या आधारावर चर्चची उभारणी झाली होती त्या आधाराच्याच सत्यतेविषयीं शंका घेऊं लागला! त्यानें आव्हान दिलें. अदृश्य स्वर्गाचा अभ्यास व परलोकाचा विचार सोडून देऊन तो प्रत्यक्ष पृथ्वीचा अभ्यास करूं लागला. जग एका धर्मोपदेशकाला मुकलें खरें, पण त्याला एक अत्यंत मोठा शास्त्रज्ञ लाभला.

— २ —

डार्विन व एब्राहाम लिंकन एकाच दिवशीं—१२ फेब्रुवारी १८०९ रोजीं जन्मल्यामुळें प्रोफेसर लल म्हणे कीं, लिंकननें मानवांचे देह गुलामगिरींतून मुक्त केले त्याप्रमाणें डार्विननें मानवी मन अज्ञानाच्या बंधनांपासून मुक्त केलें. १८०९ साल महापुरुषांच्या जन्मांनीं भरलेलें आहे. या वर्षी निसर्गानें मानव-जातीच्या मांडीवर जणूं महापुरुषांचें ताटच वाढून आणून ठेवलें. डार्विन, लिंकन, गॉड्स्ट, मेंडेलसन, चॉपिन, पो, टेनिसन, ऑलिव्हर वेंडेल होल्म्स, एलिझाबेथ बॅरेट ब्राउनिंग, या सर्वांचा जन्म याच वर्षी झाला. आणखीहि कित्येक याच सालीं जन्मले असतील. यापैकीं प्रत्येकानें मानवजातीला

शाश्वत सुंदरतेची व उदात्ततेची जोड करून दिली आहे, त्यात भरपूर भर घातली आहे. डार्विननें घातलेली भरहि कांहीं कमी नव्हती.

डार्विनचीं मातृकुल व पितृकुल दोन्ही चांगलीं होतीं. त्याच्या वडिलांचे वडील इरॅस्मस डार्विन हे प्रसिद्ध निसर्गशास्त्री होते. त्यांनीं वनस्पतींच्या प्रेमलीला हें काव्य तसेंच लॉज् ऑफ् ऑर्गॅनिक् लाइफ् (सेंद्रिय जीवनाचे नियम) हें पुस्तक लिहिलें. त्याचे आईकडचे पणजोबा चिनी मातीच्या भांड्यांचे मोठे कारखानदार होते, त्यांचें नांव जोशिया वेजवुड. शास्त्रें व कला यांत खूप रस घेणारें वातावरण डार्विनच्या घरांत असणें साहजिकच आहे. लहानपणीं डार्विन सौम्य वृत्तीचा व चिंतनशील होता. त्याला लहान लहान खडे, दगड, शिंपले, नाणीं, फुलें, कृमी, जीवजंतू, पक्ष्यांचीं अंडीं, कीटक वगैरे जमविण्याचा फार नाद होता. तो जिवंत कीटक पकडीत नसे, मेलेले आढळले तरच उचली. फुलपाखरांसहि तो मारीत नसे; पण पक्षी मात्र आपल्या छोटया बंदुकीनें तो खुशाल मारी! दुरून जीव घेण्यांत त्याच्या बालमनाला जणूं हरकत वाटत नसावी. पुष्कळ वर्षे त्याला शिकारीचा नाद होता, पण एके दिवशीं एका जखमी पक्ष्याच्या वेदना पाहून त्याच्या मनावर खूप परिणाम झाला व केवळ करमणुकीखातर पुनः प्राण्यांची हिंसा करावयाची नाहीं असा निश्चय त्यानें केला. त्याची आई तो आठ वर्षांचा असतां वारली. त्याचा बाप रॉबर्ट वेअरिंग डार्विन हा भीमकाय पुरुष होता. त्याचें वजन साडेतीनशें पौंड होतें. तो अत्यंत आनंदी व कार्यक्षम होता; पण त्याला पुत्राचा स्वभाव मात्र नीट समजला नाहीं. तो निरुपयोगी उडाणटप्पू आहे असें त्याचें मत होतें. जगातला सारा केरकचरा—फुलें, पांखरें, दगडधोंडे—घरांत आणून भरणारा हा पोरगा पुढें काय करणार, असें त्याला वाटे. मुलाच्या हातून काहीं कर्तबगारी होईल असें बापास वाटेना. त्याच्या डोक्यांत थोडेंफार जुनें ज्ञान कोंबण्यासाठीं बापानें त्याला ग्रीक व लॅटिन शिकविणाऱ्या एका शाळेंत घातलें, पण मुलानें शिक्षणाकडे लक्ष न देतां बापाच्या बागेंतच एक गुप्त प्रयोगशाळा सुरू करून रसायनशास्त्राचे व पदार्थ-विज्ञानाचे प्रयोग चालविले, त्यामुळें त्याला सारे जण वेडपट म्हणूं लागले. मुलें त्याला 'गॅस' म्हणत. हेडमास्तरांनीं त्याला 'निष्काळजी माणूस' ही पदवी दिली. मुलाच्या या प्रयोगांमुळें व उंदीर पकडण्याच्या खेळामुळें विटून

व घाबरून बापानें त्याला क्लासिकल शाळेंतून काढून घेऊन एडिंबरो येथें वैद्यकाचा अभ्यास करण्यास पाठविलें.

पित्याच्या धंद्याचें शिक्षण घेण्यांत डार्विन थोडा वेळ रमला; पण ॲनॉटमीचीं व्याख्यानें त्याला कंटाळवाणीं वाटूं लागलीं. शस्त्रक्रियेचे प्रयोगहि त्याला बघवेनात. एका मुलावर करण्यांत येत असलेली शस्त्रक्रिया पाहून डार्विन खोलींतून पळून गेला! त्या वेळीं गुंगी आणणारा क्लोरोफॉर्म नसल्यामुळें तो मुलगा फोडीत असलेल्या किंकाळया पुढें कित्येक वर्षें तो विसरूं शकला नाहीं. गटेप्रमाणेंच तो वर्गांत फारसें शिकला नाहीं. तो शाळेबाहेरच बरेंचसें शिकला. तो दारू पिई, जुगार खेळे, प्रेम करी. हें सर्व करीत असतां तो आपल्या अजबखान्यांत अधिकाधिक वस्तूंची भर घाली. 'मुलगा डॉक्टर होणें शक्य नाहीं' असें वाटल्यामुळें बापानें त्याला धर्मोपदेशक करावयाचें ठरवून केंब्रिजच्या ख्रिश्चन कॉलेजांत घातलें. या वेळीं तो अठरा वर्षांचा होता. येथें तो तीन वर्षें होता. "हीं तीन वर्षें फुकट गेलीं, वाईट वाटतें. नुसतीं फुकट जातीं तरी बरें; पण प्रार्थना, दारू पिणें, गाणें, पत्ते खेळणें या आणखी गोष्टी त्यात होत्या."

— ३ —

'बीगल' गलबतावरच्या प्रवासानें डार्विनच्या जीवनाला तर नवीन दिशा लावलीच, पण साऱ्या मानवी विचारांचीहि दिशा बदलली. ही युगप्रवर्तक सफर पांच वर्षें चालली होती. गलबतांतून पृथ्वीप्रदक्षिणा करून डार्विननें जीवनाचें कोडें उलगडण्यासाठीं निसर्गाच्या अनेक वस्तू जमा केल्या, सृष्टींत सर्वत्र विखुरलेले नाना नमुने त्यानें पाहिले, गोळा केले व त्यांचें वर्गीकरण केलें. त्याची दृष्टि शास्त्रज्ञाची होती, त्याचें मन व त्याची बुद्धि हीं कवीचीं होतीं. त्यानें जमविलेले प्राण्यांचे हजारों नमुने एकत्र जोडून त्यांतून सुसंगत अशी प्राण्यांच्या उत्पत्तीची मीमांसा करून उपपत्ति लावली व त्यांच्या विविधतेचें विवेचन केलें. आपलें संशोधन आपणास कोठें घेऊन जात आहे याची तो गलबतावर होता तेव्हां त्याला नीटशी कल्पना आली नव्हती. प्रत्येक खऱ्या निरीक्षकाप्रमाणें आधींच मनांत एकादी मीमांसा निश्चित करून तो निघाला नाहीं. प्रत्यक्ष वस्तुस्थिति पाहून तो सिद्धान्ताकडे

जाई. वीस वर्षें त्याचें संशोधन अखंड व परिश्रमपूर्वक चालू होतें. त्यानें अपरंपार माहिती मिळविली व तिची निःपक्षपातपणें छाननी केल्यावर त्याला उत्क्रान्तीची महत्त्वाची उपपत्ति आढळून आली.

हें सारें जगत् म्हणजे डार्विनपुढें एक प्रश्नचिन्ह होतें, एक गूढ व बिकट अशी समस्या होती. तो जणूं गणितातलाच एक प्रश्न होता, भूमितींतील एक सिद्धान्त होता. तो सोडवावयास पाहिजे होता. त्यांत पुष्कळच अज्ञात राशी होत्या. जग हें कौतुक करण्यासारखी कलाकृति नसून तें एक गणित आहे, एक कोडें आहे, असें डार्विनला वाटे. वाङ्मयाची त्याची आवड कधींच नष्ट झाली होती; पण त्याचें विज्ञानच त्याला वाङ्मयाप्रमाणें, कलेप्रमाणें, संगीताप्रमाणें झालें होतें. मानवांविषयींचे त्याचें प्रेम कधींहि नष्ट झालें नाहीं. विज्ञानाखालोखाल त्याला न्यायाविषयीं उत्कट आस्था वाटे. एकदा त्याचें 'बीगल' गलबत ब्राझिल येथें थांबलें. कांहीं नीग्रो गुलाम पळत होते. त्यामध्यें एक स्त्रीहि होती. पाठलाग करणाऱ्यांच्या हातीं लागूं नये म्हणून त्या म्हाताऱ्या नीग्रो स्त्रीनें कड्यावरून उडी घेतली. तिचे तुकडे तुकडे झाले! डार्विन लिहितो, "एकाद्या पोक्त व पावन रोमन स्त्रीनें जर असें केलें असतें तर 'केवढें हें स्वातंत्र्यप्रेम!' असें म्हटलें गेलें असतें; पण तेंच नीग्रो स्त्रीनें केलें म्हणून त्याचें 'पाशवी हट्टीपणा' असें विकृत वर्णन करण्यांत आलें!" गुलामगिरीवर अन्यत्र टीका करतांना तो लिहितो (आणि त्यानें अमेरिकेंतील सिव्हिल वॉरच्या आधीं वीस हें वर्षें लिहिलें होतें हें लक्षांत घेतलें पाहिजे), "गुलामांच्या धन्याकडे करुणेनें व आस्थेनें पण गुलामांकडे मात्र निष्ठुरतेनें पाहणारे लोक स्वतः गुलामांच्या स्थितींत असल्याची कल्पना करून पाहतील तर गुलामांची स्थिति किती निराशाजनक असते हें त्यांना कळून येईल. आशेचा किरण नाहीं, उत्साह नाहीं, आनंद नाहीं, जीवनांत कधीं कांहीं फरक पडण्याची वा स्थिति सुधारण्याची तिळमात्र शक्यता नाहीं! किती केंविलवाणें जीवन! आपलीं मुलेंबाळें व पत्नी आपणापासून केव्हां वियुक्त केलीं जातील, ओढून नेलीं जातील याचा नेम नाहीं, क्षणोक्षणीं ताटातूट होण्याची चिंता सतावीत आहे अशी परिस्थिति डोळ्यांसमोर आणा. ही माझी पत्नी, 'हीं माझीं मुलेंबाळें!', असें म्हणण्याचा निसर्गानेंहि न नाकारलेला गुलामांचा हक्क हिरावून घेऊन त्याची लाडकीं मुलें–बाळें, त्यांची प्रियतम पत्नी, यांची गुराढोराप्रमाणें अधिकांत

अधिक किंमत देणारांना विक्री करण्यांत येते! आणि तीहि कोणाकडून! तर शेजाऱ्यावरहि आपल्याइतकेंच प्रेम करण्याचा आव आणणाऱ्यांकडून! ईश्वरावर श्रद्धा ठेवणारे, त्याच्या इच्छेप्रमाणें पृथ्वीवर सर्वांनीं वागावें असें उपदेशिणारेच या प्रकाराचे पुरस्कर्तें असावे, त्यांनीं त्याचें समर्थन करावें व 'यांत काय आहे!' असें म्हणून उडवाउडवी करावी हें केवढें आश्चर्य!"

'बीगल' मधून सफर करीत असतां मानवप्राण्यांची उत्पत्ति कसकशी होत गेली, हें शोधून काढण्यासाठीं ज्याप्रमाणें त्यानें बारकाईनें निरीक्षण चालविलें होतें, त्याप्रमाणेंच मानवाच्या दुःखाकडेहि त्याची बारीक नजर होती. त्याकडे तो काणाडोळा करीत नव्हता, करुणेनें पाहत होता.

सफरीहून परत आल्यावर त्यानें आपली भाची एम्मा वेजवुड हिजशीं विवाह केला. त्याला पुढें दहा मुलें झालीं. या मुलाचे खरे पूर्वज कोण याचाहि शोध तो करीतच राहिला. त्यानें खेड्यांत एक घर खरेदी केलें; त्याच्याभोंवतीं विस्तृत बगीचा होता. सुदैवानें त्याला पोटासाठीं काम करण्याची अवश्यकता नव्हती. त्याच्या वडिलांनीं भरपूर मिळवून ठेवलें होतें. आपलीं मुलें कांहींहि कष्ट न करतां नीट जगूं शकतील, आळसांत राहूं शकतील अगर आपल्या उज्ज्वल प्रतिभेची व अपूर्व बुद्धिमत्तेची करामत दाखवूं शकतील अशी सोय त्यांनीं करून ठेवली होती. चार्लस डार्विन आपल्या प्रतिभेच्या पूजनांत रमला.

लग्न करण्याच्या किंचित् आधीं त्याची प्रकृति बरीच खालावली होती, ती कधींच सुधारली नाहीं. तो जवळजवळ चाळीस वर्षें आजाऱ्यासारखाच होता, तरीहि त्यानें एकट्यानें दहा माणसांइतकें काम केलें! प्रथम त्यानें 'बीगल'वरून केलेल्या प्रवासाचें इतिवृत्त प्रसिद्ध केलें. हें पुस्तक शास्त्रीय असूनहि एकाद्या मनोरंजक कादंबरीप्रमाणें रसाळ वाटतें. हरएक गोष्ट लिहितांना त्याच्या डोळ्यांसमोर एकच ध्येय असे. लिहिलेलें सर्वांना समजेल अशी भाषाशैली तो वापरी. तो लिहितो, "लहान लहान जुने सॅक्सन शब्द वापरणें चांगलें. 'एकादें लहान रोपटें अफू घेतल्याप्रमाणें जणूं गुंगीत असतें आणि अशा वृत्तीनेंच तें जगतें,' असलीं वाक्यें कानाला इंग्रजी नाहीं वाटत.

त्याचें भाषांतर करावेंसें वाटतें; पण हेंहि खरें कीं, भाषाशैली अति सोपी, सहजसुंदर व प्रासादिक असावी यासाठीं फार श्रम घेणें बरें नाहीं. वाग्वैभव केवळ निरुपयोगी असेंहि नाहीं. लिखाणांत परमोच्च वक्तृत्व असूनहि फारसा आटापिटा न करतां प्रसाद व सहजसुंदरता दोन्ही साधतां येतील तर चांगलेंच."

भाषा सहजसुंदर व स्वच्छ आणि विशद अर्थ सांगणारी व्हावी म्हणून डार्विननें खूप प्रयत्न केले. सुंदर लिहिणें प्रथम त्याला जड जात होतें. पण अविरत प्रयत्नानें त्यानें स्वतःची एक विशिष्ट भाषाशैली बनविली. मोकळी, सोपी व मनोहर भाषाशैली त्यानें निर्मिली. त्याच्या जीवनाचें ब्रीदवाक्य 'सतत प्रयत्नानें कार्य होतें' हें होतें. काव्याविषयीं आपणास फार आवड नसल्याबद्दल त्याला वाईट वाटे, तरीहि पण 'बीगलवरील प्रवास' या त्याच्या पुस्तकांत कवितांचे पुष्कळ उतारे आहेत. ब्राझिलचें पुढील वर्णन पाहा:—"येथील जमीन म्हणजे एक विस्तृत, अनिर्बंध, भव्य, भीषण व वैभवसंपन्न असें निसर्गाचें जणूं उष्ण मंदिरच आहे. पण निसर्गाच्या या घराचा कबजा मानवानें घेतला आहे. येथें मानवानें ठायीं ठायीं सुंदर घरें व लहान लहान बागा निर्मिल्या आहेत." ब्राझिलची भूमि पाहून त्याला प्रथम काय वाटलें तें पाहा: तो म्हणतो, "आनंदाच्या व आश्चर्याच्या वादळांत मी बुडून गेलों" व मग लिहितो, "नारिंगें, संत्रीं, नारळ, ताड, आंबे, केळीं, वगैरेंचीं बाह्य रूपें पृथक् पृथक् आहेत. पण या भिन्न भिन्न वृक्षवनस्पतींचीं सहस्रावधि सौंदर्यें शेवटीं एक भव्य अशी सौन्दर्यकल्पना देतात आणि वेगवेगळीं सुंदर रूपें विलीन होऊन एकच सौंदर्यकल्पना मनात राहते. पण ही विविधता गेली तरीहि अस्पष्ट पण अत्यंत सुंदर अशा आकृतींचीं चित्रें हृदयफलकावर राहतातच."

'बीगलवरील प्रवास' हें पुस्तक लिहून शंभर वर्षें होऊन गेलीं तरीहि तें पुस्तक अरबी भाषेंतील सुरस गोष्टींप्रमाणें गोड वाटतें. डार्विनचें यानंतरचें पुस्तक मात्र केवळ शास्त्रीय होतें, त्यात निसर्गाच्या स्वरूपाविषयीं बरीच माहिती असून समुद्रांतल्या बार्नेकल नामक प्राण्यांचीहि हकीकत आहे. हा प्राणी आपल्या शिंपल्यांत डोक्यावर उभा असतो व आपल्या पायांनीं तोंडांत अन्न फेंकतो. हें पुस्तक डार्विन आठ वर्षें लिहीत होता. त्याच्या आयुष्यांतलीं

हीं आठ वर्षे अत्यंत उपयोगी कामांत गेलीं. या एका विषयाला सतत आठ वर्षे चिकटून बसून डार्विननें स्वतःमध्येंहि जणूं बार्नेकलची चिकाटी बाणवून घेतली. असल्या विषयावर निरर्थक इतके प्रयत्न करण्याबद्दल डार्विनचे मित्र त्याची खूप टिंगल करीत; पण डार्विन हळूहळू 'सर्वांत मोठा सृष्टिज्ञानी व निसर्गाभ्यासी' अशी आपली प्रतिष्ठा प्रस्थापित करीत होता व आपल्या आयुष्यांतल्या सर्वांत मोठ्या कामासाठीं आपलें मन--आपल्या मनाचे स्नायू--मजबूत करीत होता.

हीं आठ वर्षे किती मोलाचीं! तो सारखा माहिती मिळवीत होता व चिकित्सक बुद्धीनें त्या माहितींतून सत्य शोधीत होता, निवडानिवड करीत होता. 'निरनिराळ्या जातींची उत्पत्ति आणि मानवाची उत्क्रांति (मानवाचा अवतार)' यांसंबंधींची आपली उपपत्ति पूर्णावस्थेस नेऊं पाहत होता.

— ४ —

ग्रीकांना व रोमनांना उत्क्रांतीचें तत्त्व अज्ञात नव्हतें हें आपण एपिक्यूरस-वरील प्रकरणांत पाहिलेंच आहे. पण ख्रिश्चन धर्म येतांच उत्क्रांतीचा विसर पडून बायबलमधील सृष्ट्युत्पत्तीची कल्पित कथा खरी मानली जाऊं लागली. गॅलिलीच्या कल्पनाप्रिय कोळ्यांच्या संगतींत मानवजात जणूं शास्त्रीय दृष्टि विसरून गेली, गमावून बसली! ती शास्त्रीय दृष्टि परत येण्यास व तिला गति मिळण्यास अठराशें वर्षे लागलीं. जगन्निर्मितीबाबतच्या ज्यूडो-ख्रिश्चन कल्पनेनें पाश्चिमात्य जगावर इतका परिणाम केला होता कीं, डार्विननें आपली उत्क्रान्तीची कल्पना—उत्क्रांतीची उपपत्ति मांडली तेव्हां तो सृष्टिनिर्मात्या ईश्वराचा खून करीत असल्यासारखा भासला. लोकांना तो खुनी वाटला. मनुष्याच्या अमर आत्म्याच्या मनोहर कथेचा डार्विन जणूं वध करीत होता! तें मधुर काव्य तो मातीस मिळवीत होता! प्रत्येक जण आपला तिरस्कार करील हें डार्विननें अपेक्षिलेंच होतें. हार्वर्ड येथील स्नेही प्रोफेसर असाग्रे यांना लिहिलेल्या पत्रांत डार्विन म्हणतो, "मला तुम्हांस प्रामाणिकपणें सांगावेंसें वाटतें कीं, रूढ कल्पनेहून वेगळ्या निर्णयाप्रत मी आलों आहें. निरनिराळे प्राणी अलग अलग निर्माण करण्यांत आलेले नसून ते सारे

परंस्परावलंबी आहेत. ...... हें वाचून तुम्ही माझा तिरस्कार कराल हें तर खरेंच; पण मी तुमच्यापासून माझा निर्णय लपवीन तर मी प्रामाणिक कसा राहूं शकेन?" त्याच्या प्रतिभेनें व बुद्धीनें लावलेला शोध सर्व जगाला ज्ञात करून देईतों त्याचा प्रामाणिकपणा त्याला स्वस्थ बसूं देईना.

'Origin of Species' हा ग्रंथ लिहिण्यापूर्वी वीस वर्षें म्हणजे १८३९ सालींच त्यानें उत्क्रांतीची चालचलाऊ उपपत्ति लोकांपुढें मांडली होती. त्या रूपरेषेचा विस्तार करून १८४२ सालीं त्यानें पस्तीस पृष्ठांचा निबंध लिहिला व तोच पुढें वाढवून १८४४ सालीं २३० पृष्ठांचा केला. हा सर्व काल व पुढील पंधरा वर्षे ही मीमांसा पारखून व पडताळून पाहण्यांत व तिच्यांतील दोष काढून टाकण्यांत खर्चून जे नवे निर्णय निघाले त्यांचें तो पुनः पुनः पर्यालोचन करीत होता. डार्विन स्वतःच स्वतःचा निर्भीड टीकाकार असल्यामुळें विरोधकांचे आक्षेप आधींच कल्पून त्यांना बिनतोड उत्तरें देण्यास तयार होता.

१८५८ सालीं डार्विन आपल्या संशोधनाला शेवटचें स्वरूप देत असतां अकस्मात् एके दिवशीं त्याला दिसून आलें कीं, दुसऱ्या एका शास्त्रज्ञानें नकळत आपली सारी विद्युत् चोरून घेतली. जूनच्या अठराव्या तारखेस त्याचा मित्र आल्फ्रेड रसेल वॅलेस यानें उत्क्रांतीवरचा एक स्वतंत्र लेख डार्विनकडे पाठविला व 'मीं मांडलेल्या उपपत्तीवरील तुमचें प्रामाणिक मत कळवा, तीवर मनमोकळी टीका करा' असें त्याला कळविलें. वॅलेस अमेरिकेंत होता. डार्विन वीस वर्षें प्राण्यांच्या उत्पत्तीचें संशोधन करीत होता हें त्याला माहीत नव्हतें; त्यामुळें 'उत्क्रांतीच्या उपपत्तीचा संशोधक' म्हणून जगाला आपली ओळख करून देण्याबद्दल त्यानें डार्विनला विनंति केली. अशा परिस्थितींत डार्विननें काय करावें? त्या विषयावरील आपल्या संशोधनाच्या व लिखाणाच्या अगदीं बरहुकूम वॅलेसचें संशोधन, तसेंच लिखाणहि होतें, हें पाहून सुप्रसिद्ध भूगर्भशास्त्रवेत्ता डॉ० लायल यास डार्विननें लिहिलें, "असा योगायोग मीं कधींच पाहिला नाहीं. किती आश्चर्यकारक योगायोग! १८४२ सालीं मीं लिहिलेलें हस्तलिखित वॅलेसजवळ असतें तर याहून अधिक संक्षिप्त सारांश त्याला काढता येणें अशक्य होतें." एकदां तर सारें श्रेय वॅलेसलाच द्यावें असें त्याला वाटलें. "क्षुद्र वृत्तीनें मी वागलों अशी शंकाहि

कोणास येऊं नये म्हणून माझीं सर्व हस्तलिखितें जाळून टाकावींसें मला वाटतें" असे त्याने लायलला लिहिलें. त्यावर लायलनें उत्तर दिलें, "तुम्ही आपले सर्व विचार ताबडतोब प्रसिद्ध करा. स्वतःच्या बाबतींत अन्याय नका करून घेऊं. आपल्याआधीं वीस वर्षें डार्विननें ही उपपत्ति अजमावली होती हें ऐकून वॅलेसला वाईट न वाटतां आनंदच होईल." शेवटीं लिनयिन सोसायटीसमोर आपलें व वॅलेसचें संयुक्त संशोधन म्हणून ही उपपत्ति मांडण्याचें त्यानें ठरविलें. तथापि उदारपणांत आपणहि मागें नाहीं हें "ज्या उपपत्तीचें संपूर्ण श्रेय वस्तुतः डार्विनचें आहे तिच्या श्रेयांत मलाहि भाग मिळावा हें माझें केवढें सुदैव!" असें जाहीर करून वॅलेसनें दाखविलें! अशा रीतीनें ही सुप्रसिद्ध चर्चा थांबली. प्रत्येकानें आपल्या कीर्तीचा प्रश्न बाजूस सारून दुसऱ्याचें नांव मोठें व्हावें म्हणून मोठें मन दाखविलें.

शास्त्रज्ञांसमोर आपली उपपत्ति मांडल्यानंतर ती छापून काढण्यासाठीं डार्विन आपलें हस्तलिखित झपाट्यानें तयार करूं लागला. २४ नोव्हेंबर १८५९ रोजीं पुस्तकाची पहिली आवृत्ति तयार झाली. पुस्तकाला "नैसर्गिक निवडीनें प्राण्यांची उत्पत्ति किंवा जीवनार्थकलहांत अधिक कृपापात्र प्राण्यांच्या जातींचें टिकून राहणें" असें लांबलचक व अवजड नाव देण्यांत आलें होतें.

ज्या शास्त्रीय पुराव्याच्या महापुरानें ॲडम व ईव्ह यांची गोष्ट, स्वर्गांतील बाग, वगैरे सारें पार वाहून गेलें, त्याचा थोडक्यात गोषवारा असा: या जगांत जिवंत प्राणी सारखे अमर्यादपणें वाढत असतात, पण अन्नपुरवठा अगर राहण्याची जागा या मात्र मर्यादितच असल्यामुळें सर्व सजीव प्राण्यांत जीवनार्थकलह अहोरात्र चाललेला असतो. परिस्थितीशीं झगडण्यास अधिक समर्थ असणारे टिकतात, बाकीचे मरतात. उत्क्रांतिवादी याला 'समर्थ असतात ते टिकतात' असें म्हणतात. पण आजबाजूची परिस्थिति देखील बदलत असतेच: समुद्र असतो तेथें जमीन होते, जमीन असते तेथें समुद्र येतो, पर्वत जाऊन त्यांच्या जागीं दऱ्या येतात, बर्फ असतें तेथेंच एकदम उष्णता पुढें येते. आजूबाजूच्या नैसर्गिक जगांत हे फरक होत असल्यामुळें प्राण्यांसहि स्वतःमध्यें व स्वतःच्या राहणींत बदलत्या परिस्थितींत जगतां यावें म्हणून फेरफार करावे लागतात. हे फरक कधीं कधीं क्रांतिकारक होतात.

एका प्राण्यांतून दुसरेच प्राणी जन्माला येतात; असें करूनच ते जगूं शकतात. ज्या पद्धतीनें ही उत्क्रांति होत जाते, तिला दुसरें चांगलें नांव सांपडत नसल्यामुळें 'नैसर्गिक निवड' हें नांव देण्यांत येत असतें. नैसर्गिक निवड म्हणजे ज्या प्राण्यांना जिवंत राहण्यासाठीं फरक करावे लागले व ते ज्यांनीं केले तेच जगावे, टिकावे, असेंच जणूं निसर्गानें ठरविलें. त्या फरकांची जगण्याला क्षम म्हणून निसर्गानेंच निवड केली व नवीन परिस्थितींत जरूर न राहिलेल्या बाबी हळूहळू काढून टाकण्याचेंहि निसर्गानें नक्की केलें.

उत्क्रांतीची उपपत्ति थोडक्यात अशी आहे: 'जीवनाची अमर्याद वाढ होत असल्यामुळें जीवनार्थकलह सुरू असतो व त्यांत अधिक क्षम व समर्थ असणारे टिकतात, बाकीच्या प्राण्यांच्या जाती नष्ट होतात; एकींतून दुसरी उत्पन्न होते.' या उपपत्तीप्रमाणें आपण जे अगदीं खालचे प्राणी म्हणून समजतों, त्यांच्यापासून मानव फार दूर नाहीं. त्यांचीच पुढची पायरी म्हणजेच मानवप्राणी. ही पुढची पायरी डार्विननें "मानवाचा अवतार" या पुस्तकांत प्रतिपादिली आहे. मानवप्राणी माकडापासून उत्क्रांत झाला या उपपत्तीचें श्रेय वा अश्रेय सामान्यतः डार्विनला देण्यांत येत असतें; पण खरोखर पाहिल्यास डार्विननें असें काहीं एक म्हटलेलें नाहीं. त्यानें जास्तींत जास्त इतकेंच सांगितलें कीं, मानव व वानर हे एकाच पूर्वजापासून केव्हां तरी जन्मले. हा प्राचीन प्रागैतिहासिक पूर्वज आज अस्तित्वांत नाहीं. म्हणजेच वानर हा आपला आजोबा नसून भाऊ आहे. डार्विनच्या मतें प्राण्यांतील परमोच्च विकास मानवात झाला आहे. सर्वांत जास्त विकसित प्राणी म्हणजे मानव. 'समर्थांचें अस्तित्व' या कायद्याप्रमाणें त्यानें इतर प्राण्यांवर प्रभुत्व मिळविलें आहे. समर्थ व क्षम या शब्दांचा डार्विनचा अभिप्रेत अर्थ 'अति बलाढ्य किंवा अति निर्दय' असा नाहीं. खालच्या प्राण्यात कोणीं टिकावयाचें व कोणीं नष्ट व्हावयाचें हें बलाबलानेंच (शारीरिक झटापटीनेंच) ठरतें. पण मानवांच्या बाबतींत वैयक्तिक झगडा नष्ट होऊन सर्व मानवप्राण्यांचें सामाजिक सहकार्यच संरक्षणाचें साधन बनतें. स्वार्थी आक्रमणशीलता जाऊन तिच्या जागीं हळूहळू अन्योन्य-साह्य व सहकार्य यांचें तत्त्व रूढ होतें. मानवी जीवनाला अतःपर जंगलाचा कायदा लावणें

बरें नाहीं. व्यक्तींचें जीवन नीट राहावयाला पाहिजे असेल तर सर्व मानवजातीनें नीट जगावें यासाठींच खटपट केली पाहिजे. सर्व मानवांच्या जीवनार्थ झटण्यांतच व्यक्तीच्याहि संरक्षणाचा परमोत्तम मार्ग आहे, ही गोष्ट हळूहळू का होईना पण आपण शिकत आहों.

म्हणून मनुष्य हा सामाजिक प्राणी आहे. तो ईश्वराची प्रतिकृति म्हणून जन्मलेला नाहीं. तो पडलेला--अधोगत—देवदूत नसून उत्क्रान्तीच्या सोपानानें उन्नत होत असलेला रानटी पशु आहे, रानटी मानव आहे. त्याचा मार्ग उत्तरोत्तर वरचा आहे. तो अधिक खालीं नाहीं जाणार. या जगात जें जें सजीव आहे. जें जें जीवनार्थ धडपडत आहे, त्या त्याशीं मानवाचा संबंध आहे. त्याच्यामध्यें पशुत्वाचे व लाखों, क्रोडों प्राण्यांचे अंश आहेत. जीवन उत्क्रांत होत असून मनुष्याला अद्यापि एक प्राणी म्हणूनच म्हणावें लागेल; पण प्रेमाची अपरंपार--अनंत—शक्यता असणारा हा प्राणी आहे.

— ५ —

खुद्द डार्विनचेंच जीवन त्याच्या उपपत्तीचा सबळ व उत्कृष्ट पुरावा आहे. त्याची प्रेमशक्ति सारखी वाढत होती. त्याच्या उपपत्तीसाठीं त्याच्यावर टीका, निंदा, शिव्याशाप, यांची लाखोली वाहण्यांत आली तरी त्यानें निंदकांविरुद्ध एकहि कटु शब्द उच्चारला नाहीं. आपल्या सहकाऱ्यांशीं त्याचा एक नम्र साहाय्यक म्हणून तो वागे; त्यानें त्यांच्यावर कधींहि वरचष्मा गाजविला नाहीं. ज्यांचीं नांवेंहि कोणास माहीत नसत. अशा प्रयोग-शाळेंतल्या कामगारांविषयीं व माहिती गोळा करून देणाऱ्यांविषयीं तो फार कृतज्ञता दाखवी. ते अमोल मदत देत. डार्विन त्यांना विज्ञानशास्त्रांतील हमाल म्हणे. प्राणी कितीहि क्षुद्र असला तरी तो त्याचा तिरस्कार करीत नसे. प्राणिमात्र त्याला पवित्र वाटे. बुद्धाला साऱ्या विश्वाविषयीं अपार प्रेम वाटे, तसाच थोडासा डार्विनचा प्रकार होता. तो बुद्धाच्याच जातीचा होता; त्याला सारें जीवन पवित्र वाटे. सजीव प्राण्याविषयीं बोलावें तसें तो झाडेंमाडें, तृणवेली, वगैरेंविषयींहि बोले. त्यानें लावलेल्या एकाद्या झाडाचें अगर गवताचें रोंवलेलें अगर खोंवलेलें पान वर आलें कीं त्याची ती हुषारी पाहून तो म्हणे, “अरे लबाडा, वर आलास? मीं तुला अडकवून, डांबून ठेवलें

तरी वर डोकें काढलेंसच अं!" अशी त्यांची प्रेमानें खरडपट्टी काढून तो त्यांच्यावर रागावावयाचा. कांहीं बीजांकुरांवर प्रयोग करतां करता तो चिडून म्हणे, "हीं भिकारडीं चिमुरडीं मला पाहिजे त्याच्या नेमकें विरुद्ध करतात! चावट कोठचीं!" प्रत्येक रोपटें त्याला जणूं व्यक्तित्वसंपन्न पवित्र व्यक्तीच वाटे. फुलांचें सौंदर्य पाहून त्याची जणूं समाधि लागे! फुलांपासून मिळणाऱ्या निर्दोष व निरुपम आनंदाबद्दल तो सदैव कृतज्ञता प्रकट करी. तो फुलांच्या पाकळ्यांना अगदीं हलुवारपणें स्पर्श करी, त्या वेळीं त्याच्या डोळ्यांत एकाद्या संताचें अपरंपार प्रेम वा एकाद्या बालकाचें निष्कपटी कुतूहल दिसे. त्याचा खिश्चन धर्मावर विश्वास नव्हता तरीहि त्याचा स्वभाव मात्र खिस्तासारखा होता. तो म्हणे, "ईश्वरानें कोणाला एकादा ग्रंथ दिला यावर माझा तरी विश्वास बसत नाहीं." तो अज्ञेयवादी होता. अपरंपार दुःखानें भरलेल्या या जगाची रचना एकादा ज्ञानी ईश्वर करणें शक्य आहे का असें तो विचारी. तो लिहितो, "या जगाच्या पाठीमागें कांहीं कल्याणावह योजना तर नाहींच नाहीं, पण मुळीं योजनाच असेलसें वाटत नाहीं." पण तो केवळ नास्तिक नव्हता. तो जपून जाणारा होता. तो या निर्णयाप्रत आला कीं, "हा सारा विषय मानवी बुद्धीच्या अतीत आहे. मनुष्यानें आपलें कर्तव्य करावें म्हणजे झालें."

डार्विनच्या मतें त्याचें स्वतःचें कर्तव्य आमरण सारखें श्रमत राहणें हें होतें. आपल्या बांधवांना ज्ञानाचा प्रकाश देण्यासाठीं अविरत झटणें हें त्याचें कर्तव्य होतें. पण श्रम करतांना त्याला वरचेवर दोन अडथळे येत. तो सुखी व संपन्न असल्यामुळें त्याला फार श्रमण्याची संवय नव्हती. प्रकृति बरी नसल्यामुळें काबाडकष्ट करणें त्याला अशक्यच होई. पण आपल्या इच्छाशक्तीच्या जोरावर त्यानें या दोन्हीं अडचणींवर जय मिळविला. सुखासीनतेची संवय त्यानें सोडून दिली. पत्नीच्या प्रेमळ सेवापरायणतेमुळें शारीरिक व्यथेची व आजाराची अडचण दूर झाली. डार्विनची पत्नी अत्यंत दयाळू व फार थोर स्त्री होती. डार्विननें तिला 'अत्युत्तम व अति प्रेमळ' असें संबोधून अमर केलें आहे. "अशी पत्नी लाभल्यामुळेंच मी ताण सहन करूं शकलों व शेवटपर्यंत नीट धडपड चालविली" असें डार्विननें लिहिलें आहे. डार्विन नेहमीं आजारी आजारीच असावयाचा; त्याच्या पत्नीनें त्याच्या या

प्रकृतीला अनुरूप असें शांत जीवन ठेवलें; कधीं आदळआपट नाहीं, कधीं रागावारागावी नाहीं. ती त्याला उत्साह देई, पण टोंचीत नसे. 'भराभरा आटपा' असें ती कधीं म्हणत नसे. त्याच्या प्रयोगांशीं ती परिचित राही, प्रुफें तपासण्याच्या कामीं त्याला मदत करी व त्याला शारीरिक वेदना होत तेव्हां त्याची इतक्या प्रेमळपणें व कनवाळूपणें शुश्रूषा करी कीं, तो म्हणे, "तुझ्याकडून शुश्रूषा करून घेण्यासाठीं आजारी पडणेंहि बरें."

एम्माचें डार्विनवर जितकें प्रेम होतें तितकेंच डार्विनचें एम्मावरहि होतें. दोघांचें हें अन्योन्य प्रेम त्यांच्या मुलांच्या स्वभावांत पूर्णपणें उतरलें होतें. पूर्णपणें विकसित अशा जीवांचें हें कुटुंब होतें. त्याचें संवर्धन फारच उत्कृष्टपणें झालें होतें. तीं मुलें आनंद, सौम्यता व अन्योन्य-आदर अशा वातावरणात वाढलीं होतीं. आदरभाव म्हणजे काय ? दुसऱ्यांच्या भावनांची सहानुभूतिपूर्वक जाणीव. सानुकंप विचार म्हणजेच सद्भाव, आदरभाव. डार्विनच्या चारित्र्याची ही मुख्य किल्ली आहे. वयाच्या ऱ्याहत्तराव्या वर्षी त्यानें लंडनला शेवटची भेट दिली. आपल्या एका मित्राच्या घरांत शिरत असतां त्याला घेरी येऊं लागलीसें पाहून त्याचा मित्र बाहेर गेलेला होता तरी आचाऱ्यानें त्याला 'आंत या ना?' असें म्हटलें; पण बटलरला कशाला उगीच त्रास, या भावनेनें डार्विन आंत न जातां घडपडत बाहेर गेला व गाडी पाहूं लागला. पुढें तीन महिन्यांनीं म्हणजे १८८२ सालच्या मार्चच्या सातव्या तारखेस तो मरण पावला. त्याला मरणाची यत्किंचितहि क्षिति वाटली नाहीं. तो मरण्यास तयारच होता. त्याच्या अधार्मिक मतांसाठीं त्याच्या शत्रूंनीं त्याला नरकाचा धनी ठरविलें; पण एका धर्मशील स्त्रीच्या मतें, "तो इतका चांगला होता कीं, तो खात्रीनें स्वर्गासच गेला असला पाहिजे. डार्विनचें ईश्वराशिवाय चालेल, पण त्या सर्वशक्तिमान् प्रभूचें डार्विनशिवाय कसें चालणार ?"

## प्रकरण ६ वें

# कृष्णवर्णीयांचा त्राता अब्राहाम लिंकन

### — १ —

मानवजातीची धार्मिक, सामाजिक व राजकीय स्वातंत्र्याच्या कार्यक्षेत्रांत कसकशी प्रगति होत गेली हें आतांपर्यंत आपण पाहत आलों. किती तरी राष्ट्रें रानटी स्थितींतून सुधारणेच्या आसपास येत आहेत असें आपणास दिसलें. आपल्या काळाबरोबर पुढें न जातां शेंकडों वर्षे मागें रेंगाळत राहणारे, मध्ययुगीन विचारांनीं अंध झालेले व प्रगतीला अडथळा करणारे किती तरी मुत्सद्दी आपणांस अधूनमधून आढळले! पावलें पुढें टाकीत असतांहि दृष्टि मात्र भूतकाळांतच ठेवणारे व ठेवावयास लावणारे ते प्रतिगामी मुत्सद्दी लोकशाहीच्या काळांत पुनः राजशाह्या दृढ करीत, नवप्रकाश येत असतां दुष्ट रूढींनाच सिंहासनावर बसवूं पाहत. अंधळ्यांचे हे अंधळे नेते जगांत धूडगूस घालीत असूनहि मानवजात चुकुनमाकून का होईना, पण न्यायाच्या, सहिष्णुतेच्या, उदारतेच्या व अधिक स्वच्छ आणि सुंदर विचारांच्या अधिकाधिक जवळ जात चालली आहे असें आपणांस आढळलें. आतांपर्यंत आपण आशिया व युरोप यांतच वावरलों. त्यांवरच आपली दृष्टि खिळली होती. आतां आपण अटलांटिक ओलांडून अमेरिकेंत जाऊं या व युरोपातून आणखी पश्चिमेकडे चाललेला संस्कृतीचा प्रवाह पाहूं या.

जगांतल्या विचारहीन लेखकांनीं किती तरी वर्षे अमेरिकेची उगीचच टर उडविली आहे. अमेरिकन लोक असंस्कृत आहेत, त्यांना नीट चालरीत वा रीतभात नाहीं, ते रानटी आहेत, जुन्या जगांतील नबाबी व रुबाबी संस्कृतीच्या मानानें ते फारच मागसलेले आहेत. असें हे लेखक खुशाल लिहितात! तें थोडेंसें खरेंहि असेल; पण त्या टीकेच्या आवाजांत एक प्रकारची कुरुचि, एक प्रकारची अशिष्टता नाहीं का ? त्यांत एक प्रकारचा रानवटपणा दिसत नाहीं का ? अमेरिकेंत वसाहत करणाऱ्यांना अस्तन्या वर सारून रात्रंदिवस अविश्रांत श्रमावें लागलें, जंगलें तोडावीं लागलीं. युरोपांतील आपल्या बांधवांची संस्कृति आपलीशी करून घ्यावयाला त्यांना अवसर तरी कोठें होता ?

युरोपीय संस्कृतींतील सद्गुण अभ्यासावयालाच नव्हे, तर दुर्गुण उचलावयालाहि त्यांना फुरसत नव्हती. त्यांना अठराव्या शतकांतला बराचसा काळ स्वतःचें घर व्यवस्थित करण्यांतच घालवावा लागला. त्या वेळीं युरोपच दुसऱ्यांच्या घरांत लुडबूड करीत होतें. अमेरिकन जरा रानवट व आडदाड दिसले तरी ते युरोपियनांपेक्षां खास अधिक शांतताप्रिय होते. दरबारी चालीरीती त्यांना माहीत नसल्या तरी ते उगीचच कोणाच्या माना कापावयालाहि धांवत नसत. साम्राज्यवादी कवि किप्लिंग युद्धाच्या वैभवाचीं गाणीं अत्यंत सुंदर व अलंकृत शब्दात गातो, तर वाल्टव्हियन ओबडधोबड वाणीनें मानवी बंधुतेचीं गीतें गातो.

एकोणिसाव्या शतकांतील प्रबल राष्ट्रांत अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें हें एकच राष्ट्र खरोखर अनाक्रमणशील राष्ट्र होतें. अमेरिकनांतहि गर्जना करणारे इंडेलहप्प मधूनमधून दिसत, अगदींच दिसत नसत असें नाहीं. मेक्सिकन व स्पॅनिश युद्धांच्या वेळीं अमेरिकेनेंहि लष्करी मूठ दाखविण्याचा बेशरमपणा केलाच. जंगली रानवटपणापासून कोणतें राष्ट्र पूर्णपणें मुक्त झालें आहे? पण विचारहीन स्वार्थांधतेचे प्रकार अमेरिकेच्या बाबतींत कधीं कधीं दिसून आले असले तरी एकंदरींत अमेरिका फारशी युद्धप्रिय होती असें म्हणतां येणार नाहीं.

पण अमेरिकेला एक दुष्ट रोग जडलेला होता, तो म्हणजे गुलामगिरीचा. तो मारून टाकण्यासाठीं अनिच्छेनें तिला एका यादवी युद्धांत—भावांभावांमधल्या निर्दय आणि निष्ठुर युद्धांत—भाग घ्यावा लागला. ती इतिहासांतील अत्यंत दुर्दैवी व दुःखदायक घटना होती. असें घडलें नसतें तर काय झालें असतें, असल्या चर्चा आतां काय कामाच्या? इतिहासांत टाकलेलीं पावलें पुनः बदलून टाकण्यांत काय अर्थ? ही यादवी टाळता आली असती असा युक्तिवाद करण्यांत येतो. ती निःसंशय टाळतां आली असती. हेंच काय, पण जगांतलें कोणतें युद्ध, त्यांतील पुढारी वेगळे असते तर, टाळतां आलें नसतें? त्या त्या युद्धांतील सूत्रधार व प्रमुख पात्रें वेगळीं असतीं तर प्रत्येक युद्ध टळलें असतें. पण ते सूत्रधार मानवीच होते. त्यांच्या ठायीं मानवांचे क्रोध—मत्सर व स्वार्थ—दंभ भरपूर होते. त्यांची दृष्टि संकुचित व मर्यादित असल्यामुळेंच, ते जराहि दूरचें बघत नसल्यामुळेंच, इतिहास जसा घडावासें आपणांस वाटतें

तसा तो घडला नाहीं. भूतकाळाचें पुस्तक पुरें झाले आहे. आतां कितीहि काथ्याकूट केला, त्यांतील कितीहि घोडचुका दाखविल्या तरी भूतकाळातलें एक अक्षरहि बदलणें आतां शक्य नाहीं. पोप म्हणे, ' जें आहे तें योग्यच आहे.' भूतकाळाला हेंच वचन आपण लावूं तर तें बरोबरच ठरेल. भूतकाळांत जें जें घडलें तें तें तसतसें घडण्यावांचून गत्यंतरच नव्हतें. प्राप्त परिस्थितींत तसेंच व्हावयाचें. १८६१ सालचें अमेरिकेंतील अंतर्युद्ध टाळणें अशक्य होतें. पण त्या युद्धानेंहि भूतकाळांतील इतर प्रत्येक युद्धाप्रमाणें भविष्यकाळासाठीं मात्र रक्तानें संदेश लिहून ठेवला आहे, धोक्याची सूचना देऊन ठेवली आहे. भूतकाळ बदलतां येणार नाहीं, भविष्यकाळ मात्र बदलतां येईल. कोणती ती सूचना ! कोणता तो संदेश ! ती सूचना, तो संदेश, हाच कीं, ' कांहीं युद्धें टाळतां येतात, मानवजातीच्या सुधारणेसाठीं युद्ध ही अवश्यक गोष्ट नाहीं. अमेरिकेंतील गुलामगिरी अंतर्गत युद्धामधील रक्तपाताशिवाय रद्द करतां आली असती.' हा संदेश नीट ध्यानीं यावा म्हणून अमेरिकेंतील गुलामगिरीचा इतिहास जरा पाहूं या.

— २ —

कोलंबस प्रथम अमेरिकेंत आला तेव्हां तो तीन वस्तूंच्या शोधात होता : सोनें, बाटविण्यासाठीं माणसें व गुलाम म्हणून विकावयाला मानवी शरीरें. त्याच्या पाठोपाठ स्पॅनिश लोक येऊन इंडियनांना गुलाम करूं लागले. पण इंडियनांना तो ताण सहन होईना आणि म्हणून ( व्हॅन लून् म्हणतो, ) 'एका दयाळू धर्मोपदेशकानें—लॅस कॅससनें—आफ्रिकेंतून नीग्रो आणावे असें सुचविलें. इंडियन गुलामांची जागा भरून काढावी असा त्याचा मथितार्थ. नीग्रो अमेरिकेस बऱ्याच वर्षांपूर्वीं आले होते. पहिले पांढरे यात्रेकरू मॅसेच्युसेट्स्-मध्यें १६२० सालीं प्लायमाउथ येथें व गुलामांचे पहिले यात्रेकरू व्हर्जिनिया-मध्यें जेम्स टाउन येथें उतरले.

उत्तरेकडील संस्थानांना गुलामगिरीचा वीट आला. मॅसेच्युसेट्समध्यें तर १७८३ सालींच गुलामगिरी रद्द करण्यांत आली. इतरहि कांहीं संस्थानांनीं मॅसेच्युसेट्सचे अनुकरण केलें. उत्तरेकडच्यांना कळून आलें कीं, स्वातंत्र्यापेक्षां

दास्यासाठींच अधिक खर्च लागतो. हेंच दाक्षिणात्यांच्याहि डोक्यांत लवकरच आलें असतें. बेंजामिन फ्रँकलिननें हें ओळखलें होतें. तो म्हणाला, "ग्रेट ब्रिटनमध्यें कामगार जितके स्वस्त आहेत तितके आपल्या इकडे गुलामहि स्वस्त नाहींत; कोणींहि गणित करून पडताळा पाहावा. आपण गुलाम विकत घेतला त्या रकमेवरचें व्याज धरा; त्या गुलामाच्या जीविताचें इन्शुअरन्स जमेस धरा; त्याच्या प्राणांची अशाश्वती लक्षांत घ्या; त्याला लागणारे कपडे, त्याला द्यावें लागणारें अन्न, त्याच्या आजारांत करावा लागणारा खर्च, त्यामुळें फुकट जाणारा वेळ, कामाकडे दुर्लक्ष झाल्यामुळें होणारें नुकसान (आणि कितीहि काळजी घेतली तरी, आपला फायदा नाहीं हें माहीत असल्यावर कोणता माणूस मनापासून व लक्ष देऊन काम करील?), गुलामांनीं काम चुकवूं नये म्हणून त्यांच्यावर ठेवलेल्या अवेक्षकांचा खर्च, पुनः पुनः होणाऱ्या चोऱ्यामाऱ्या (गुलाम हे गुलाम असल्यामुळें व गुलाम हे चोरहि असावयाचेच म्हणून या होतच राहणार) या साऱ्या खर्चाची इंग्लंडमधील लोखंडाच्या वा लोंकरीच्या कारखान्यांतील मजुराच्या मजुरीशीं तुलना करून पाहिल्यास लक्षांत येईल कीं, येथील नीग्रोंकडून आपण कितीहि काम करून घेत असलों तरी ते इंग्लंडमधील मजुरांपेक्षां एकंदरीत अखेर महागच पडतात."

दुसऱ्या शब्दांत हेंच सांगावयाचें तर गुलामगिरी फायदेशीर नव्हती. दक्षिणेकडच्यांना ती दरिद्रीच करीत होती. युरोपांतील राष्ट्रें हें पाहत होतीं; एकामागून एक सर्वांनीं गुलामगिरी टाकून दिली. १८६० च्या सुमारास जगांतील बहुतेक सर्व देशांत गुलामगिरी ही एक मृतसंस्था झाली होती; अमेरिकेंतहि ती मृत्युपंथास लागली होती. १८३३ सालीं ग्रेटब्रिटननें आपल्या सर्व भागांतील गुलामगिरी रद्द केली. १८२७ सालीं मेक्सिकोनें सर्वांना मुक्त केलें. फ्रान्सनें १८४८ सालीं, पोर्तुगालनें १८५८ सालीं, रशियाचा झार अलेक्झांडर यानें १८६३ सालीं सर्व गुलामांना मुक्त केलें, भू-दासांना स्वातंत्र्य दिलें. अमेरिकेंतील दक्षिणी संस्थानेंहि पुढल्या पिढींत गुलामगिरी रद्द करावयाला तयार झालीं असतीं; पण नैतिकदृष्ट्या गुलामगिरी वाईट म्हणून मात्र नव्हे, तर आर्थिक दृष्ट्या ती परवडत नव्हती म्हणून. अमेरिकन नीग्रोंचें स्वातंत्र्य: दहा लाख लोकांच्या रक्तानें पवित्र

करण्याची जरुरी नव्हती; हें अंतर्गत युद्ध एक अनवश्यक अशी दुःखद घटना होती.

पण तत्कालीन स्वभावाप्रमाणें हें अंतर्गत युद्ध टाळणेंहि अशक्य होतें. अमेरिकेंतील मोठ्यांतल्या मोठ्या मुत्सद्द्यांनींहि युद्ध व्हावें म्हणूनच प्रयत्न केले. आणि दुःखाची गोष्ट ही कीं, आपण काय करीत आहों हें त्यांनाहि कळत नव्हतें. यांपैकीं सर्वांत मोठा मुत्सद्दी उदात्त चारित्र्याचा पण संकुचित दृष्टीचा अब्राहाम लिंकन होय. तो थोर पण करुणास्पद पुरुष होता. युद्ध होण्याला त्याचीच अप्रबुद्धता बरीचशी कारणीभूत झाली. थोडें शहाणपण त्याच्या ठायीं असतें तर युद्ध होतेंच ना. पण युद्ध सुरू झाल्यावर त्यानें अनुपमेय धैर्य दाखविल्यामुळें यश मिळालें व गुलामगिरी रद्द झाली.

— ३ —

कोणाहि नाटककारानें लिंकनच्या चरित्रापेक्षां अधिक दुःखद संविधानक निर्मिलेलें नाहीं. तो इतिहासांतील अत्यंत महत्त्वाकांक्षी पुरुष होता; पण त्यानें जें जें हातीं घेतलें त्या सर्वांत त्याला अपयशच आलें आणि अखेर जेव्हां यश आलें, तेव्हां तें अपयशापेक्षांहि कटुतर वाटलें. ज्या एकमेव स्त्रीवर त्याचें प्रेम होतें, ती मरण पावली व जिच्याशीं त्यानें लग्न केलें तिला पति सुखी व्हावा यापेक्षां पति कीर्तिमान् व्हावा याचीच चिंता जास्त असे. तो कॉंग्रेससाठीं दोनदां आणि सीनेटसाठीं दोनदां उभा राहिला; पण चारीहि वेळीं पडला. तो धंद्यांत शिरला, पण त्यांतहि त्याला अपयशच आलें. युनायटेड स्टेट्सच्या लॅंड-ऑफिसमध्यें नोकरी मिळावी म्हणून त्यानें अर्ज केला, पण तो नामंजूर झाला. व्हाइस-प्रेसिडेंटच्या जागेसाठीं तो उभा राहिला व अयशस्वी झाला. आणि अखेर जेव्हां तो प्रेसिडेंट म्हणून निवडला गेला, तेव्हां तो अत्यंत शांतिप्रिय असूनहि त्याला अत्यंत रानटी असें युद्ध पुकारावें लागलें! कुटुंबीयांवर त्याचें फार प्रेम होतें; पण दोन मुलें अकालीं मेलीं व त्याला रडावें लागलें! एक तर अगदींच अर्भकावस्थेत वारलें व दुसरें वयाच्या बाराव्यां वर्षी. त्या वेळीं लिंकन प्रेसिडेंट होता. युद्धाची भीषण व गंभीर जबाबदारी खांद्यांवर असतां प्रिय पुत्राच्या मृत्यूचा असह्य व जबरदस्त धक्का त्याला बसला! शेवटीं १८६५ सालीं युद्ध एकदांचें

संपलें. दैवानें विजयानंदाचा व यशाचा पेला भरून आणला. पण तो पेला तो ओंठाशीं आणणार तोंच गोळी घालून कोणीं तरी त्याचा प्राण घेतला. जनरल ली शरण आल्यावर पांचच दिवसांनीं त्याचा खून झाला. खरी ट्रॅजेडी कशी लिहावी हें देवांनीं लिंकनच्या चरित्रानें मानवी नाटककारांना शिकविलें आहे.

— ४ —

मीं वर म्हटलें कीं, लिंकनजवळ शहाणपण कमी होतें. म्हणून हें अन्तर्गत युद्ध झालें. माझ्या म्हणण्याचा अर्थ मला स्पष्ट करूं दे. लिंकन जगांतला एक मोठा मुत्सद्दी होता खरा, तरी पण प्रथम तो राजकारणी होता. त्याला मानवांच्या कल्याणाची तळमळ होती, पण तो स्वतःच्या महत्त्वाकांक्षेला आधीं पूजिणारा होता. तो अभिजात व प्रतिभावान् विचारस्रष्टा नव्हता. तो विचारानें जुन्या वळणाचाच होता. वैयक्तिक सूड घ्यावयाचा असेल, तर त्यासाठीं लढण्यास तो तयार असे. राष्ट्राचा कोणीं अपमान केला अगर राष्ट्रावर कोणीं अन्याय केला, तर त्यासाठींहि लढावयास तो तयार असे. लढाईशिवाय अन्य मार्गच त्याला कधीं दिसत नसे. अन्यायाविरुद्ध हत्यार उपसणे हा एकच मार्ग त्याला शिकविण्यांत आला होता. त्याला धीर धरवत नसे. बुद्ध, कन्फ्यूशियस, टॉल्स्टॉय, यांच्याप्रमाणें त्याला गंभीर व प्रशान्त अशी दीर्घदृष्टि नव्हती.

त्यानें गुलामगिरीचें पाप पाहिलें, पण हें पाप मरणोन्मुख आहे, लवकरच नष्ट होणार आहे, हें मात्र त्यानें ओळखलें नाहीं. आपल्या राजकीय आशा-आकांक्षांच्या धुमाकुळांत जीवनाकडे विश्वव्यापक दृष्टीनें पाहण्याची संवय त्याला लावून घेतां आली नाहीं. तसें करण्यास त्याला वेळहि झाला नाहीं व तसा त्याचा स्वभावहि नव्हता. तो प्रेसिडेंट होण्यास उत्सुक होता; पण आपल्या निवडणुकीमुळें दक्षिणेकडील व उत्तरेकडील संस्थानांमध्यें नक्की युद्ध होणार हें मात्र त्याच्या लक्षांत आलें नाहीं. १८६० सालीं प्रेसिडेंटच्या जागेसाठीं चार उमेदवार उभे होते. गुलामगिरीविरुद्ध जोरदार आणि चढाईचें धोरण अवलंबावें असें म्हणणारा त्यांपैकीं फक्त लिंकनच होता. उत्तरेकडच्यांनीं ढवळाढवळ केल्यावांचूनहि दक्षिणेकडची गुलामगिरी नष्ट

होईल अशी लिंकनचा प्रतिस्पर्धी डग्लस याची श्रद्धा होती. डग्लसची दृष्टि मोठी होती, पण लिंकन हुषार राजकारणपटु होता.

डग्लस निवडला गेला असता तर युद्ध झालें नसतें, गुलामगिरी नैसर्गिक रीत्याच मेली असती; लिंकन इतिहासांत कमी प्रसिद्ध झाला असता, पण अधिक दैववान् ठरला असता. पण संकुचित दृष्टि व वैयक्तिक महत्त्वाकांक्षा यामुळें देशांत मरण व विनाश हीं मात्र त्यानें ओढवून घेतलीं. युद्धाशिवाय जें करतां आलेंच नसतें असें कोणतेंहि भलें त्यानें केलें नाहीं, कोणतेंहि हितमंगल त्याला करतां आलें नाहीं.

जेव्हां लिंकन प्रेसिडेंटशिपसाठीं उभा राहिला, तेव्हां दाक्षिणात्य म्हणाले कीं, लिंकन अध्यक्ष म्हणून निवडून आला तर आम्ही फुटून निघूं, उत्तरेकडच्या संस्थानांपासून अलग होऊं." लिंकन निवडून आला आणि दाक्षिणात्यांनीं दिलेली धमकी खरी केली. त्या अन्तर्गत युद्धाचा इतिहास सर्वांना माहीत आहेच. ती हकीकत येथें सांगण्यांत अर्थ नाहीं. लिंकन गुलामगिरीच्या विरुद्ध होता. पण गुलामगिरी रद्द करण्यासाठीं तें युद्ध नव्हतें. आरंभींचा त्याचा उद्देश बंडखोर संस्थानांना पुनः संयुक्त संस्थानांत आणणें हा होता. प्रेसिडेंट निवडून आल्यामुळें जी गोष्ट झाली होती, ती दूर करण्याकरतां तो हत्यार हातीं घेऊन उभा राहिला. युद्ध सुरू होऊन दोन वर्षें झाल्यावर गुलामगिरीचा प्रश्न अधिक प्रामुख्यानें पुढें आला. युरोपांतील तटस्थ राष्ट्रांची सहानुभूति मिळावी, त्याचप्रमाणें स्वतःच्या राष्ट्राची नैतिक भूमिका अधिकच उच्च दिसावी म्हणून गुलामगिरी रद्द करण्याच्या प्रश्नाला लिंकननें महत्त्व दिलें. दक्षिणेकडचीं संस्थानें केवळ राजकीय बाबीसाठीं भाडत होतीं, तोंपर्यंत युरोपियन राष्ट्रें केवळ तटस्थ होतीं. कांहीं तटस्थ राष्ट्रें तर म्हणत होतीं कीं, अमेरिकेंतील संस्थानें इंग्लंडपासून फुटून निघालीं, त्याचप्रमाणें त्यांना स्वतःच्या संघांतूनहि फुटतां येईल. पण १८६३ च्या जानेवारीच्या पहिल्या तारखेस ही लढाई नीग्रोंना अमेरिकेंत सुरक्षितपणें राहतां यावें यासाठीं असल्याचें लिंकननें जगाला जाहीर केलें. त्याच्या या घोषणेनें जगाची सदसद्विवेकबुद्धि जागी झाली. मागील महायुद्धांत प्रेसिडेंट वुड्रो विल्सन यानें १९१७ सालीं 'जग लोकशाहीसाठीं बिनधोक व निर्वेध करण्यासाठीं हें युद्ध आहे' असें जाहीर करून जगाची सहानुभूति

आपल्याकडे ओढून घेतली, तसेंच लिंकननेंहि केलें होतें. 'नीग्रोंचा उद्धार करावयाचा आहे' या घोषणेमुळें कांहींसा इच्छित परिणाम झाला. त्यामुळें युरोपचीच सदसद्विवेकबुद्धि जागृत झाली असें नव्हे, तर स्वतः लिंकनचीहि विवेकबुद्धि जागृत झाली. हुषार राजकारणी पुरुष आतां उदात्त महापुरुष झाला. 'एका महनीय ध्येयासाठीं झगडणारा' असें तेजोवलय त्याच्याभोंवतीं पसरलें. स्वतःची इच्छा नसूनहि किंवा मनापासून तसें वाटत नसतांहि 'मानव-जातीचा एक परित्राता—उद्धारकर्ता' म्हणून त्याचें नांव इतिहासांत अजरामर झालें.

पण युद्धाला हें नवीन ध्येय मिळालें तरी तें अप्रियच राहिलें. सारींच युद्धें अप्रिय असतात, पण इतिहासकार खरें सांगत नाहींत; उत्तरेकडच्यांचे व दक्षिणेकडच्यांचे किती तरी सैनिक त्याना सोडून जात होते. कोणालाच उत्सुकता वाटत नव्हती. बहुजनसमाजाला युद्ध नको होतें. सक्ति करण्याशिवाय गत्यन्तरच नसल्यामुळें लोकांना कुटुंबांतून बळजबरीनें ओढून नेऊन लढावयास लावण्यांत आलें. हा जो सक्तीचा मानव-यज्ञ चालू होता, त्यांत श्रीमंतांवर मात्र सक्ति नव्हती, हा आणखी एक अन्याय होता. ते शेंदोनशें डॉलर देऊन स्वतः-ऐवजीं दुसऱ्यास मरावयास पाठवीत. यामुळें गरिबांवरच या हत्याकांडाचें सारें ओझें पडलें. त्यांनाच बळी पुरवावे लागत. ही सक्ति अत्यंत अमानुष व निर्दय होती. स्वतःबदली दुसरा एकादा बळी ज्यांना पाठवितां येत नसे, ते या धोरणाविरुद्ध कडक टीका करूं लागले. सक्तीविरुद्ध देशांत सर्वत्र बंडाळी होऊं लागली, दंगेधोपे होऊं लागले. न्यूयॉर्कमध्यें हे दंगे बरेच दिवस चालू राहिले व त्यात हजारों लोक मरण पावले. या अन्तर्गत युद्धांतल्या अनेक लढायांपैकीं नागरिकांची सरकारशीं झालेली लढाई महत्त्वाची असूनहि बहुतेक इतिहासकारांनीं तिचा उल्लेख देखील केलेला नाहीं! युद्धाबद्दल संपूर्ण सत्य सांगणें फायद्याचें नसतें व तें कोणास आवडतहि नाहीं.

हें अन्तर्गत युद्ध ही दुःखद व लज्जास्पद घटना होती, हा कलंक होता. या युद्धामुळें लिंकनचें चारित्र्य उन्नत व धीरोदात्त झालें, पण त्यासाठीं केवढी जबरदस्त किंमत द्यावी लागली! युद्धामुळें सर्वत्र पसरलेल्या व पेटलेल्या प्रक्षुब्ध भावनांमुळेंच शेवटीं त्याचाहि खून झाला व त्यानंतर देशांत सर्वत्र

सामाजिक व राजकीय बेदिली माजली; पण असें होणें स्वाभाविकच होतें. मागल्या महायुद्धानंतर प्रेसिडेंट हार्डिंगच्या कारकीर्दींत आपल्या पिढीनेंहि तीच बेदिली अनुभवली आहे. युद्धांत भाग घेणाऱ्या सर्वच राष्ट्रांची नैतिक दृष्टि युद्धामुळें अधःपतित होते, नैतिक मूल्यें नष्ट केलीं जातात. शांतताकालीं दुर्गुण समजल्या जाणाऱ्या गोष्टी युद्धकाळांत सद्‌गुण मानल्या जातात आणि युद्धकालीं वर तोंड करून सर्वत्र मिरविणारे दुर्गुण युद्धाबरोबर नष्ट न होतां पुढें बरींच वर्षें सर्वत्र वावरत राहतात. अश्रद्धा, नास्तिकता, सिनिसिझम, अप्रामाणिकपणा, पशुता, दुष्टता, खून वगैरेंच्या पायावरच युद्धोत्तर संस्कृति उभारण्यांत येत असते. सिव्हिल वॉर संपतांच लिंकननें आपल्या राष्ट्राला "कोणाशींहि द्वेषमत्सराची वागणूक करूं नका, सारें विसरून जा, सर्वांशीं प्रेमानें व स्नेहानें वागा" अशी सूचना दिली. हे शब्द सुंदर, अमर व उदात्त आहेत, पण वाईट येवढ्याचकरतां वाटतें कीं, ते तो वाजवीपेक्षां पांच वर्षें उशिरानें बोलला.

लिंकनचें जीवन बनविणारे, त्याचें चारित्र्य बनविणारे कांहीं धागे आपण पाहिले. मानवजातीचा तो एक अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण नमुना आहे. त्याच्यामध्यें मर्त्य व अमर्त्य दोन्ही गोष्टींचें मिश्रण आहे. सूर्यप्रकाश व ही खालची माती या दोहोंपासून त्याचें जीवन बनलें आहे. बेदरकार महत्त्वाकांक्षा व व्यापक सहानुभूति दोन्ही त्याच्या जीवनात आहेत; क्षुद्रता व उदात्तता यांचें तो एक चमत्कारिक मिश्रण आहे. निर्दयता व प्रेम दोन्ही त्याच्या ठायीं होतीं. त्याचा पोषाख शेतकऱ्यासारखा असे, पण त्याची वाणी राजाची वाटे. कोणाहीसमोर तो गागरत नसे, त्याची मान खालीं होत नसे. पण पत्नीपुढें मात्र तो नांगी टाकी! राजकारणांत तो कारस्थानें करी, पण इतर सर्व व्यवहारांत तो अत्यंत प्रामाणिकपणें वागे. तो सामान्य मनोबुद्धीचा पण अद्वितीय इच्छाशक्तीचा मनुष्य होता. तो सामान्य जनांपैकींच एक होता. तो सर्वांकडे बंधुभावानें व बंधुप्रेमानें पाही. पण स्वतःच्या वैयक्तिक महत्त्वाकांक्षे-साठीं त्यानें साडेसात लाख लोकांना मृत्यूकडे पाठविलें! मानवजातीचा मोठेपणा व तिचें दुर्दैव यांचें प्रतीक म्हणजे लिंकन.

## प्रकरण ७ वें

# द्वेषविहीन जगाचें ध्येय देणारा टॉल्स्टॉय

— १ —

लिंकनने मोठेपणा कसा मिळविला हें पाहणेंच मोठें कौतुकाचें आहे; पण टॉल्स्टॉयनें आपला मोठेपणा कसा फेंकून दिला, त्याचा कसा त्याग केला हें पाहणें अधिक कौतुकाचें आहे. लिंकन धीरोदात्त धैर्यामुळें श्रेष्ठ पुरुष झाला, तर टॉल्स्टॉय आपल्या अनंत प्रेमामुळें व सौजन्यामुळें आपलें प्रतिष्ठित स्थान सोडून बहुजनसमाजांत जाऊन बसला.

बुद्धाप्रमाणेंच टॉल्स्टॉयहि मोठ्या व श्रीमंत सरदार–घराण्यांत जन्मला होता. त्याच्या पूर्वजांपैकीं एक जण पीटर दि ग्रेटचा मित्र होता. तो यास्नाया पोलिआना (म्हणजे प्रकाशमय दरी) येथें १८२८ सालीं जन्मला. वयाच्या दुसऱ्याच वर्षी त्याची आई वारली, नवव्या वर्षी वडील वारले. त्याला दोन भाऊ होते व दोन बहिणी होत्या. हीं सारीं भावंडें दूरच्या एका आत्याच्या ताब्यांत देण्यांत आलीं, तिचें नांव टारिआना. तिच्या ठायीं अत्यंत थोर असे दोन सद्गुण—प्रेम व गांभीर्यवृत्ति—मोठ्या प्रमाणांत होते. येणाऱ्या–जाणाऱ्या भोळसट यात्रेकरूंशीं फार एकरूप होण्याचा दुबळेपणाहि तिच्या ठायीं होता. ती त्यांना साधुसंत मानी, गूढवादी मानी.

हे यात्रेकरू अनेक गोष्टी सांगत. टॉल्स्टॉयच्या मनावर या गोष्टींचा खूप परिणाम होई. त्याला लागलेली अध्यात्मज्ञानाची गोडी कधींहि सुटली नाहीं. तो दिवसाढवळ्याहि जणूं स्वप्नांत रमे, गूढ चिंतनात मग्न होई! त्याच्या या वृत्तीमुळें त्याची तीव्र बुद्धि कधीं कधीं झांकोळली जाई. तो एकोणिसाव्या शतकांतला अतिश्रेष्ठ महामति होता; पण त्याच्या गूढ गुंजनामुळें त्याच्या मतीचें तेज कमी होई. तो शाळेंत मठ्ठ होता. शाळेंतील शिक्षक तो व त्याचे दोन भाऊ यांच्याविषयीं नेहमीं म्हणत कीं, "सर्जियसच्या ठायीं खूप काम करण्याची इच्छा आहे व कर्तबगारीहि आहे; डिमिट्रीला करण्याची इच्छा आहे, पण क्षमता नाहीं; व लिओला काहीं करण्याची इच्छाहि नाहीं व पात्रताहि नाहीं!"

पण. जीवनाविषयीं त्याची सहसा फारशी कोठें न आढळणारी अत्यंत गंभीर दृष्टि होती. वयाच्या पांचव्या वर्षीच तो अशा निर्णयाला आला कीं, ' जीवन करमणुकीसाठीं नव्हे तर फार मोठ्या जबाबदारीसाठीं मिळालेलें आहे. ' वयाच्या सोळाव्या वर्षीच त्याची सनातन धर्मावरची श्रद्धा उडाली व त्यानें तात्त्विक परिभ्रमण सुरू केलें. तारुण्याच्या वनांतून तो तत्त्वज्ञानासाठीं हिंडत–फिरत होता, प्रयोग करीत होता. मूळच्या धार्मिक श्रद्धेतून तो अज्ञेय–वादाकडे गेला व अज्ञेयवादांतून बौद्धिक शून्यवादाला पोंचला. ( कशावरच त्याची श्रद्धा राहिली नाहीं. ) शेवटीं तो निराश झाला तेव्हां त्याचें वय एकोणीस वर्षांचें होतें.

तो दिसण्यास कुरूप होता, त्यामुळें त्याला असमाधान वाटे. त्याच्या दुःखाचें हेंहि एक कारण होतें. लोकांनीं आपलें कौतुक करावें, आपली वाहवा करावी, असें त्याला फार वाटे. तो आपल्या डायरींत लिहितो, " मी सर्वांना माहीत व्हावा, सर्वांनीं मजवर प्रेम करावें, असें मला नेहमीं वाटे. " पण आपणासारख्या सौन्दर्यहीनास जगांत सुख लाभणें शक्य नाहीं हें तो जाणून होता. त्याचें तोंड खरोखरच गोरिलाच्या तोंडासारखें होतें. बारीक खोल गेलेले डोळे, आंत गेलेलें खोल कपाळ, जाड ओंठ, भलें मोठें नाक, लांबलचक व मोठे कान, अशी त्याची मूर्ति होती. त्याचें शरीर कॅलिबन नांवाच्या भुताचें होते, पण त्या शरीरांतील मन एअरीलच्या मनासारखें दैवी होतें. आपण कुरूप असल्याची जाणीव नष्ट व्हावी म्हणून त्यानें आत्महत्या करण्याचेंहि ठरविलें. पण सुदैवानें त्याचें मन पालटले व स्वच्छंदपणें विलासी जीवन कंठून विरंगुळा मिळविण्यासाठीं तो निघाला. मृत्यूनें कायमची विस्मृति मिळविण्याऐवजीं सुख–विलासानें तो आपणास तात्पुरती विस्मृति पाहूं इच्छीत होता.

आणि असें चाललें असतां एके दिवशीं रूसो त्याच्या हातांत आला. त्याला रूसोचा शोध लागला. हा शोध म्हणजे त्याला त्या वेळीं अत्यंत आवश्यक असें टॉनिकच होतें. रूसो भेटल्यावर स्वतःच्या कुरूपतेबाबत त्याला दुःख वाटेनासें झालें व निसर्गाच्या सौंदर्याकडे त्याची दृष्टि वळली. चर्चच्या धर्माचा त्याग करून तो रूसोच्या धर्माचा उपासक झाला. टॉल्स्टॉय रूसोची

देवाप्रमाणें पूजा करूं लागला. रूसोची लहानशी प्रतिमा करून साधुसंतांच्या मूर्तीप्रमाणें तो ती गळ्यांत घालूं लागला.

रूसोच्या तत्त्वज्ञानानें संस्फूर्त होऊन त्यानें ' रशियन जमीनदार ' ही आपली पहिली कादंबरी लिहिली. त्याला जन्मभर पुरून उरलेला प्रश्नच त्यानें या कादंबरींत गोंविला आहे. थोर पेरिषितांचें ध्येय व बहुजनसमाजाची त्याबाबतची उदासीनता हा तो प्रश्न होय. नेखलडोव्ह नामक एक बडा जमीनदार या कादंबरीचा नायक आहे. तो विद्यापीठांतील शिक्षण सोडून शेतकऱ्यांच्या साह्यासाठीं म्हणून जातो. पण हे सारे शेतकरी कर्तृत्वहीन अशा सर्वसाधारण लोकांप्रमाणेंच असतात; ते स्वतः कांहींच करूं इच्छीत नाहींत. ' आपलें नशीब ' असें म्हणत ते पडून राहतात व आपल्या चाकोरींतून बाहेर पडण्याची इच्छाच त्यांना होत नाहीं. आपणास झोडपणारा धनी ते जाणूं शकतात, पण दया दाखविणाऱ्या धन्याशीं कसें वागावयाचें हें त्यांना समजत नाहीं. ' असला कसला हा मालक ? ' असेंच जणूं त्यांस वाटत असतें. ते त्याच्यापासून दूर राहतात, ' असा कसा हा बावळट ?" असें म्हणून त्याची थट्टा—टिंगल करतात. त्यानें देऊं केलेल्या मदतीकडे ते साशंकतेनें पाहतात. त्याच्याकडे ते फसव्या, लफंग्या, हेरगिरी करणारा, दुष्ट, शठ, मूर्ख, अशा अनेक दृष्टींनीं पाहतात, पण आपला मित्र होऊं पाहणारा, आपला मित्र होण्यासाठीं धडपडणारा हा धनी आहे हें त्याच्या ध्यानात येत नाहीं.

नेखलडोव्ह निराश होतो. तो पियानो वाजवीत बसतो. पण त्याला संगीताची देणगी नसते. त्याच्या बोटांना जें गाणें वाजवितां येत नाहीं तें त्याची प्रतिभा, त्याची कल्पनाशक्ति शब्दांत गुंफते. तो संगीत ऐकतो. अनेक भूतकालीन व भविष्यकालीन संमीलित ध्वनी एकमेकात मिसळून जातात. त्याचें स्वप्न पूर्ण होतें, विजयानें नटतें.

तो आपल्या मनःश्चक्षूंसमोर स्वप्नसृष्टींत ते शेतकरी पाहतो. त्यांची ती दुर्दशा व त्यांचें तें भिकारडें जीवनच त्याला दिसतात असें नव्हे, तर त्या शेतकऱ्यातील प्रेमळपणाहि त्याला दिसतो. किती सुंदर व सोंपें तें जीवन ! शेतकऱ्यांतील जें जें चांगलें, तें तें त्याच्या दृष्टीस दिसतें. त्या शेतकऱ्यांच्या अज्ञानाची, आळसाची, हट्टीपणाची, दंभाची व अविश्वासाची तो त्यांना क्षमा करतो; कारण, तो आतां त्यांच्याकडे पाहत नसून त्यांच्या आंत पाहतो, जणूं त्यांच्या

जीवनांत, हृदयांत शिरतो. त्यांच्या हालअपेष्टा, त्याची अनंत सहनशक्ति, त्यांचा आनंद, त्यांचा उत्साह, जें जें नशिबीं असेल तें तें जीवनांत शांतपणें स्वीकारणें, मृत्यूसमोरहि धैर्यानें व शांतपणें उभें राहणें, हें सारें आतां त्याला दिसूं लागतें. तो गुणगुणतो, " खरोखरच सुंदर आहे हें शेतकऱ्यांचें सरळ, निर्दोष व निष्पाप जीवन! किती साधें व किती गोड!! किती सेवामय व किती कर्ममय!!! त्यानें देऊं केलेली मदत ते नाकारीत, त्यामुळें त्याला वाईट वाटे. पण आतां त्याला सारें समजूं लागलें व समजूं लागल्यामुळें त्याला सहानुभूतीहि वाटूं लागली. कारण, ते सारे भाऊच होते. तो व ते शेतकरी एकरूपच होते. एकाच हाडामांसाचे, एकाच रक्ताचे, निर्दय भवितव्यतेच्या प्रहाराखालीं जगणारे, श्रमणारे, मरणारे असेच ते सारे अगतिक जीव नव्हते का? भवितव्यताच मालक, तीच जमीनदार! हें दैव सर्वांना नाचवीत आहे, रडवीत आहे, नष्ट करीत आहे. सारेच दैवाच्या हातीं! सारेच दैवाचे दास!!

— २ —

१८५१ सालीं टॉल्स्टॉय पैसे उधळून बसला होता. सावकारांचा ससेमिरा चुकविण्यासाठीं तो कॉकेशसमध्यें पळून गेला व सैन्यांत दाखल झाला. त्याचा भाऊ आधींच तेथें अमलदार झाला होता. एकोणिसाव्या वर्षीं तो आत्महत्या करूं इच्छीत होता. पण आतां तेविसाव्या वर्षीं तो जीवनावर पूर्ण भरंवसा ठेवणारा झाला होता. तो जीवनाला मिठी मारून बसला होता. तात्त्विक संशय-पिशाच्चें त्यानें पिटाळून लावलीं. मानगुटीला बसणारी पापाची भीति त्यानें झुगारून दिली. तो पुनः एकदां गूढवादांत व सुंदर स्त्रियात रमूं लागला. तरुण फॉस्टप्रमाणें तो जगांत वावरूं लागतो, जगाला नाकारण्याऐवजीं त्याचें स्वागत करतो. हें जग एकंदरींत बरें व करमणूक करणारें खेळणें आहे असें त्याला वाटूं लागतें. सुखात भर घालणारा प्रत्येक अनुभव त्याला चांगला वाटूं लागतो. आपल्या 'कोसॅक्स्' या कादंबरींत तो लिहितो, " कांहींहि वाईट नसतें. एकाद्या सुंदर मुलीच्या संगतींत करमणूक करून घेण्यांत काय पाप आहे? उलट, तें आरोग्याचें व निकोप आणि निरोगी प्रकृतीचेंच लक्षण होय."

पर्वतांच्या सौंदर्यांत तो रंगला, तन्मय झाला. तो लढला व जुगार खेळला. त्यानें प्रेमप्रकारहि केले आणि अत्यंत काव्यमय पण यथार्थदर्शन घडविणाऱ्या अप्रतिम कादंबऱ्या त्यानें लिहिल्या. त्यानें नानाविध वाङ्मय निर्माण केलें—बाल्यांतील गोष्टी, मुलांच्या गोष्टी, युद्धांतील कथा, कोसॅक्स लोकांवरील कादंबऱ्या, निबंध, पत्रें असा प्रचंड वाङ्मयप्रवाह त्याच्या बहुप्रसव, प्रतापी व प्रतिभासंपन्न लेखणींतून जोरानें व भव्यतेनें वाहूं लागला.

वाङ्मयांतच विलीन होऊं लागल्यामुळें लष्करी कर्तव्यांत व शिस्तींत त्याचें नीट लक्ष नसे. तो निर्मितीचा भक्त होता, विनाशाचा नव्हता. जरी त्याला अद्यापि लष्करी गणवेषाचा अभिमान वाटत होता, जरी तीं सुंदर पदकें व चकचकीत बटणें त्याला आवडत, तरी युद्धाचें खरें स्वरूप त्याच्या लक्षांत येऊं लागलें होतें. वयाच्या चोविसाव्या वर्षीं त्यानें 'स्वारी' ही कादंबरी लिहिली—लष्करशाहीविरुद्ध त्यानें केलेली ही पहिली निर्भय घोषणा. तींत तो लिहितो, "या जगांत शांततेनें राहणें अशक्यच आहे काय ? हें जग किती सुंदर आहे! वर अनंत तारांकित आकाश! असें सुंदर आकाश व अशी रमणीय धरणी यांच्यामध्यें राहून या मानवांच्या मनांत द्वेष व मत्सर राहतात तरी कसे ? आपल्याच भावांना ठार करावें, त्यांचा सूड घ्यावा, असें यांना वाटतें तरी कसें ? निसर्गाचा स्पर्श होतांच खरोखरीं मानवी हृदयांतील सारी दुष्टता, सारी कटुता, वितळून जावी, अदृश्य व्हावी. 'सत्यं–शिवं–सुन्दरम्'चें अत्यंत जवळचें रूप, त्याचा साक्षात्कार म्हणजे हे निसर्ग–दर्शन होय. त्यानें आपण स्वतः नको का प्रेमळ व सुंदर व्हावयाला—निष्पाप व निर्मळ व्हावयाला ?"

अद्यापि त्यानें प्रत्यक्ष युद्ध पाहिलें नव्हतें. लुटुपुटीच्या लढाया व हालचालीच त्यानें पाहिल्या होत्या. युद्धाचें प्रतिबिंब, युद्धाची नक्कल त्यानें पाहिली असली तरी अस्सल युद्ध त्यानें पाहिलें नव्हतें, तें पाहण्याची वेळ आली. १८५३ सालीं रशियानें तुर्कस्तानविरुद्ध युद्ध पुकारलें. 'झारच्या महान् वैभवासाठीं तुम्हीहि आपणांस करतां येईल तें थोडेंफार करा', असें टॉल्स्टॉयला सांगण्यांत आलें. प्रथम देशभक्तीच्या भावनेनें तोहि वाहवून गेला. इतर रशियन तरुणांप्रमाणें तोहि एकदम भीषण झाला, क्रूर झाला. त्याच्यावरून जणूं एक प्रकारची रानटी पण धार्मिक उत्साहाची लाटच गेली!

बाळपणींच्या गूढगुंजनाकडे तो पुनः वळला. तो तुर्कांना मारीत होता व ईश्वराशीं बोलत होता. रशियनांवर ईश्वराची कृपा होती व तुर्कांवर त्याचा कोप होता, यासाठीं तो ईश्वराची प्रार्थना करी, प्रभूचे आभार मानी. संकटकालीं देवानें आपले प्राण वांचविले म्हणून तर तो फारच कृतज्ञता प्रकट करी. युद्धाच्या ऐन गर्दीतहि कांहींतरी मोठ्या कामासाठीं ईश्वर आपणास वाचवीत आहे असें त्याला वाटे, असा गूढ अनुभव त्याला येई. १८५५ सालच्या मार्चच्या पांचव्या तारखेस तो डायरींत लिहितो :—

"एक महान् विचार माझ्या मनांत आला आहे. त्या विचाराच्या साक्षात्कारार्थ मी आपलें सारें जीवन देईन असें मला वाटतें. मी आपलें जीवन त्या ध्येयार्थ देऊं शकेन. कोणता हा विचार? कोणतें हे नवीन ध्येय? नव्या धर्माचा पाया घालण्याचा विचार मला स्फुरला आहे. ..."

कोणता हा धर्म?—अप्रतिकाराचा, आंतरराष्ट्रीय बंधुतेचा, शांततेचा. पण हा महान् विचार मनात डोकावत असतांच एकीकडे तो तुर्कांना कंठस्नान घालीत होता. कारण, झारची तशी आज्ञा होती. पण लवकरच त्याला या खाटिकखान्याचा वीट आला. क्रिमियन युद्धाच्या काळांत त्यानें तीन पुस्तकें लिहिलीं. पहिलें देशभक्तीनें ओतप्रोत भरलेलें आहे. दुसऱ्यांत 'मानवां'नीं एकमेकांचा संहार करण्याबाबत तो लिहितो. पण तिसऱ्याच्या प्रस्तावनेंत आपल्या प्रजेला तोफांचा चारा करणाऱ्या शास्त्यांचा त्यानें धिक्कार केला आहे.

तो युद्धाकडे जितकें जितकें अधिक पाहत राहिला, तितकें तितकें युद्धाचें अधिक यथार्थ दर्शन त्याला झालें.

— ३ —

१८५६ सालीं टॉल्स्टॉयनें सैन्यांतून राजीनामा दिला व तो सेंटपीटर्सबर्ग ऊर्फ लेनिनग्राड येथें परत आला. तो येण्यापूर्वीच 'शिपाई व लेखक' म्हणून त्याची कीर्ति तेथें येऊन धडकली होती! तो येतांच त्याला लोक साहित्यसम्राट्—साहित्यांतील सिंह समजूं लागले. शहरांतील प्रमुख लेखकांनीं व कलावंतांनीं त्याचा सत्कार केला, त्याला आपल्या बैठकींतहि घेतलें; पण ते सारे दांभिक आहेत असें त्याला आढळून आलें. त्याना स्वतःचीं मतें नव्हतीं.

ते संपत्तीचे गुलाम होते. 'जो देईल पोळी, त्याची वाजवावी टाळी' असे ते होते. आपण म्हणजे मानवजातीचीं वेंचक माणिक-मोतीं असें ते समजत. ते स्वतःला आपल्या काळांतील बौद्धिक पुरुषश्रेष्ठ मानीत. आपण सृष्टीचे भूषण आहों, वैभव आहों, असें ते समजत. ते जें कांहीं लिहीत, तें वरिष्ठ वर्गासाठीं लिहीत. आपल्या उदात्त विचारांत सहभागी होण्यास बाकीची मानवजात अपात्र आहे असें त्यांना वाटे. पण टॉल्स्टॉयची वृत्ति नेमकी याच्या उलट होती. वाङ्मय हा त्याचा धर्म होता. साहित्यसेवा त्याला पवित्र वाटे. सौंदर्य व शहाणपण यांचें उपनिषद् म्हणजे वाङ्मय, साऱ्या मानवजातीनें त्यांत सहभागी व्हावें असें त्याला वाटे. 'सत्साहित्य ही सर्वांची मिळकत, सर्वांचा साहित्यावर वारसा' असें त्याचें मत असे. तो मूठभर लोकांची करमणूक करण्यासाठीं लिहीत नसे, तर बहुजनसमाजाला सुशिक्षित करण्यासाठीं लिही.

तो बहुजनसमाजासाठीं लिही, याचा अर्थ त्याला त्याच्या बुद्धिमत्तेची यथार्थ कल्पना नव्हती असा नव्हे. बहुजनसमाजाच्या क्षुद्र व तुच्छ जीवनाची बाजू त्याला ठाऊक होती. बहुजनसमाज जणूं गुरांढोरांप्रमाणें वागे, हें टॉल्स्टॉय जाणून होता. पण 'तेखलडोव्ह' नायकाप्रमाणें हे शेतकरीहि प्रकाशासाठीं धडपडत आहेत ही गोष्टहि तो पाहत होता. आंतरिक वृत्तीनेंच ते प्रकाशाकडे चाचपडत येत आहेत हें त्याच्या दृष्टीस दिसत होतें. शेतकऱ्यांना, बहुजनसमाजाला कोणी तरी नेता वा मार्गदर्शक हवा होता. "लोकांना काय पाहिजे आहे हें समजून घेण्यासाठीं त्यांच्याकडे जा, त्यांच्या गरजा समजून घ्या व त्या पूर्ण होण्यासाठीं त्याना साह्य करा."

यास्नाया पोलियाना येथें त्यानें शेतकऱ्यांची शाळा उघडली. या शाळेंत तो पंतोजी म्हणून वागत नसे, तर त्यांच्याबरोबर सहविद्यार्थी होई. तो किसानांचा सहाध्यायी होई. टॉल्स्टॉय म्हणे कीं, "जीवनाच्या गहन, गूढ ग्रंथांतील पहिलीं मुळाक्षरें घोकणाऱ्या मुलांप्रमाणें ते सारे होते." पोलिसांनीं ती शाळा बंद केली. 'शेतकऱ्यांना त्यांच्या अज्ञानांत तसेंच पडूं दे' असें टॉल्स्टॉयला सांगण्यांत आलें. यानंतर आजार व निराशा यांचे महिने आले. त्याचे दोन भाऊ क्षयानें मेले. आपणासहि तोच रोग आहे अशी टॉल्स्टॉयला शंका आली. त्याची सारी श्रद्धा लोपली. त्याची मंगलावरची श्रद्धा गेली. त्याचा

कशावरच विश्वास उरला नाहीं. त्याच्या डोक्यांत आत्महत्येचे विचार डोकावूं लागले. पण या वेळेस त्याच्या कलेनें तसेंच त्याच्या प्रेमानेंहि त्याला वांचविलें. सोफिया ॲन्ड्रेयेवना बेहर्स नांवाच्या सतरा वर्षांच्या मुलीशीं त्यानें लग्न केलें. तो तिच्या दुप्पट वयाचा होता. त्यानें पंधरा वर्षें अमिश्र आनंद उपभोगला. त्याच्या जीवनाचें आकाश निरभ्र व स्वच्छ होतें. त्याची पत्नी बुद्धिमती होती. "मी खऱ्या ग्रंथकाराची पत्नी आहें; माझा तो हक्क आहे." असें ती म्हणे. ती त्याला शुद्धलेखन घाली, त्याच्या कल्पनाशक्तीला चेतवी, त्याला उत्तेजन देई. ती त्याच्या हस्त-लिखिताच्या कष्टानें व मेहनतीनें नकला करी. जीं कांहीं अत्यंत मनोहर पृष्ठें त्यानें रंगविलीं आहेत त्यांच्यासाठीं ती जणूं आदर्श म्हणून त्याच्या-समोर असे.

या सुखाच्या वातावरणांत त्यानें दोन अत्यंत मोठ्या कादंबऱ्या लिहिल्या : १ युद्ध व शांति (ही म्हणजे विश्वव्यापक दुःखाचें गद्य महाकाव्य आहे.) २ ॲना कॅरेनिना—वैयक्तिक वासनाविकारांची शोकान्त कथा. पण या कलासेवेमुळें त्याला अद्यापि शांति-समाधान लाभलें नाहीं. आपल्या हातून कांहीं तरी अधिक चांगलें व्हावें असें त्याला वाटत होतें. निर्दोष कादंबऱ्या लिहिण्यापेक्षां अधिक उदात्त कांहीं तरी आपल्या हातून व्हावें अशी अत्यंत उत्कट इच्छा-उत्कंठा त्याच्या मनांत होती. 'युद्ध व शांति' या कादंबरींतील नायक प्रिन्स अन्ड्रेई हा जेव्हां ऑस्टर्लिट्झ् येथें जखमी होऊन पडतो, तेव्हां त्याला जगाच्या आंतरिक शांतिमयतेचें अंधुक दर्शन होतें. त्याला वर पसरलेलें अनंत आकाश दिसतें. पृथ्वीवर चाललेल्या हिंसेकडे, दुष्टपणाकडे व नीचतेकडे आकाश जणूं विचारमग्न दृष्टीनें पाहत असतें आणि तें आकाश पाहून अन्ड्रेईचें मन एकदम अपरंपार व अवर्णनीय आनंदानें उचंबळून येतें. जीवनाच्या अंधारांतून ही जी अंतर्यामींची शांति मधूनमधून आढळते, हा जो प्रकाश मधूनमधून दिसतो, तो प्रकाश आपल्या मानवबंधूंना देण्याची चिंता टॉल्स्टॉयला होती. कलेच्या माध्यमाच्या द्वारा आपणास हें करता येईल असें त्याला वाटेना.

तो एका नवीन प्रकारच्या कलेचा विचार करूं लागला. माणसांमाणसांत सहानुभूतीचा बंध स्थापण्यासाठीं एक निराळीच कला हवी असें त्याला वाटूं

ागलें. लोकांना प्रकाशाकडे घेऊन जाण्याची इच्छा त्याला होती; पण
ोणता प्रकाश ? सनातनी धर्मावरची त्याची श्रद्धा तर उडून गेली होती.
सोनें त्याला थोडे दिवस धार्मिक आनंद--निसर्गाचा आनंद—दिला होता.
ण अतःपर तेवढ्यानें त्याचें समाधान होईना. खरा धर्म मिळावा म्हणून तो
नः चर्चकडे वळला. चर्चचीं मतें, चर्चचे आचार, सारें तो पुनः तपासूं
ागला. तीन वर्षें त्यानें रोमन कॅथॉलिकांचे सर्व आचार व विधिनिषेध
ाळले, पण व्यर्थ. त्याचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. त्याची ख्रिस्तावर
तकी दृढ भक्ति होती कीं, या रूढ सांप्रदायिक ख्रिश्चन लोकांप्रमाणें
ाह्याचारी होणें त्याला शक्य झालें नसतें. ते विधी, ते समारंभ, तीं
ायश्चित्तें, सारें कर्मकांड त्याला मूर्खपणाचें, पापात्मक, धर्माची निंदा करणारें
ासें वाटलें. तो लिहितो, "चर्चची शिकवण केवळ कापट्यमय व
ासत्यमय आहे, यासंबंधीं माझी खात्री झाली आहे. मूर्खपणाच्या रूढींचा,
ादूटोण्यांचा, चेटकाचा आचार! यांच्या बुजबुजाटांत खरा ख्रिश्चन धर्म
ास होऊन गेला आहे. जो धर्म मुळांत शांति व प्रेम यांच्यावर आधारलेला
ोता, पण जो आतां युद्ध व असहिष्णुता यांचा प्रचार करीत होता, त्या
र्मापासून तो आतां कायमचा दूर गेला. टॉल्स्टॉय आतां नवधर्माचा प्रणेता
ााला. किंवा नवधर्म म्हणण्याऐवजीं बुद्धाचाच विस्मृत धर्म, इसाया, कन्फ्यू-
ग्रयस व ख्रिस्त यांचाच धर्म तो नव्यानें विवरून सांगत होता. तो या नव्या
र्माचा निरहंकारी प्रस्थापक, नेता होता. या धर्मांत विधि-निषेधांचें अवडंबर
ाव्हतें, भट-भिक्षुक-उपाध्याय यांचेंहि बंड नव्हतें. यांत चर्चची अडगळ
ाव्हती. कांहीं साध्या आदेशांवर हा धर्म उभारण्यांत येणार होता. कोणते हे
ादेश ? कोणत्या या आज्ञा ? कोणाचेंहि वैर करूं नका, क्रोधाच्या आहारीं
ााऊं नका, कधींहि हिंसा करूं नका. श्रीमंतांचीं कर्मशून्य विलासलोलुपता,
ाासनसंस्थेचा जुलूम, चर्चची दुष्टता, या गोष्टींविरुद्ध त्याच्या नवधर्माचें बंड
ोतें. "तो समाजवादी, अराजकवादी व चर्च न मानणारा झाला. थोडक्यांत
हणजे तो ख्रिस्ताचा खरा अनुयायी झाला." मानव-जातीच्या सेवेसाठीं
ापली कीर्ति, आपली प्रतिष्ठा, आपलें स्थान, आपली संपत्ति, फार काय, पण
ापले प्राणहि द्यावयास तो तयार होता. तो शेतकऱ्याचे साधे कपडे वापरूं
ागला, परित्यक्त व दीनदरिद्री यांच्यांत मिसळूं व बसूं-उठूं लागला.

विजयी व उन्नत होण्यासाठीं तो नमला होता. आपल्या नबाबी अलगपणापासून तो सामान्य जनतेच्या पातळीवर येऊन उभा राहिला आणि असें करीत असतां सर्व मानवजातीला नैतिक भव्यतेच्या उंच स्थानावर, नवीन उच्च भूमिकेवर तो नेत होता. सारें जग त्याला नवीन धर्मदाता म्हणूं लागलें, त्याचा जयजयकार करूं लागलें; पण त्याच्या कुटुंबीयानीं त्याला वेडा ठरविलें. आपला पति बुद्धिभ्रष्ट होत आहे असें त्याच्या पत्नीला वाटूं लागलें. त्याचें डोकें ठिकाणावर नाहीं असें वाटून ती घाबरली. तो मानवांच्या बंधुत्वाविषयीं बोलूं लागला कीं त्याचीं मुलें जांभया देऊं लागत व निघून जात. केवळ निःस्वार्थ जीवन जगणें म्हणजे मूर्खपणाची निश्चित निशाणी असें त्यांना वाटे. आपल्या ध्येयासाठीं त्यानें स्वतःला खुशाल वाहून घ्यावें! पण आपल्या सर्व कुटुंबीयांचा त्यासाठीं होम करण्याचा त्याला काय अधिकार असा त्यांचा सवाल असे. तो स्वतःच्या घरांतहि जणूं अपरिचित झाला! त्याचीं ध्येयें कोण ओळखणार? त्याचें अंतरंग कोणाला कळणार? आपल्या मित्राला लिहिलेल्या एका पत्रांत तो म्हणतो, "मला अगदीं एकटें एकटें वाटतें. माझ्या सांगण्यावर तुमचा विश्वास बसणार नाहीं; पण वस्तुस्थिति अशी आहे खरी. माझें जें सत्य स्वरूप, माझा जो खरा मी, त्याचा भोंवतालच्या लोकांकडून उपहास केला जात आहे, त्याची ते सारे उपेक्षा करीत आहेत.

अशा मानसिक वेदना होत असतांहि तो आपलें कार्य पुढें रेटीतच होता. ख्रिस्ती धर्माचा अर्थ तो एकोणिसाव्या शतकाच्या भाषेंत समजावून सांगत होता. ख्रिस्तानें ईश्वराचें राज्य स्थापण्याचा प्रयत्न केला, तर टॉल्स्टॉयनें मानवांचें लोकराज्य स्थापण्याचा यत्न केला. भूतदया, प्रेम, अन्यायाचा अप्रतिकार, हीं तत्त्वें जनतेच्या मनावर बिंबविण्यासाठीं त्यानें अनेक निबंध लिहिले, अनेक गोष्टी लिहिल्या. त्याचें पारितोषिक म्हणून चर्चनें त्याला १९०१ सालीं धर्मबाह्य ठरविलें. तो वृद्ध होत चालला, तसा त्याच्या शिकवणींत आणखी एक नवीन रंग आला. तो लोकांपासून, कुटुंबीयांपासून, पत्नीपासून, मुलांपासून विमुख झाला होता. तो सर्वांचा होता; पण त्याचें कोणीच नव्हतें. सर्व मानवी व्यवहारांकडे तो निराळ्याच गूढतेनें पाहूं लागला, दिव्य दृष्टीनें पाहूं लागला. तो संन्यासी झाला. पूर्वी त्यानें व्यभिचाराला धिक्कृत केलें होतें. आतां वयाच्या

सत्तराव्या वर्षीं तो लोकांना 'संपूर्णपणें ब्रह्मचारी राहावें' असें शिकवूं लागला. "जो कोणी एकाद्या स्त्रीचा—स्वतःच्या पत्नीचाहि–विषयबुद्धीनें विचार करील. त्यानें तिजशीं व्यभिचार केल्यासारखेंच आहे." आपल्या क्षीण इच्छांनुसार जगाची पुनर्रचना करूं पाहणाऱ्या वृद्धाचें दर्शन एक प्रकारें करुणास्पद असतें. अशा वृद्धाला पाहून त्याची कींव येते. 'संपूर्ण ब्रह्मचर्य पाळल्यामुळें मानवजात नष्ट झाली तरी हरकत नाहीं' असें तो म्हणे! पण त्या वेळीं त्याची बुद्धि व त्याचें मन त्याला हळूहळू सोडून जाऊं लागलीं होतीं. त्याचा गूढवाद त्याच्या बुद्धीला संपूर्णपणें ग्रासूं पाहत होता. रिसरेक्शन (पुनरुद्धार) या आपल्या शेवटच्या कादंबरींत तो एका पाप्याच्या शरीरांत संताचा आत्मा घालतो. या कादंबरींतला नायक नेखलडोव्ह आरंभीं दुष्ट व पापी असतो, पण शेवटीं हुतात्मा होतो. त्याच्या जीवनात आकस्मिक क्रान्ति होते व थोडक्याच वर्षांत तो एकदम पाप्याचा संत होतो. पाप–शिरोमणीची पुण्य–मूर्ति होते! अपूर्व बुद्धीच्या टॉल्स्टॉयला जी स्थिति गांठण्यासाठीं जीवनावधि धडपडावें लागलें, ती हा पापात्मा थोड्याशा अवधींतच मिळवितो! रिसरेक्शन ही कादंबरी म्हणजे जगांतील अत्यंत सुंदर व करुण काव्यांपैकीं एक आहे; पण ती एका वृद्धाची कृति आहे.

— ४ —

टॉल्स्टॉयला स्वतःचा मोठेपणा पाहावयास मिळाल्यानंतरहि बराच काळ तो जगला. आयुष्याच्या अखेरच्या दहा वर्षांत तो राजकीय, सामाजिक व नैतिक ध्येयें उपदेशीत होता, पण तीं ध्येयें या मर्त्य लोकीं कशीं अमलांत येणार? ज्या जगात अतिमानुष लोक असतील, त्यांतच तीं मूर्त होण्याची शक्यता. तो वृद्ध होत चालला तसतसा तो अधिकाधिक गहनगंभीर तत्त्वज्ञानी व बालकाप्रमाणें साधा होत गेला. १९१० सालच्या ऑक्टोबरच्या अठ्ठाविसाव्या तारखेस तो घर सोडून बाहेर पडला, तेव्हां त्याचें वय ब्याऐशीं वर्षांचें होतें. त्याच्या अंगांत शेतकऱ्याचें कुडतें असे. त्याच्या चेहऱ्यावर वार्धक्यामुळें सुरकुत्या व वेदनांमुळें आंठ्या पडल्या होत्या. त्याची मुद्रा सौम्य पण करुण व शांत होती. बुद्धाप्रमाणें परिव्राजक होऊन जगाच्या राजमार्गांनें तो फिरत होता. बुद्धानें जीवन मिळावें म्हणून घराचा त्याग केला होता, तर टॉल्स्टॉय जणूं मरण मिळावें म्हणून घराबाहेर पडला होता.

एकटेंच कोठें तरी मरून पडावें, आसपास कोणी नको, असें त्याला वाटलें. त्यानें सारें जीवन दुसऱ्यांवर दया करण्यात घालविलें, पण तो मात्र घरच्यांची दया सोडून पळून गेला! कित्येक दिवस तो गांवोगाव भटकत होता. शेवटीं एके दिवशीं तो जो रस्त्याच्या कडेला पडला, तो पुनः उठलाच नाहीं! एक डॉक्टर त्याच्यापाशीं आला, त्याला तो म्हणाला, "पृथ्वीवर लाखों लोक दुःखी व आजारी आहेत, मग तुम्ही फक्त माझाच विचार कां करता?" १९१० सालच्या नोव्हेंबरच्या विसाव्या तारखेस जी शांति तो आयुष्यभर मिळवूं पाहत होता, ती त्याला मिळाली. नुकतेच सहा वाजले होते व त्याचें दुःख-भग्न शरीर शांत झालें. 'शेवटचा महामोक्ष' त्याला मिळाला. 'मृत्यु', 'धन्यतम मृत्यु' त्याला मिळाला. याच शब्दांनीं त्यानें मृत्यूला गौरविलें होतें. जग सुसंस्कृत व युद्धहीन व्हावें यासाठीं त्यानें जीवन खर्चलें; पण त्याच्या मृत्यूनंतर चारच वर्षांत सारें जग भीषण व रानटी अशा एका महायुद्धांत बुडून गेलें!

## प्रकरण ८ वें

# शेवटचा कैसर सम्राट् दुसरा वुइल्यम

— १ —

लिखित इतिहासांत १९१४ सालचें महायुद्ध म्हणजे अत्यंत भयानक आपत्ति होय. हिची जबाबदारी कोणाहि एका व्यक्तीवर वा राष्ट्रावर नसून सर्व मानवजातीवरच आहे. एकोणिसाव्या शतकांत सारें जगच युद्धाचे विचार शिकत होतें. शांततेचे विचार जणूं जगांतून लुप्तच झाले होते! 'आपआपल्या जातीजमातीपुरतें वागतांना सभ्य गृहस्थ राहा, पण राष्ट्राचे एक घटक या दृष्टीनें गुंड बना' असा संदेश प्रत्येक राष्ट्र आपापल्या लोकांस देत होतें. कल्पना करा कीं, हत्यारबंद लोक बोस्टन, बर्लिन वा बगदाद शहरांत घुसले असून कोण अधिक लुटतो, लुबाडतो व सर्वांना दहशत वा दरारा बसवितो, याबाबत त्यांची आपसांत स्पर्धा लागली आहे व तेथें पोलिस वगैरे कोणी नाहींत, कायदेशीर साधन नाहीं, या हत्यारबंद गुंडांविरुद्ध उपाययोजना

करील असें संघटित सामाजिक यंत्रहि नाहीं. हुबेहूब अशीच स्थिति एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत व विसाव्या शतकाच्या सुरुवातीस जगांतील बलाढ्य राष्ट्रांची होती.

युरोपांतील प्रबलतर राष्ट्रें जागतिक प्रमाणावर उठाठेवी व दंगामस्ती करणारीं होतीं. युरोपांत एक विशिष्ट मनोवृत्ति सर्वत्र बळावत होती. ही विशिष्ट राष्ट्रीय मनोवृत्ति जंगलच्या कायद्यावर उभारलेली होती. 'बळी तो कान पिळी' हें या सर्वांचें ब्रीदवाक्य होतें. 'आमच्या देशातलें जें आम्हांस हवें असतें तें आम्ही विकत घेतों, पण इतर देशांतलें जें आम्हांस हवें असतें तें आम्ही चोरून घेतों,' असें सारीं बलाढ्य राष्ट्रें म्हणत. तीं चढाऊ राष्ट्रें घाणेरड्या व निंद्य खेळांत मग्न झालीं. पूर्वेकडील दुबळीं राष्ट्रें लुटावयाचीं हा जणूं सर्वांचा धर्मच झाला! तीं याला 'डाकूगिरी' म्हणत नसत, तर 'संरक्षण' म्हणत असत. फ्रान्सनें अल्जीअर्स, मादागास्कर, आनाम व टोंकिन यांचें संरक्षण करण्याचें ठरविलें व त्यांना आपल्या पंखाखालीं घेतलें. ऑस्ट्रिया तुर्कांच्या विरुद्ध रक्षण द्यावयास उभा राहिला. बोस्निया व हर्झेगोविना या प्रदेशान त्यानें जवळ घेतलें. रशिया पोर्ट आर्थरचें रक्षण करावयाला गेला व जपानशीं १९०४–५ सालीं त्याचें युद्ध झालें. जर्मनी आफ्रिका व आशिया या खंडांत संरक्षणासाठीं धांवूं लागला. त्याचे हे संरक्षित टापू होते. इंग्लंड सर्वांत जास्त चढाईखोर होतें. हिंदुस्थान, ईजिप्त, आयर्लंड इत्यादि दहाबारा देशांवर इंग्लंडनें आपले पंख पसरले होते. रस्त्यांतल्या एकाद्या लहान मुलाजवळचीं उंसाचीं कांडीं घेण्याचा जसा कोणासच बिलकुल हक्क नसतो, तसाच या प्रबळ राष्ट्रांना दुबळ्या राष्ट्रांची मालमत्ता लुबाडण्याचा यत्किंचित् सुद्धा हक्क नव्हता. पण राष्ट्रीय नीति व्यक्तीच्या नीतीच्या पाठीमागें शेंकडों वर्षें असते. आपआपल्या शासनसंस्थांच्या वतीनें कारभार हांकणारे मुत्सद्दी आतरराष्ट्रीय कारभारात असें वागतात कीं, तसें खासगी नागरिक या नात्यानें वागण्याचें ते स्वप्नांतहि मनांत आणण्याचें धाडस करणार नाहींत. जर्मनी, फ्रान्स, इंग्लंड, रशिया, ऑस्ट्रिया व इटली इत्यादि राष्ट्रांनीं जगाला चक्क जाहीर केलें कीं, 'दुबळ्या राष्ट्रांवर सत्ता गाजविणें हें आमचें ईश्वरदत्त कर्तव्य आहे. हें भाग्य आम्हांस ईश्वरानें दिलें आहे!' व तीं सर्व दुबळ्या राष्ट्रांना लुटावयास व गुलाम करावयाला पुढें सरसावलीं.

वसाहतींचें साम्राज्य मिळविण्यासाठीं वेडी स्पर्धा जोरात सुरू झाली. या स्पर्धेतून लवकर अथवा उशिरा जागतिक युद्ध पेटणार यांत शंका नव्हती. कारण या चढाऊ राष्ट्रांच्या परस्पर हितसंबंधांचे पुष्कळ वेळां खटके उडत, संघर्ष होत. ज्यानीं उत्कृष्ट प्रदेश आधींच बळकावले होते, त्यांच्याकडे इतर देश द्वेषानें व मत्सरानें बघत. कारण, त्यांना लुटींतला फारसा फायदेशीर वांटा मिळालेला नसे. पुष्कळदा एकाच तुकड्यावर अनेकांचे गिधाडी डोळे लागलेले असत. या स्पर्धेतून शस्त्रास्त्रांची स्पर्धा सुरू झाली. तोफांचा आवाज ईश्वरी आवाजाप्रमाणें पूजिला जाऊं लागला.

सारें जग युद्धोत्सुक झालें. 'युद्ध', 'युद्ध' असा आवाज सर्वत्र घुमूं लागला. प्रत्येक देशांतील हरएक तरुणास शिकविण्यांत येई कीं, दुसऱ्या देशांतील दहाना तो भारी आहे. ही लढाऊ मनोरचना ऑस्ट्रिया–जर्मनी-तल्याइतकीच इंग्लंडमध्येंहि ठसविण्यांत आलेली होती. जुन्या जगांतलीं इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, ऑस्ट्रिया, इटली, रशिया, हीं प्रबळ राष्ट्रें १९१४–मधल्या महायुद्धासाठीं अगदीं कंबर कसून तयार होतीं; खुंट्या नीट पिरगळलेल्या होत्या. डेव्हिड स्टार जॉन्सन याच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे "युरोपचें पिस्तूल भरलेलें होतें आणि एकदम स्फोट झाला."

— २ —

म्हणून मागील महायुद्धाला साम्राज्यशाही स्पर्धा हेंच मुख्य कारण होतें, हें क्लेमेंकोच्या कारकीर्दीवरून लक्षांत येईल. क्लेमेंकोला 'वाघ' असें नाव होतें व त्याबद्दल त्याला अभिमान वाटे. किप्लिंग हा या साम्राज्यशाहीचा महाकवि होता. काळ्या लोकांचें ओझें गोऱ्या लोकाना कर्तव्य म्हणून वाहावें लागतें व गोरे लोक जगाचे प्रभु होण्यासाठींच जन्मलेले आहेत असें तो म्हणे. नित्शेच्या तेजस्वी लिखाणांत हेंच 'बळाचें उद्दाम तत्त्वज्ञान' भरलेलें होतें. नित्शेचें मन सौंदर्य व वेडेपणा यांच्या दरम्यान लंबकाप्रमाणें हेलकावे खात असे. नित्शे स्वतः कोमल मनाचा व प्रेमळ स्वभावाचा होता; पण त्यानें जगाला द्वेषाचें व युद्धाचें उपनिषद् दिलें. झार निकोलस याच्या धोरणांत हीच साम्राज्यशाहीची उद्दामता होती. त्याची कारकीर्द ज्यूंच्या छळासाठीं व फटक्यांच्या थैमानासाठीं प्रसिद्ध आहे. पण सम्राट् दुसरा वुइल्यम याच्या अहंमन्य शब्दानीं व रानवट कृतींनीं या सर्वांना रंगरूप आलें.

— ३ —

वुइल्यम होएनझोलर्न यानें एकट्यानेंच मानवजातीला युद्धांत ढकललें असें नव्हे. तो अनेक साम्राज्यवाद्यांपैकीं एक होता; पण त्याचा आवाज सर्वांहून बुलंद होता, त्याची घनगर्जना होती; जे अपराधी होते, युद्ध पेटविण्याचा गुन्हा करणारे होते, त्यांत हा वुइल्यम पटकन् उमटून पडे. दुसरे गुन्हेगार आपलें पाप गुप्तपणें, मुत्सद्देगिरीच्या पडद्याआड, गाजावाजा न करतां, मोठ्या शिताफीनें करीत. त्यामुळें पुष्कळ अविवेकी इतिहासकार त्यामागील महायुद्धांतल्या माणुसकीस काळिमा लावणाऱ्या गोष्टींचें खापर एकट्या वुइल्यम कैसरच्याच डोक्यावर फोडतात.

पण आपण लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, कैसर हा एकटाच कांहीं गुन्हेगार नव्हता. विसाव्या शतकांतला पोषाख केलेल्या, पण केवळ रानटी व अत्यंत प्राचीन काळच्या जंगली पूर्वजांप्रमाणें असलेल्या, साम्राज्यवादी लोकाचा तो एक प्रतिनिधि होता. जवळजवळ प्रत्येक देशांत असे लोक होते आणि तेच राज्यकारभार चालवीत असत, ही वस्तुस्थिति ध्यानीं धरून कैसर वुइल्यमचें जीवन आपण पाहूं या.

कैसर एकोणीस वर्षांचा असतां म्हणजे १८७९ सालीं त्याची आजी, इंग्लंडची राणी व्हिक्टोरिया, ही हिंदुस्थानची सम्राज्ञी म्हणून घोषणा करण्यांत आली, त्याच वेळीं त्यानें मनाशीं खूणगांठ बांधून ठेवली कीं, मी जेव्हां जर्मनीचा राजा होईन तेव्हां मीहि असाच सम्राट् होईन व वाटेल ती किंमत देऊन जर्मन साम्राज्य वाढवीन. त्याचे वडील तिसरे फ्रेडरिक हे १८८८ सालच्या जून महिन्यांत वारले. त्यांनीं फक्त तीनच महिने राज्य केलें. वुइल्यमला राज्याभिषेक झाला. त्यानें गादीवर येताच चॅन्सेलर बिस्मार्क याला काढून टाकलें व आपण एकट्यानें राज्य चालवावयाचें ठरविलें.

वुइल्यम फार उंच नव्हता. त्याचा डावा हात सुकलेला होता. त्याची बुद्धिहि कांहीं मोठी अपूर्व नव्हती. पण तो स्वतःला आपल्या अहंकाराच्या आरशांत पाही. ‘ आपण महाप्रभु आहों ’, ‘ ईश्वराच्या खालोखाल जर कोणाचें

वसाहतींचें साम्राज्य मिळविण्यासाठीं वेडी स्पर्धा जोरात सुरू झाली. या स्पर्धेतून लवकर अथवा उशिरा जागतिक युद्ध पेटणार यांत शंका नव्हती. कारण या चढाऊ राष्ट्रांच्या परस्पर हितसंबंधांचे पुष्कळ वेळां खटके उडत, संघर्ष होत. ज्यानीं उत्कृष्ट प्रदेश आधींच बळकावले होते, त्याच्याकडे इतर देश द्वेषानें व मत्सरानें बघत. कारण, त्याना लुटींतला फारसा फायदेशीर वांटा मिळालेला नसे. पुष्कळदा एकाच तुकड्यावर अनेकांचे गिधाडी डोळे लागलेले असत. या स्पर्धेतून शस्त्रास्त्रांची स्पर्धा सुरू झाली. तोफांचा आवाज ईश्वरी आवाजाप्रमाणें पूजिला जाऊं लागला.

सारें जग युद्धोत्सुक झालें. 'युद्ध', 'युद्ध' असा आवाज सर्वत्र घुमूं लागला. प्रत्येक देशांतील हरएक तरुणास शिकविण्यांत येई कीं, दुसऱ्या देशांतील दहाना तो भारी आहे. ही लढाऊ मनोरचना ऑस्ट्रिया-जर्मनी-तल्याइतकीच इंग्लंडमध्येंहि ठसविण्यांत आलेली होती. जुन्या जगांतलीं इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, ऑस्ट्रिया, इटली, रशिया, हीं प्रबळ राष्ट्रें १९१४-मधल्या महायुद्धासाठीं अगदीं कंबर कसून तयार होतीं; खुंट्या नीट पिरगळलेल्या होत्या. डेव्हिड स्टार जॉन्सन याच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे "युरोपचें पिस्तूल भरलेलें होतें आणि एकदम स्फोट झाला."

— २ —

म्हणून मागील महायुद्धाला साम्राज्यशाही स्पर्धा हेंच मुख्य कारण होतें, हें क्लेमेंकोच्या कारकीर्दीवरून लक्षांत येईल. क्लेमेंकोला 'वाघ' असें नाव होतें व त्याबद्दल त्याला अभिमान वाटे. किप्लिंग हा या साम्राज्यशाहीचा महाकवि होता. काळ्या लोकांचें ओझें गोऱ्या लोकाना कर्तव्य म्हणून वाहावें लागतें व गोरे लोक जगाचे प्रभु होण्यासाठींच जन्मलेले आहेत असें तो म्हणे. नित्शेच्या तेजस्वी लिखाणांत हेंच 'बळाचें उद्दाम तत्त्वज्ञान' भरलेलें होते. नित्शेचें मन सौंदर्य व वेडेपणा यांच्या दरम्यान लंबकाप्रमाणें हेलकावे खात असे. नित्शे स्वतः कोमल मनाचा व प्रेमळ स्वभावाचा होता; पण त्यानें जगाला द्वेषाचें व युद्धाचें उपनिषद् दिलें. झार निकोलस याच्या धोरणांत हीच साम्राज्यशाहीची उद्दामता होती. त्याची कारकीर्द ज्यूंच्या छळासाठीं व फटक्यांच्या थैमानासाठीं प्रसिद्ध आहे. पण सम्राट् दुसरा वुइल्यम याच्या अहंमन्य शब्दानीं व रानवट कृतींनीं या सर्वांना रंगरूप आलें.

— ३ —

वुइल्यम होएनझोलर्न यानें एकट्यानेंच मानवजातीला युद्धांत ढकललें असें नव्हे. तो अनेक साम्राज्यवाद्यांपैकीं एक होता; पण त्याचा आवाज सर्वांहून बुलंद होता, त्याची घनगर्जना होती; जे अपराधी होते, युद्ध पेटविण्याचा गुन्हा करणारे होते, त्यांत हा वुइल्यम पटकन् उमटून पडे. दुसरे गुन्हेगार आपलें पाप गुप्तपणें, मुत्सद्देगिरीच्या पडद्याआड, गाजावाजा न करतां, मोठ्या शिताफीनें करीत. त्यामुळें पुष्कळ अविवेकी इतिहासकार त्यामागील महायुद्धांतल्या माणुसकीस काळिमा लावणाऱ्या गोष्टींचें खापर एकट्या वुइल्यम कैसरच्याच डोक्यावर फोडतात.

पण आपण लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, कैसर हा एकटाच कांहीं गुन्हेगार नव्हता. विसाव्या शतकांतला पोषाख केलेल्या, पण केवळ रानटी व अत्यंत प्राचीन काळच्या जंगली पूर्वजांप्रमाणें असलेल्या, साम्राज्यवादी लोकांचा तो एक प्रतिनिधि होता. जवळजवळ प्रत्येक देशांत असे लोक होते आणि तेच राज्यकारभार चालवीत असत, ही वस्तुस्थिति ध्यानीं धरून कैसर वुइल्यमचें जीवन आपण पाहूं या.

कैसर एकोणीस वर्षांचा असतां म्हणजे १८७९ सालीं त्याची आजी, इंग्लंडची राणी व्हिक्टोरिया, ही हिंदुस्थानची सम्राज्ञी म्हणून घोषणा करण्यांत आली, त्याच वेळीं त्यानें मनाशीं खूणगांठ बांधून ठेवली कीं, मी जेव्हां जर्मनीचा राजा होईन तेव्हां मीहि असाच सम्राट् होईन व वाटेल ती किंमत देऊन जर्मन साम्राज्य वाढवीन. त्याचे वडील तिसरे फ्रेडरिक हे १८८८ सालच्या जून महिन्यांत वारले. त्यांनीं फक्त तीनच महिने राज्य केलें. वुइल्यमला राज्याभिषेक झाला. त्यानें गादीवर येताच चॅन्सेलर बिस्मार्क याला काढून टाकलें व आपण एकट्यानें राज्य चालवावयाचें ठरविलें.

वुइल्यम फार उंच नव्हता. त्याचा डावा हात सुकलेला होता. त्याची बुद्धिहि कांहीं मोठी अपूर्व नव्हती. पण तो स्वतःला आपल्या अहंकाराच्या आरशात पाही. 'आपण महाप्रभु आहों', 'ईश्वराच्या खालोखाल जर कोणाचें

वैभव असेल तर तें आपलेंच ', असें त्याला वाटे. त्यानें आपल्यासमोर जणूं जिहोव्हाचा आदर्श ठेवला होता. तो तदनुसार वागत होता, त्याच्याप्रमाणें आपणाला बनवूं पाहत होता. आपलें यशोवैभव वाढविण्यासाठींच मानवजात आहे असें त्याला वाटे. कीर्तीची अपरंपार भूक त्याला होती. आपल्या पिढींतील जास्तींत जास्त मोठा आवाज करणारा आपणच व्हावें असें त्याला वाटे. सारीं राष्ट्रें आपणाकडे पाहत राहतील अशा रीतीनें आपल्या तलवारीचा खणखणाट करण्याचें त्यानें ठरविलें होते. ब्रिटानिया समुद्राची स्वामिनी होती. कैसरनेंहि भूमीचा तसाच समुद्राचाहि स्वामी होण्याचें ठरविलें. त्याचे निर्दय व कठोर डोळे जगाला कःपदार्थ मानीत. त्याच्या मिशांचीं दोन्ही टोकें वर पिळलेलीं असत—जणूं तो स्वर्गालाहि तुच्छ मानीत होता, स्वर्गालाहि ऐट दाखवीत होता !

सारीं राष्ट्रें तलवारीच्या साधनानें आपापलीं राज्यें—साम्राज्यें वाढविण्या-साठीं धडपडत होतीं, स्पर्धा करीत होतीं. " ठीक, " कैसर म्हणाला, " या सर्वांना जर्मन राष्ट्र तलवार कशी धरतें ते दाखवून देतों. " सारे इंग्लंड युद्ध-भावनांनीं नाचत होतें. पुढील गीत सर्वांच्या ओठावर होतें :—

" आम्हांला लढण्याची इच्छा नाहीं; पण लढण्याची वेळच आली तर आमच्याजवळ भरपूर आरमार आहे, भरपूर द्रव्यबळ आहे व भरपूर मनुष्य-बळहि आहे. "

इंग्लंडचें आह्वान वुइल्यमनें स्वीकारलें. " मीहि माझ्या जर्मनीला माझ्या हयातींत सैन्य, संपत्ति व गलबतें यांनीं संपन्न करतों " अशी घोषणा करून तो प्रतिज्ञेवर सांगे कीं, " माझें सारें जर्मन राष्ट्रच शिपाईगिरीचा पेशा पत्करील. विजयी चढाई हेंच माझें जीवितकार्य ! " राज्यावर येतांच तो म्हणाला, " सैन्यावरच माझी सारी भिस्त आहे. " आपल्या जर्मन राष्ट्राला शिस्त शिकवावयाला, शिक्षण द्यावयाला व संघटित करावयाला तो उभा राहिला. कत्तलीसाठीं तो त्याना पुष्ट करूं लागला. इतिहासांतील अत्यंत अव्यंग असें युद्धतंत्र त्यानें निर्माण केलें व तें खरोखरच इतकें परिपूर्ण होतें कीं, तें शेवटीं चाटोळें फिरलें व निर्मात्याचाच निःपात करतें झालें.

वुइल्यम जगभर प्रवासार्थ निघाला. लंडन, रोम, व्हिएन्ना, अथेन्स, कॉन्स्टँटिनोपल इत्यादि शहरांतून तो मिरवीत गेला. आपण किती अद्भुत

पुरुष आहों हेंच जणूं तो जगाला दाखवूं इच्छीत होता. तो पॅलेस्टाइनला गेला व घोड्यावर बसून जेरुसलेम शहरांत शिरला. देवाप्रमाणें त्याला मिरवीत नेण्यांत आलें. त्याच्या खास प्रवेशासाठीं तेथील भिंतीला मुद्दाम नवीन दरवाजा करण्यांत आला होता. नेहमींच्या सामान्य दरवाजातून जाणें कैसरला कमीपणाचें होतें. जगांतील सर्वांत मोठें आरमार आपल्यापाशीं असावें म्हणून १८९५ सालीं त्यानें इंग्लंडशीं स्पर्धा सुरू केली. तो म्हणाला, " माझें लष्कर ज्या दर्जाचें आहे, त्याच पराकोटीला माझें आरमार नेल्यावांचून मी स्वस्थ बसणार नाहीं. "

आणि इतर राष्ट्रेंहि स्वस्थ बसलीं नव्हतींच. डेन्मार्क व हॉलंड यासारखीं कांहीं राष्ट्रें सोडून दिलीं तर इतर प्रत्येक देशाच्या अंदाजपत्रकांत उत्पन्नाचा नव्वद टक्के भाग युद्धावरच खर्च होई. संरक्षक व आक्रमक दृष्टींनीं दोस्ती करण्यांत येई. इंग्लंड, फ्रान्स व रशिया यांनीं आपला एक दोस्त–संघ बनविला, तर जर्मनी व ऑस्ट्रिया यांनींहि आपली गट्टी केली. ज्याच्यावर सूर्य कधींहि मावळत नाहीं, असें आपलें अवाढव्य साम्राज्य वाढविण्याचा निर्धार इंग्लंडनें केला होता. आशिया व आफ्रिका खंडांतलें आपलें साम्राज्य टिकवावयाचें व १८७० सालीं जर्मनीनें बळकावलेले अल्सेस व लॉरेन्स हे प्रांत परत घ्यावयाचे असें फ्रान्सच्या मनांत होते. रशिया भयभीत झाला होता. वसाहतींच्या चढाईत जर्मनीची स्पर्धा पाहून त्याच्याहि तोंडास पाणी सुटलें, त्याचाहि स्वार्थ जागृत झाला. युद्ध लवकर सुरू व्हावें म्हणून शक्य तें सर्व ऑस्ट्रिया व जर्मनी यांनीं केलें. कैसरला गर्व चढला होता. तो दटावीत होता, दरडावीत होता, आपल्या मोठेपणाची गर्जना करीत होता आणि महायुद्धाचा दिवस कधीं येतो याची वाट पाहत होता.

१९१४ सालीं दोन्ही पक्ष तयार झाले होते. युद्ध सुरू करण्यासाठीं सारेच जण एकाद्या निमित्ताची वाट पाहत होते. फर्डिनंड हा ऑस्ट्रियाच्या गादीचा वारस होता. तो बोस्नियाची राजधानी साराजेव्हो येथें गेला होता. हा प्रांत आरंभीं सर्व्हियाचा होता. तो तुर्कांनीं घेतला होता व तुर्कांच्या हातून सरतेशेवटीं ऑस्ट्रियानें बळकावला होता. १९१४ सालच्या जूनच्या अठ्ठाविसाव्या तारखेस एका देशप्रेमी

सर्व्हियन विद्यार्थ्यानें साराजेव्हो येथें फर्डिनंडचा खून केला. सर्व्हियाचा प्रदेश ऑस्ट्रियानें गिळंकृत केलेला पाहून तो विद्यार्थी चिडला होता.

ऑस्ट्रियानें जुलैच्या अठ्ठाविसाव्या तारखेस सर्व्हियाशीं युद्ध पुकारलें. रशिया अशा एकाद्या संधीची वाटच पाहत होता. सर्व्हियाला मदत करण्याच्या मिषानें ऑस्ट्रिया व जर्मनी यांच्याविरुद्ध आपल्या सैन्याच्या हालचाली त्यानें सुरू केल्या. जर्मनीनें रशियाविरुद्ध व रशियाचा गुप्त मित्र फ्रान्स याच्याहि विरुद्ध युद्ध पुकारलें. युद्धाच्या पहिल्या घोषणेनंतर आठच दिवसांत हा वणवा सर्वत्र भडकला. युरोपांतील सर्व प्रमुख राष्ट्रें कत्तली करण्याचा गुन्हा करूं लागलीं. रक्ताचा सडा घालण्यांत आला, एक कोटि मानवांचा संहार झाला.

१९१७ सालीं अमेरिकाहि युद्धांत ओढली गेली. भीति, स्वार्थ व अभिमान यांच्या संमिश्र भावना अमेरिकेस युद्धांत खेंचत्या झाल्या. 'जर्मनांचा जय झाला तर ?' अशी भीति खरोखरच कांहीं अमेरिकनांना वाटे. विजयी कैसरचीहि त्यांना धास्ती वाटे. दोस्तांना दारूगोळा पाठविणाऱ्या कांहीं कारखानदारांना जर्मनीच्या पाणबुड्यांचा त्रास होत होता. १९१५ सालच्या मे महिन्यांत जर्मन पाणबुड्यांनीं योग्य सूचना देऊन लुसिटानिया ही अमेरिकन बोट बुडविली. ही दोस्तांसाठीं तोफा नेत होती. कांहीं उतारूहि तिजवर होते. प्रेसिडेंट वुड्रलसननें कैसरला एक कडक पत्र लिहिलें. पण आपल्या देशबांधवांना तो म्हणाला, "मी क्षुद्रासारखें एकदम युद्ध सुरू करणार नाहीं." १९१६ सालीं वुड्रलसनच पुनः प्रेसिडेंट निवडला गेला. त्याच्या निवडणुकीचें घोषवाक्य 'मीं अमेरिकेला युद्धापासून अलिप्त ठेवलें' हें होतें. प्रत्येकाच्या ओंठावर 'मीं माझा मुलगा लढाईत मारण्यासाठीं नाहीं वाढविला !' हें गाणें होतें. अमेरिकेंतील बहुजनसमाजाचें मत या गीतांत होतें. पण प्रेसिडेन्ट निवडून आल्यानंतर दोनच महिन्यांत वुल्सनला जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारावें लागलें. 'अमेरिकेच्या गलबतांस धक्का लावूं नका' असें त्यानें कैसरला बजावलें, तेव्हां कैसरनें जबाब दिला कीं, 'आमच्याविरुद्ध असणाऱ्या दोस्त-राष्ट्रांना दारूगोळा पुरविणें बंद करा.' वुड्रलसनसमोर दोनच मार्ग होते : एक तर दारूगोळा पाठविणें बंद करणें किंवा

जर्मनीबरोबर युद्ध पुकारणें. त्यानें पहिला मार्ग पत्करला असता तर शस्त्रास्त्रें व दारूगोळा तयार करणाऱ्या कारखानदारांचें नुकसान झालें असतें, पण अमेरिकेंत शांतता राहिली असती. वुइल्सननें दुसरा मार्ग पसंत केला. तो शाळा-मास्तराच्या वृत्तीचा होता. दुसऱ्यांसाठीं तो कायदा करी, पण स्वतः कधीं कोणाचा सल्ला घेत नसे. कैसरनें वुइल्सनचें मानण्याचें नाकारलें. तेव्हां त्याला धडा शिकविण्यासाठीं त्यानें अमेरिकन मुलांना युरोपात पाठविण्याचें ठरविलें. प्रथम युद्ध न करण्याची स्वाभिमानता वुइल्सनजवळ होती; पण आतां युद्धापासून दूर राहणें त्याच्या गर्वास व अभिमानास पटेना.

कैसर गमावली जाणारी लढाई लढत होता, म्हणून तर त्यानें निकरावर येऊन निर्दयपणें आणि हट्टानें पाणबुड्यांची लढाई सुरू केली होती. त्यानें शेवटचा पत्ता टाकला होता. अमेरिका युद्धांत ओढली गेली. कैसरचें लष्करी यंत्र कोलमडण्याला आता केवळ कांहीं महिनेच अवकाश होता. तें १९१८ सालच्या उन्हाळ्यांत गडगडलें. जर्मन सैन्याचा धुव्वा उडला! ते पळत सुटले! कैसर गलबतांत बसून पळून गेला. भेदरलेल्या सशाप्रमाणें तो हॉलंडांत गेला. त्यानें लाखों लोकांना युद्धाच्या खाईत लोटलें; पण तें मरणसंगीत स्वतः ऐकण्याचें धैर्य मात्र त्याला नव्हतें. हॉलंडमध्यें डॉर्न येथें तो हद्दपारींत राहिला. त्याच्या जीवनांतील आवाज आतां बंद पडला, मंद झाला. आतां गडबड नव्हती, गर्जना नव्हती; सारें शांत होतें. लष्करी आक्रमणकाळात तो जितका सुखी होता, त्यापेक्षां अधिक सुखी तो हॉलंडमध्यें असेल अशी आशा करूं या. त्याच्या अडदांड कारकीर्दीनें जगाला दोन गोष्टी पटविल्या : (१) अनियंत्रित राजशाही ही आता एक जुनाट गोष्ट झाली होती; (२) यापुढें आंतरराष्ट्रीय स्पर्धेच्या जागीं आंतरराष्ट्रीय सहकार्य आलें पाहिजे, तरच मानवजात वांचण्याचा संभव आहे. १९१४ सालच्या युद्धासारखी जगड्व्याळ आपत्ति पुनः जगावर येतां कामा नये.

प्रकरण ९ वें

# नवयुगाचे अग्रदूत : लेनिन व गांधी

— १ —

मॅकिआव्हिलियन पद्धत पत्करणारे युरोपीय मुत्सद्दी जणूं संस्कृति–सुधारणांचें दिवाळेंच काढूं पाहत होते! त्यांच्या अप्रामाणिक महत्त्वाकांक्षांमुळें महायुद्ध सुरू झालें होतें; त्यांची दुर्दम्य हावच युद्धाला मानवी सहनशक्तीच्या पलीकडे नेत होती, युद्ध लांबवीत होती. जग वेडें झाले होतें. त्याला पुनः शुद्धीवर आणण्यासाठीं नवीन प्रकारच्या मुत्सद्द्याची आवश्यकता होती. हा नवा मुत्सद्दी एकाच वेळीं रशिया व हिंदुस्थान या दोन देशांत उत्पन्न झाला : रशियांत १९१७ सालीं लेनिनच्या रूपाने व पुढें दोन वर्षांनीं हिंदुस्थानांत गांधींच्या रूपानें. लेनिन डिक्टेटर झाला; त्यानें चमत्कार केले. शेतकऱ्यांस त्यानें प्रतिष्ठित केलें, रंकांस राजे केले. जगांतील राष्ट्रें तोंडांत बोटें घालून पाहूं लागलीं. गांधींच्या जादूच्या स्पर्शानें तर लेनिनहूनहि मोठा चमत्कार झाला : हिंसक जगाशीं या महान् संताने अहिंसक युद्ध पुकारले!

या दोन्ही महापुरुषांचीं कर्मे सामान्यदृष्ट्या तर्कांत बसत नसत. ते काय करीत होते हें जगाला कळेचना. आजहि लेनिन व गांधी हे जणूं दुसऱ्या कोठल्या लोकाहून येथें आले असावे असेंच पुष्कळांना वाटतें. जणूं ते या पृथ्वीवरचे नसावेच असे वाटतें. कांहीं जण त्यांची पूजा करतात; कांहीं जण त्यांचा उपहास करतात; बहुतेकांकडून त्यांच्या विरुद्ध गैरसमज पसरविला जात असतो.

पण त्यांचे स्वभाव समजून घेण्याची किल्ली अगदीं साधी आहे. नवीन प्रामाणिक व राजकारणी पुरुषांचे ते नवीन आदर्श आहेत. या नव्या मुत्सद्द्याचें ध्येय सत्तासंपादन हें नसून सेवा हें आहे. जुन्या परंपरेचे मुत्सद्दी (जे अद्यापि पोत्यांनीं आहेत!) वैभवाचे भक्त असतात; त्यांना स्वतःचे कीर्तिडिंडिम वाजवावयाचे असतात. पण हे नवे मुत्सद्दी न्यायाची भक्ति करणारे आहेत. आपल्या मानवबंधूंचा ते धिक्कार करीत नाहींत, तर त्यांची कींव करतात. ते त्यांची पिळणूक करीत नाहींत, तर त्याना साह्य करतात. ते हाडाचे संत असूनहि, नवधर्मप्रणेते असूनहि, परिस्थितीमुळें त्यांना राजकारणांत पडावें

लागलें, मुत्सद्दी व्हावें लागलें. गांधी व लेनिन म्हणजे इतिहासांतील एक नवा चमत्कारच! दयेचा केवळ उपदेश करूनच न थांबतां ते दया प्रत्यक्ष आचरणात आणणारे होते. न्याय व प्रेम प्रत्यक्षात आणणारे ते नवे बुद्ध होते. शब्दावरच समाधान न मानतां ते प्रत्यक्ष काम करणारे येशिया होते, ईश्वराचे राज्य पृथ्वीवर आणूं पाहणारे ते कर्मवीर होते. लेनिन व गांधी परस्परांपासून कितीहि भिन्न दिसले, तरी एका बाबतींत त्यांच्यांत साम्य आहे. जग सोडून न जातां जगाची नव्यानें उभारणी करणारे ते महान् धार्मिक नेते आहेत.

देव न मानणाऱ्या लेनिनला धर्मात्मा मानणें कित्येकांना विरोधात्मक वाटेल; पण बुद्ध व कन्फ्यूशियस हेहि देव मानीत नसत हें विसरून चालणार नाहीं. लेनिन मरण पावला तेव्हां त्याला लाखों-क्रोडो लोक जवळजवळ देव मानूं लागले होते. त्याची शव-पेटी जाऊं लागली तेव्हां त्यांनीं हातांचे क्रॉस केले, त्याला जणूं धर्मात्मा मानलें. बुद्धाच्या अनीश्वरवादी तत्त्वज्ञानाप्रमाणेंच लेनिनची आधिभौतिक शिकवणहि एक दिवस धर्ममय होईल, तिला रूढीचें अधःपतित रूप येईल, तिचा जणूं एक संप्रदाय बनेल. गांधी व लेनिन यांच्याविषयीं कोट्यवधि लोकांना इतकी खोल, आंतरिक पूज्यबुद्धि कां बरें वाटतें? कारण, लाखों लोकांच्या अस्पष्ट मूक भावनांना त्यांनीं आवाज फोडला, नवीन गति दिली, नवी दिशा दाखविली. लेनिन कामगाराचा संरक्षक संत झाला. गांधी हिंदुस्थानचे तारनहार झाले.

— २ —

१९१७ सालीं लेनिन सत्ताधीश झाला. बहुजनसमाजाला काय पाहिजे हें त्याला माहीत होतें व तें त्यानें त्याला दिलें, म्हणूनच त्याच्या हातीं सत्ता आली. हिंसेचा अवलंब करणारा झार मारला गेला होता, रशियन जनतेला युद्धाचा खरोखर वीट आला होता. झार मेल्यावर युद्धाचें कारणच संपलें असें तीस वाटलें. तिचें जर्मनांशीं काडीचेंहि भांडण नव्हतें. पण नव्या रशियन रिपब्लिकचा अध्यक्ष केरेन्स्की युद्ध थांबवीलसें दिसेना. आपली फसवणूक झाली असें रशियनांस वाटलें. युद्धामुळें रक्तशोषण होऊन राष्ट्र जणूं मरणोन्मुख झालें होतें. त्यांच्यांत दम वा राम उरला नव्हता. रोज एक पौंड ब्रेड मिळत असे,

ती पाऊण पौंडावर आली. पुढें पुढें अर्ध्या पौंडावर येऊन शेवटीं तर प्रत्येकास पावच पौंड ब्रेड मिळूं लागली. अखेरीस तर एक आठवडा असा आला कीं, अजीबात ब्रेडच मिळाली नाहीं. पेट्रोग्राडमधल्या निम्म्याहून अधिक लहान मुलांस दूध मिळत नव्हतें. शिपायांना पुनः खंदकांत पाठविण्यांत आलें, पण त्यांच्या पोटांत अन्न नव्हतें, पायांत बूट नव्हते. ते कृश झाले होते. त्यांचीं तोंडें फुटून गेलीं होतीं, चिंबलीं होतीं. फाटलेल्या गणवेषांतून त्यांचीं हिरवीं-निळीं शरीरें दिसत होतीं. 'तह करा' अशी प्रार्थना करण्यासाठीं त्यांनीं पेट्रोग्राडला शिष्टमंडळ पाठविलें. रुमानियन सरहद्दीवरून आलेला एक शिपाई गर्जना करून म्हणाला, 'भाई हो! खंदकांत आपण मरत आहों, थंडीनें कडक होऊन गेलों आहों, फुकटाफुकट आपण मरत आहों. केरेन्स्की शांतता आणील असें वाटलें होतें. पण हें नवें सरकार तहाचा शब्दहि तोंडातून काढूं देत नाहीं, आणि ही बंदी करीत असतां आम्हांला हें सरकार अन्नहि पुरवीत नाहीं, जगूंहि देत नाहीं!" हा शिपाई हाडकुळा व कृश होता, दुःखी-कष्टी व निकरावर आलेला होता.

रशियन सैनिकांना युद्धांत वैभव वा मोठेपणा दिसेना. दुसरा एक शिपाई म्हणाला, "ज्यांना खंदक म्हणतात, पण आम्हाला जीं आमच्यासाठीं खणलेलीं थडगीं वाटतात, अशा ठिकाणांहून मीं तुम्हांला सर्वांचे रामराम आणले आहेत." दमल्या-भागलेल्या सैनिकांनीं तीन मागण्या मागितल्या: युद्ध थांबविणें, गरिबांना जमीन व भुकेलेल्यांना भाकरी. या मागण्याबाबत 'लंडन-टाइम्स'. "बोल्शेव्हिझमला एकच उपाय आहे, गोळ्या घाला," अशी टीका करतो. साम्राज्यशाहीच्या या लंडनमधील संपादकापासून सूचना घेऊन पेट्रोग्राडमधलेहि प्रतिगामी रशियन संपादक 'क्रांतिकारकांची सरास कत्तल करा' असें प्रतिपादूं लागलीं, शांततेच्या पुरस्कर्त्यांना व ज्यूंना गोळ्या घालण्याचा उपदेश करूं लागलीं! सैनिकास उद्देशून काढलेल्या जाहीरनाम्यात केरेन्स्की लिहितो, "युद्ध ही पवित्र वस्तु आहे. कांहीं झालें तरी शेवटपर्यंत लढणें हें तुमचें पवित्र कर्तव्य आहे." रशियन सैन्यांतील अमलदार केरेन्स्कीच्याच मताचे होते. पण सैनिक हळूहळू पळून जाऊं लागले, पलटणी चिथरूं लागल्या! 'पुरे झालें हें युद्ध!' असें म्हणून हजारों शिपाई निघून जाऊं लागले.

अखेर तो ऐतिहासिक दिवस उगवला : ७ नोव्हेंबर १९१७ !— नवयुगाच्या जन्माचा थोर दिवस ! सैनिकांच्या प्रचंड सभेंत लेनिन शिरला. शिपाई, शेतकरी व कामकरी यांच्या त्या विराट् सभेंत लेनिन थोडेच शब्द बोलला ! पण त्या लहानशा भाषणानें क्रान्ति झाली, प्रचंड उलथापालथ झाली ! जणूं प्रचंड भूकम्प होऊन खालीं, तळाशीं असलेले वर आले व वरचे खालीं मातींत गेले ! युध्यमान राष्ट्रांना त्यानें ' तावडतोब तह करा ', असें सुचविलें. पराभूतांना वाईट वाटणार नाहीं व नेत्यांनाहि लूट मिळणार नाहीं, असा नवीन प्रकारचा तह त्यानें सुचविला. लुटीशिवाय केला जाणारा तह ! त्यानें आपल्या देशबंधूंना राजकीय व सामाजिक लोकशाहीचें ध्येय दिलें; पण खरी लोकशाही येण्यापूर्वी कांहीं दिवस अपरिहार्य म्हणून त्यानें कामगारांची हुकूमशाही उभी केली. कुत्र्याप्रमाणें वागविले जात असलेले पददलित आतां प्रतिष्ठित होणार होते. कामगारांची सत्ता स्थापन होणार होती. या सामाजिक क्रान्तीचें ध्येय जगांत आतरराष्ट्रीय बंधुता स्थापणें हें होतें, सर्वांचे समान हितसंबंध प्रस्थापित करणें हें होतें. भांडवलशाहीची निर्दय स्पर्धा व क्षुद्र स्वार्थान्धता नष्ट करून विश्वकुटुंबवाद प्रस्थापित करणें हें या सामाजिक क्रांतीचें अन्तिम प्राप्तव्य होतें. लेनिनपूर्वी पुष्कळ इतर पुढारी या सभेंत बोलले होते. ट्रॉट्स्कीनें आपल्या निश्चयी व तेजस्वी वाणीनें सांगितलें कीं, जगांतील साऱ्या साम्राज्यशाह्या नष्ट झाल्यावांचून राहणार नाहींत. झिनोव्हिव्हचें भाषण फारच भावनाप्रधान होतें. तो म्हणाला, " साऱ्या जुलूम करणाऱ्यांनीं हा दिवस ध्यानांत धरावा. त्यांना स्वतःच्या कृत्याचा झाडा द्यावा लागेल. लाखों लोकांना मारणाऱ्या वुइल्यम कैसरसारख्या अनियंत्रित सत्ताधाऱ्यांनीं व साम्राज्यवाद्यांनीं हा दिवस विसरूं नये. " सैनिकांच्या प्रतिनिधींनीं युद्ध थांबविण्याबद्दल मनापासून विनंति केली. प्रत्येकजण आतरराष्ट्रीय गीत गात होता.

" ही शेवटची लढाई आहे, प्रत्येकानें आपआपली जागा घ्यावी. हा आंतरराष्ट्रीय पक्ष म्हणजे सर्व मानवांचा पक्ष होईल." आणि मग तो महामना लेनिन उभा राहिला. तो कसा होता ? तो कसा दिसला ? तो आडव्या बांध्याचा, टक्कल पडलेला व ठेंगणा होता. तो अति साधा व जणूं घरगुती वृत्तीचा दिसे. त्याच्या ठायीं भव्य, दिव्य, कांहींहि नव्हतें ; एक

जीर्ण कोट त्याच्या अंगांत होता, पायांतील विजार त्याला जरा मोठी—लाबच होत होती. पण असा हा साधा लेनिन उभा राहताच सर्व श्रोत्यांनीं त्याला जणूं प्रणाम केला ! ती सभा एकदम जणूं प्रेमळ व भाक्तिमान् भक्ताचीच होऊन गेली ! "एक पिकलेल्या केसांचा म्हातारा सैनिक तर मुलाप्रमाणें स्फुंदूं लागला. सारे लोक देहभान विसरून गेले ! ते हंसूं लागले, रडूं लागले, नाचूं लागले, एकमेकांस क्षेमालिंगनें देऊं लागले. ते अपूर्व अशा आनंदासिंधूंत डुंबत होते. असा आनंद कधीं कोणीं अनुभवला नव्हता. जनतेच्या या उचंबळलेल्या भावना ओसराव्या म्हणून लेनिन सस्मित उभा होता. तेथील रीडिंग स्टॅंडची कडा धरून उभ्या राहिलेल्या लेनिनचे लहान, चिमणे डोळे प्रेमानें हंसत होते. त्याने आपली निर्मळ दृष्टि सर्व सभेवर फिरविली. भावना ओसरून सारे शांत झाल्यावर लेनिन रोजच्या साध्या व्यावहारिक आवाजात म्हणाला, "आता आपण नवीन समाजरचना निर्माण करण्याचे काम सुरू करूं या." नवीन वर्षाला प्रारंभ करतांना एकादा शाळामास्तर बोलतो तसे लेनिन बोलला व जगांतील प्रामाणिक राज्यकारभाराचा पहिला मानवी प्रयोग अशा रीतीनें सुरू झाला.

— ३ —

जनतेचे लेनिनवर जितकें प्रेम होते तितकें क्वचितच कोणा ऐतिहासिक व्यक्तीच्या वांट्यास आले असेल. 'न्यू यॉर्क टाइम्स'च्या १९३१ सालच्या जानेवारीच्या अठराव्या तारखेच्या अंकांत वॉल्टर डुरान्टी लिहितो, "आपल्या अनुयायांशीं बोलत असतांना मीं लेनिनला पाहिलें आहे. डोळे दिपविणारा प्रकाश असावा व ती ठेंगणी, सुदृढ, लहान व कार्यमग्न मूर्ति बोलण्यास उभी राहावी. ती उभी राहताच मेघगर्जनेप्रमाणे टाळ्यांचा कडकडाट होई. मी सभोंवार पाहीं, तेव्हां ईश्वराला समोर पाहणाऱ्या लोकांच्या चेहऱ्यावर तळपणाऱ्या तेजासारखें तेज त्या श्रोत्यांच्या तोंडांवर फुललेलें मला दिसे.

लेनिनवर जनतेचें अपार प्रेम होतें. त्याच्याविषयीं त्यांना अत्यंत थोर पूज्य-बुद्धि वाटे. कारण, लेनिन आश्चर्य वाटण्याइतका साधा होता. त्यानें आपली अद्वितीय बुद्धि जनतेच्या सेवेला वाहिली होती. अत्यंत गहन व कठिण गोष्टी तो त्यांना अत्यंत सोप्या भाषेत समजावून देई. मनातील विचार त्याला नीट

प्रकट करतां येत असत. मुत्सद्द्यांच्या बोलण्यातील दुटप्पीपणा व अस्पष्टता त्याच्या बोलण्यात नसत. त्याचा सारा व्यवहार साधा, सरळ व प्रामाणिक असे. यामुळें तो मनांत असेल तेंच आपल्या भाषणांत सांगे. पोटांत एक व ओंठावर दुसरें असें करण्याची गरजच त्याला कधीं भासली नाहीं. आपल्या हातून कधीं कांहीं चूक झाली तर ती तोच आधीं कबूल करी. पण त्याचबरोबर दुसऱ्यांच्याहि चुका निष्ठुरपणें दाखविण्याचें कटु कर्तव्य तो करी. विशेषतः दुसऱ्यांचा दंभ प्रकट करण्यांत तर तो फारच कठोर बने. क्रांति झाल्यावर पूर्वीच्या कारकीर्दींतील कागदपत्र त्याच्या हातीं आले व १९१४ सालचें महायुद्ध घडवून आणणारे नाना गुप्त तहांचे कागदपत्र त्याला मिळतांच ते त्यानें ताबडतोब प्रसिद्ध करून म्हटलें, "जगांतील या असल्या अप्रामाणिक व दांभिक मुत्सद्द्यांचा मी चिरशत्रु आहें."

जीवनावधि त्याचें एकच ध्येय होतें. त्याला अशा प्रकारची समाजरचना निर्माण करावयाची होती कीं, तींत दुष्टता, पिळणूक, बेकारी, आंतरराष्ट्रीय कारस्थानें व युद्धें यांना वाव उरणार नाहीं. या एका ध्येयाच्या पूर्ततेसाठीं त्यानें सारें जीवन वाहिलें. स्वतःच्या सर्व वैयक्तिक महत्त्वाकांक्षा व आशाआकांक्षा त्यानें झुगारून दिल्या. त्याचा बाप मध्यमवर्गांतील सरदारांपैकीं होता. सेंट-पीटर्सबर्ग विद्यापीठांतून परमोच्च यश मिळवून तो पदवीधर झाला होता. भरपूर पैसा व मानसन्मान मिळवून देणारा कायद्याचा धंदा त्याच्यासमोर उभा होता. पण त्याच वेळेस त्याचा मोठा भाऊ १८९१ सालीं क्रांतिकारक चळवळींत भाग घेतल्याबद्दल फांशीं दिला गेला! लेनिनचें आपल्या भावावर अपार प्रेम होते; त्याच्याविषयीं त्याच्या मनांत अपार पूज्यबुद्धि होती. भावाच्या बलिदानानें लेनिनच्या जीवनाला अजीबात निराळें वळण दिलें. कायद्याचा धंदा, सामाजिक दर्जा, वगैरे सारे भिरकावून देऊन तो तनमनधनेंकरून पद-दलितांच्या व अकिंचन परित्यक्ताच्यासाठीं आखाड्यांत—क्रांतीच्या समरांगणांत उडी घेता झाला. १८९७ सालीं त्याला गिरफदार करून सैबीरियांत पाठविण्यांत आलें. तेथें त्यानें कॉम्रेड एन्. के. क्रुप्स्काया हिच्याशीं विवाह केला. तीहि त्याच्याबरोबर वनवासांत गेली होती.

१९०० सालीं तो युरोपांत परत आला. त्याच्यामागें कुत्रे सारखे लागले होते. त्याला स्वतःचा देश उरला नव्हता. तो सारखा लिहीत होता, सारखा

जीर्ण कोट त्याच्या अंगांत होता, पायांतील विजार त्याला जरा मोठी—लांबच होत होती. पण असा हा साधा लेनिन उभा राहताच सर्व श्रोत्यांनीं त्याला जणूं प्रणाम केला ! ती सभा एकदम जणूं प्रेमळ व भक्तिमान् भक्तांचीच होऊन गेली ! "एक पिकलेल्या केसांचा म्हातारा सैनिक तर मुलाप्रमाणें स्फुंदूं लागला. सारे लोक देहभान विसरून गेले ! ते हंसूं लागले, रडूं लागले, नाचूं लागले, एकमेकांस क्षेमालिंगनें देऊं लागले. ते अपूर्व अशा आनंदासिंधूंत डुंबत होते. असा आनंद कधीं कोणीं अनुभवला नव्हता. जनतेच्या या उचंबळलेल्या भावना ओसराव्या म्हणून लेनिन सस्मित उभा होता. तेथील रीडिंग स्टॅंडची कडा धरून उभ्या राहिलेल्या लेनिनचे लहान, चिमणे डोळे प्रेमानें हंसत होते. त्याने आपली निर्मळ दृष्टि सर्व सभेवर फिरविली. भावना ओसरून सारे शांत झाल्यावर लेनिन रोजच्या साध्या व्यावहारिक आवाजांत म्हणाला, "आता आपण नवीन समाजरचना निर्माण करण्याचें काम सुरू करूं या." नवीन वर्षाला प्रारंभ करताना एकादा शाळामास्तर बोलतो तसे लेनिन बोलला व जगांतील प्रामाणिक राज्यकारभाराचा पहिला मानवी प्रयोग अशा रीतीनें सुरू झाला.

— ३ —

जनतेचे लेनिनवर जितकें प्रेम होतें तितकें क्वचितच कोणा ऐतिहासिक व्यक्तीच्या वांट्यास आलें असेल. 'न्यू यॉर्क टाइम्स'च्या १९३१ सालच्या जानेवारीच्या अठराव्या तारखेच्या अंकांत वॉल्टर डुरान्टी लिहितो, "आपल्या अनुयायांशीं बोलत असताना मीं लेनिनला पाहिलें आहे. डोळे दिपविणारा प्रकाश असावा व ती ठेंगणी, सुदृढ, लहान व कार्यमग्न मूर्ति बोलण्यास उभी राहावी. ती उभी राहताच मेघगर्जनेप्रमाणे टाळ्यांचा कडकडाट होई. मी सभोंवार पाहीं, तेव्हां ईश्वराला समोर पाहणाऱ्या लोकांच्या चेहऱ्यावर तळपणाऱ्या तेजासारखें तेज त्या श्रोत्यांच्या तोंडांवर फुललेलें मला दिसे.

लेनिनवर जनतेचें अपार प्रेम होतें. त्याच्याविषयीं त्यांना अत्यंत थोर पूज्य-बुद्धि वाटे. कारण, लेनिन आश्चर्य वाटण्याइतका साधा होता. त्यानें आपली अद्वितीय बुद्धि जनतेच्या सेवेला वाहिली होती. अत्यंत गहन व कठिण गोष्टी तो त्यांना अत्यंत सोप्या भाषेत समजावून देई. मनांतील विचार त्याला नीट

प्रकट करतां येत असत. मुत्सद्द्यांच्या बोलण्यातील दुटप्पीपणा व अस्पष्टता त्याच्या बोलण्यात नसत. त्याचा सारा व्यवहार साधा, सरळ व प्रामाणिक असे. यामुळें तो मनांत असेल तेंच आपल्या भाषणांत सांगे. पोटांत एक व ओठावर दुसरें असें करण्याची गरजच त्याला कधीं भासली नाहीं. आपल्या हातून कधीं कांहीं चूक झाली तर ती तोच आधीं कबूल करी. पण त्याचबरोबर दुसऱ्यांच्याहि चुका निष्ठुरपणें दाखविण्याचें कटु कर्तव्य तो करी. विशेषतः दुसऱ्यांचा दंभ प्रकट करण्यांत तर तो फारच कठोर बने. क्रांति झाल्यावर पूर्वीच्या कारकीर्दीतील कागदपत्र त्याच्या हातीं आले व १९१४ सालचें महायुद्ध घडवून आणणारे नाना गुप्त तहांचे कागदपत्र त्याला मिळतांच ते त्यानें ताबडतोब प्रसिद्ध करून म्हटलें, "जगांतील या असल्या अप्रामाणिक व दांभिक मुत्सद्द्यांचा मी चिरशत्रु आहें."

जीवनावधि त्याचें एकच ध्येय होतें. त्याला अशा प्रकारची समाजरचना निर्माण करावयाची होती कीं, तींत दुष्टता, पिळणूक, बेकारी, आंतरराष्ट्रीय कारस्थानें व युद्धें यांना वाव उरणार नाहीं. या एका ध्येयाच्या पूर्ततेसाठीं त्यानें सारें जीवन वाहिलें. स्वतःच्या सर्व वैयक्तिक महत्त्वाकांक्षा व आशाआकांक्षा त्यानें झुगारून दिल्या. त्याचा बाप मध्यमवर्गातील सरदारांपैकीं होता. सेंट-पीटर्सबर्ग विद्यापीठांतून परमोच्च यश मिळवून तो पदवीधर झाला होता. भरपूर पैसा व मानसन्मान मिळवून देणारा कायद्याचा धंदा त्याच्यासमोर उभा होता. पण त्याच वेळेस त्याचा मोठा भाऊ १८९१ सालीं क्रांतिकारक चळवळींत भाग घेतल्याबद्दल फांशीं दिला गेला! लेनिनचें आपल्या भावावर अपार प्रेम होते; त्याच्याविषयीं त्याच्या मनांत अपार पूज्यबुद्धि होती. भावाच्या बलिदानानें लेनिनच्या जीवनाला अजीबात निराळें वळण दिलें. कायद्याचा धंदा, सामाजिक दर्जा, वगैरे सारे भिरकावून देऊन तो तनमनधनेंकरून पद-दलितांच्या व अकिंचन परित्यक्ताच्यासाठीं आखाड्यांत—क्रांतीच्या समरांगणांत उडी घेता झाला. १८९७ सालीं त्याला गिरफदार करून सैबीरियांत पाठविण्यांत आलें. तेथें त्यानें कॉम्रेड एन्. के. क्रुप्स्काया हिच्याशीं विवाह केला. तीहि त्याच्याबरोबर वनवासांत गेली होती.

१९०० सालीं तो युरोपांत परत आला. त्याच्यामागें कुत्रे सारखे लागले होते. त्याला स्वतःचा देश उरला नव्हता. तो सारखा लिहीत होता, सारखा

चळवळ करीत होता, स्वप्नें उभवीत होता, योजना आंखीत होता. " ज्या दिवशीं फौजफांट्याची वा पाशवी बळाची जरुरीच उरणार नाहीं, कोणीहि कोणालाच गुलाम करण्यासाठीं शस्त्रास्त्रें जवळ ठेवणार नाहीं, समाजातील एक वर्ग दुसऱ्या वर्गास दडपून टाकण्यासाठीं जुलूम करणार नाहीं " असा दिवस उजाडावा म्हणून लेनिन अहोरात्र असेल तेथें अविश्रांत श्रमत होता. सेंट फ्रॅन्सिसप्रमाणें त्यानें दारिद्र्याला व हालअपेष्टांना वरलें होतें. जगांतील दारिद्र्य दूर व्हावें म्हणून तो दरिद्री झाला होता. जगातील क्लेश नाहींसे व्हावे म्हणून तो क्लेश सहन करीत होता. त्याच्या या वनवासकालभर त्याची पत्नी व मैत्रीण क्रुप्स्काया त्याच्याबरोबर त्याच्या हालअपेष्टांत त्याची भागीदारीण होती, त्याच्या महत्कृत्यांत त्याला मदत करीत होती.

१९०५ सालीं रशियांत परत येऊन त्यानें त्या वेळच्या क्रांतींत भाग घेतला; पण १९०७ सालीं त्याला पुनः हद्दपार करण्यांत आलें. तेव्हांपासून १९१७ सालच्या विजयदिनापर्यंत कधींहि त्याला रशियांत पाय ठेवतां आला नाहीं.

निर्वासनाच्या प्रदीर्घ काळांत तो कष्ट सोसण्यास व स्वतःच्या क्लेशांकडे पाहून हंसण्यास शिकला होता. लेनिनचें एक अपूर्व वैशिष्ट्य म्हणजे त्याचें हास्य. गॅमालिएल ब्रॅडफर्ड आपल्या " Quick & the Dead " या पुस्तकांत लिहितो, " लेनिनला कोठेंहि भेटा, त्याच्या चेहऱ्यावर हंसें असावयाचेंच." मॅक्झिम गॉर्की, बर्ट्रांड रसेल, मिसेस फिलिफ स्नोडन यांच्यावर, येवढेंच काय, पण त्याच्या सान्निध्यांत येणाऱ्या प्रत्येकावर त्याच्या हास्याचा जादूसारखा परिणाम होई. कोणाकोणाला त्याच्या त्या हास्यांत कठोरता आहेसें भासे, तर कित्येकांना त्यांत सुस्वभाव व आनंद यांचें प्रतिबिंब दिसे. ब्रॅडफर्ड लिहितो, " तें हास्य मला तरी कोडेंच होतें. मी तरी ते समजूं शकलों नाहीं. " पण मला वाटतें कीं, त्याचें हंसें समजून घेणें सोपें आहे. लेनिन हंसे तें तो कठोर होता म्हणून नसे, अगर आनंदी होता म्हणूनहि नसे, तर तो दुःखी होता म्हणून. त्यानें इतकें दुःख इतक्या उत्कटपणे सोसलें होतें कीं, तो आतां पोटभर हंसावयास शिकला होता. या मानवी नाटकाला नवीन स्वरूप देण्यासाठीं तो धडपडत होता; पण हा सारा विश्वव्यापक फार्स आहे हें त्याला

दिसत होतें. त्याचें हास्य स्विफ्टच्या, हेनच्या किंवा मार्क ट्वेनच्या हास्याप्रमाणें होतें. त्यानें मानवजातीसाठीं स्वतःचा होम केला; पण मानवजात तिच्यासाठीं इतका होम करण्याच्या लायकीची नाहीं हें तो जाणत होता. स्वतःच्या कम्यूनिस्ट बंधूंतहि त्याला असा अनुभव येत असे कीं, "शेंकडा एक प्रामाणिक असला, तर एकोणचाळीस गुंड व साठ टोणग्ये असतात." गटेप्रमाणेंच त्यानें मानवाची मूर्खता व त्याचें दुःख हीं तळाशीं बुडून पाहिलीं होतीं, समजून घेतलीं होतीं. "अश्रूंत हास्य असतें" हे एका लॅटिन कवीचे शब्द त्यालाहि नीट समजले होते. लेनिनच्या हंसण्यांत अश्रू असत.

— ४ —

लेनिन १९२४ सालच्या जानेवारीच्या एकविसाव्या तारखेस मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय फक्त त्रेपन्न वर्षांचें होतें. सोव्हिएट कॉंग्रेसनें काढलेल्या जाहीरनाम्यांत त्याला जवळजवळ देव बनविण्यांत आलें होतें. सदर जाहीरनामा म्हणतो, "लेनिनची दूरदृष्टि निःसीम होती. बहुजनसमाजाची संघटना करण्याची त्याची बुद्धि कल्पनातीत होती. तो सर्व देशाचा, सर्व लोकांचा, सर्वकालीन व परम महान् पुढारी होता. तो नव्या मानवजातीचा प्रभु होता, जगाचा तारनहार होता." लेनिन महापुरुष होता यांत शंकाच नाहीं. तो अति महान् विभूतींपैकीं एक होता. पण त्यानें एक दुःखद चूक केली——हिंसेनें जागतिक क्रांति घडवून आणण्याचा यत्न केला. त्यानें झारचा जुलूम नष्ट केला; पण त्या जागीं कामगारशाहीचा जुलूम आणला. अग्नीनें अग्नि विझवितां येत नाहीं. लेनिननें द्वेषाशीं द्वेषानेंच लढण्याची खटपट केली. जगाची लष्करशाहीपासून सुटका करण्यासाठीं त्यानें स्वतः एक सामर्थ्यशाली लष्करी यंत्र उभें केलें. लेनिनच्या कार्यक्रमांतील मोठा दोष म्हणजे हिंसेवरील (लष्करी सामर्थ्यावरील) त्याचा विश्वास हा त्या योजनेंतील दुबळेपणा होता. तो फ्रेंच क्रांतीचा धडा विसरला. डान्टन्, राब्सपेरी, मरात यांनींहि लेनिन व ट्रॉट्स्की यांच्याप्रमाणेंच जगाला मुक्त करण्यासाठीं प्रचंड सैन्य उभें केलें होतें. पण तें सैन्य नेपोलियनच्या हातीं पडलें व त्या सैन्यानें फ्रान्सचें स्वातंत्र्यहि अस्तास नेलें.

लष्करशाहीच्या संरक्षक पंखाखालीं खरें स्वातंत्र्य कधींहि टिकणार नाहीं, जगणार नाहीं. मला एकादे वेळेस वाटतें कीं, लेनिननें कांहीं केलें असेल तर तें इतकेंच कीं, भावी रशियन नेपोलियनसाठीं त्यानें सैन्य निर्माण करून ठेवलें. लेनिनच्या, त्याचप्रमाणें झारच्या लष्करशाहीपासून मुक्त झाल्याविना रशिया पूर्णपणें स्वतंत्र झाला असें म्हणतां येणार नाहीं.

— ५ —

जगाला गांधींचे हृदय असलेला लेनिन, खरोखरीं हवा आहे अगर लेनिनची बुद्धि असणारे गांधी हवे आहेत. कांहीं बाबतींत गांधींचें मन जुन्या काळांतील आहेसें वाटतें. त्यांची बुद्धि प्राचीन काळांत वावरत होतीसें वाटतें. विवाहितांना संततीची इच्छा नसेल तर त्यांनीं ब्रह्मचारी राहावें असें ते म्हणत. ते ' यंत्रें नकोत ' असें म्हणत. तसेंच ते चरखा हातीं घ्यावयास सांगत होते. ते वैद्यकशास्त्राच्याहि विरुद्ध होते. ते संन्यस्त वृत्तीचे होते. ते शेळीचें दूध व खजूर यांवर राहत. ते फळें खात. गाय हिंदुमात्रास पूज्य असल्यामुळें ते गायीचे दूधहि पीत नसत, ते हिंदु धर्मांतील अनेक रूढी मानीत. पण या अशा कांहीं गोष्टी सोडून दिल्या, तर मानवी रंगभूमीवर गांधींसारखा दिव्य स्फूर्ति देणारा महापुरुष क्वचितच झाला असेल असें आपणांस निःशंकपणें व निःपक्षपातीपणानें म्हणावें लागेल. जगांत होऊन गेलेल्या अत्यंत प्रभावी व स्फूर्तिदायी व्यक्तींपैकीं गांधी एक होत.

गांधींना महात्मा म्हणतात. महात्मा म्हणजे ज्याचा आत्मा मोठा आहे तो, ज्याचें मन मोठें आहे असा महापुरुष. गांधी केवळ शान्तात्मे होते असें कित्येक म्हणत, पण तें केवळ असत्य आहे. सीझरला ज्याप्रमाणें शांततावादी म्हणतां येणार नाहीं, त्याचप्रमाणें गांधींनाहि शांततावादी म्हणतां येणार नाहीं. गांधी हे त्यांच्या कालीं जिवंत असणाऱ्यांत अत्यंत जोरदार लढवय्ये होते. खरोखरच त्याना ' इतिहासांतील सर्वांत मोठी विभूति ' असें म्हणावें लागेल. असा युद्धशास्त्रज्ञ पूर्वीं कधीं झाला नाहीं. गांधींनीं जें नवें शस्त्र शोधिलें आहे, त्याच्याशीं तुलना करून पाहतां तुमच्या या पाणबुड्या, तुमचीं हीं झेपेलिनें, तुमचीं हीं आरमारें, तुमच्या या तोफा म्हणजे लहान मुलांचीं खेळणीं वाटतात. गांधींनीं शोधलेलें हें कोणतें शस्त्र?—अहिंसेचें सर्वशक्तिमान् शस्त्र. रक्तपाताशिवाय लढाया कशा जिंकाव्या हें गांधींनीं शिकविलें आहे.

गांधी हे लढवय्ये होते. त्यांनीं आयुष्यभर अन्यायाशीं सतत युद्ध चालविलें. कर्मशून्य आणि प्रतिकारहीन शांतिब्रह्माशीं तर त्याना कांहीं एक करावयाचें नसे. एकादा सेनापति स्वतःच्या फौजांना जसें शिक्षण देतो, तसेंच—तितक्याच दक्षतेनें गांधी आपलें सैन्य तयार करीत असत. ते लिहितात, " दुसऱ्यास न मारतां स्वतः मरण्याचें शांत व दान्त धैर्य मी माझ्या सैनिकांत उत्पन्न करण्याचा यत्न करीत असतों. माझी श्रद्धा आहे कीं, अहिंसा हिंसेपेक्षां अनंतपट श्रेष्ठ आहे, क्षमा शिक्षेपेक्षां अधिक प्रभावी आहे. क्षमा शूराला भूषविते." हे शब्द कांहीं नवे नाहींत. असे शब्द पुनः पुनः उच्चारले गेले आहेत. हे शब्द उच्चारण्यांत गांधींनीं बुद्धाचें अनुकरण केलें आहे. पण गांधींनीं हे शब्द प्रत्यक्ष कृतींत आणून त्या महात्म्याच्या पुढें पाऊल टाकलें. त्या शान्तिप्रिय महात्म्याचे ते शब्द बरोबर होते असें अश्रद्ध जगाला गांधींनीं नीट पटविलें आहे, त्यामुळें सारे सिनिक ( संशयात्मे ) चकित झाले आहेत.

गांधींनीं एक मोठा विजय आधींच मिळविला होता. हिंदुस्थानांत त्यांनीं जें नवें युद्ध मांडले तें अपेशी होणार असें भविष्य पुष्कळ लोकांनीं वर्तविलें होतें व हिंदुस्थानांतील या अहिंसक युद्धाची भरपूर टिंगल केली होती. पण आफ्रिकेंत गांधी अशीच एक लढाई लढले होते व तींत विजयी झाले होते ही गोष्ट हे टीकाकार विसरून गेले होते. लंडन–विद्यापीठांत कायद्याचा अभ्यास करून ते हिंदुस्थानांत आले व १८९३ सालीं वकिली करूं लागले. पण एका महत्त्वाच्या खटल्यासाठीं दक्षिण आफ्रिकेंत प्रिटोरिया येथें त्यांना बोलावण्यांत आलें. या वेळीं गांधींचें वय फक्त चोवीस वर्षांचें होतें.

थोडया महिन्यांतच ते आफ्रिका सोडून जाणार होते; पण एकवीस वर्षे ते तेथें राहिले. आफ्रिकेंत दीड लक्ष हिंदी लोक होते. तेथें त्यांचा अपमान करण्यांत येई, त्यांच्यावर जुल्म करण्यांत येई, त्यांना गुलाम म्हणून वागविण्यांत येई. गांधींनीं या सर्वांची संघटना करून त्यांच्यांत शक्ति उत्पन्न केली व अहिंसक लढा सुरू केला. इतिहासांतील ही असली पहिलीच लढाई होती. रक्तहीन क्रांति करून आपल्या या अहिंसक सेनेला गांधींनीं विजय मिळवून दिला. कोणतें तत्त्व डोळ्यांसमोर ठेवून गांधी वागत होते? शत्रूला न मारतां त्याला जिंकून घ्यावयाचें असें गांधींचें धोरण होतें. सामान्य शिपाई शत्रूवर विश्वास

ठेवीत नसतो. पण गांधीजी शत्रूवरहि नेहमीं विश्वास ठेवीत. म्हणून ते शत्रू-विरुद्ध अहिंसा, अक्रोध व असहकार हीं तीनच शस्त्रें वापरीत. दुसऱ्यांवर जुलूम करणाऱ्या माणसाकरितां किंवा माणसाबरोबर कांहींहि करावयाला ते तयार नसत. संपूर्ण असहकार हे त्यांचें धोरण असे. दक्षिण आफ्रिकेंतील सर्व हिंदी जनतेला अन्यायाविरुद्ध सार्वत्रिक संप करण्याला त्यांनीं प्रवृत्त केलें. 'शत्रूला शारीरिक अपाय करूं नका,' ही त्यांनीं आपल्या सैनिकांना शिकवलेली दुसरी गोष्ट. कारण, त्यांचा लढा व्यक्तीविरुद्ध नसून व्यक्तीच्या हृदयात लपून बसलेल्या पशुतेविरुद्ध असे. 'शत्रू संकटांत असतील तेव्हां त्यांना साह्य करीत जा.' ही त्यांनीं आपल्या सैनिकांना शिकविलेली तिसरी गोष्ट. दक्षिण आफ्रिकेंत सत्याग्रह–संग्राम सुरू असतां जोहान्सबर्ग येथें प्लेग उद्भवला. गांधींनीं लगेच लढा थांबविला. आपल्या शत्रूंना मदत करण्यासाठीं व सुख–शांति देण्यासाठीं त्यांनीं आपल्या सैनिकांचें शुश्रूषापथक बनविलें.

या अभिनव व विचित्र युद्धपद्धतीशीं कोणत्या रीतीनें लढावें, हें गांधींच्या शत्रूंना प्रथम कळेचना. त्यांनीं हिन्दी लोकांची कत्तल केली, हजारोंना तुरुंगांत डांबलें, गांधींचा छळ केला. एकदां तर ते गांधींना दगडांधोंड्यांनीं ठार करणार होते. तरीहि गांधी व त्यांचे अनुयायी शांतच राहिले. त्यांनीं हातहि उगारला नाहीं. त्यांनीं अन्यायाची परतफेड क्षमेनें, अत्याचाराची परतफेड करुणेनें व द्वेषाची परतफेड प्रेमानें केली. आणि गांधींचीं शस्त्रें प्रभावी ठरलीं. गांधी व त्यांचे अहिंसक सैनिक यांनीं शत्रूला लाजविलें, पराभूत केलें. जनरल स्मट्स्चा एक सेक्रेटरी या सत्याग्रह्यांशीं निर्दयपणें लढत होता. तो शेवटीं गांधींना म्हणाला, "मला तुमचे लोक आवडत नाहींत. त्यांना साह्य करावेंसें मला मुळींच वाटत नाहीं. पण मी करूं काय? आम्ही अडचणींत असतों तेव्हां तुम्ही साह्यास येतां! मग तुमच्यावर हात कसा टाकावा? तुम्हीं हिंसेचा अवलंब करावा असें मला कितीदां तरी वाटतें. इंग्रज संपवाले असें करतात. तुम्हीहि हिंसक बनाल, तर तुमचा प्रश्न कसा मिटवावा हें आम्हांस माहीत आहे. पण तुम्ही तर शत्रूलाहि अपाय करीत नाहीं, आत्म–क्लेशानेंच विजय मिळवूं इच्छितां. स्वेच्छेनें घालून घेतलेल्या सुजनतेच्या व उदारतेच्या मर्यादा तुम्ही कधीं उल्लंघीत नाहीं, त्यामुळें आम्ही केवळ अगतिक व किंकर्तव्यमूढ होऊन गेलों आहों."

शांतिमय अहिंसक प्रतिकारानें हिंसेवर पूर्ण विजय मिळविला. जनरल स्मट्स् गांधींना शरण आला. १९१४ सालीं दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोक मुक्त झाले.

— ६ —

१९१९ सालीं गांधींनीं दक्षिण आफ्रिकेंत यशस्वी झालेला हा दिव्य प्रयोग हिंदुस्थानांत सुरू केला. या वेळीं तीस कोटी लोकाचें सबंध राष्ट्र त्यांनीं अहिंसक झगडयासाठीं उभें केलें. स्त्रिया, पुरुष, मुलें, सर्वच अहिंसक बंडासाठीं उठलीं. १९१४ सालच्या महायुद्धांत हिंदुस्थाननें नऊ लक्ष पंचाऐंशीं हजार सैनिक दिले, या राजनिष्ठेचें बक्षीस म्हणून स्वराज्य देण्याचें इंग्रजांनीं दिलेलें अभिवचन युद्ध संपताच ते विसरले व हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्याऐवजीं त्याचें असलेलें पारतंत्र्यच त्यांनीं अधिक दृढ केलें, त्यामुळें हिंदुस्थान संतापला. १९१९ सालच्या फेब्रुवारीच्या अठ्ठाविसाव्या तारखेस सात्त्विक संतापाचा अहिंसक संग्राम सुरू झाला. प्रिन्स ऑफ वेल्स हिंदुस्थानला भेट देण्यास आले. पण ते कलकत्त्यांत आले तर सारे रस्ते निर्जन होते ! जिकडे तिकडे शुकशुकाट ! त्याच्या स्वागतासाठीं एकहि मनुष्य बाहेर आला नाहीं.

देशभर सार्वत्रिक धरपकड झाली. पंचवीस हजार स्त्री–पुरुषांची तुरुंगांत रवानगी करण्यांत आली ! ते तुरुंगात जाताना आनंदानें गाणीं गात होते. शेवटीं गांधींनाहि अटक झाली. “ ब्रिटिश सरकारविरुद्ध बंड पुकारून मीं जाणूनबुजून उघडपणें कायदा मोडला आहे ”, असें गांधींनीं कबूल केलें. खटल्याच्या वेळीं ब्रूम्स्फील्ड हे न्यायाधीश होते. गांधी म्हणाले, “ मी दयेची याचना करीत नाहीं, केलेलीं कर्मं सौम्यहि करून दाखवूं इच्छीत नाहीं. मीं कायद्याप्रमाणें जाणूनबुजून गुन्हा केला आहे. पण नागरिक या नात्यानें तसें करणें हें माझें परमोच्च कर्तव्यच होतें. म्हणून देतां येईल ती जास्तींत जास्त शिक्षा मला द्या, ती मी आनंदानें स्वीकारीन व भोगीन. न्यायाधीशमहाराज, तुमच्यासमोर दोनच मार्ग आहेत : न्यायाधीशाची जागा तरी सोडा, नाहीं तर मला कठोरतम शिक्षा तरी फर्मावा. ”

न्यायाधीश ब्रूम्स्फील्डहि उदारतेंत हटणारे नव्हते. ते म्हणाले, " तुमच्या लक्षावधि देशबांधवांच्या दृष्टीनें तुम्ही एक मोठे देशभक्त व थोर पुढारी आहां ही गोष्ट लक्षांत न घेणें अशक्य आहे. राजकीय मतांच्या बाबतींत तुमच्याशीं मतभेद असणारे लोकहि तुम्ही एक उदात्त ध्येयाचे पुरुष आहां, संत आहां, असें मानतात ! "

तें बंड तात्पुरतें शमलें, पण त्या अहिंसक बंडानें ब्रिटिश सरकारला बराच विचार करावयाला लावलें यांत शंकाच नाहीं. मुंबई प्रांताचे गव्हर्नर सर जॉर्ज लॉइड म्हणतात, " जागतिक इतिहासांत गांधींचा हा प्रयोग अत्यंत मोठा, भव्य व प्रचंड होता व तो यशाच्या अगदीं जवळ आला होता."

१९२२ सालची ही गोष्ट. पुढे गांधीजी सुटले. आजारी असल्यामुळें त्यांना प्रत्यक्ष राजकारणांत कांही वर्षे भाग घेतां आला नाहीं. ब्रिटिशांना वाटलें कीं, हिंदी चळवळ थांबली, सत्याग्रह बंद पडला, मेला. पण गांधी योग्य वेळेची वाट पाहत होते. अहिंसक असहकाराच्या प्रयोगासाठीं ते राष्ट्राला निरनिराळ्या रीतींनीं सारखी शिकवण देत होते. १९२९ सालीं त्यांची शक्ति पुनः आली. शत्रूंना मित्र करण्याच्या कलेचें बरेंचसें शिक्षण त्यांच्या सैनिकांना मिळालें होतें. त्यांनीं ब्रिटिश सरकारविरुद्ध शेवटचें व फार मोठें बंड सुरू केलें. त्यांना पुनः तुरुंगात घालण्यात आलें. त्यांच्या साठ हजार अनुयायांनाहि तुरुंगांत डांबण्यांत आलें. पण तुरुंगांत जाण्यास—शत्रूवर हात न टाकतां स्वतः कष्ट भोगण्यास सारें राष्ट्र शिस्तींत उभें होतें. जुलमी सरकारचा द्वेष न करतां त्याचे कायदे मोडण्याला—जंगली सत्ताधीशांच्या हिंसक उद्दामपणाला सुसंस्कृत लोकाच्या शांत स्वाभिमानानें उत्तर द्यावयाला—सारें राष्ट्र सज्ज होतें. तेथें साठ हजार म्हणजे वास्तविक मूठभरच लोक तुरुंगांत गेले !

हिंदी राष्ट्राचा विजय झाला. १९३१ च्या जानेवारीमध्यें गांधींना मुक्त करण्यात आलें. ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानला स्वराज्य दिलें; पण गांधींचें पूर्ण समाधान झालें नाहीं. त्यांना संपूर्ण स्वातंत्र्य हवें होतें. आणि का हवें असूं नये ? ब्रिटिशांना हिंदुस्थानवर राज्य करण्याचा काय अधिकार ? बेकायदा आक्रमणाच्या जोरावर ते सत्ताधीश आहेत. हिंदुस्थानांतील इंग्रज हे नेते नसून पाहुणे आहेत असे गांधी मानीत. ते प्रसंगीं इंग्रजांचे हुकूम मानीत नसत; पण इंग्रज संकटांत पडले, त्यांना अडचण आली, तर गांधी लगेच

त्यांच्या मदतीला धांवत. पाश्चिमात्यांच्या पाणचटपणाला गांधी पौर्वात्याच्या सुजनतेनें सुसंस्कृतपणें उत्तर देत. आपल्या सहनशीलतेनें, हालअपेष्टांनीं, दयेनें, क्षमेनें, सौजन्यानें, कार्यकुशलतेनें ते इंग्रजाना सभ्य माणसें बनविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगीत. त्यांनीं जगाला सिद्ध करून दाखविलें कीं, शस्त्रास्त्रांचीं युद्धें आतां जुनाट झालीं, मोठ्यांत मोठ्या लढायाहि रक्तपाताशिवाय लढतां येतात आणि प्रेम हेंच पृथ्वीवरील अत्यंत प्रभावी व प्रबळ शस्त्र होय. त्यांचे जीवितकार्य पुरें झालें आहे.

## प्रकरण १० वें

# हुकूमशाही विरुद्ध लोकशाही : मुसोलिनी, हिटलर, रूझवेल्ट

— १ —

गेलीं एकवीस वर्षें हें जग अत्यंत रुग्णावस्थेंत आहे. परिस्थिति मोठी आणीबाणीची आहे. १९१४ सालच्या महायुद्धातून नाना प्रकारच्या आपत्ती उद्‌भवल्या व शारीरिक, मानसिक, आणि नैतिक आधिव्याधी उत्पन्न झाल्या. या सर्व आधिव्याधींमुळें मानवजात निरुत्साही होऊन गेली, खचून गेली, मेटाकुटीस आली. नाना उपाय सुचविले गेले, अमलांत आणले गेले आणि अजूनहि सुचविले जात आहेत व अमलांत आणले जात आहेत : रशियांत कम्युनिझम्, जर्मनींत नाझीझम्, इटलींत फॅसिझम्, अमेरिकेंत लोकशाही, हिंदुस्थानांत अहिंसक प्रतिकार, असे नाना प्रयोग चालले आहेत. जगांतील दुःखांचा परिहार व्हावा यासाठीं प्रत्येक देशानें सुचविलेल्या रामबाण उपायांपैकीं कांहींचें निरीक्षण-परीक्षण आपण केलें; आता उरलेल्यांकडेहि जरा वळूं या.

समकालीन घटनांचें अत्यंत शांतपणें व बिनचूक मूल्यमापन करणें इतिहासकाराला फार कठिण जातें. कारण, त्याला स्वतःच्याच पिढीच्या इतिहासांत प्रत्यक्ष भाग घेणारा व पुनः प्रेक्षक आणि तटस्थ निरीक्षकहि व्हावें लागतें. या दोन्ही भूमिका तो कशा पार पाडणार ? आजूबाजूच्या जगांत जें जें घडतें तें तें त्याच्या बाबतींतहि घडतच असतें; त्याच्यावरहि त्याचा परिणाम होतच असतो; त्यामुळें त्याची दृष्टि तितकी निर्मळ राहत नाहीं, त्याचा स्वभाव शांत राहत

नाहीं. आपलें व आपल्या कुटुंबाचें काय होणार या चिंतेमुळें तो निर्णयहि बरोबरच करील असें नाहीं. त्याची न्यायबुद्धि पक्षातीत राहणें व सत्यावर स्थिरणें कठिण असतें. शेवटीं जगाची गति नक्की कोणत्या दिशेनें जाणार, कोणता प्रवाह पुढें जाणार याचें त्याला नीट आकलन होत नाहीं: एकाच वेळीं दहाबारा दिशांनीं प्रवाह खळखळ करीत जात असतात.

अशा या गोंधळांतून दोन प्रवृत्ती, दोन निष्ठा निश्चित स्वरूपांत जगापुढें उभ्या राहत आहेत: लोकशाही व हुकूमशाही. हे दोन्ही प्रवाह प्रबळ दिसत आहेत. मानवी मर्यादा ध्यानीं घेऊन या दोन्ही प्रवृत्तींचा शक्य तितक्या निःपक्षपातीपणें विचार करूं या.

— २ —

लोकशाहीप्रधान राष्ट्रें लोकशाहीप्रधानच राहिलीं आहेत. ज्या देशांमध्यें अनियंत्रित व एकमुखी सत्ता होती त्यांमध्यें ती जाऊन तिच्या जागीं हुकूमशाही आली आहे. ते देश जणूं आगींतून निघून फुफाट्यात पडले आहेत! महायुद्धापूर्वी ज्या देशांत राजशाह्या होत्या त्याच देशांत या हुकूमशाह्या उद्-भवल्या ही महत्त्वाची गोष्ट आहे. लोकशाहीप्रधान राष्ट्रांत राहणाऱ्यांच्या दृष्टीनें ही जरा समाधानाची व उत्साहाची गोष्ट आहे. हीवरून लोकशाहीप्रधान शासनपद्धतीखालीं स्वातंत्र्याचें शिक्षण न लाभलेल्या देशातच फॅसिझम व नाझी-झम शक्य होतात असें आढळून येत आहे. राजशाही व समाजसत्तावाद याच्यामधील पायरी म्हणजेच फॅसिझम असें कांहीं राजकीय तत्त्वज्ञानी म्हणत असतात, प्रतिपादीत असतात. राजशाहीखालीं आज्ञाधारकपणाची, मुकाट्यानें मान खालीं घालण्याची संवय झालेल्याना एका दिवसांत स्वातंत्र्याचीं कर्तव्यें पार पाडतां येणें शक्य नसल्यामुळें रशिया, इटली, जर्मनी, पोलंड तुर्कस्थान, हंगेरी, स्पेन या सर्व देशांत हुकूमशाह्या अस्तित्वांत आल्या. पण लोकशाहीप्रधान देशांत हुकूमशाही येण्याची भीति नको, भीति बाळगण्याचें कारण नाहीं, असें इतिहास सांगत आहेसें दिसतें. इंग्लंड, फ्रान्स, स्विट्झर्लंड, डेन्मार्क, हॉलंड, नॉर्वे, स्वीडन, युनायटेड स्टेट्स यामध्यें अद्यापि तरी हुकूमशहा झालेला नाहीं.

राजांची जुलुमी सत्ता नष्ट करण्याचा हुकूमशाही हाहि एक उपाय दिसतो; पण विस्तवानें विस्तवाशीं खेळणें मूर्खपणाचें व व्यर्थ होय. एक हिंसक प्रकार जाऊन त्याच्या जागीं दुसरा येणें इतकाच त्याचा अर्थ! राजघराण्यातील पुरुषाला पदच्युत करून सामान्य कुळांत जन्मलेला तेथें येऊन बसतो इतकाच फरक. पण राष्ट्राचें दास्य कायमच असतें, स्वातंत्र्य दूरच असतें. अनियंत्रित राजशाही व फॅसिस्ट हुकूमशाही या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. हे एकाच शासनपद्धतीचे दोन पोटभेद अनियंत्रित सत्ता चालविणाऱ्या हुकूमशहांचाच हा एक प्रकार. जर्मनींतील व इटलींतील फॅसिझम पाहिल्यास असें दिसून येईल कीं, मानवांतील अत्यंत निंद्य व अत्यंत जुलुमी प्रवृत्तींच्या हातीं तेथली सर्व सत्ता देण्यांत आली आहे. त्या सिंहासनावर आहेत. अर्वाचीन हुकूमशहा हा मानवांतील अत्यंत निंद्य प्रवृत्तींचा प्रतिनिधि होय.

— ३ —

पण अर्वाचीन हुकूमशहा नैतिकदृष्ट्या अत्यंत कमी दर्ज्याचा असला तरी त्याच्या ठायीं राजकारणातील धूर्तता मात्र भरपूर प्रमाणांत असते. राजकारणांत तो हुषार असतो. हिटलर–मुसोलिनीसारखे लोक सत्ताधारी होतात तेव्हा त्यांच्यासमोर (१) विस्कळित राष्ट्राची एकी करणें, (२) राजकीय चळवळीसाठीं पैसे पुरविणाऱ्या श्रीमंतांचे हितसंबंध संभाळणें व त्यांचा पुरस्कार करणें व (३) आपल्या हातीं सत्ता ठेवण्याची अपरंपार अभिलाषा (हाच सर्वांत महत्त्वाचा हेतु) असे तीन हेतू असतात. पहिले दोन तिसऱ्याच्या पूर्ततेसाठीं असतात. ज्यांतील प्रत्येक व्यक्ति स्टेटशीं राजनिष्ठ असेल असें संघटित एकजुटीचें इटली राष्ट्र आपण निर्माण करीत असल्याची घोषणा करताना मुसोलिनीच्या डोळ्यांसमोर असलेलें राजकीय तत्त्वज्ञान त्याच्या दृष्टीनें बरोबर व खरेंच असतें. आपल्या फायद्यासाठीं वाटेल तेव्हा हातीं धरतां येण्यासारखी, साऱ्या इटलीची मिळून एकमुठी तलवार तो तयार करूं इच्छी. आपल्या हेतूवर उघड टीका होऊं नये असें वाटत असल्यामुळेंच तो भाषणस्वातंत्र्याची गळचेपी करी. सार्वजनिक मतांची, त्यांमुळें इटलीचें अकल्याण होईल म्हणून नव्हे, तर आपल्या सत्तेला धोका येईल म्हणूनच

त्याला भीति वाटे. भांडवलशाही व कामगार यांच्यांत ऐक्य (वस्तुतः तें नाममात्रच असतें) व अविरोध आहेत असें दाखविण्याची खटपट तो करी याचें कारण, देशांत झगडे व लढे असतील तर त्यामुळें स्वतःची सत्ता संपुष्टांत यावयाची व देशांत उघड गोळीबार सर्वत्र होऊं लागल्यास एकाद्या वेळीं त्यांत आपलेंहि डोकें जखमी व्हावयाचें अशी त्याला भीति वाटे हे होय. मुसोलिनी सर्वांना दडपून टाकून समाजास गुलाम करून ठेवूं इच्छीत असे. कारण, असें केले तरच त्याला स्वतःची सत्ता टिकविणें शक्य असे. लोकांना मारूनमुटकून समाधानी ठेवण्याच्या खटाटोपामुळेंच लोकांच्या तक्रारींकडे तो दुर्लक्ष करी. वर्तमानपत्रांना तो हुकूमशहा व त्यांचें धोरण याचें नेहमीं समर्थन करण्यास बजावी. हुकूम न पाळणाऱ्यांना तो गोळया घालून गप्प बसवीत असे व हें सर्व करून अत्यंत प्रामाणिकपणानें व मोठ्या आढ्यतेनें जगाला सांगे, "पाहा, इटलींत कसें ऐक्य आहे! येथें एकहि विरोधी आवाज नाहीं."

इटलींत एकहि विरोधी आवाज नसणें हें स्वतःच्या सत्तेसाठीं ज्याप्रमाणें त्याला महत्त्वाचें वाटे, त्याचप्रमाणें पुंजीपतींच्या सर्व गरजा भागविणें हेहि त्याला अवश्यक वाटे. कारखानदारांना व बँकवाल्यांना तो आधीं स्वेच्छेनें वागण्याचें स्वातंत्र्य देई व मग ते मुसोलिनीला भरपूर पैसे देत असत. त्यांच्याच जोरावर तो सत्ताधीश राहूं शके. मुसोलिनीचे राजकीय खर्च अपरंपार असत. तो हे पैसे कोठून आणीत असे हें समजावयाला इटलींत मुद्रण-स्वातंत्र्य नसल्यामुळें, तेथें वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी असल्यामुळें, मार्ग नाहीं. पण इटलींतील बहुजन-समाज दरिद्री असल्यामुळें मुसोलिनीला हा पैसा कोठून मिळे हें समजण्याला फारशी अक्कल नको. जप्ती व लांचलुचपत या दोन मार्गांनीं तो पैसे उकळी व सत्ता हातीं ठेवी. डाकूगिरी व लांचलुचपत हेच हुकूमशाही शासनपद्धतीचे दोन मुख्य आधार. प्रो. रॉबर्ट सी. ब्रुक्स आपल्या 'हुकूमशहांपासून सोडवा' या सुंदर व उद्बोधक पुस्तकांत लिहितात, "मोठ्यात मोठ्या प्रमाणावर लांचलुचपत व इतर नष्ट-भ्रष्ट प्रकार रूढ करूं इच्छिणाऱ्या सरकारला त्यासाठीं हुकूमशाहीहून अधिक योग्य उपाय सुचविणें कोणत्याहि घटना-विशारदाला अगर सैतानालाहि शक्य नाहीं."

हुकूमशहा सर्व राष्ट्राचें एक हत्यार बनवितो, साधन बनवितो. श्रीमंत लोक अशा हुकूमशहाला देत असलेल्या देणग्यांच्या (अगर लांचांच्या म्हणा हवें तर) पैशाच्या जोरावर हुकूमशहा आपल्या हत्याराला धार लावतो, नीट आकार देतो. हुकूमशहा राष्ट्राचें एकीकरण श्रीमंतांपुढें लाळ घोटून करतो, कारण, त्याला स्वतःच्या हातांत सत्ता हवी असते. स्वतःच्या फायद्यासाठीं, केवळ स्वार्थासाठीं, त्याला हें सर्व करावयाचें असतें. आजकालच्या हुकूमशाहीच्या मागें या मुख्य हेतूशिवाय दुसरें कांहींएक नसतें. मुसोलिनीच्या जीवनाची व कारकीर्दीची थोडक्यांत रूपरेषा पाहिल्यास हें स्पष्ट होईल.

मुसोलिनीहि हिटलरप्रमाणेंच अहंकेंद्री होय. सारें जग आपल्या व्यक्तित्वाभोंवतीं फिरत आहे असें त्यालाहि वाटत असे. त्याच्या सर्व जीवनांत पुढें घुसण्याची, मीपणाची, अहंपूजेची वृत्ति दिसून येई. तो कामगार-कुळांत जन्मला. तरुणपणीं तो सामाजिक क्रांति करणाऱ्यांच्या पक्षांत होता. लहानशा डबक्यांतला मोठा मासा व्हावेंसें त्याला वाटे. त्यानें आपल्या वर्तुळांत, आपल्या डबक्यांत, जास्तींत जास्त मोठा आवाज करण्याची धडपड केली. त्यानें चर्चवर हल्ला चढविला व स्टेटच्या सनदशीर सत्तेविरुद्धहि बंडाची चिथावणी दिली. जागतिक महायुद्धांत त्याच्या हिंसक वृत्तीला भरपूर क्षेत्र लाभलें. तो युद्धप्रिय पक्षाचा पुढारी झाला. युद्धानंतर अत्याचारानें—हिंसेनें अधिकच गोष्टी मिळवितां येतील असें त्याला दिसलें, मोठीं बक्षिसें मिळवितां येतील असें त्याला वाटलें. त्याची स्वार्थेच्छा अपार होती. १९२२ सालीं त्यानें सैन्यावर ताबा मिळविला व ज्यूलियस सीझरप्रमाणें तो रोमवर चाल करून गेला. त्यानें आपण इटलीचे संरक्षक असल्याची घोषणा केली.

इतिहासांत तेच ते नमुने पुनः पुनः दिसतात. मुसोलिनी 'सीझरची छोटी आवृत्ति' वाटतो. सीझरप्रमाणें त्यालाहि वाटत असे कीं, फक्त आपणच जगाला वांचवूं शकूं. सीझरप्रमाणेच आपण मोठे साहित्यसम्राट् आहों व जगज्जेते होऊं शकूं असें त्याला वाटे. हुकूमशहा झाल्यावर मुसोलिनी म्हणाला, "जग एका कलावंताला मुकलें." सीझरप्रमाणेंच तो पोरकट व पदोपदीं स्वतःची जाहिरात-

बाजी करणारा होता. तो प्रसंगीं आपली लठ्ठ, बुटकी व वांकड्या पायांची मूर्ति लोकांना दाखवीत असे. तो मोठा प्रदर्शनबाज होता. तो अमेरिकन सर्कशींतील उत्कृष्ट विदूषक शोभत. तो भुंकणाऱ्याचें सोंग छान करी. डामडौल व आरडाओरडा करण्यांत तो तरबेज होता. त्याची भूमिका नेहमीं उठावाची असे. तो नेहमीं धटिंगणपणा व उद्दामपणा चालूच ठेवी. मिलिटरी परेड करण्याचा त्याला फार नाद असे. जुन्या रोमन नेत्यांप्रमाणें स्वतःचे पराक्रम जगाला जाहीर करण्यासाठीं तो प्रचंड उत्सव–समारंभ योजीत असे. सीझरला 'मी' हें प्रथमपुरुषी सर्वनाम अत्यंत आवडे. तो म्हणे, "मी आलों, मीं पाहिलें, मीं जिंकिलें!" या बाबतींतहि मुसोलिनीनें सीझरचें झकास अनुकरण केलें. "इटलीचा भाग्यविधाता फक्त मीच आहें," अशीच त्याची घोषणा असे. तो एकदां म्हणाला, "मी लोकांना तोलतों, अजमावतों, युद्धांत पुढें ढकलतों, मींच त्यांचा मार्गदर्शक होतों." मुसोलिनी जाणूनबुजून सीझरचें अनुकरण करीत असे. पण तें शहाणपणाचें नव्हतें. सीझरचा अंत कसा झाला ही दुर्दैवी घटना इतिहासानें दाखविली असली तरी मुसोलिनी ती विसरून गेला असें दिसतें.

अति महत्त्वाकांक्षी लोक शेवटीं पस्तावतात हें, थोडा वेळ कां होईना, मुसोलिनीच्या लक्षांत आलें, असें १९२९ ते १९३४ या अवधींत वाटत होतें. या चारपांच वर्षांत त्यानें आपल्या स्वभावाला थोडें नियंत्रित ठेवलें होतें. त्यानें हुकूमशाही हातीं घेतली तेव्हां तो जरा ऐटींत होता. त्याचीं आरंभींचीं भाषणें गोळ्यांनीं भरलेलीं होतीं, त्यांत 'बुलेट' शब्दाशिवाय एक वाक्यहि आढळणार नाहीं. तो साऱ्या जगाशीं युद्ध करावयाला तयार होता. पण मुसोलिनीच्या या अहंमन्यतेमुळें चिडून सारें जग जेव्हां त्याच्याविरुद्ध उठलें तेव्हां तो जरा थंड पडला, त्याच्या वाणींत थोडा संयम आला. तो स्वतःच्या राष्ट्रापुरतें पाहूं लागला, आपल्या राष्ट्राची घडी नीट बसवूं लागला. त्यानें कामगार व भांडवलदार याचे हितसंबंध नवीन पायावर उभारण्याचा यत्न केला. झगडे विसरून सिंह व उंदीर समाधानानें जवळजवळ राहतील, असें त्यानें केलें. कामगाराचा 'संप करण्याचा' हक्क नष्ट करण्यांत आला. आपण 'कॉर्पोरेट स्टेट' स्थापीत असल्याची घोषणा करून त्यानें सर्वत्र सहकार्याचा कारभार सुरू करण्याचें ठरविलें. प्रत्येक धंद्याचें एक कॉर्पोरेशन व्हावयाचें म्हणजे

काय ? मालक व कामगार दोघांचेहि हितसंबंध संभाळणाऱ्या प्रतिनिधींची एक संमिश्र कमिटी स्थापून तीमार्फत त्या त्या धंद्याचें कॉर्पोरेशन चालवयाचें. पण आतापर्यंत तरी रशियांतल्या कम्युनिस्ट–स्टेटप्रमाणेंच इटलींतल्या कॉर्पोरेट–स्टेटची कल्पनाहि कागदावरच राहिली आहे. ती अद्यापि विचारांतच आहे, प्रत्यक्षांत आलेली नाहीं. खरें बोलावयाचें तर असें स्टेट प्रत्यक्षांत यावें म्हणून खटपटच केली गेली नाहीं, योजनाच हातीं घेतली गेली नाहीं, कार्यक्रमच आंखले गेले नाहींत. पण हीं कॉर्पोरेट–स्टेट्स् अस्तित्वांत आलीं तरीहि त्यामुळे कामगारांचा प्रश्न सुटेल असें मुळींच नाहीं. कामगारांची दैना तशीच राहणार. उंदीर व सिंह एकत्र नांदतांना दिसतील खरें; पण उंदीर सिंहाच्या पोटात नांदणार हें उघडच आहे. आणि कामगारांना पुनः संपाची मात्र बंदी ! कामगारांची मजुरी कमी करण्यांत आणि असून त्यामुळें एक–तृतीयांश कामगार कायमचे बेकार झाले. राजकीय उठाठेवी करणारा या नात्यानें मुसोलिनी हुषार असेल. पण त्याच्या ठायीं मुत्सद्देगिरी काडीमात्रहि नव्हती. मुत्सद्देगिरीचें इंद्रियच त्याला नव्हतें. पण तो इटलीच्या अंतर्गत कारभारांत व्यग्र राहिल्यामुळें तात्पुरता एक फायदा तरी झाला. आंतरराष्ट्रीय चावटपणा करावयाला त्याला अवसरच मिळाला नाहीं. कांहीं दिवसपर्यंत जगाला त्याच्या अंगावरचा शांतीचा झगाच दिसला, आंतील लष्करी चिलखत दिसलें नाहीं.

पण इसवी सनाच्या १९२९ व्या सालच्या जुलैच्या अखेरीस त्याला शांति नकोशी झाली असावी. त्याचें शांतीचें वस्तुतः वरपांगी सोंगच होतें. किती दिवस असेंच राहावयाचें असेंच जणूं त्याला वाटत असावें. त्याचे दांत शिवशिवत होते, त्यांचीं नखें फुरफुरत होतीं. शांतीचीं वस्त्रें फेंकून देऊन पुनः संनद्ध होऊन जगाला आह्वान द्यावयाला तो उभा राहूं इच्छीत होता. त्याची सत्ता हळूहळू डळमळीत होत होती, इटॅलियन जनता असंतुष्ट होती. कांहीं तरी बदल व्हावा, असें तिला वाटत होतें. तिचें लक्ष वेधण्यासाठीं कोठें तरी युद्ध उकरून काढण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. ॲबिसिनियावर त्याची वक्रदृष्टि वळली. इटॅलियन तरुणांना तो इथिओपियन लोकांचीं पापें पढवूं लागला, द्वेष–विषाचीं इंजेक्शनें देऊं लागला. प्राचीन काळीं कॅटो जितक्या जंगलीपणानें ‘ कार्थेज धुळीला मिळविलेंच पाहिजे ’ असें म्हणे, तितक्याच

जंगलीपणानें ‘ इथिओपिया मातीस मिळविलाच पाहिजे ’ असें मुसोलिनी ओरडूं लागला.

दुसऱ्यांच्या प्राणांची किंमत देऊन स्वतःचें वैभव वाढविण्यास तो उत्सुक असे. त्याचें डोकें थोडे दिवस जरा ठिकाणावर होतें; पण तें पुनः बेताल होऊं लागलें. भरमसाट उद्दाम भाषा व स्वैर महत्त्वाकांक्षा पुनः वर डोकें काढूं लागल्या. अर्वाचीन इटॅलियनांप्रमाणें तो बोलत नसून तो जणूं अखेरचा, शेवटचा रोमन नमुना दिसूं लागला. शांतिनाथ ख्रिस्ताचें नीतिशास्त्र मुसोलिनीस माहीत नव्हतें. त्या बाबतींत तो अंधळा होता. युद्धदेवाचें—त्या प्राचीन मार्सदेवाचें जुनाट युद्धनीतिशास्त्र त्याला चांगलें समजत असे. तो ओरडून सांगे, “ युद्ध म्हणजे न्याय, युद्ध म्हणजे उदात्तता व धीरोदात्तता, युद्ध म्हणजे बंधुभावात्मक करुणा ! युद्धाचा त्रिवार जयजयकार करा ! ” शांतीची प्रीति असणाऱ्यांची टिंगल करतांना प्राचीन रोमनांनींहि वापरली नसती इतकी अश्लील भाषा तो वापरीत असे. शांततोपासकांना तो “ मूर्खांचा व हत–पतितांचा बाजार ” असें मानत असे. येशू म्हणे, “ शांततोपासकांना पृथ्वीचें राज्य मिळेल, ते पृथ्वीचे वारसदार होतील. ” पण मुसोलिनी अट्टाहासानें सांगे, “ असल्या शांतिब्रह्मांचें पृथ्वीवरून उच्चाटनच केलें पाहिजे.”

मुसोलिनीच्या ठायीं अतिलष्करी मनुष्याची महत्त्वाकांक्षा होती, पण अलौकिक बुद्धि नव्हती. आपण अलेक्झांडर, नेपोलियन, सीझर व्हावें, असें त्याला वाटे. दुसऱ्यांच्या मुंडक्यांशीं खेळ करूं पाहणारी जी मानवप्राण्यांची कोटि आहे तींतील तो होता, पण मानवांतली ही जात झपाट्यानें नष्ट होत आहे. जुलमानें, जुलूम करणारेच शेवटीं नाश पावतात, जुलमाची ज्वाला जुलूम करणाऱ्यांनाच जाळते, त्यांचेंच भस्म करते. हिंसेवर आधारलेलें कोणतेंहि सरकार चिरंजीव झालें नाहीं. तेहतीसशें वर्षांपूर्वी परिणत–प्रज्ञ तत्त्वज्ञान्याप्रमाणें, संस्फूर्त सन्ताप्रमाणें, ॲरिस्टॉटल म्हणाला होता, “ जुलूमशाह्या अत्यंत क्षणभंगुर असतात. जुलमांचीं राज्यें क्षणजीवी असतात. ”

— ४ —

मुसोलिनी सीझरची, तर हिटलर मुसोलिनीची संक्षिप्त आवृत्ति. मुसोलिनी-प्रमाणेंच 'आपण अलौकिक पुरुष आहों' असा भ्रमरोग त्यालाहि जडला. आपण मोठा कलावान् व्हावें असें त्याला वाटूं लागलें. पण साधा घरें रंग-विणारा होण्याइतपतच कलेची देणगी निसर्गानें त्याला दिलेली होती, म्हणून तो चिडला. तो जगावर इतका चिडला कीं, 'या जगावर मी सूड उगवीन' अशी त्यानें जणूं प्रतिज्ञाच केली. त्याच्या दुष्ट स्वभावात विफल झालेल्या महत्त्वाकांक्षेचीं बीजें पेरलीं गेलीं, त्यांना अंकुर फुटले, फुलें-फळें आलीं. त्यांतून जन्माला आलेला विषवृक्ष म्हणजे जुलूमशाही.

आरंभापासूनच तो आडदांड होता. तो ऑस्ट्रियन डॉन क्विक्झोट होता. तो स्वतःला 'अपूर्व पराक्रम करणारा महावीर' मानी. डॉन क्विक्झोटप्रमाणेंच आपल्या कल्पनेच्या पवनचक्कीच्या पंखांवर त्यानें आरोहण केलें, पण डॉन क्विक्झोट मानवजातीला मुक्त करण्यासाठीं स्वार झाला होता, तर हिटलर मानवजातीला गुलाम करण्यासाठीं. आपण दुर्दैवी सरदार असून सारी मानव-जात आपली शत्रु आहे असें तो लेखी.

ध्येयहीन असा तो काल्पनिक शत्रूंवर दांतओंठ खात भटकत होता. तो युद्धाची वाट पाहत होता. अखेर महायुद्धाची संधि आली. युद्ध हाच जणूं त्यानें स्वतःचा धर्म मानला. आपण दुर्दैवी सरदार आहों व जर्मन राष्ट्र जगातील सर्व राष्ट्रांत दुर्दैवी राष्ट्र आहे असें त्याला वाटे. त्याचें व त्याच्या जर्मनीचें एकच ध्येय होतें : आपला शत्रु जें जग त्याचा नाश करणें.

युद्धाला सुरुवात होतांच तोंपर्यंत दाबून ठेवलेल्या त्याच्या मनोवृत्ती खळ-बळून बाहेर पडल्या. तो सांगतो, माझ्या अंगीं उत्साहाचें वारें "संचरलें, मी जणूं बेभान झालों. मीं गुडघे टेंकले व भारलेल्या अंतःकरणानें ईश्वराचे आभार मानले. अशा युद्धाच्या महापर्वणीच्या वेळीं जिवंत असण्याचें भाग्य मला दिल्याबद्दल मीं प्रभूचे आभार मानले."

हें युद्धप्रेम त्याच्याजवळ आजहि तितकेंच आहे. जर्मनी व हिटलर यांविषयीं जगानें आदर दाखवायावस तयार व्हावें यासाठीं जगाला चाबकाखालीं

झोडपून काढण्याकरितां प्रभूनें आपणास पाठविलें आहे असें त्याला वाटे. जगाविषयीं हिटलरच्या मनांत असलेल्या या अढीला दुर्दैवानें सबळ कारणेंहि होतीं. १९१४ सालच्या महायुद्धांत दोस्त विजयी झाले; पण जुलुमांतून, दडप्येगिरींतून हिंसा पुनः शतमुखांनीं तोंड वर काढते ही मूलभूत गोष्ट, हें नागवें सत्य ते विसरले. आजचा हिटलरिझम हा १९१४ सालच्या महायुद्धाचा अपरिहार्य परिणाम आहे. पराजयातून सूडाची भावना जन्मते. युद्धांतील प्रत्येक विजय दुसऱ्या युद्धाचीं बीजें पेरीत असतो. हिटलर निमित्तमात्र आहे. तो भवितव्यतेच्या हातांतील एक साधन आहे. विजयानें मदांध झालेल्या दोस्तांच्या मूर्खपणातून हिटलरिझमचें हत्यार तयार झालें व त्याला धारहि लागली. विजयी दोस्त शतकानुशतकांचा धडा विसरले आणि त्यांच्या या घोडचुकीमुळेंच सारें जग या वेड्या पिशाच्चाच्या तावडींत सांपडलें. स्वतःच्या राष्ट्राच्या वैभवासाठीं साऱ्या जगाचाहि निःपात करण्यास हिटलर मागेंपुढें पाहणारा नव्हता. कारण, तो तें स्वतःचें जीवितकार्यच समजत असे.

हिटलर हें भवितव्यतेच्या हातांतील एक साधन आहे. तो अनेक अर्थांनीं साधन बनला होता. तो द्वेषाचें साधन होतो, स्वार्थाचें साधन होतो; तो अधिक प्रबळ व अधिक हिशेबी अशा दुष्टाच्या हातांतलें बाहुलें होता. त्याचें धोरण त्याचें स्वतःचें नसे. जर्मनींतील लष्करी पेशाचे लोक व कारखानदार हे त्याचें धोरण ठरवीत असत; तो फक्त त्याची अमलबजावणी करीत असे. तो केवळ ट्रॅन्स्मिशनचें साधन होता. आवाज हिटलरचा ऐकूं आला तरी शब्द गोबेल्सचे—त्यानें निश्चित केलेले असत; गोबेल्स हाच द्वेषाचा पुरस्कर्ता व स्वार्थाचा पैगंबर होता. बर्लिनमधील लष्करवाल्यांनीं व रूहर प्रांतातील कारखानदारांनीं हिटलरला हाताशीं धरलें आहे. हिटलर उत्कृष्ट बोलतो, श्रोत्याना रडवी, उचंबळावी. त्याच्यांत तडफ होती. तो आपल्यांतील द्वेषविष दुसऱ्यांत बरोबर टोंचूं शके. म्हणूनच त्याची निवड लष्करवाल्यांनीं व भांडवलवाल्यानीं केली होती. एकाद्या मोठ्या युद्धविशारदाची बुद्धि त्याच्या ठायीं नव्हती. एकाद्या सिव्हिल गुन्हेगाराला असणारी अक्कलहि त्याला नव्हती स्वार्थांध व मदांध लष्करशाहीचा व भांडवलशाहीचा तो एक बेशरम व बेबंध आवाज होता.

हिटलर एकच गाणें, एकच तान, जर्मन चढाईचें एकच गान गाई. त्याच्या मतानें जर्मन तरुणांचे उच्च शिक्षण म्हणजे बंदूक मारावयास शिकणें हें होतें. तो म्हणे, "जीवनाची पहिल्या नंबरची प्रभावी शाळा लष्कर हीच होय." जर्मनीचें परमोच्च ध्येय एकच होतें : तोंडावर अहंकाराची ऐट दाखवून इतर राष्ट्रांमध्यें मिरविणें. तो आपल्या आत्मचरित्रांत लिहितो, "साऱ्या शिक्षणाची योजना अशी हवी कीं, जर्मन तरुणाला आपण दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रांतील तरुणापेक्षा श्रेष्ठ आहों असें निःशंकपणें वाटावें." हिटलरच्या या रानवट मीमांसेला विरोध करणाऱ्या आइन्स्टीन, फ्यूक्टवँटार, थॉमस मॅन, वगैरे सर्वांना त्यानें हद्दपार केलें. तो त्यांनीं 'पृथ्वीवरील घाण' म्हणत असे. आपण श्वासोच्छ्वास करतों तेथें श्वासोच्छ्वास करावयाला ते नालायक आहेत असा शेरा मारून तो गर्वानें सांगत असे, "आम्हाला नकोत हे मुर्दाड लोक! दुसऱ्या राष्ट्रांनीं यांना खुशाल पाळावें. जितके अधिक पाळतील तितकें बरेंच." बुद्धिमान् व प्रामाणिक लोक पाहून तो चिडे, त्याचा अहंकार जणूं दुखावला जाई. जीवनाचें आपलें ध्येय त्यानेंच एका भाषणात अत्यंत मार्मिक शब्दांत असें सांगितलें आहे : जमिनीवर डोकीं तुटून पडलीं आहेत, मुंडक्यांच्या राशी पडल्या आहेत हे पाहणें.

हिटलरचा नाझीझम राजकीयदृष्ट्या व सामाजिक विकासदृष्ट्या मुसोलिनीच्या फॅसिझमपेक्षां खालच्या पायरीचा होता. फॅसिस्ट लोक निदान समाजाची पुनर्रचना करण्याचा दुबळा प्रयत्न करतांना तरी दिसत. पण नाझींना तेवढेंहि श्रेय देता येणार नाहीं. फॅसिस्ट निदान न्यायाचें सोंग तरी करीत असत ; पण नाझींचें सारें तंत्र, त्यांची सारी उठावणी, उभारणी, चेतवणी द्वेषावर उभारलेली असे. अलीकडचें जर्मन राष्ट्र अत्यंत दुर्दैवी होतें. मागील महायुद्धांत पराजय झाला, स्वाभिमान धुळीस मिळविला गेला, पूर्वीच्या वैभवाच्या तुलनेनें दारिद्र्य आलें, या सर्व गोष्टींमुळें ते चवताळलेले, पिसाळलेले होते. भवितव्यतेवर त्यांचा दांत होता, दैवावर त्यांना सूड उगवावयाचा होता ; त्यांना सारखें वाटत असें कीं, कोणी ना कोणी तरी शत्रु आपला नाश करण्यासाठीं कोठेंना कोठें टपून बसलेला असणारच. सदैव अशी भीति असल्यामुळें ते प्रतिप्रहार करावयाला सदैव सज्ज असत. प्रतिप्रहार किंवा प्रहार. जर्मनाना वाटत असलेली ही भीति हेंच हिटलरचें भांडवल असल्यामुळें

अतिशयोक्त प्रचारानें तो त्याच्या मनांतील ही भीति वाढवीत राही, जर्मन जनतेच्या मनांत ज्वलंत द्वेष पेटता राहील असें करी व द्वेषाची आग पेटती राहावी म्हणून तो सारखा वारा घालीत बसे. ज्यू, कल्जी व सारीं परकीं राष्ट्रें तुमचे शत्रु आहेत असें तो जर्मन जनतेच्या कानींकपाळीं ओरडून सांगत असे. साऱ्या जगाविरुद्ध युद्ध पुकारण्याइतकी तयारी नव्हती म्हणूनच आधीं त्यानें फक्त ज्यू व धर्मोपदेशक यांच्याविरुद्ध युद्ध पुकारलें. जर्मनीचें रक्तशोषण हेच लोक करीत आहेत असें त्यानें स्वतःला व जर्मन जनतेला पटवून दिलें होतें. अंध व अविवेकी संतापानें ज्यू व कल्जी या अल्पसंख्य लोकांवर तो सदैव आग पाखडीत असे, त्यांना सळो कीं पळो करून सोडीत असे. ज्यू व धर्मोपदेशक यांविरुद्ध त्यानें चालविलेली ती प्रचंड मोहीम व चालविलेला तो तुफानी प्रचार पाहिला म्हणजे दुःख होत असलें तरी थोडें हंसूंहि येतें. तो प्राचीन लॅटिन कवि 'पर्वताच्या प्रसूति वेदनांनंतर शेवटीं उंदीरच बाहेर पडला!' असें म्हणाला, तेंच हिटलर व त्याचे नाझी सरदार करीत होते. फुलपांखरांशीं लढण्यासाठीं ते आपल्या प्रचंड तोफा चालवीत होते. हिटलरच्या अप्रबुद्धतेला व दुष्टतेला अर्वाचीन इतिहासांत तुलनाच नाहीं! असला नमुना पाहावयाचाच असेल तर मानवजातीच्या आरंभींच्या काळांतच गेलें पाहिजे. मुसोलिनी हा शेवटचा वाटतो आहे, तर हिटलर हा अतिप्राचीन असीरियन नमुना होय असें वाटतें.

— ५ —

इटलींतील व जर्मनींतील जुलुमी भुतावळ पाहिली; आतां अमेरिकेंतील लोकशाहीचा प्रयोग पाहूं या, म्हणजे मनावरचा ताण थोडा कमी होऊन मनाला थोडें बरें वाटेल. मानवजात अनियंत्रित राजशाहींतून हळूहळू लोकशाहीच्या शासनपद्धतीकडे जात आहे, हें आपण पाहत आलों. हा विकास हळूहळू होत आहे, हें खरें. व्यक्ति सत्ताधाऱ्यांसाठीं आहे या रानटी तत्त्वातून शासनसंस्था व्यक्तीसाठीं आहे या सुसंस्कृत तत्त्वापर्यंत मानवजात हळूहळू येऊन पोंचत आहे. व्यक्तीसाठीं शासनसंस्था आहे या तत्त्वाचा आजचा उत्कृष्ट पुरस्कर्ता म्हणजे रूझवेल्ट. तो व्यक्तीच्या जीवनाचें पावित्र्य ओळखतो. वॉल्ट व्हिटमनच्या दैवी प्रतिभेचा स्फुलिंग रूझवेल्टमध्येंहि आहे असें वाटतें.

दोघेहि अमेरिकन असले तरी उच्च आहेत. व्हिटमनप्रमाणें रूझवेल्टलाहि दुःखितांविषयीं सहानुभूति वाटते. कारण, तो स्वतः दुःखांतून जाऊनच शहाणपण शिकला आहे. त्याच्या आजारामुळें त्याचें शरीर दुबळें झालें, पण बुद्धि तीव्र झाली. आजारी पडण्यापूर्वी तो सामान्य राजकारणी होता. पण आजारांत कित्येक महिने पाठीवर पडून राहावें लागल्यामुळें तो जीवनाकडे एका निराळया दृष्टिकोनानें पाहूं लागला. त्याच्यांतील राजकीयपणा जाऊन तो वरच्या दर्ज्याचा मुत्सद्दी झाला.

असेहि कांहीं लोक आहेत कीं, जे रूझवेल्टलाहि हुकूमशहा म्हणतील. पण हा शब्दांचा सम्यक् उपयोग नव्हे. रूझवेल्टला डिक्टेटर म्हणणें हें सर्वस्वी सत्याला सोडून आहे. हुकूमशहा हिंसेच्या बळावर सत्ता काबीज करतो व दमदाटी देऊन अगर धाकदपटशा दाखवून ती हातीं ठेवतो. रूझवेल्टला लोकांनीं निवडून दिले व पुनः निवडून येण्यासाठीं त्याला लोकांच्या सदिच्छेवरच विसंबावें लागेल. हुकूमशहा भाषणस्वातंत्र्याला भितो, तर रूझवेल्ट भाषणस्वातंत्र्याचा कैवारी आहे. हुकूमशहा जीवनावधि सत्ताधारी होऊं पाहत असतो, तर रूझवेल्टच्या मनांत असें कांहींहि नाहीं. हुकूमशहा जुलुमानें विरोधी आवाज मारून ऐक्य निर्मितो, तर रूझवेल्ट सहकार्यानें ऐक्य स्थापूं पाहतो. हुकूमशहा आपल्या विरोधकांचे खून करतो, तर रूझवेल्ट त्यांना मित्र करूं पाहतो. हुकूमशहा जनतेला धाक घालतो, तर रूझवेल्ट तिला उत्तेजन देतो. हुकूमशहा 'बळी तो न्यायी' असें प्रतिपादितो, तर रूझवेल्ट 'न्यायी तो बळी' असें मानतो. हुकूमशहाच्या तोंडावर सदैव आंठ्या, तर रूझवेल्टच्या मुखावर सदैव स्मित.

रूझवेल्टच्या स्मितांत त्याच्या स्वभावाची व चारित्र्याची किल्ली आहे. रूझवेल्टची मुद्रा पाहून हा निर्मळ सदसद्विवेकबुद्धि व उदार हृदय असलेला पुरुष असावा असें वाटतें. त्याच्या चेहऱ्यावरून तो धूर्त पण प्रांजळ असावासें वाटतें. त्याची मनोबुद्धि निरोगी असावी असें वाटतें. त्याच्या मुद्रेंत बावळटपणा दिसत नाहीं. त्याच्या चेहऱ्यावर कलावंताची सुभगता दिसून येते. रूझवेल्ट हा सत्कर्मांचा कलावंत आहे. सुस्वभाव हें त्याचें मुख्य वैशिष्ट्य. प्रयोग करण्यास शिकण्याची सदैव तयारी हें त्याचें दुसरें वैशिष्ट्य. "किती झालें तरी मीहि मनुष्यप्राणीच आहें; अर्थात् मीहि चुकणारच", असें

तोहि लेनिनप्रमाणेंच मनमोकळेपणानें म्हणतो. जगांतील अन्याय व दुःखें दूर करण्यासाठीं एकाच विश्वव्यापक रामबाण उपायावर तो विसंबून राहत नाहीं, निरनिराळे कायदे करूं पाहतो. या कायद्यांच्या योगें सामाजिक, राजकीय व आर्थिक न्याय अधिक प्रमाणांत येईलसें त्याला वाटतें व तदनुसार तो नवेनवे कायदे करतो. यासाठीं त्यानें आपल्या सभोंवतीं वेंचक बुद्धिमान् माणसें गोळा केलीं आहेत. वर्तमानपत्रें टिंगलीच्या आवाजात "रूझवेल्टच्या बुद्धीची ठेव" असें या लोकांना उद्देशून म्हणत असतात. हे लोक अमेरिकेंतील व्यावहारिक विचारांचे उत्तम पुरस्कर्ते आहेत. राजकीय अनुयायांच्यापेक्षां बुद्धिमान् सल्लागारांचा सल्ला घेण्याचा ज्ञातपणें निश्चय करून रूझवेल्टनें जणूं रक्तहीन क्रांतीचेंच युग सुरू केलें. प्रोफेसर योले व त्याचे सहकारी यांच्या मार्गदर्शकत्वाखालीं प्रेसिडेंट रूझवेल्ट राजकीय तत्त्वज्ञान शिकूं लागला तेव्हां ती एक महत्त्वाची गोष्ट झाली यात शंकाच नाहीं. अमेरिकेच्या इतिहासांत ती तारीख क्रांतिकारक आहे. रूझवेल्ट तेव्हां जणूं पदवी–उत्तर अध्ययनच करीत होता आणि आतां तर तो एम्. एस्. म्हणजे मुत्सद्देगिरी–पारंगत होऊं पाहत आहे.

रूझवेल्ट मुत्सद्दी आहे. रूझवेल्टखेरीज आजच्या पिढींतल्या कोणासहि हा शब्द लावतां येणार नाहीं. लेनिन मुत्सद्दी होता; पण आपल्याइतका पात्र दुसरा मुत्सद्दी त्याला युरोपांत आपल्यामागें ठेवतां आला नाहीं. रॅम्से मॅक्डोनल्डमध्यें ती पात्रता होती ; पण तो मुख्य प्रधान झाला व त्याच्यांतील ती पात्रता गेली ; बकिंगहॅम–पॅलेसजवळ येतांच त्याचें डोकें बिघडलें ; पण प्रेसिडेंट निवडून आल्यावर रूझवेल्टमधले मुत्सद्देगिरीचे गुण मेले तर नाहींतच, उलट वाढले. त्याचा वरिष्ठ वर्गांत जन्म झाला आहे व त्याला उच्च शिक्षण लाभलें आहे तरीहि खालच्या वर्गांतील लोकाचे संसार सुखी व सुंदर करण्यासाठीं तो सदैव धडपडतो, तोच विचार त्याच्या डोक्यांत सदैव चालू राहतो. पूर्वीच्या प्रेसिडेंटाप्रमाणें त्याला भांडवलदार व कारखानदार यांच्याबद्दल फारशी सहानुभूति नाहीं. भांडवलदार दुसऱ्यांना दारिद्र्यांत लोटून स्वतः मातबर होत असतात. रूझवेल्ट त्यांचा नाहीं. आपल्या भाषणांतून त्यानें स्वार्थान्ध माणसांना दयामाया न दाखविण्याचा निश्चय पुनः पुनः जाहीर केला आहे.

त्याचे शब्द म्हणजे पोकळ वचनें नसतात, तो कृतींचा आरंभ असतो. रूझवेल्ट हा व्यवहारकुशल अमेरिकन आहे. अमुक गोष्टी झाल्याच पाहिजेत असें त्याचें धोरण असतें. होत नाहींत म्हणजे काय! कूलिज म्हणे, "आपल्या देशांत कायदे वाजवीपेक्षां जास्त आहेत." रूझवेल्ट म्हणतो, "कायदे वाजवीपेक्षां कमी आहेत, आणखी पाहिजेत." याचा अर्थ हाच कीं, प्रबळापासून दुर्बळांचें रक्षण करण्यास पुरेसे कायदे नाहींत. म्हणून अध्यक्षपदीं निवडून येतांच रूझवेल्ट निश्चयानें व खंबीरपणें नव्या कामास लागला. हें नवें काम म्हणजे न्यायाची सुसंबद्धता—नवी व्यवस्था. असें रूझवेल्टनें केलेल्या कायद्यांचें थोडक्यांत परीक्षण केल्यास दिसून येईल कीं तो ख्रिश्चन धर्माची अमलबजावणी करूं पाहत होता. ख्रिश्चन तत्त्वें सामाजिक जीवनांत आणण्याचा त्याचा तो प्रचंड प्रयोग होता. या त्याच्या नव्या कायद्यांना 'नवा कारभार' असें म्हणतात. त्याच्या 'न्यू डील'चे प्रमुख विशेष पाहूं या.

१९४३ सालच्या मार्चच्या चौथ्या तारखेस हूव्हरनें रूझवेल्टला एके काळीं अति प्रबळ असलेल्या आर्थिक रचनेचें प्रेत दाखविलें. नवा प्रेसिडेंट रूझवेल्ट झाला होता व त्याच्यावर आर्थिक रचनेंत प्राण ओतण्याच्या आवश्यक कार्याची जबाबदारी होती. रूझवेल्टनें तें काम हिंमतीनें उचललें व त्यांत यश मिळविलें. बॅंकर्सना त्यानें अधिक प्रामाणिक केलें. ते कमी दिवाळें काढतील असें केलें. त्याच्यापूर्वी कित्येक वर्षे इतके प्रामाणिक बॅंकर्स कधींहि नव्हते. पूर्वी सदैव निघत असलेलीं दिवाळीं निघणें बंद झालें. ठेवी ठेवणाराचा बॅंकवाल्यांवर पुनः विश्वास बसला. दारूबंदीचा पोरकट कायदा त्यानें रद्द केला. कृतज्ञ राष्ट्रानें पुनः शहाणपणा व विवेक यांचा अंगीकार केला. दारू मिळून राष्ट्र ताळ्यावर आलें.

नंतर तो शेतकऱ्यांना दारिद्र्यांतून वर काढण्यासाठीं पुढें सरसावला. त्यानें शेतकऱ्यांना सांगितलें कीं, 'कमी पैदास झाली तर सरकार नुकसानभरपाई देईल.' यामुळें स्टॉक-एक्स्चेंजमधले वायदेवाले, रेलरोड व इतर आंतरराष्ट्रीय उद्योगधंद्यांचे चालक व इतर लहानमोठे श्रमजीवी लोकांच्या रक्तावर पोसणारे व आपल्याच बंधूंच्या हालअपेष्टांवर जगणारे लोकहि स्तंभित झाले.

अकिंचनांची बाजू घेणारा त्यांचा कैवारी प्रेसिडेंट उभा राहतांच स्वार्थी पुंजीपतींचे खेळ बंद झाले, त्यांचीं स्वार्थी कारस्थानें बंद पडलीं. पण अजूनहि त्यांचे आश्चर्य कमी झालें नाहीं. रूझवेल्टच्या नव्या डीलला घाणेरडीं नांवे ठेवून ते त्याचें श्रेय नष्ट करूं पाहत होते. संपत्तीची अधिक चांगल्या रीतीनें विभागणी व्हावी असें तो म्हणतो. पण टीकाकार म्हणतात, 'रूझवेल्ट समाजवादच आणीत आहे.' गरिबांचीं घरे नीट बांधून देण्याची योजना, आजारीपण, बेकारी व वार्धक्य यांसाठीं तरतूद करणें, बालश्रमाची पद्धत बंद करणें, इ० कार्यक्रमांकडे हे टीकाकार भीतीनें पाहतात. वारसांवरील कर वाढविणें, बड्या उत्पन्नावरचे कर वाढविणें, असंरक्षित दरिद्री जनतेच्या हक्कांची पायमल्ली घटनाकायद्यानें होत असल्यास त्या घटनेंत चूक आहे असें दाखविणें, इत्यादि रूझवेल्टच्या कृत्यांनीं पुंजीपती घाबरले, गडबडले. सरकारी भांडवल घालून टेन्नेस्सी व्हॅली समाजाच्या उपयोगासाठीं नांवारूपास आणण्याचा प्रयोग पाहून तर हवा तसा फायदा घेण्यास सवकलेले चद्रूलाल थक्कच झाले ! हा प्रयोग फार धोक्याचा आहे, यांत क्रांतीचीं—समाज-वादाचीं बीजें आहेत असें ते म्हणूं लागले. पण हा प्रयोग यशस्वी करण्याची मोठी महत्त्वाकांक्षा रूझवेल्ट धरीत आहे. तो या शेवटच्या प्रयोगांत यशस्वी झाल्यास उद्योगधंद्यांतील स्वार्थीपणावर प्राणांतिक प्रहार केलासें होईल, म्हणून हे धोरण अयशस्वी करण्यासाठीं वॉलस्ट्रीटमध्यें कारस्थानें चालू आहेत.

रूझवेल्ट भांडवलशाहीचा पुरस्कर्ता आहे कीं समाजवादी आहे? सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ जे. एम्. केनीस एकदां म्हणाला, "रूझवेल्ट फारच उदात्तपणें बरोबर वागत आहे." प्रोफेसर मोले म्हणाला, "तो फारच उदात्तपणें जहाल होत आहे." पण खुद्द रूझवेल्टनेंच एका भाषणांत 'मी मध्यबिंदूच्या जरा डावीकडे झुकणारा आहें' असें म्हटलें. त्याचे प्रतिगामी प्रतिस्पर्धी त्याला शंभरनंबरी समाजवादी म्हणतात व राजकीय हेतूंसाठीं तो भांडवल-दाराचा मित्र असल्याचें नुसतें ढोंग करीत आहे असा त्याच्यावर आरोप करतात. पण त्याचे जहाल प्रतिस्पर्धी तो हाडाचा खरा भांडवल-शाहीचाच पुरस्कर्ता आहे असें म्हणतात. त्याचा सर्व खटाटोप मरणोन्मुख भांडवलशाहीला मरूं न देण्यासाठींच आहे. आपण कोणती बाजू घ्यावी हें रूझवेल्टलाहि निश्चित माहीत नसेल. भांडवलशाही जिवंत राहणें शक्य

असल्यास तो तिच्यांत नवीन प्राण ओतील; पण ती मरणारच असल्यास तो तिला पुरावयासहि तयार होईल व नवा प्रयोग करील. आज तरी जपून सावधगिरीनें तो मार्ग पाहत आहे.

दुसऱ्या शब्दांत हेंच सांगावयाचें तर रूझवेल्ट भांडवलशाहीचाहि पुरस्कर्ता नाहीं वा समाजवादीहि नाहीं; तो प्रयोगवादी आहे, फार हुषार सेल्समन आहे. आपल्या धोरणाला चालना कशी मिळेल, आपलीं धोरणें कशीं खपतील हें तो छान जाणतो. कायदेमंडळांत व जनतेसमोर आपलीं धोरणें मांडून तीं त्याच्या गळीं उतरविण्यांत रूझवेल्टचा हातखंडा आहे. तो पुरोगामी सुधारणा प्रतिगामी भाषेंत मांडतो, जहाल बाबींना सनातनी पोषाख देतो. अनुकूल काळाची व स्थळाची वाट पाहण्यास तो शिकला आहे. तो एकादें नवें बिल एकदम आणीत नाहीं. योग्य वेळीं व योग्य स्थळीं तो तें मांडील. तो पराभवहि खेळाडू वृत्तीनें पत्करतो, पण आपलें घोडें नव्या दमानें पुनः पुढें दामटावयास तो उभा राहतो. थोडक्यांत सांगावयाचें तर आपलें गिऱ्हाईक कसें खुष ठेवावें हें त्याला नीट माहीत आहे. आणि गिऱ्हाइकाला—युनायटेड स्टेट्स्‌मधील सर्व जनतेला—खुष, राजी ठेवण्यासाठीं रूझवेल्ट आपल्या अव्यवस्थित आर्थिक व सामाजिक रचनेंत चतुर्विध सुधारणा करूं पाहत आहे:—

(१) कारखानदारांनाहि योग्य नफा देणें, (२) शेतकऱ्यांची चणचण दूर करणें, त्यांच्या गरजा भागविणें, (३) कामगारांना कमी तासांचा आठवडा व अधिक मजुरी देवविणें, (४) धंदेवाइकांस प्रामाणिकपणें उदर-निर्वाह चालवितां येईल अशी भरपूर, पुरेशी संधि देणें.

राष्ट्रव्यापी न्यायस्थापनेचा हा नवा प्रयोग आहे. याला नवें अनुरूप नांव अजून मिळालेलें नाहीं; कोणी त्याला नियमित, नियंत्रित केलेला भांडवलवाद म्हणतात, तर कोणी त्याला संयमी लोकशाही म्हणतात. कोणी त्याला गिल्ड-सोशॅलिझमहि म्हणतात. रूझवेल्टनें स्वतः या प्रयोगाला 'सदनशीर आर्थिक व्यवस्था' असें नांव दिलें आहे. कदाचित् 'समाजवादी भांडवलशाही' हें नांवहि त्याला शोभेल. पण नांवाशीं खरोखरी काय करावयाचें आहे? हेतूचेंच महत्त्व खरें. रूझवेल्टचा सामाजिक प्रयोग व लेनिनचा साम्यवादी कम्युनिस्ट

प्रयोग हे दोन्ही या आपल्या अंधाऱ्या शतकांतले दोन मार्गदर्शक दीपस्तंभच होत. या दोहोंत अमेरिकन प्रयोगच अधिक उदात्त व हिंसेवर आधारलेला नसल्यामुळें यशस्वी होण्याची अधिक शक्यता असलेला असा आहे.

युनायडेट स्टेट्स् म्हणजे कांहीं अद्यापि आदर्श देश नव्हे. त्यांत खूप अन्याय आहे, गोंधळ आहे, करप्शन आहे, लांचलुचपत आहे, वशिलेबाजी आहे, दैन्य आहे, दुर्दशा आहे, खूप क्लेशहि आहेत. तो अद्यापि रानटीपणाच्या जंगलांतच वावरत आहे. पण त्यांतून मार्ग काढण्यासाठीं प्रेसिडेंट रूझवेल्ट प्रामाणिकपणें प्रयत्न करीत आहे. कन्फ्यूशियस किंवा मॅझिनी यांच्याइतका मोठा रूझवेल्ट नसला, तरी तो निःसंशय शूर, निर्भय व प्रामाणिक आहे व त्यानें चालविलेला सामाजिक प्रयोग बहुधा फसणार नाहीं. त्याच्यामागून कोणीहि प्रेसिडेंट होवो, त्याने रूझवेल्टच्या पावलावर पाऊल टाकल्याशिवाय चालणार नाहीं. कारण, त्यानें अमेरिकेला सरळ सरळ मोठ्या प्रश्नास तोंड द्यावयास लावले आहे. परिस्थितीकडे कानाडोळा करून आता भागणार नाहीं.

— ६ —

अमेरिकाच आजच्या जगाची आशा आहे. ती शांततेच्या मार्गांनीं कशी प्रगति करून घ्यावी हें शिकवीत आहे. १९४२ पर्यंत अमेरिका अज्ञात होती. राष्ट्रांच्या प्रयोगासाठीं जणूं ही चांगली टेस्ट-टयूब व्हावी अशी प्रभूची इच्छा असल्यामुळे ती तो बरेच दिवस तयार करीत असावा. जुनाट झालेल्या युद्धाच्या मार्गानेंच आपलीं भांडणें मिटविण्यास शिकलेले युरोपांतील लोक येथें आल्यावर आपआपले मतभेद, आपआपल्या अलग राष्ट्रीयता व आपआपलीं धार्मिक पृथक्त्वें विसरून सस्नेह सहकार्यानें नांदूं लागतात. युनायटेड स्टेट्स् हेंच पहिले आंतरराष्ट्रीय राष्ट्र आहे. परस्परांशीं झगडणाऱ्या व लढणाऱ्या जातीजमातींचें एका प्रेमळ राष्ट्रकुटुंबात परिवर्तन करणें शक्य आहे हें अमेरिकेनें प्रत्यक्ष प्रयोगानें सिद्ध केलें आहे. सर्व मानवजात एक कशी होईल या तत्त्वज्ञानी संतांपुढें सदैव उभ्या असलेल्या प्रश्नाचें—शाश्वत संशोधन चालू असलेल्या या कूटाचें—अंतिम उत्तर अमेरिकाच देईलसें दिसतें. इंग्लंडची स्वातंत्र्यप्रीति, फ्रान्सची सौंदर्यप्रीति, जर्मनीची विज्ञानभक्ति, रशियाची गूढताभक्ति,

आयर्लंडचें काव्यप्रेम, इटलीचें संगीतप्रेम, आफ्रिकेची उत्कट विकारिता, नॉर्वे व स्वीडन यांचें धैर्य, इंग्लंडची शान्ति, पौर्वात्यांची दिव्यतेची तहान, या सर्व गोष्टी, हे सारे सुंदर विशेष अमेरिकेच्या भट्टींत घातले जात असून त्यांतून नव्या संस्कृतीचें सुंदर सोनें निर्माण होत आहे.

आज या क्षणीं आजूबाजूस अंधार आहे, प्रतिगामी शक्ती जोरात आहेत—घोड्यावर स्वार आहेत. जग आणखी एका महायुद्धाकडे खेंचलें जात आहे. पण येत्या कांहीं वर्षांत केवढीहि मोठी आपत्ति आली तरी सुद्धां ती जाईल, ती जाणारा रोग ठरेल. कारण, मानवजातीचे शरीर निरोगी आहे; तें हुकूमशाहीच्या व युद्धाच्या रोगांशीं झगडून त्यांना पिटाळून लावील. मानवजात पूर्ण निरोगी होईल. तिला हे रोग पुनः जडणार नाहींत. मानवजात अपार व अनंत चुका—घोडचुका—करते हें तर खरेंच; पण तिला न्यायाचीहि शाश्वत भूक आहे. गटेच्या फॉस्टप्रमाणें ती चुका करून शिकत आहे. ती कितीहि मूर्ख, रानटी, जंगली, दांभिक, युद्धप्रिय, असहिष्णु, स्वार्थी व मुत्सद्दी असली तरी अंतःप्रेरणेनेंच जणूं प्रकाशाकडे जात आहे. तिला प्रकाशाकडे जाण्याची इन्स्टिंक्ट ( उपजतबुद्धि ) आहेच. अमेरिका तिची मार्गदर्शक आहे असें दिसतें. अमेरिकेंतील सामाजिक लोकसत्ता एकादे दिवशीं सर्व जगाचें सामाजिक लोकशाहींत परिवर्तन करील, सर्व जगाला सामाजिक लोकशाहीकडे नेईल.

समाप्त

# आमचें प्रकाशन

( शिल्लक नसलेल्या पुस्तकांची किंमत दिलेली नाहीं. )

* १-२ **सत्याचे प्रयोग** ( द्वितीयावृत्ति ) : म. गांधी

* ३ **खादी-मीमांसा** ( द्वितीयावृत्ति ) : वाळूभाई मेहता

४ **स्वराज्य-शिष्टाई** : म. गांधी

५ **संयम कीं स्वैराचार** ? ( खंड १ ला ) : म. गांधी

६ **हिंडलग्याचा प्रसाद** : काका कालेलकर

* ७ **हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें व पुनर्घटना** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : एस्. राधाकृष्णन् २-८-०

* ८ **उपनिषदांतील दहा गोष्टी** ( तृतीयावृत्ति )
लेखक : शंकरराव देव ०-१२-०

* ९ **विद्यार्थी-जीवन** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : श्री. स. महाजन

*१० **फिलिपाइन्सच्या स्वातंत्र्याचा इतिहास**
लेखक : त्र्यं. र. देवगिरीकर १-४ ०

११ **कॉंग्रेसचा इतिहास** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : डॉ. पट्टाभि सीतारामय्या

१२ **समाजवादच कां** ? ( द्वितीयावृत्ति )
लेखक : जयप्रकाश नारायण २-०-०

१३ **खानबंधू** : महादेवभाई देसाई

१४ **जवाहरलाल नेहरू** : आत्मचरित्र (द्वितीयावृत्ति) पं. नेहरू १२-८-०

*१५ **विश्राम** ( पंचमावृत्ति ) : साने गुरुजी १-८-०

*१६ **भारतीय संस्कृति** ( चतुर्थावृत्ति ) : साने गुरुजी ३-०-०

१७ **प्रसाद-दीक्षा** : म. गांधी

१८ **भिल्ल साधु गुलामहाराज** : शं. वि. ठकार

*१९ **आधुनिक भारत** : आचार्य जावडेकर

*२० **हिमालयांतील प्रवास** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : काका कालेलकर २-४-०

२१ **गांधीजींचें विविध दर्शन** ( द्वितीयावृत्ति )
संकलनकार : एस. राधाकृष्णन् २-८-०

*२२ **जिवंत व्रतोत्सव** ( द्वितीयावृत्ति ) : काका कालेलकर ३-१२-०
२३ **गांधी-विचार-दोहन** : किशोरलाल मश्रूवाला
२४ **सत्याग्रही महाराष्ट्र** : प्रेमा कंटक ३-०-०
*२५ **अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र ?** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : जॉन रस्किन २-०-०
*२६ **जीवन-दर्शन** ( तृतीयावृत्ति )
लेखक : महाकवि खलिल जिब्रान १-१२-०
२७ **ग्रामोद्योगाचें अर्थशास्त्र** : जे. सी. कुमारअप्पा
२८ **बापू** : घनश्यामदास बिडला
२९ **संस्कृतीचें भवितव्य** ( द्वितीयावृत्ति ) : एस्. राधाकृष्णन् १-४-०
३० **महात्मा गौतमबुद्ध** : एस्. राधाकृष्णन् १-०-०
३१ **जीवन आणि साहित्य** : आचार्य स. ज. भागवत २-८-०
३२ **प्राचीन साहित्य** : कविसम्राट् रवींद्रनाथ ठाकूर १-८-०
३३ **संयम कीं स्वैराचार ?** ( खंड २ रा ) : म. गांधी १-१२-०
३४ **हिंदु-मुसलमान-ऐक्य** : आचार्य जावडेकर ३-०-०
३५ **गीता-हृदय** (तृतीयावृत्ति) : साने गुरुजी ०-१२-०
३६ **हिंदूंचें समाजकारण** : काका कालेलकर २-४-०
३७ **द्विखंड हिंदुस्थान** : डॉ. बाबू राजेंद्रप्रसाद ११-०-०
३८ **कॉंग्रेस-कथा** : ( द्वितीयावृत्ति ) : गो. आ. देशपांडे ४-८-०
३९ **भगवान् बुद्धासाठीं** : शंकरराव देव ३-८-०
४० **आचार्य कृपलानी** : निवडक लेख व भाषणें ३-०-०
४१ **वाल्मीकि–आश्रमांतील प्रवचनें** : आचार्य जावडेकर १-०-०
४२ **संपूर्ण स्वदेशी** : म. गांधी २-४-०
४३ **प्रवासी** : महाकवि खलिल जिब्रान २-०-०
४४ **ज्ञानेश्वरी–अंतरंग** डॉ. रा. द. रानडे २-८-०
४५ **गांधीजींचें मानस** : म. गांधी ४-०-०
४६ **दिल्ली-डायरी** : म. गांधी ६-०-०
४७ **मानवजातीची कथा** : डॉ. हेन्री थॉमस ८-०-०
४८ **भारतीय राष्ट्रवादाचा विकास** : प्रा. न. र. फाटक ४-०-०

---

* हीं पुस्तकें मुंबई, मध्यप्रात व वऱ्हाड यांतील सरकारी विद्याखात्यांनीं शाळांतील वाचनालयांकरितां व बक्षिसांकरितां मंजूर केलीं 'आहेत

